# प्रस्तावना

संग्रहालयाची कल्पना भारतात नवीन नाहीं भारतात पुरातनकालापासून संग्रहालयें व चित्रशाळा अस्तित्वात असल्याचा बोलका पुरावा म्हणून ग्रामीण देवालयाकडे आपल्याला बोट दाखविता येईल एखाद्या खेडेगांवातील तत्कालीन देवालय हें बहुधा कलाकुसरीचें व शिल्पकलेचें दर्शन घडविणारें एक छोटेंसें संग्रहालयच असे संगीत व नृत्य, शिल्पकृति व रंगचित्रें, लाकडी व हस्तिदंती कोरीव कलाकृति आणि वस्त्रें व धातूंचीं कामें यासंबंधींची अभिरुचि जनतेंत तेथूनच निर्माण झाली त्याखेरीज आपल्या उदार आश्रयानें कलेचें संवर्धन करणारे राजेलोक बहुधा सार्वजनिक त्याचप्रमाणें खाजगी संग्रहालयें व चित्रशाळा तयार करीत असत आपल्या पुराणग्रंथात, चित्रशाळा व विश्वकर्मा-मंदिरें याचा उल्लेख आढळतो मनोरंजनाचीं साधनें तसेंच शैक्षणिक व सांस्कृतिक केन्द्रें या दृष्टीनं त्याना विशेष महत्त्व होतें

प्राचीन भारताची ही परंपरा मध्ययुगीन कालातहि सातत्यानें टिकून होती लहान लहान राज्याचें साम्राज्यात रूपांतर झाल्यानंतर अनेक मातब्बर सरदारघराणीं उदयास आलीं सम्राटानीं निर्माण केलेल्या चित्रशाळा व संग्रहालयें याच्या जोडीला या श्रीमंत व शोकीन सरदाराच्या जवळ असलेला वस्तुसंग्रहहि बराच मोठा व मौल्यवान असे कधीं जित राज्यांतून मिळविलेल्या विजयचिन्हाच्या स्वरूपात, तर कधीं रसिक व्यक्ति व कलाप्रेमी घराणीं यानीं संपादन केलेल्या विविध वस्तूंच्या स्वरूपात हे वस्तुसंग्रह तयार होत, तर कधीं जगांतील अद्भुत वस्तूंचा अभ्यास करण्याची आवड असलेल्या शास्त्रज्ञानीं व व्यासंगी विद्वानांनीं जमविलेल्या नानाविध वस्तूंच्या रूपात या संग्रहाचा विकास झालेला असे या संग्रहालयाची सुरुवात कशीहि झालेली असली तरी, त्याच्या द्वारें लोकशिक्षणाचें व लोकरंजनाचें कार्य साध्य झालें, तसेंच लोकाची प्रयोगशीलता व अभ्यासू वृत्ति जागृत करण्यासहि त्याची पुष्कळच मदत झाली यात मुळींच शंका नाहीं

अशी पार्श्वभूमि लाभल्यानंतर, गतकालीन परंपरेला यत्किंचितहि बाध येऊं न देतां, आधुनिक संग्रहालयाचा भारतात विकास होत राहावा यात नवल वाटण्याजोगें असें काहीं नाहीं संग्रहालय शब्दाचा सध्यांचा रूढ अर्थ लक्षात घेता, भारतातील आद्य संग्रहालय सन १८१४ मध्ये स्थापन झालें असें म्हणावयास हरकत नाहीं, कारण त्यावर्षी बंगालच्या एशियाटिक सोसायटीनं, भूस्तरशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणीशास्त्र, मानवशास्त्र व पुराणवस्तुशास्त्र एतद्विषयक प्रदर्शनीय वस्तूंचा संग्रह एकत्रित करून या संग्रहालयाची मुहूर्तमेढ रोवली पुढे त्यात रंगचित्रें, वस्त्रप्रावरणें व इतर विविध कलाकृतींची झपाट्यानें भर पडत गेली आणि कालान्तरानें त्याचा विस्तार होत होत आज तें 'भारतीय संग्रहालय, कलकत्ता' या नावानं ओळखलें जात आहे आशियाखंडातील एकमेव महान् संग्रहालय म्हणून त्याचा उल्लेख करावयास हरकत नाहीं

यानंतर पाच वर्षांच्या अवधींतच मद्रास येथील लिटररी सोसायटीनंहि अशाच तऱ्हेच्या एका संग्रहालयाची योजना आखली पुढें १९ व्या शतकाच्या मध्यास मुंबईस व्हिक्टोरिया व आल्बर्ट संग्रहालय आणि आशियांतील पहिलें वैद्यकीय संग्रहालय स्थापण्यात आलें अशाच प्रकारें प्रांताच्या तसेंच भारतीय संस्थानाच्या अनेक राजधान्याच्या ठिकाणीं संग्रहालयें स्थापन होत जाऊन या शतकाच्या अखेरीस भारतातील बहुधा प्रत्येक महत्त्वाच्या शहरात एक एक संग्रहालय अस्तित्वात आलें

शैक्षणिक तसेंच सांस्कृतिक केंद्रें म्हणून संग्रहालयांचे प्राचीन कालापासून अत्यंत महत्त्व आहे भारतीय गणराज्याच्या स्थापनेनंतर तर आपल्या राष्ट्रीय जीवनात त्याना विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे प्रत्येक व्यक्तीनें प्रशासनसंस्थेंत भाग घेणें म्हणजे लोकशाही मात्र प्रशासनसंस्थेंत भाग घेण्याचें हें काम जाणीवपूर्वक व समजूतदारपणें करण्यात आलें पाहिजे तसें झालें नाहीं तर तें लोकशाहीला तारक होण्याऐवजीं मारकच होण्याचा संभव अधिक असतो या दृष्टीनें सर्व नागरिकाच्या शिक्षणाची तरतूद करणें हें आधुनिक शासनसंस्थेचें एक अटळ कर्तव्य आहे शाळा, महाविद्यालयें व तांत्रिक शिक्षणसंस्था यामधून ज्या रूढ पद्धतींनुसार शिक्षण दिलं जातें त्या पद्धति हा उद्देश सफल करण्यासाठीं पुरेशा नाहींत हें सर्वमान्य झालें आहे कारण ह्या शिक्षणसंस्था, सर्व वर्गांतील लोकाच्या व आबालवृद्धाच्या शिक्षणविषयक गरजा भागवूं शकत नाहींत आजच्या नागरिकाला ज्या विषयाचं ज्ञान असणें आवश्यक आहे, त्या सर्व विषयाचा अंतर्भाव शालेय पाठ्यक्रमात झालेला नसतो आणि तसा तो करणें शक्यहि नसतें संग्रहालयांतील किंवा एखाद्या चित्रशाळेंतील दृक्-दर्शनानं लोकाच्या मनावर जो प्रभावी परिणाम घडून येतो तो ग्रंथालयाद्वारा दखील होऊं शकत नाहीं, आणि म्हणूनच शिक्षक व ग्रंथ याच्याद्वारें मिळणाऱ्या शिक्षणाच्या जोडीला दृक्-श्राव्य साधनाची जोड मिळणें अत्यावश्यक आहे तसें झाल्यास, सर्व वर्गांतील लोकाच्या व आबालवृद्धाच्या शिक्षणविषयक गरजा भागविल्या जातील आणि ज्ञानाचीं सर्व क्षेत्रें सर्वांस सर्वांना खुलीं होतील

या दृष्टीनं विचार केल्यानंतर, कलासंग्रहालय व विज्ञानसंग्रहालय यांच्या जोडीनें तंत्रविज्ञान, आरोग्यशास्त्र, कृषिशास्त्र, वनविद्या, उद्योग, पुराणवस्तुशास्त्र, भूस्तरशास्त्र, प्राणीशास्त्र, वनस्पतिशास्त्र व मानवशास्त्र अशा विविध विषयास वाहिलेलीं संग्रहालयें आपल्या देशात स्थापन होणें अत्यंत आवश्यक आहे पुराणवस्तुविभागाला, जेथें महत्त्वपूर्ण ठिकाणच्या पुरातन वस्तु दाखविण्यासाठीं ठेवता येतील अशीं उत्खनन-स्थान संग्रहालयें उभारावीं लागतील तसेंच मानवेतिहास, वैज्ञानिक प्रगति व तंत्रविद्येचा विकास कस कसा होत गेला याचं तरुण पिढीला सम्यक् ज्ञान करून देण्यासाठीं विद्यापीठ व शिक्षणसंस्था याचीं दखील स्वतंत्र संग्रहालयें असणें अगत्याचं ठरतें

शिक्षणाच्या दृष्टीनं संग्रहालयाचा योग्य तो उपयोग व्हावा म्हणून आणखी काहीं गोष्टी लक्षात घ्याव्या लागतील संग्रहालयांतील कलाकृतींची मांडणी योग्य व आकर्षक रीतीनें करण्यात आली पाहिजे संग्रहालय पहावयास येणाऱ्या व्यक्तींची अभिरुचि व ग्रहणशक्ति लक्षात घेऊन त्याना यथोचित मार्गदर्शन करणं आवश्यक आहे वस्तूंचें प्रदर्शन हें केवळ त्याची सुव्यवस्थित मांडणी करण्यापुरतेंच मर्यादित नसावें, तर त्यात त्याची जुळाजुळव व अर्थबोधक माहिती याचाहि अंतर्भाव असला पाहिजे संग्रहालय योजनेचें सर्वांगीण यश हें, विद्यार्थी, व्यासंगी विद्वान व

सर्वसामान्य जनता आणि प्रत्यक्ष संग्रहालयें यांच्या दरम्यान सर्व पातळींवरील परस्पर सहकार्यावरच अवलंबून असतें. वस्तुतः आजच्या संग्रहालयांचें कार्य प्रेक्षकांनीं तेथें केवळ पाहाण्यासाठीं यावें एवढ्यापुरतें मर्यादित राहिलेलें नाहीं. तर संग्रहालयांतील विविध वस्तु व त्या ठेवण्यामागील उद्देश जनतेला माहीत करून देण्यासाठीं नवीन उपक्रमांचें नियोजन करणें व त्यायोगें जनतेंत संग्रहालयाविषयीं कुतूहल व संग्रहालयें पाहण्याची आवड निर्माण करणें, हा त्या कार्याचा महत्त्वाचा भाग आहे. कुतूहल निर्माण करण्याच्या व ज्ञानदानाच्या दृष्टीनें ग्रंथालयांप्रमाणेंच आजचीं संग्रहालयें देखील आधुनिक युगांतील खरीखुरीं विद्यापीठेंच बनलीं आहेत.

मारखम व हारग्रीव्ज् यांनीं आपल्या संग्रहालय निर्देशिकेंत भारतीय संग्रहालयांचा सुसंबद्ध वृत्तांत बहुधा प्रथमच दिलेला आढळतो. त्यानंतर देशांत अनेक घडामोडी झाल्या. फाळणी झाल्यामुळें, भारताचीं कांहीं संग्रहालयें पाकिस्तानच्या ताब्यांत जाणें अपरिहार्य होतें; तरीदेखील भारतीय संग्रहालयांची संख्या बरीच वाढली आहे. भारतांतील व भारताबाहेरील विद्यार्थ्यांच्या वाढत्या गरजा भागविण्यासाठीं, एक राष्ट्रीय संग्रहालय निर्देशिका तयार करण्यांत यावी अशी सूचना १९५१ सालीं 'युनेस्को'नें केली होती. त्या सूचनेनुसार निर्देशिकेचा मसुदा तयार करण्याची कामगिरी आपल्या पुराणवस्तुविभागाचे एक अधीक्षक श्री. शिवराममूर्ति यांजकडे सोंपविण्यांत आली होती. त्यांनीं अत्यंत परिश्रमपूर्वक व मोठ्या उत्साहानें नियोजित निर्देशिकेचा मसुदा तयार केला. त्यांचा हा मसुदा निरनिराळ्या तज्ज्ञ मंडळांनीं तपासल्यानंतर त्यांत अनेक महत्त्वाचे बदल करण्यात आले आहेत. प्रस्तुत संग्रहालय निर्देशिकेंत भारतांतील सर्व प्रकारच्या संग्रहालयांची विवरणात्मक माहिती समाविष्ट असून त्यांचा पूर्वेतिहास, वाढ, व्याप्ति व ३१ डिसेंबर १९५८ रोजीं तेथें उपलब्ध असलेल्या सोयी याची संपूर्ण माहिती दिलेली आहे.

: नवी दिल्ली,
१२ सप्टेंबर, १९५९

हुमायून कबीर

# लेखकाचे चार शब्द

भारतातील संग्रहालय चळवळीच्या प्रगतीबाबत सरकारला व जनतेस तपशीलवार माहिती पुरविण्यासाठी एक अद्ययावत संग्रहालय निर्देशिका तयार करण्याबाबत आंतरराष्ट्रीय संग्रहालय परिषदेनें कांहीं सूचना केल्या होत्या या सूचना मूर्त स्वरूपात आणणें शक्य व्हावें या दृष्टीनें युनेस्कोच्या महासंचालकाच्या इच्छेनुसार सन १९५२ मध्यें भारत सरकारनें या प्रश्नाचा विचार केला सन १९३६ मध्यें मारखम व हारग्रीव्ज् यांनी भारतातील संग्रहालयाची निर्देशिका प्रसिद्ध केल्यानंतर देशाचे विभाजन झालें व कांहीं संग्रहालयें पाकिस्तानात गेलीं तसेंच भारतातील कांहीं संग्रहालयें बंद करण्यात आलीं तर कित्येक नवीन स्थापन करण्यात आलीं आणि त्यांची उत्तरोत्तर प्रगति होत आहे अशा परिस्थितींत अशी अद्ययावत निर्देशिका प्रसिद्ध करण्याची आवश्यकता प्रकर्षानें जाणवूं लागली अशा प्रकारची निर्देशिका तयार करण्याबाबत सूचना केल्यानंतर, भारताच्या पुराणवस्तुविभागाच्या महासंचालकांनीं हें काम माझ्याकडे सोंपविलें

निर्देशिका तयार करण्याचें काम पूर्णकालिक विशेषाधिकारी या नात्यानें मी स्वीकारावें व त्यासाठीं स्वतः सर्व संग्रहालयांना भेटी देऊन तपशीलवार माहिती गोळा करावी अशी मूळ कल्पना होती परंतु त्यानंतर कलकत्ता येथील भारतीय संग्रहालयाच्या पुराणवस्तुविभागाचा अधीक्षक म्हणून मी जें काम करीत असें त्या कामाव्यतिरिक्त हें काम मी करावें व माहिती पत्रव्यवहार करून गोळा करण्यात यावी असें ठरविण्यात आलें त्यामुळें हा अहवाल निरनिराळ्या संग्रहालयांना स्वतः भेट देऊन मिळविलेल्या माहितीवर आधारलेला नाहीं सन १९५३ ते १९५५ मध्यें भारतातील विविध संग्रहालयांशीं पत्रव्यवहार करून मिळविलेल्या माहितीवरूनच केवळ तो तयार करण्यात आला आहे त्यांत आता अगदीं अलीकडची म्हणजे ३१ डिसेंबर १९५८ पर्यंतची संग्रहालयासंबंधीची संपूर्ण माहिती देण्यात आली आहे आवश्यक ती माहिती नेहमींच अपेक्षेप्रमाणें लवकर मिळूं शकली नाहीं आणि काहीं वेळेस तर पुरेशी माहिती मिळण्यासहि फारच विलंब लागला

या कामासाठीं भारतातील ज्या संग्रहालयाच्या अधिकारीवर्गानें आपापल्या संग्रहालयासंबंधीची तपशीलवार माहिती पुरवून मला सहकार्य दिलें त्या सर्वांचा मी अतिशय आभारी आहें त्याचप्रमाणें ही निर्देशिका तयार करण्यासाठीं भारताच्या पुराणवस्तु विभागाचे महासंचालक व वैज्ञानिक संशोधन व सांस्कृतिक कार्यक्रम मंत्रालय यांनीं ज्या सवलती मला उपलब्ध करून दिल्या त्याबद्दल त्यांचाहि मी आभार मानतों

तसेंच अगदीं अल्प अवधींत सूचि तयार करून दिल्याबद्दल श्री थायू डी माथूर यांचाहि मी आभारी आहें

सी शिवराममूर्ति,
अभिरक्षक
भारताचें राष्ट्रीय संग्रहालय

नवी दिल्ली,
तारीख ६ मे, १९५६

५९ इंदूर मध्यवर्ती संग्रहालय
६० खजुराहो पुराणवस्तु संग्रहालय
६१ नौगांग राज्य संग्रहालय, धुबेला राजवाडा
६२ रायपूर महंत घासीदास स्मारक संग्रहालय
६३ सागर पुराणवस्तु संग्रहालय, सागर विश्वविद्यालय
६४ सांची पुराणवस्तु संग्रहालय
६५ सोनगीर दिगंबर जैन संग्रहालय

## मद्रास

६६ मद्रास फोर्ट सेंट जॉर्ज संग्रहालय
६७ ,, सरकारी संग्रहालय व राष्ट्रीय कला प्रदर्शनालय
६८ मदुराई गांधी स्मारक संग्रहालय
६९ ,, श्री मीनाक्षी सुंदरेश्वर मंदिर संग्रहालय
७० पद्मनाभपुरम् पुरातनवस्तु संग्रहालय
७१ पुडुकोटाई सरकारी संग्रहालय
७२ श्रीरंगम् श्रीरंगनाथस्वामी देवस्थानम् संग्रहालय
७३ तंजावर तंजावर कलाप्रदर्शनालय, राजवाडा इमारत

## म्हैसूर

७४ बंगलोर सरकारी संग्रहालय
७५ विजापूर पुराणवस्तु संग्रहालय
७६ चित्रदुर्ग स्थानिक पुरातनवस्तु संग्रहालय
७७ धारवाड कानडी संशोधन संस्था संग्रहालय
७८ हंपी पुराणवस्तु संग्रहालय
७९ मंगलोर सरकारी संग्रहालय, श्रीमती भवन, बिजई
८० ,, महात्मा गांधी स्मारक संग्रहालय, कारवार हायस्कूल

## ओरिसा

८१ बारीपद बारीपद संग्रहालय
८२ बेलखडी बेलखडी संग्रहालय
८३ भुवनेश्वर ओरिसा राज्य संग्रहालय
८४ खिचिंग (मयूरभंज) खिचिंग संग्रहालय

## पंजाब

८५ अमृतसर मध्यवर्ती शीख संग्रहालय
८६ पतियाळा प्रादेशिक संग्रहालय
८७ सिमला पंजाब शासन संग्रहालय

## राजस्थान

८८ अजमीर राजपुताना संग्रहालय
८९ अल्वार सरकारी संग्रहालय अल्वार
९० अंबर पुराणवस्तु संग्रहालय
९१ बिकानेर गंगा सुवर्णमहोत्सव संग्रहालय
९२ भरतपूर राज्य संग्रहालय
९३ बुंदी राष्ट्रीय परंपरा संरक्षण संस्था संग्रहालय
९४ जयपूर सरकारी मध्यवर्ती संग्रहालय
९५ झालावाड पुराणवस्तु संग्रहालय
९६ जोधपूर सरदार संग्रहालय
९७ कोटा संग्रहालय व सरस्वती भांडार
९८ सगरिया छोटुराम संग्रहालय
९९ सिकार सिकार संग्रहालय
१०० उदेपूर व्हिक्टोरिया सभागृह संग्रहालय

## उत्तर प्रदेश

१०१ अलाहाबाद अलाहाबाद संग्रहालय
१०२ ,, महात्मा गांधी हिंदी संग्रहालय, हिंदी भवन
१०३ हरद्वार गुरुकुल संग्रहालय, गुरुकुल कांग्री
१०४ लखनौ राज्य संग्रहालय
१०५ मथुरा पुराणवस्तु संग्रहालय (पुराणवस्तुशास्त्र कर्झन संग्रहालय)
१०६ सारनाथ सारनाथ संग्रहालय
१०७ वाराणशी कला व पुराणवस्तुशास्त्र भारत कला भवन संग्रहालय, बनारस हिंदु विश्वविद्यालय

## पश्चिम बंगाल

१०८ कलकत्ता भारतीय संग्रहालय
१०९ ,, व्हिक्टोरिया मेमोरिअल हॉल (स्मारक सभागृह) संग्रहालय
११० ,, भारतीय कला आशुतोष संग्रहालय, कलकत्ता विश्वविद्यालय
१११ ,, नगरपालिका संग्रहालय
११२ ,, एशियाटिक सोसायटी संग्रहालय
११३ ,, बंगीय साहित्य परिषद् संग्रहालय
११४ ,, गुरुसदय संग्रहालय
११५ कंठलपारा ऋषि बंकिम ग्रंथालय व संग्रहालय
११६ माल्दा बी आर् सेन संग्रहालय
११७ शांतिनिकेतन रवींद्र सदन (टागोर संग्रहालय)
११८ श्रीरामपूर श्रीरामपूर महाविद्यालय संग्रहालय
११९ तामलक हॅमिल्टन हायस्कूल संग्रहालय

२

## शैक्षणिक व विज्ञान संग्रहालयें

## आंध्र प्रदेश

१ गुंटुर वैद्यकीय महाविद्यालय संग्रहालय
२ हैद्राबाद आरोग्य संग्रहालय
३ विशाखापट्टणम् आंध्र वैद्यकीय महाविद्यालय संग्रहालय

## आसाम

४ गौहत्ती आसाम वनवस्तु संग्रहालय

# भारतांतील संग्रहालयें

## भारतातील संग्रहालयाचा उगम व विकास

भारतातील संग्रहालय स्थापन करण्याच्या चळवळीचा उगम सन १७८४ साली सर विल्यम जोन्स या महान विद्वान गृहस्थानें स्थापन केलेल्या एशिआटिक सोसायटी ऑफ बेंगाल नामक संस्थेंत झाल्याचें दिसून येतें प्रस्तुत सोसायटीच्या सदस्यांनी वेळोवेळीं देणगी म्हणून दिलेल्या अनेक 'अनघ वस्तु' सुयोग्य रीतीनें मांडून ठेवण्यासाठीं इमारत बांधण्याचा निकट प्रश्न सन १७९६ साली सोसायटीसमोर उभा राहिला १८१४ सालीं डॉ वालिश या डॅनिश वनस्पतिशास्त्रवेत्त्यानें प्रस्तुत सोसायटीस एक संग्रहालय स्थापन करण्याविषयीं अत्यंत आग्रहपूर्वक विनंती केली व अशा संग्रहालयाचा अवैतनिक अध्यक्ष म्हणून स्वत काम करण्याचें आपल्या जवळच्या मौल्यवान संग्रहातील वस्तूंच्या समकृती पुरविण्याचें आश्वासन दिलें डॉ वालिश यांची सूचना मान्य करण्यात येऊन दोन विभाग असलेलें एक संग्रहालय स्थापन करण्यांत आलें एका विभागात पुरातन व मानवजातिशास्त्रविषयक वस्तु व दुसऱ्या विभागांत भूस्तरशास्त्र व प्राणिशास्त्रविषयक वस्तु ठेवण्यात आल्या या संग्रहालयाची झपाट्यानें वाढ झाली सन १८३६ सालीं सोसायटीला स्वत च्या आर्थिक तंगीची जाणीव होऊन तिनें सरकारकडे आर्थिक मदतीची याचना केली व अशी मदत मिळावी म्हणून सतत प्रयत्न केले अखेरीस सन १८३९ साली ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालक मंडळानें संग्रहालय चालविण्यासाठीं काहीं रकम मंजूर केली व काही खास कारणासाठीं वेळोवेळीं अनुदानें देण्याचा अधिकार भारत सरकारला दिले

सन १८४० सालीं स्थापन करण्यात आलेलें व सुरवातीस सोसायटीच्या संग्रहालयांत ठेवण्यांत आलेलें व नंतर जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया या संस्थेच्या इमारतींत हलविण्यात आलेलें कलकत्ता येथील व्यावहारिक भूस्तर शास्त्रविषयक संग्रहालय अखेरीस इंपीरियल म्यूझिअममध्यें हलविण्यांत आलें हा इंपीरियल म्यूझिअम सोसायटीच्या संग्रहालयातील भूस्तरशास्त्र, प्राणि शास्त्र व पुरातन वस्तुशास्त्रविषयक वस्तुसंग्रह एकत्र ठेवण्यासाठीं म्हणून, सोसायटी व भारतसरकार यांच्या दरम्यान दीर्घकाल विचारविनिमय झाल्यानंतर नव्यानेंच स्थापन करण्यांत आला होता इंपीरियल म्यूझिअमची ही भव्य इमारत संग्रहित वस्तु ठेवण्यासाठीं सन १८७५ सालीं बांधून तयार झाली या इमारतींत नंतरच्या काळांत अनेक नवीन उपदालनांची भर पडल्यामुळें औद्योगिक व कलाविभागासाठीं जादा प्रदर्शनालयांची सोय करता आली सन १९०४ सालीं म्यूझिअमच्या विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष, सर हर्बर्ट रिस्ले, यांनीं अशी सूचना मांडली कीं, सदरहू म्यूझिअममध्यें भूस्तरशास्त्र, प्राणिशास्त्र, मानवजातिशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र, कला आणि उद्योग या विषयांचे पांच वेगवेगळे विभाग असावेत

मद्रास येथें संग्रहालय स्थापन करण्यासाठीं फार पूर्वी म्हणजे सन १८१९ सालापासून प्रयत्न करण्यात येत होते आणि लंडनच्या एशिआटिक सोसायटीची पूरकसंस्था असलेल्या मद्रास लिटररी सोसायटी या संस्थेनें सन १८२८ सालीं व्यावहारिक भूस्तरशास्त्रविषयक संग्रहालय असावें अशी इच्छा प्रदर्शित केली सन १८४३ सालीं प्रस्तुत सोसायटीनें असें संग्रहालय स्थापन करण्याविषयीं सरकारला विनंति केली व ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालक मंडळानें मद्रास येथें एक मध्यवर्ती संग्रहालय स्थापन करण्याचें मान्य केलें सन १८५० सालीं असिस्टंट सर्जन एडवर्ड ग्रीन बाल्फर यानीं उपरोक्त संग्रहालयाचा मुख्य अधिकारी म्हणून काम करण्याचें आश्वासन दिलें व बहुतांशीं त्यांच्या वैयक्तिक उत्साहामुळेंच या संग्रहालयाच्या इमारतीचें काम अल्पावधींत पूर्ण झालें डॉ बाल्फर यानीं बंगळोर, तिरुचिरापल्ली, कोइंबतूर, कुड्डलोर, उटकमंड, सिकंदराबाद व मंगलोर येथें स्थानिक संग्रहालयें स्थापन करण्यास उत्तेजन दिलें त्यानुसार सहा संग्रहालयें प्रत्यक्ष सुरू करण्यात आलीं, परंतु राजमहेंद्री येथील संग्रहालयाखेरीज बाकीचीं सर्व संग्रहालयें पुढें सन १८६१ सालीं बंद पडलीं

सन १८५१ सालीं डॉ अर्स्किन यानीं दी व्हिक्टोरिया ॲण्ड अल्बर्ट म्यूझिअम स्थापन केला

मुंबई येथील ग्रँट मेडिकल कॉलेज म्यूझिअम, या भारतातील व आशियांतील सर्वांत जुन्या वैद्यक संग्रहालयाची स्थापना १८४५ सालीं ग्रँट मेडिकल कॉलेजच्या स्थापनेनंतर लवकरच झाली आणि त्यातील सर्वांत जुनें माहितीपुस्तक १८५० सालापासूनचें आहे

जनरल कॉलिन्स यानीं सन १८५७ च्या सुमारास त्रिवेंद्रम येथें एक संग्रहालय स्थापन केलें

मुंबई येथें एक संग्रहालय असावें ही कल्पना प्रथम १८४८ सालीं निघाली व १८५१ सालीं लंडन येथें भरविण्यात येणाऱ्या महान प्रदर्शनासाठीं जी वस्तूंची जमवाजमव चालली होती तीमुळें सदरहू कल्पनेस चालना मिळून सन १८५७ सालीं डॉ ब्युइस्ट यांच्या प्रयत्नामुळें म्यूझिअम ऑफ इकॉनॉमिक प्रॉडक्ट्स नामक संग्रहालय स्थापन करण्यात आलें परंतु नंतर लवकरच बंडाचा उद्रेक झाल्यामुळें त्यावर अनिष्ट परिणाम होऊन सैन्याला राहण्यासाठीं ती इमारत लगेच ताब्यात घेण्यात आली आणि सध्याची जी व्हिक्टोरिया व अल्बर्ट म्यूझिअमची इमारत आहे ती पुढें १८७१ सालीं संग्रहालयासाठीं देण्यात आली

लखनौ व नागपूर येथील संग्रहालयें सन १८६३ सालीं स्थापन करण्यांत आलीं व त्यानंतर लगेच पुढील वर्षी लाहोर येथें एक संग्रहालय स्थापन झालें बंगलोर येथील म्हैसूर गव्हर्मेंट म्यूझिअम सन १८६५ सालीं अस्तित्वात आलें मथुरा संग्रहालयाची निर्मिति सन् १८७४ सालीं झाली पुढील वर्षांत रायपूर संग्रहालय अस्तित्वात आलें सन १८८८ सालीं राजकोट येथें एक संग्रहालय स्थापन करण्यात आलें, आणि पुढें दहा वर्षांनंतर श्रीनगर येथें एका संग्रहालयाची निर्मिति झाली बडोदें संग्रहालयाचा शिलान्यास सन १८८७ सालीं करण्यांत आला

## राणीच्या राज्यारोहणाच्या अर्धशतसांवत्सरिक उत्सवामुळें नूतन संग्रहालयाच्या उदयास चालना मिळाली.

सन १८८७ सालीं व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दीचा अर्धशतसांवत्सरिक उत्सव साजरा करण्यांत आला त्या निमित्तानें केवळ भारतातच नव्हे तर ब्रिटिश साम्राज्याच्या इतर भागांत देखील, अनेक नूतन संग्रहालयें उदयास येऊन एका नव्या युगास सुरवात झाली या काळांत, मद्रास येथें व्हिक्टोरिया टेक्निकल इन्स्टिट्यूट, जयपूर, उदयपूर, राजकोट, छिंदवाडा येथें प्रत्येकी एक संग्रहालय, कलकत्ता येथें व्हिक्टोरिया मेमोरिअल हॉल इत्यादि अनेक संग्रहालयें स्थापन करण्यात आलीं

### लॉर्ड कर्झनचे प्रयत्न

परंतु देशांतील संग्रहालयाच्या विकासास सर्वांत मोठी चालना जर कोणी दिली असेल तर ती लॉर्ड कर्झन यांच्या अमदानींत होय लॉर्ड कर्झन यांच्याप्रमाणेंच आरकेऑलॉजिकल सर्व्हे खात्याचे संरक्षक सर जॉन मार्शल यांना देखील संग्रहालयाच्या बाबतींत विशेष उत्साह वाटत होता संग्रहालयाच्या निर्मितीच्या इतिहासात सन १९०२ सालानंतर क्रमश अनेक घटना नियमितपणें घडून आल्या व परिणामीं अनेक उत्खनन स्थान संग्रहालयें व स्थानिक संग्रहालयें अस्तित्वात आलीं यांपैकीं काहीं आरकेऑलॉजिकल सर्व्हे खात्यानेंच स्थापन केलीं, तर इतर कित्येक त्या खात्याच्या प्रोत्साहनानें स्थापन झालीं अजमेर, बारीपाडा, चंबा, जोधपूर, खजुराहो, ग्वाल्हेर, विजापूर आणि ढाका या ठिकाणीं दहा वर्षांच्या अवधींत जी संग्रहालयें स्थापन झालीं त्याचें सर्व श्रेय सर जॉन मार्शल यांनी या बाबतींत दाखविलेल्या अतीव आस्थेलाच द्यावें लागेल याशिवाय सारनाथ आणि इतर वास्तूंच्या ठिकाणीं असलेलीं पुरातवस्तु संग्रहालयें व नवी दिल्ली येथील सेंट्रल एशियन ॲन्टिक्विटीज म्यूझिअम यांचें जनकत्व देखील सर जॉन मार्शल यांचकडेच जातें बंगालमधील माल्दा येथील, पाटणा व मंडाले येथील, मुंबई राज्यांत विजापूर, आग्र्याच्या ताजमध्यें व धार आणि पेशावर येथील संग्रहालयें देखील लॉर्ड कर्झन यांच्या प्रयत्नामुळेंच स्थापण्यात आलीं

मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझिअम स्थापण्याचें, फार पूर्वी म्हणजे सन १९०४ सालापासून घाटत होतें सरकारकडून व श्री करीमभाई इब्राहिमसारख्या उदार हृदयी दात्याकडून सढळ हातानें अनुदानें व देणग्या मिळविण्यात येऊन संग्रहालयासाठीं सन १९१४ सालींच इमारत बांधून तयार झाली असली तरी, युद्धकाळांत तींत लष्करी रुग्णालय तात्पुरतें ठेवण्यात आल्यामुळें संग्रहालय ठेवण्यासाठीं म्हणून सन १९२१ साली ती देण्यात आली सदरहू इमारतींत तदनंतर रॉयल एशियाटिक सोसायटीची मुंबई शाखा, ॲन्थ्रॉपॉलॉजिकल सोसायटी, बॉम्बे नॅचरल हिस्टरी सोसायटी व यांनी संग्रहित केलेल्या वस्तु ठेवण्यात आल्या, तसेंच आरकेऑलॉजिकल सर्व्हे खात्याच्या पश्चिम मंडळानें दीर्घकाळ जमवून ठेवलेल्या वस्तु देखील तींत ठेवण्यात आल्या

### उत्खनन स्थान संग्रहालयें

उत्खनन स्थान संग्रहालयांपैकीं, सारनाथ येथील संग्रहालय फार पूर्वी म्हणजे सन १९०४ सालीं स्थापण्यात आलें व नालंदा येथील संग्रहालय सन १९१७ सालीं अस्तित्वात आलें सात वर्षांनंतर मोहेंजो-दारो येथें व नंतर केवळ दोनतीन वर्षांच्या अवधींतच हराप्पा व तक्षशिला येथें तशींच संग्रहालयें स्थापण्यात आलीं हीं सर्व संग्रहालयें सर जॉन मार्शल यांच्या प्रयत्नामुळेंच अस्तित्वात आलीं नागार्जुनकोंडा येथील संग्रहालय सुमारें १७ वर्षांपूर्वी निर्माण झालें व हैद्राबादमधील कोंडापूर येथील व येलेश्वरम् आणि अमरावती येथील संग्रहालयें हीं तर अगदींच अलिकडची आहेत सन १९५२ सालीं हैद्राबाद राज्याच्या पुरातवस्तु विभागानें कित्येक उत्कृष्ट शिल्पाकृति एकत्र करून त्यांची आलमपूर येथें एका मंडपांत व्यवस्थित रीतीनें मांडणी केली प्रस्तुत संग्रहालयाची देखभाल सध्यां आंध्रप्रदेश सरकारकडून केली जाते खजुराहो येथील जुन्या जागेंतील संग्रहालय नुकतेंच मध्यवर्ती पुरातवस्तु खात्यानें आपल्या ताब्यात घेतलें मध्यवर्ती पुरातवस्तु खात्याच्या ताब्यात असलेल्या कोणार्क येथील संग्रहालयामुळें अशा प्रकारच्या संग्रहालयात एक नवी भर पडली आहे सन १९५६ च्या अखेरीस घानच्या झालेल्या बुद्धजयंतीच्या सोहळ्यानिमित्त हें संग्रहालय स्थापन करण्यात आलें परंतु श्रीरंगपट्टम येथील संग्रहालय हें अगदीं अलीकडे स्थापन झालेलें अशा प्रकारचें संग्रहालय असून त्यात टिपूच्या व्यक्तिगत अवशेष वस्तु ठेवण्यात आल्या आहेत पुरातवस्तुविभाग सध्यां या संग्रहालयाची व्यवस्था पाहत असतो

### इतर राज्य संग्रहालयें

कित्येक राज्य सरकारांनी त्या त्या सरकारच्या खात्यांनी जमविलेल्या वस्तु एकत्र करून अनेक संग्रहालयें स्थापन केलीं अशा रीतीनें सन १९११ ते १९४७ या दरम्यानच्या काळात इंदूर, हैद्राबाद, हिंमतनगर, जामनगर, कोल्हापूर, पद्मनाभपुरम, रेवा (आता नौगांव) येथील संग्रहालयें अस्तित्वात आलीं

### महानगरपालिकांनीं चालविलेलीं संग्रहालयें

काहीं शहरांच्या व नगरांच्या महानगरपालिकांनीं संग्रहालयाच्या बाबतींत विशेष आस्था दाखविल्यामुळें कित्येक संग्रहालयें निर्माण झालीं व त्यांचा विकास झाला अशा प्रकारचीं काहीं संग्रहालयें, त्यांचा त्वरित विकास व उत्कृष्ट संग्रह या गोष्टींमुळें विशेष नांवारूपाला आलीं आहेत मुंबईचें प्रिन्स ऑफ वेल्स म्यूझिअम हें अशा संग्रहालयांपैकींच एक होय मुंबई महानगरपालिकेचें याबाबतचें धोरण अत्यंत उदार असून तिनें दी व्हिक्टोरिआ ॲंड अल्बर्ट म्यूझिअम नांवाचें दुसरें एक महत्त्वाचें संग्रहालय देखील चालविलें आहे अलाहाबाद संग्रहालयामध्यें फार उत्तमोत्तम वस्तूंचा संग्रह असून तें आता स्वतःच्या मालकीच्या सुंदर इमारतींत हलविण्यात आलें आहे प्रस्तुत संग्रहालयाची व्यवस्था अलाहाबाद नगरपालिकेकडून ठेवली जाते पुणें शहर नगरपालिकेनें सन १९२९ सालीं लॉर्ड रे महाराष्ट्र औद्योगिक संग्रहालयाचें जवळ जवळ पुनरुज्जीवन केलें व त्याच्या व्यवस्थेप्रीत्यर्थ ती सध्या बराच खर्च करीत असते कलकत्ता येथें देखील अशा प्रकारचें एक नगरपालिकेनें चालविलेलें संग्रहालय आहे. आरंभीं हें औद्योगिक संग्रहालय होतें परंतु सध्या त्यास आरोग्य संग्रहालयाचें स्वरूप आलें आहे बडोदा नगरपालिकेचें देखील तसेंच एक आरोग्य संग्रहालय आहे केवळ संग्रहालयासाठीं म्हणून आखण्यात आलेल्या व दोन वर्षांपूर्वी बांधून तयार झालेल्या अशा एका आदर्श इमारतींत संग्रहालय निर्माण करून अहमदाबादच्या महानगरपालिकेनें सर्व देशापुढें एक आदर्श ठेवला आहे दर्शनाद्वारें शिक्षण देणाऱ्या संस्था म्हणून संग्रहालयाकडे आस्थापूर्वक लक्ष पुरविणाऱ्या काहीं नगरपालिकांची ठळक उदाहरणेंच येथें दिलीं आहेत

## संस्था व व्यक्ति यांनी पुरस्कृत केलेलीं संग्रहालयें

वर उल्लेखिलेल्या संग्रहालयांखेरीज संस्थांनी, इतकेंच नव्हे, तर व्यक्तींनी दाखविलेल्या उत्साहामुळें अनेक संग्रहालयें अस्तित्वात आलीं आहेत पुणें येथील भारत इतिहास संशोधन मंडळानें चालविलेलें संग्रहालय अशा प्रकारचें आहे गौहत्ती येथील कामरूप अनुसंधान समितीच्या संग्रहालयाचेंच पुढें प्रांतिक संग्रहालयांत रूपांतर झालें एका महाविद्यालयाच्या इतिहास मंडळानें प्रांतिक पातळीवरील संग्रहालयाचा मूळारंभ करण्यांत यशस्वी व्हावें ही घटना क्वचित तर खरीच, तथापि भुवनेश्वर येथील ओरिसा प्रांतिक संग्रहालय अशाच रीतीनें अस्तित्वांत आलें आहे रॅव्हेनशॉ महाविद्यालयाच्या इतिहास मंडळाच्या संग्रहालयातील वस्तूच प्रस्तुत संग्रहालयात ठेवण्यांत आल्या आहेत सन १९१० साली सुरू केलेलें वंगीय साहित्य परिषद संग्रहालय हें अशाच प्रकारचें आहे कारण साहित्य परिषदेच्या उत्साहामुळेंच तें अस्तित्वात आलें आहे

वरेंद्र संशोधन मंडळाचें संग्रहालय हें दिघापातियाचे कुमार शरत्कुमार रे यांच्या अविश्रांत प्रयत्नांचें फळ आहे प्रस्तुत संग्रहालय सध्यांच्या इमारतीत सन १९१९ सालीं नेण्यांत आलें

सन १९१९ सालीं बनारस येथें राय कृष्णदास यांच्या प्रयत्नांमुळें भारत कला भुवन नामक कलाकुसरीच्या वस्तूंचें एक सुंदर संग्रहालय स्थापन करण्यांत आलें राय बहादुर श्री एम् व्यास, यांनी आपल्या उत्साहानें व जमविलेल्या विविध वस्तूंची देणगी देऊन अलाहाबाद येथील नगरपालिका संग्रहालयास उपकृत करून ठेवलें आहे मद्रासजवळ येथील थिऑसॉफिकल कॉलेजमधील संग्रहालय डॉ जे एच्. कझिन्स यांच्या वैयक्तिक वस्तुसंग्रहामुळें अस्तित्वांत आलें त्याचप्रमाणें सेंट झेवियर कॉलेजमध्यें भारत इतिहास संशोधन संस्थेचें संग्रहालय रेव्ह एच्. हेरास एस् जे यांच्याच प्रयत्नांमुळें निर्माण झालें आहे

## विद्यापीठ संग्रहालयें

राज्य पुराणवस्तुविभागानें संग्रहित केलेल्या वस्तूंचें एक संग्रहालय निर्माण करून तें म्हैसूर विद्यापीठाशीं संलग्न करण्यांत आलें (पुराणवस्तु संशोधन संचालक हेच येथें प्रस्तुत संग्रहालयाचा प्रमुख अधिकारी म्हणून काम करीत असे) *तथापि ज्यास सर्वस्वी विद्यापीठ संग्रहालय म्हणतां* येईल असें पहिलें संग्रहालय कलकत्ता येथें अस्तित्वात आलें, आणि विद्येचे व संस्कृतीचे महान आश्रयदाते सर आशुतोष मुखर्जी यांचें नाव त्या संग्रहालयास देण्यांत आलें या आशुतोष संग्रहालयामुळें कलकत्ता विद्यापीठाचा कित्ता गिरविण्याची स्फूर्ति मिळून त्यायोगें इतर विद्यापीठांतून देखील अशाच प्रकारचीं संग्रहालयें निर्माण होत आहेत उदाहरणार्थ अलाहाबाद विद्यापीठांत कौशांबी संग्रहालय अस्तित्वांत आलें असून हरद्वारच्या गुरुकुल विद्यापीठांत देखील एक संग्रहालय स्थापन करण्यांत आलें आहे बनारस विद्यापीठानें भारतकला भवन संग्रहालय आता स्वतःच्या देखरेखीखालीं चालविण्यासाठीं आपल्या ताब्यांत घेतलें आहे वल्लभ विद्यानगर व सागर विद्यापीठ या दोन संस्थांतून पुरातन वस्तु संग्रहित करून एक एक संग्रहालय अस्तित्वांत आलें आहे दिल्ली व गौहत्ती विद्यापीठांमध्यें आता मानवशास्त्रविषयक संग्रहालयें स्थापण्यांत आलीं आहेत मद्रास व विद्यापीठें यांच्यांत गेल्या कांहीं वर्षांत पुराणवस्तुशास्त्रविषयक संशोधन व उत्खनन यांबाबतची आवड एकसारखी वाढत असून परिणामतः वैशाली येथें आणि तिरुपती येथें कांहीं संग्रहालयें निर्माण झालीं आहेत तिरुपती येथील वेंकटेश्वर संग्रहालय हें मंदिराचें तसेंच विद्यापीठाचें देखील संग्रहालय आहे पुणें येथील डेक्कन कॉलेज ऑफ पोस्ट ग्रॅज्युएट रिसर्च संस्थेच्या संग्रहालयात आणि कर्नाटक विद्यापीठाच्या नियंत्रणाखालीं असलेल्या धारवाड येथील कन्नड रिसर्च सोसायटीच्या संग्रहालयांत उत्खननातून व संशोधनातून मिळालेल्या चीजवस्तूंचा बहुमोल संग्रह करण्यात आला आहे बडोदे विद्यापीठाच्या संग्रहालयात अशाच प्रकारें जमविलेल्या वस्तु ठेवलेल्या आहेत

गौहत्ती येथें नुकतेंच एक वाणिज्य संग्रहालय सुरू करण्यात आलें विद्यापीठीय संग्रहालयाचा हा अगदी नवीन प्रकार आहे भारतांत विद्यापीठाशीं संलग्न असलेल्या वाणिज्य संग्रहालयाचें हें एकमेव उदाहरण आहे

भारतात असें एकही महत्त्वाचें महाविद्यालय नाहीं कीं ज्यातील वेगवेगळ्या विभागानीं वेगवेगळ्या शास्त्रीय विषयांच्या अभ्यासास प्रोत्साहन मिळावें म्हणून आपलीं स्वतंत्र संग्रहालयें निर्मिलीं नाहींत आणि शिवाय *स्थापत्यशास्त्रविषयक व वैद्यक शास्त्राच्या निरनिराळ्या शाखांचीं अशीं वेगवेगळीं* संग्रहालयें देखील आहेत रोगनिदानशास्त्र आरोग्यशास्त्र, इंद्रियविज्ञानशास्त्र इत्यादींसारख्या विषयांचें शिक्षण देण्याच्या कामीं प्रभावी मदत व्हावी म्हणून वैद्यक व स्थापत्यशास्त्र महाविद्यालयांनीं स्वतःचीं अशीं स्वतंत्र संग्रहालयें विकसित केलीं आहेत

## वन आणि कृषि संग्रहालयें

डेहराडून येथील वन महाविद्यालयाशीं संलग्न असलेला एक उत्कृष्ट संग्रहालयसमूह असून त्यांत वनसंवर्धन, इमारती लाकूड, सामान्य वन्य उत्पादन आणि कीटकशास्त्र असे वेगवेगळे विभाग आहेत वनसंशोधन संस्था व डेहराडून येथील वन-महाविद्यालय या संस्था केवळ भारतातच नव्हे, तर सबंध आशिया खंडात सर्वोत्तम आहेत डेहराडून येथील वन शाळा फार पूर्वी म्हणजे सन १८७८ सालीं स्थापन झालेली असली तरी सन १९१४ सालीं वनसंशोधन संस्था स्थापन झाल्यावरच या कार्याला विशेष चालना मिळून तेथें एक वनसंशोधन संग्रहालय निर्माण करण्यात आलें

कोइंबतूर येथें मात्र श्री एच्. ए गास यांच्या प्रयत्नामुळें सन १९०२ सालींच साधें वन संग्रहालय स्थापन करण्यात आलें होतें श्री एच् ए गास यांना सेवानिवृत्तीपूर्वी संग्रहालयाची नवी इमारत पूर्ण झालेली बघण्याचें भाग्य लाभलें प्रस्तुत संग्रहालयास त्यांचेंच नाव देऊन त्यांनीं केलेल्या अमोल सेवेबद्दल त्यांचें ऋण मान्य करण्यात आलें आहे

कोइंबतूर येथील कृषि महाविद्यालय व संशोधन संस्था यांचाच एक भाग म्हणून कृषि व संबद्ध शास्त्रास वाहिलेलें कृषि संग्रहालय सन १९०९ सालीं प्रथम स्थापन करण्यात आलें मृत्तर रचना, कृषि अवजार, धान्यांचे प्रकार व सर्वें आणि कृषक प्राणिशास्त्र, वनस्पतिशास्त्र सूक्ष्मजंतुशास्त्र इत्यादि विषयांशीं संबंधित असलेल्या वस्तूंच नमुने प्रस्तुत संग्रहालयांत ठेवण्यांत आले आहेत

## स्थापत्य संग्रहालय

मद्रासजवळ गिंडी येथील स्थापत्य महाविद्यालयाच्या संग्रहालयात अध्यापनासाठीं आवश्यक असलेले शेकडों सुंदर नमुने ठेवलेले आहेत तसेंच स्थापत्यशास्त्राच्या वेगवेगळ्या शाखांचें शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांना अत्यंत उपयुक्त ठरतील अशा सर्व अद्यावत उपकरणांनी युक्त असलेल्या विस्तीर्ण कर्मशाळा त्यांत आहेत गिंडी येथें अलीकडेच स्थापन झालेल्या

धपश्चम संग्रहालयात स्वदेश्य धान्योत्पादना सिद्ध करून दाखविणारे अनेक नमुने ठेवलेले आहेत. धान्योत्पादन व वितरणपुरवठा करण्याच्या कामीं आपल्या देशानें केलेल्या राष्ट्रीय प्रगतीची यथार्थ कल्पना देणें हा प्रस्तुत संग्रहालयाचा उद्देश आहे.

## वैद्यक संग्रहालय

मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजचें रोगनिदान संग्रहालय हे सर्वांत जुन्यापैकी असून त्याची स्थापना सन १८४५ सालीं झाली. त्यातल्या वस्तूंचें मार्गदर्शपुस्तक सर्वांत जुनें म्हणजे सन १८५० सालचें आहे. देशांत सर्वत्र असलेल्या वैद्यक महाविद्यालयांतून वैद्यकशास्त्राच्या निरनिराळ्या शाखांसाठीं स्वतंत्र संग्रहालयें निर्माण होत आहेत. मद्रास मेडिकल कॉलेजचें रोगनिदान संग्रहालय फार पूर्वी म्हणजे सन १८६८ सालीं अस्तित्वात आलें. परंतु आरोग्यशास्त्र व औषधशास्त्रविषयक संग्रहालय अनुक्रमें सन १९३८ व सन १९३९ सालीं स्थापन करण्यात आलीं. कलकत्ता मेडिकल कॉलेजमधील रोगनिदान संग्रहालयांतील काही वस्तु तर १८२३ सालापासून संग्रहित केलेल्या आहेत. मात्र त्याचे पहिले संग्रहालयाध्यक्ष म्हणून डॉ. एलन वेब यांची सन १८४० सालीं नेमणूक झाली. त्यानंतर या संग्रहालयांत आणखी अनेक अमोल वस्तूंची भर पडली.

स्टॅन्ले मेडिकल कॉलेज स्थापन झाल्यानंतर लगेच म्हणजे सन १९२३ सालीं त्याला जोडूनच एक रोगनिदान संग्रहालय निर्माण करण्यात आलें, मात्र शरीररचनाशास्त्र, आरोग्यशास्त्र व औषधिविज्ञानविषयक संग्रहालयें अगदीं अलीकडे म्हणजे सन १९५० नंतर मूर्त स्वरूपात आलीं.

मुंबईच्या सेठ गोवर्धनदास सुंदरदास मेडिकल कॉलेजचीं शरीररचनाशास्त्र आणि रोगनिदानशास्त्रविषयक संग्रहालयें अनुक्रमें सन १९२५ व १९२६ सालीं स्थापण्यात आलीं. दिल्ली येथील लेडी हार्डिंज मेडिकल कॉलेजचें संग्रहालय सन १९१७ सालीं अस्तित्वांत आलें. मात्र मद्रास येथील स्टॅन्ले मेडिकल कॉलेजचीं शरीररचनाशास्त्र, आरोग्यशास्त्र आणि औषधिविज्ञानविषयक संग्रहालयें ज्याप्रमाणें अगदीं अलीकडे स्थापन करण्यात आलीं त्याप्रमाणें बडोदें येथील मेडिकल कॉलेजचीं शरीररचनाशास्त्र, औषधिविज्ञान, रोगनिदानशास्त्र आणि प्रतिबंधक औषधें या विषयाबाबतचीं संग्रहालयें देखील अगदीं अलीकडेच म्हणजे सन १९४९ सालीं निर्माण करण्यांत आलीं.

कलकत्ता येथील स्कूल ऑफ ट्रॉपिकल मेडिसिन या संस्थेचें संग्रहालय सन १९२१ सालीं स्थापन करण्यात आलें. वैद्यकीय संशोधनास आणि पदव्युत्तरचा वैद्यक अभ्यासक्रम शिकविण्यास मदत व्हावी या दृष्टीनें त्यातील वस्तुसंग्रह एकसारखा वाढविण्यात येत आहे. त्यात जीवनशास्त्रविषयक निरनिराळ्या वर्गांतील जीवाणूंचे विविध नमुने जतन करून ठेवण्यात आले आहेत. व्याधिग्रस्त प्राण्यांचे विच्छेदित नमुने, मानवी देहाचें विच्छेदनपूर्व व विच्छेदनानंतरचें स्वरूप दर्शविणारे नमुने, तसेच उष्णकटिबंधात उद्भवणाऱ्या रोगांचें स्वरूप दर्शविणारे प्लॅस्टिकचे नमुने देखील प्रस्तुत संग्रहालयांत ठेवण्यात आले आहेत व त्यामुळें वैद्यकशास्त्राचे विद्यार्थी आणि संशोधन करणारे विद्यार्थी यांना आपल्या विषयाचें सखोल ज्ञान होण्यास विशेष मदत होते.

लखनौ येथील प्रॉव्हिन्शियल हायजीन इन्स्टिट्यूटचें संग्रहालय सन १९२८ सालीं स्थापन करण्यात आलें. त्यांत उल्कापाषाणशास्त्र, पदार्थविज्ञान, रसायन शास्त्र, शरीररचनाशास्त्र, निवार्य रोग, पाणीपुरवठा, हवा आणि वायुवीजन, मल व जलनिःसारण व्यवस्था आणि पौष्टिक आहार असे वेगवेगळे विभाग पाहण्यास मिळतात.

## सृष्टिविज्ञान संग्रहालयें

ज्याप्रमाणें कित्येक इतिहास संशोधन मंडळांनी इतिहास व पुरातवस्तुविषयक संग्रहालयें स्थापन केलीं आहेत त्याप्रमाणें सृष्टिविज्ञान मंडळांनी संग्रहालयाच्या सृष्टिविज्ञान विभागाचें प्रयत्नपूर्वक संशोधन केलें आहे, तसेंच स्वतंत्र अशीं सृष्टिविज्ञान संग्रहालयें देखील स्थापन केलीं आहेत. मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियमच्या सृष्टिविज्ञानविभागात नैसर्गिक दृश्यांचीं हुबेहूब दर्शन घडविणारीं उत्कृष्ट आभासचित्रें ठेवलेलीं आहेत. भारतीय संग्रहालयांतून आढळून येणाऱ्या अशा आभासचित्रांचे हे सर्वोत्कृष्ट नमुने आहेत. प्रस्तुत संग्रहालयास मुंबईच्या सृष्टिविज्ञान मंडळानें अत्यंत परिश्रमपूर्वक सहाय्य दिलें असून त्यानें सावधानें संशोधन केलें आहे. ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे कीं, या संग्रहालयाच्या सृष्टिविज्ञानशाखेंत जो वस्तुसंग्रह जमविण्यात आला आहे त्यासाठीं सदरहू मंडळानें आपल्या सदस्यांकडूनच रु. २३,००० एवढी रक्कम जमविली आणि १९३८ सालीं मुख्य संग्रहालयाच्या इमारतीला जोडून जेव्हा नवीन इमारत बांधण्यात आली तेव्हा सदरहू सृष्टिविज्ञान शाखेसाठीं सरकारनें रु. १७,५०० चें खास अनुदान देऊन जमलेल्या रकमेंत भर टाकली. सृष्टिविज्ञान विभागासाठीं लागणाऱ्या जादा जागेची सोय करण्यासाठीं आखलेल्या विस्तृत योजनेचा उपरोक्त नवीन इमारत हा केवळ एक भाग आहे.

दार्जिलिंग येथील सृष्टिविज्ञान संग्रहालयाची कल्पना जरी सन १९०७ सालींच निघाली होती, तथापि सन १९२३ सालीं दार्जिलिंग येथें सृष्टिविज्ञान मंडळाची स्थापना झाली व त्यानंतर एका कार्यक्षम संग्रहालयाध्यक्षाची नेमणूक होऊन संग्रहालयांतील वस्तूंची योग्य रीतीनें काळजी घेण्याची व त्यात भर टाकण्याची खात्रीलायक तजवीज झाली. श्री. सी. एम. इंग्लिस यांच्या अविश्रांत परिश्रमामुळें सदरहू संग्रहालयास अत्युत्कृष्ट दर्जा प्राप्त झाला व दी एस्यादर सेक्रेटरी ऑफ दी म्यूझियम असोसिएशन श्री. मरखॅम यांनी त्या संग्रहालयास भेट दिल्यानंतर त्यांनीं त्याची मुक्तकंठानें प्रशंसा केली व त्याप्रमाणें आपला अभिप्राय नोंदून ठेवला. त्याचें सर्व श्रेय देखील श्री. सी. एम्. इंग्लिस यांनाच आहे.

महाविद्यालयांतून सृष्टिविज्ञान संग्रहालयें फार पूर्वीपासून म्हणजे सन १८७४ पासून सुरू करण्यात आलीं आहेत. त्यापूर्वी अर्नाकुलम् येथील महाराजा महाविद्यालयात प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्रविषयक संग्रहालयें स्थापन करण्यात आलीं आणि १८८५ सालीं मद्रास ख्रिश्चन कॉलेजमध्यें प्राणिशास्त्र विभागाचें संग्रहालय सुरू करण्यांत आलें. पुढें अकरा वर्षांनंतर तिरुचिरापल्ली येथील सेंट जोसेफ महाविद्यालयाचें सृष्टिविज्ञान संग्रहालय अस्तित्वात आलें. बंगलोर येथील सेन्ट्रल कॉलेजमध्यें सन १८९८ सालीं भूस्तरशास्त्र संग्रहालय निर्माण करण्यात आलें. वनस्पतिशास्त्र व प्राणिशास्त्र संग्रहालयें मात्र त्यानंतर बरेच वर्षांनी म्हणजे अनुक्रमें सन १९२१ व १९२३ सालीं सुरू करण्यात आलीं.

मुंबईच्या सेंट झेवियर कॉलेजच्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ हिस्टॉरिकल रिसर्च नामक संस्थेनें सुरू केलेलें संग्रहालय तर तेथें आहेच. पण तें स्थापन

होण्याच्या दहा वर्षे आधीं म्हणजे सन १९१८ मध्यें या कॉलेजमध्यें सृष्टिविज्ञान संग्रहालय सुरू करण्यात आलें अलाहाबाद विद्यापीठाचें भूस्तर शास्त्र संग्रहालय फार पूर्वी म्हणजे सन १९१० सालीं, गुरुवर्य डॉ डब्ल्यु एच् वुडलॅंड यांच्या प्रयत्नामुळें निर्माण झालें आणि वनस्पतिशास्त्र विभाग सुरू करण्यात आल्यानंतर वनस्पति संग्रहालय देखील स्थापन करण्यात आलें उक्त संग्रहालयांव्यतिरिक्त सन १९५२ सालीं अलाहाबाद विद्यापीठात इतिहास व पुराणवस्तुशास्त्र यास वाहिलेलें कौशाबी संग्रहालय स्थापण्यात आलें

## विज्ञान संग्रहालयें

विशिष्ट विषयाच्या अभ्यासाठी तसेंच जनतेंत ज्ञानप्रसार होण्यासाठी विविध प्रकारचीं उपकरणीं आणि मनोरंजक व बोधप्रद वस्तूंनीं सुसज्ज अशा विज्ञान संग्रहालयाची गरज बऱ्याच वर्षांपासून भासत आहे आणि अनेक देशांतून अशा प्रकारचीं संग्रहालयें निर्माण करण्यात आलीं आहेत दिल्ली येथील राष्ट्रीय विज्ञान प्रयोगशाळा या संस्थेंत एक विज्ञान संग्रहालय सुरू करून भारतात देखील या दिशेनें पहिला प्रयत्न करण्यात आला आहे आणि या संग्रहालयाचें एका नामांकित संस्थेंत रूपांतर होण्याची सर्व दृष्टीनें शक्यता आहे अशा प्रकारचं आणखी एक संग्रहालय सुरू करण्यासाठीं बिर्ला हाऊसनें दिलेल्या उदार देणगीच्या मदतीनें कलकत्ता येथें एक तंत्रविज्ञान संग्रहालय सध्या स्थापन होत आहे

## औद्योगिक संग्रहालयें

एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, वेळोवेळीं जीं प्रदर्शनें भरविण्यात येतात त्यासाठीं गोळा करण्यांत आलेल्या वस्तूंच्या मदतीनेंच बहुधा संग्रहालयांची स्थापना झालेली असते कलाकुसरीचे व कारागिरीचे विभाग व औद्योगिक दृष्ट्या ज्यांना किंमत आहे अशा जिनसा यांना अशा प्रदर्शनवस्तूंमध्यें विशेष स्थान देण्यात येत असतें ज्याची केवळ औद्योगिक संग्रहालय म्हणून वाढ करण्यात आली आहे अशीं देखील काहीं संग्रहालयें आहेत पुण्याच्या लॉर्ड रे महाराष्ट्र औद्योगिक संग्रहालयाची स्थापना सन १८८८ सालीं झाली भारतीय कलावस्तु व कारखान्यात निर्माण झालेल्या वस्तु यांचें पुण्यात जें प्रदर्शन भरविण्यात आलं होतें त्यातून पुढें प्रस्तुत संग्रहालयाचा जन्म झाला आणि अशा प्रकारच्या संग्रहालयांपैकीं एक वाखाणण्याजोगें संग्रहालय म्हणून तें नावारूपास आलें आहे

सन १९३६ सालीं बिहार वाणिज्य संग्रहालय हें अशा प्रकारचं आणखी एक संग्रहालय अस्तित्वात आलें प्रथमत त्याचें खाजगी संस्थेसारखें स्वरूप होतें अगदीं अलीकडच्या काळापर्यंत त्यातील वस्तुसंग्रह हळुहळु वाढवला जात होता व त्याच बरोबर येथ श्री पी के सेनगुप्ता यांचाच वाव लागेल सध्या ह्या संग्रहालयाचें कार्य बंद पडलें आहे दुसरें महायुद्ध संपल्यानंतर थोड्याच दिवसांत कलकत्ता येथें मोठ्या प्रमाणावर एक वाणिज्य संग्रहालय स्थापन करण्यात आलें व त्याचा विकास करून एका मोठ्या संस्थेंत त्याचें रूपांतर करण्याचा पश्चिम बंगाल सरकार सध्या प्रयत्न करीत आहे व्हिक्टोरिया राणीचा हीरकमहोत्सव साजरा करण्यात आला त्या प्रसंगीं जीं अनेक संग्रहालयें स्थापन करण्यांत आलीं त्यांपैकीं मद्रास येथील दी व्हिक्टोरिया टेक्निकल इन्स्टिट्यूट संग्रहालय हें एक औद्योगिक संग्रहालय म्हणून नावलौकिकास आलें आहे त्याचप्रमाणें सन १९२७ सालीं त्रावणकोर संस्थानच्या तत्कालीन राजाच्या षष्ठ्यब्दिपूर्ति समारंभाच्या स्मरणार्थ त्रिवेंद्रम येथें श्री मूलम षष्ठ्यब्दिपूर्ती मेमोरियल इन्स्टिट्यूट नामक एक संग्रहालय स्थापन करण्यात आलें असून तें एक उत्कृष्ट औद्योगिक संग्रहालय आहे हस्तिदंतावरील व लाकडावरील कोरीव कामावर त्यात विशेष भर दिलेला आढळून येतो व शिवाय कारागिरीचे इतरहि प्रकार प्रस्तुत संग्रहालयात आहेत

अगदीं अलीकडे निर्माण झालेलें उत्कृष्ट संग्रहालय म्हणजे कॅलिको वस्त्र संग्रहालय होय श्री गौतम साराभाई यांनीं प्रस्तुत संग्रहालय सन १९४९ सालीं अहमदाबाद येथें एका आकर्षक नव्या इमारतींत स्थापन केलें अत्युत्कृष्ट वस्त्राचें प्रदर्शन करणाऱ्या या संग्रहालयात भारतात निर्माण होणाऱ्या विविध प्रकारच्या आधुनिक वस्त्रांचें दर्शन घडविण्यावर अधिक भर दिला जातो भारताची आर्थिक दृष्ट्या व कलाविज्ञान दृष्ट्या सद्य स्थिति व हस्तव्यवसाय व यंत्रचलित माग यांचं सामान्य उपयोग यांच्या सचित्र दर्शनानं या विषयाची माहिती या संग्रहालयांत अत्यंत मनोज्ञ पद्धतीनें मिळते कापूस, ताग, लोकर, रेशीम, नायलॉन यासारखा कच्चा माल आणि कताई व विणाईच्या पद्धतींचें रूप आदिमानवानें वापरलेल्या पद्धतीपासून थेट अत्याधुनिक यंत्रमागानें होणाऱ्या कताई-विणाईचें काम क्रमश कसकसें उत्क्रांत होत गेलें याचं आकर्षक रीतीनं प्रस्तुत संग्रहालयात प्रदर्शन करण्यात आलें आहे

## बालसंग्रहालयें

वैज्ञानिक तत्त्व, सृष्टिविज्ञानविषयक प्रश्न, गति, गुरुत्वाकर्षण, जीव-विकास व न्हास यासंबंधीचे अबाधित नियम, कला व विद्या, इतिहास व संस्कृति यासंबंधी माहिती नमुने, तक्ते इत्यादींच्या साह्यानं सोप्या परंतु मार्मिक पद्धतीनं लहान मुलांना करून देणारीं संग्रहालयें अलीकडे निर्माण होऊं लागलीं आहेत अमरेली बालसंग्रहालय श्री पी जी मेहता यांनी स्थापन केलें असून त्यांनी त्यास सर्वस्वी वाहून घेतलें आहे श्री सी पी गुप्ता यांच्या प्रयत्नामुळें लखनौ येथें सन १९५७ सालीं मोतीलाल नेहरू बालसंग्रहालयाची स्थापना झाली मद्रास सरकारी संग्रहालयाचा जोड विभाग म्हणून बालसंग्रहालयासाठीं बांधण्यात येणाऱ्या इमारतीचा शिलान्यास नुकताच करण्यात आला श्री शंकर पिल्ले यांच्या संग्रहांतून उत्कृष्ट बाहुलीसंग्रह घेऊन व इतर कलाविभागासाठीं जागा राखून ठेऊन मुलांसाठीं एक उत्तम संग्रहालय दिल्ली येथें लवकरच स्थापन करण्यात येणार आहे.

## मंदिर संग्रहालयें

संग्रहालयाच्या – विशेषत दक्षिण भारतांतील संग्रहालयाच्या-वाढीच्या दुसऱ्या अवस्थेंत निर्माण झालेलीं संग्रहालयें म्हणजे मोठमोठ्या मंदिरांतील छोटीं परंतु मनोरंजक संग्रहालयें हीं होत भारतातील मंदिर हें स्थानिक लोकांच्या धार्मिक गरजा पुरविणारी अशी एक संस्था आहे इतकेंच नव्हे, तर तें नेहमीच सांस्कृतिक, आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक केन्द्र म्हणून समजलें जाई, शिवाय मंदिर म्हणजे एक लहानसें संग्रहालयच आहे असें समजण्यास देखील मुळींच हरकत नाहीं अशीं संग्रहालयें निर्माण झालीं हें योग्यच झालें मंदिरांतील अशा संग्रहालयांपैकीं, तंजावर येथील बृहदीश्वर मंदिरातील राजराजा संग्रहालयाचा नाम उल्लेख केला पाहिजे सरस्वतीमहाल राजवाड्या

अलीकडेच तयार करण्यांत आलेल्या कला प्रदर्शनालयांत हें संग्रहालय नव्यानें स्थापन करण्यांत आलें आहे त्याचप्रमाणें श्रीरंगम् मंदिरांतील संग्रहालय, तसेंच मदुराई येथील मीनाक्षी – सुंदरेश्वर मंदिरांतील संग्रहालय हींहि विशेष उल्लेखनीय आहेत त्यापैकीं पहिल्या संग्रहालयांत शिला व धातु शिल्पकृतींचा प्रेक्षणीय संग्रह असून दुसऱ्या संग्रहालयात हस्तिदंती कामाचा उत्कृष्ट संग्रह आहे मंदिरांतील संग्रहालयांपैकीं उत्तम संग्रहालय म्हणजे तिरुपती येथील श्री व्यंकटेश्वर विद्यापीठाच्या सहकार्यानें बांधलेलें प्रशस्त असें श्री व्यंकटेश्वर संग्रहालय हें असून त्यात शिल्पकृतींचा व लेखांचा बराच मोठा संग्रह आहे.

## पुराणवस्तु संग्रहालयांच्या वाढीस पुराणवस्तु संशोधनाची विशेष मदत झाली

संग्रहालयाच्या अगदीं प्राथमिक अवस्थेंत बहुधा भूस्तरशास्त्रविषयक अथवा जीवनशास्त्रविषयक वस्तूंचा संग्रह करण्यात येई या वस्तूंच्या आधारेंच भारतांतील प्रमुख संग्रहालयें स्थापन करण्यात आलीं परंतु लॉर्ड कॅनिंग यांनी उत्तर भारत पुराणवस्तु संशोधन केन्द्र स्थापन केल्यावर आणि जनरल कनिंगहॅम यांची पुराणवस्तु संशोधक म्हणून नेमणूक करण्यांत आल्यावर संग्रहालयांतून पुराणवस्तूंचा विभाग असण्याची गरज भासू लागली आज या संग्रहालयांत पुराणवस्तूंचा उत्कृष्ट संग्रह असून त्याबद्दल त्याच्या चालकांस अत्यंत अभिमान वाटतो जनरल कनिंगहॅम यांच्या अविश्रांत मेहनतीचें हें फळ आहे या शतकाच्या आरंभापासून आणि सर जॉन मार्शल व लॉर्ड कर्झन यांनी पुराणवस्तु–संशोधन–विभागाची मुदत वाढविल्यामुळें संग्रहालयातील पुराणवस्तुविभाग विशेष आकर्षक बनले, तसेंच स्वतंत्र पुराणवस्तु – संग्रहालयें अस्तित्वांत आलीं व त्यांनी लोकांचें लक्ष वेधून घेतलें वर सांगितलेंच आहे कीं, स्मारकें सुस्थितींत ठेवून व संग्रहालयें स्थापन करून भारताचा वैभवशाली भूतकाळ जाणून घेण्यात व त्याचें जतन करण्यात लॉर्ड कर्झन यांनी व्यक्तिशः विशेष आस्था व उत्साह दाखविल्यामुळें, तसेंच सर जॉन मार्शल यांनी सहानुभूतिपूर्वक साहाय्य केल्यामुळें अनेक पुराणवस्तु संग्रहालयें अस्तित्वांत आलीं पुराणवस्तु विभागातील संग्रहालयाच्या विकासाकडे बाजवी लक्ष पुरविण्यात यावें यासाठीं सर मॉर्टिमर व्हीलर यांनी तितक्याच कळकळीनें सन १९४५ मध्य संग्रहालय शाखा काढली परिणामी सन १९४९ मध्यें दिल्ली येथें भारतीय राष्ट्रीय संग्रहालय स्थापन होऊन ज्ञानप्राप्तीची नवीन दालनें जनतेस खुलीं झालीं

सुरुवातीस कर्नल कॉलीन मॅकेंझीसारख्या व्यक्तींच्या व एशियाटिक सोसायटीसारख्या संस्थांच्या इतर सदस्यांच्या उत्साहामुळें निरनिराळीं संग्रहालयें अस्तित्वांत आलीं व लोकांकडून देणगीच्या रूपानें अनेक वस्तु मिळाल्यामुळें त्यांतील वस्तुसंग्रह बराच वाढला पुराणवस्तुसंशोधन केन्द्र स्थापन होण्यापूर्वी बरेच दिवस आधी जनरल कनिंगहॅम यांनी सन १८३५-३६ च्या सुमारास सारनाथ येथील गुप्तकालीन बुद्धाच्या मूर्तींचा मोठा संग्रह देणगीदाखल दिला होता एशियाटिक सोसायटीच्या संग्रहातील आकर्षक शिल्पकृति सध्या भारतीय संग्रहालयांत ठेवण्यात आल्या आहेत त्या वेळेचे लेफ्टेनंट गव्हर्नर सन्माननीय जी एफ् एडमंस्टन यांनी भेट म्हणून त्या दिल्या होत्या ब्रिटनचा जावाशी अल्पकाळ संबंध आल्यामुळें एशियाटिक सोसायटीच्या सदस्यांकडून जावांतील सुंदर शिल्पकृती भेटीदाखल वेळोवेळीं मिळाल्या होत्या भारतीय संग्रहालयांतील अप्रतिम वस्तूंमध्यें त्यांची गणना होते परंतु, पुरातत्त्वशास्त्रविभागाचे सरसंचालक सर ॲलेक्झांडर कनिंगहॅम यांनी गांधारशैलीच्या अनेक शिल्पकृती, बोध-गया येथील पुरातनवस्तु आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे भारहूत येथील कठडे व प्रवेशद्वार या वस्तु ज्या वेळीं देणगीदाखल दिल्या त्या वेळेपर्यंत भारतीय संग्रहालय चांगलें सुस्थिर झालें होतें या वस्तु भारतीय संग्रहालयातील अत्यंत मौल्यवान् ठेवा म्हणून समजल्या जातात कनिंगहॅम यांनी केवळ या पुरातन वस्तूंची भेट दिली, इतकेंच नव्हे, तर जे डी एम्. बेग्लर यांच्या मदतीनें संग्रहालयातील वस्तूंची आकर्षक मांडणी करण्याच्या कामींहि ते आस्थापूर्वक लक्ष देत असत डॉ ॲंडरसन यांनी म्हटल्याप्रमाणें पुराणवस्तु विभागाची, त्यांतील शिलालेखांनुसार, अशोक, इंडोसायथिअन, गुप्त व मोगल अशा चार उपविभागांमध्यें त्यांनीच विभागणी केली व हें काम आवश्यक त्या फेरफारांनिशीं गेलीं कित्येक वर्षे अविरतपणें चालू आहे

जनरल अलेक्झांडर कनिंगहॅम यांनी सन १८७३ मध्यें भारहूत येथील स्तूपाचे अवशेष शोधून काढले, एवढेंच नव्हे, तर मोडतोडीपासून त्याचा बचाव करण्यासाठीं त्याची भारतीय संग्रहालयात रवानगी केली याबद्दल आपण त्यांचे अत्यंत ऋणी आहोत त्यानंतर दोन वर्षांनी ज्यांच्या राज्यांत भारहूत होते त्या नागोदच्या महाराजांना ह्या शिल्पकृति सरकारला देण्याविषयीं कनिंगहॅम यांनीच विनंति केली ' विध्वंसक ' म्हणून दुष्कीर्ति होण्याचा धोका पत्करूनहि [ प्रा विल्डरनीं लिहिलें आहे, " भारहूतहून या वस्तु हलविण्यासंबंधीं एक सूचना आहे असें ऐकतों या योजनेला विध्वंसकतेचा दर्प येतो " ] त्यांनीं कठड्याचा कांहीं भाग व प्रवेशद्वार या वस्तु हलविल्या व सध्या अलाहाबाद संग्रहालयात असलेले छोटे संग्रह वगळतां जाता हा भव्य स्तूप व प्रवेशद्वार यांचे आता एवढेच अवशेष शिल्लक आहेत एवढेंच वाईट वाटतें कीं, जें कांहीं मागें राहिलें होतें त्यापैकीं वाहून नेता येईल असा प्रत्येक दगड बांधकामासाठीं लोक घेऊन गेले

कर्नल कॉलीन मॅकेन्झी यांना सन १७९७ मध्यें अमरावती स्तूपाचे अवशेष सापडले त्यापैकीं जेवढे वांचविता येतील तेवढे वाचवून त्यांनी भारतावर केवढे उपकार केले आहेत या गोष्टीचें या ठिकाणीं स्मरण होतें एशियाटिक सोसायटीकडे व मच्छलीपट्टण् येथें त्यांनी पाठविलेले संगमरवरी दगड खरीज करून उघड्यावर पडलेल्या संगमरवरी दगडांपैकीं कांहींचा खेड्यातील लोकांनी जाळून चुना तयार केला व बाकी जे उरले त्यांचा घरबांधणीसाठीं उपयोग केला मद्रास व ब्रिटिश संग्रहालयांतील अत्यंत मूल्यवान् वस्तूंत ज्याची गणना होते ते कठड्याचे कांहीं भाग व कोरीव काम वगळल्यास, भव्य स्मारकांपैकीं एक असलेला हा अमरावती स्तूप जवळजवळ नामशेष झाला आहे

गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत मेजर एच् एच् कोल यांच्या औदार्यामुळें गांधार शिल्पकलेचा उत्कृष्ट संग्रह मिळविण्यांत मद्रास संग्रहालय भाग्यवान् ठरलें होतें पण काय दैवदुर्विलास पहा ! भारतीय संग्रहालयातील गांधार शिल्पकृतींत ज्याचा दुसरा क्रमांक लागला असता असा हा अमोल संग्रह, आपल्या आधीच्या अधिकाऱ्यांचें धोरण बदलून, त्या संग्रहालयाला केवळ प्रातिनिधिक स्वरूप देण्याच्या हेतूनें डॉ बर्जेस यांनी उतावळेपणानें परत केला डॉ बिडी यांच्या प्रयत्नामुळें मिळविलेला हा संग्रह अशा रीतीनें ठिकठिकाणीं विखुरला गेला

डॉ. डी. बी. स्पूनर यांच्या प्रयत्नांमुळें व शाहरी बाहलोल, तख्त-इ-बाही, शाहजी-की-ढेरी येथील व इतर ठिकाणच्या उत्खननांत त्यांना सापडलेल्या अनेक शिल्पकृतींमुळें पेशावर येथील संग्रहालय पुराणवस्तूंच्या दृष्टीनें अत्यंत समृद्ध बनलें. या प्रदेशात केलेल्या उत्खननात अनेक उत्तम वस्तु सापडल्या. त्यांपैकी कनिष्काच्या करण्डकाचे अवशेष म्हणजे एक अमोल वस्तु आहे. हे अवशेष पेशावर संग्रहालयात ठेवण्यांत आले असून त्या संग्रहालयातील तो एक मौल्यवान् ठेवा आहे. कनिंगहॅम यांच्या प्रयत्नामुळें कलकत्ता येथील भारतीय संग्रहालयातील व लाहोर येथील संग्रहालयातील गांधार शैलीच्या वस्तुसंग्रहाचा पाया घातला गेला. भारतीय संग्रहालयात ठेवलेल्या व भारतांत अत्युत्कृष्ट ठरलेल्या गांधार शिल्पकृतींच्या संग्रहाची प्रचंड वाढ मुख्यत्वें सरहद्द विभागात सर जॉन मार्शल यांनी केलेल्या उत्खननामुळें झाली.

मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयाला सर रतन व सर दोराब टाटा आणि सर अकबर हैदरी यासारख्या उदार खाजगी व्यक्तींकडून भेटीदाखल अमोल संग्रह मिळाले आहेत. या संग्रहालयातील सृष्टिविज्ञान-विभाग अत्युत्कृष्ट असून त्याचें सर्व श्रेय मुंबईच्या सृष्टिविज्ञान संस्थेकडे जातें.

पुराणवस्तुसंशोधन खात्याच्या अधिकाऱ्यांनी प्रांतांतील व संस्थानांतील निरनिराळ्या संग्रहालयांशीं सहकार्य करावें, असें सर जॉन मार्शल यास सुरुवातीपासूनच वाटत होतें. याच धोरणानुसार निरनिराळ्या मंडलाच्या अधीक्षकांनी प्रांतिक संग्रहालयाच्या मतीनें पुराणवस्तु विभाग सुरू केले. आदित्तनालूर व पेरुम्बर येथील लोहयुगातील पुरातनवस्तु आणि अमरावती यथेयें व इतर कित्येक ठिकाणी सापडलेल्या अनेक बुद्धकालीन शिल्पकृति, पुरातनवस्तु-यात अमरावती येथील ब्रॉन्झ वस्तूंचाहि समावेश होतो-ह्या दक्षिण मंडलाचे अधीक्षक श्री. री यांनी उत्खनन करून मिळविल्या होत्या, व सध्या त्या मद्रास संग्रहालयात ठेवल्या आहेत. त्याच संग्रहालयातील जैन विभागात ठेवलेले, दनवूलप्पड्ड येथें सापडलेले शिल्पकृतीचे अत्यंत महत्त्वाचे नमुने देखील पुराणवस्तुसंशोधनकेंद्राच्या प्रयत्नामुळेंच या संग्रहालयाला मिळाले आहेत. ताम्रपटाचा व ब्रॉन्झमूर्तींचा जगातील सर्वांत मोठा संग्रह मद्रास संग्रहालयात असून त्याची वाढ कलेक्टर व न्यायाधीश यांच्या प्रयत्नांमुळें झाली. या ताम्रपटांपैकीं बहुतेक ताम्रपट त्यांच्या मालकांनी, त्यांवरील दुर्बोध लिखाण हें आपल्या वडिलोपार्जित हक्कांसंबधीं आहेत (अशी त्यांची भोळी समजूत होती) व त्यामुळें त्यावर मिळकतीवरील आपला हक्क हमखास शाबित होईल अशा आशेनें न्यायालयांत सादर केलेले होते आणि त्यांना कांहींहि उपयोग न झाल्यानें अखेर निराश होऊन त्यांनी ते सर्व ताम्रपट तेथेंच राहूं दिले. पुढें बेवारशी मिळकत म्हणून त्यांची संग्रहालयात रवानगी करण्यात आली. याशिवाय पुराणवस्तु-विभागातील पुरालेख शाखेचीहि संग्रहालयातील ताम्रपटाचा संग्रह वाढण्याच्या कामी बरीच मदत झाली. मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयातील पुराणवस्तुसंग्रह समृद्ध होण्यास पश्चिम मंडळाच्या अधीक्षकाच्या प्रयत्नांची बरीच मदत झाली. तसेंच ऐहोळे व घारापुरी येथील उत्कृष्ट शिल्पकृतींमुळें देखील या संग्रहालयात अमोल भर पडली आहे.

डॉ. जे. पी. एच्. वोगल हे सन १९११-१२ मध्यें सरसंचालक म्हणून काम करीत होते. संग्रहालयांविषयी त्यांना विशेष आस्था व उत्साह वाटत असल्यामुळें त्या वेळीं भारतातील संग्रहालय चळवळीस चालना मिळाली. पुढे १९११ मध्यें डॉ. वोगल यांनी पौर्वात्य तज्ज्ञांच्या अधिवेशनात-ज्यांत संग्रहालय अधिवेशनहि अंतर्भूत होतें-भारतात त्या वेळीं अस्तित्वात असलेल्या ३९ संग्रहालयांचा अहवाल सादर केला होता. चंबा संग्रहालय त्यांच्या प्रयत्नामुळेंच अस्तित्वात आलें. तसेंच मथुरा संग्रहालयातील वस्तुसंग्रह रायबहादुर राधाकृष्णन् हे अत्यल्प काळात अतिशय समृद्ध बनवूं शकले याचें कारण देखील डॉ. वोगल यांनी त्या कामीं दिलेलें प्रोत्साहन व आर्थिक मदत हेंच होय. त्याचप्रमाणें लखनौ व दिल्ली येथील संग्रहालयें आणि कलकत्ता येथील भारतीय संग्रहालय यांवर देखील त्यांची अतिशय कृपादृष्टि होती. संग्रहालय अधिवेशनाचे त्या वर्षीचे अध्यक्ष या नात्यानें त्यांनी संग्रहालयाच्या कारभाराचें अत्यंत सहानुभूतिपूर्वक समालोचन केलें होतें.

देशात सर्वत्र असलेल्या प्रांतिक संग्रहालयांतील पुराणवस्तुविभागाच्या कारभाराशी पुराणवस्तु अधीक्षकाचे संबंध असल्यामुळेंच गुप्तनिधींतील शिल्पकृति, ब्रॉन्झचे पुतळे व नाणीं इत्यादि वस्तु त्वरित ताब्यात घेणें शक्य झालें. मद्रास संग्रहालयावर साहाय्यक पुराणवस्तुशास्त्रज्ञाची नेमणूक होईपर्यंत, मंडल अधीक्षक अवेतनिक अधिकारी म्हणून पुराणवस्तुविषयक बाबतींत त्या संग्रहालयाला साहाय्य करीत असे. त्याचप्रमाणें सरहद्द मंडलाचा अधीक्षक हा पेशावर संग्रहालयाचा अवेतनिक संग्रहालयाध्यक्ष म्हणून काम पहात असे. पश्चिम मंडलाचा पुराणवस्तुशास्त्रविषयक अधीक्षक हा अद्यापहि पेशावर संग्रहालयाचा अवेतनिक संग्रहालयाध्यक्ष म्हणून काम पाहात असतो. पश्चिम मंडलाचा पुराणवस्तुशास्त्रविषयक अधीक्षक हा सध्या देखील विजापूर संग्रहालयाचा अवेतनिक संग्रहालयाध्यक्ष म्हणून काम पहात असतो. त्याशिवाय, पुराणवस्तुसंशोधन केंद्राचे अधीक्षक हे भारतातील कित्येक संग्रहालयाच्या समितीत आहेत.

केवळ सल्लामसलत व साहाय्य देऊनच नव्हे, तर सढळ हातानें अनुदानें देऊन पुराणवस्तुविभागानें मथुरा, मद्रास, लखनौ व इतर ठिकाणीं असलेल्या संग्रहालयातील वस्तूंच्या संख्येंत भरघोस वाढ होण्यास मदत केली आहे.

पुराणवस्तु संशोधन केन्द्रानें ऐतिहासिक महत्त्वाच्या ठिकाणाहून मिळविलेल्या वस्तु मुक्तहस्तानें संग्रहालयांना वाटून दिल्या आहेत. यामुळें मोहेन्जो-दारो येथे सापडलेल्या वस्तु भारतातील बहुधा सर्व प्रमुख संग्रहालयातून आढळून येतात. पुराणवस्तुविभागाकडून उसनवार मिळविलेले संग्रह प्रमुख संग्रहालयात आढळतात. भारतीय संग्रहालयातील रत्नें व नाणीं यांचा पीअर्सचा उत्कृष्ट संग्रह या प्रकारात मोडतो. अशा रीतीनें उसनवार घेतलेले इतर संग्रह मद्रास संग्रहालयात, पाटणा संग्रहालयात व मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयात आहेत. अनेक ठिकाणीं केलेल्या उत्खननांत मिळालेल्या वस्तु उदारपणें त्या त्या विभागात असलेल्या संग्रहालयांच्या स्वाधीन करण्यात आल्या. अशा रीतीनें बसरह व पाटलीपुत्र येथील उत्खननात मिळालेल्या वस्तु तसेंच कुर्कीहर येथील ब्रॉन्झ मूर्ती मिळाल्यामुळें पाटणा संग्रहालय अत्यंत समृद्ध बनलें आहे. भीटा, सहेथ-महेथ, सांकीसा येथील उत्खननांत मिळालेल्या पुराणवस्तूंमुळें लखनौ संग्रहालय समृद्ध झालें आहे. तसेंच नाल येथील उत्खननात मिळालेल्या वस्तूंमुळें क्वेटा येथील संग्रहालय समृद्ध झालें आहे. मात्र शेवटीं निर्दिष्ट केलेल्या ठिकाणीं मिळालेल्या वस्तु सन १९३४ च्या भीषण धरणीकंपानंतर भारतीय संग्रहालयात पाठविण्यांत आल्या.

पुरातत्त्वविभागानें सिद्धान्तानें धोरण स्वीकारून, केवळ प्रत्यक्ष निर्मिति करूनच नव्हे, तर अप्रत्यक्षरीत्या प्रोत्साहन देऊन देखील संग्रहालयांची उभारणी करण्यास हातभार लावला आहे  हैद्राबाद, ग्वाल्हेर, बारीपाडा, अजमेर, नागपूर, सिंचिग व सांची हीं सर्व राज्यसंग्रहालयें या विभागाचीं ऋणी आहेत  संग्रहालयांत वस्तूंची मांडणी करण्यासाठीं देखील या विभागांतील अधिकाऱ्यांची मदत मिळत असे  उदा॰ श्री रामप्रसाद चंदा यांनीं मथुरा, सिंचिग व बारीपाडा येथील संग्रहालयांतील मांडणी करण्याच्या कामीं मदत केलेली आहे

## कलाप्रदर्शन विभाग

भारतामध्यें पुरातत्त्वविषयक अनेक संग्रहालयें अत्यंत झपाट्यानें निर्माण करण्यांत आलीं आहेत  तथापि, कलाप्रदर्शन विभागाची मात्र तितक्या वेगानें वाढ झालेली नाहीं  वस्तुतः प्रमुख संग्रहालयांपैकीं अनेक संग्रहालयांत कला विभाग असले व त्यांत मुख्यत्वे राजस्थान, मोंगल व दाक्षिणात्य शैलीचीं चित्र प्रदर्शित करण्यांत आलेलीं असलीं तरी केवळ दोन किंवा तीन मोठीं दालनें वगळल्यास, इतर ठिकाणीं कलेच्या विकास क्रमाचा होत गेला याचें समग्र दर्शन होत नाहीं  प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयांतील कलाविभाग अत्यंत समृद्ध आहे व त्यांत भारतीय व युरोपीय या दोहों प्रकारच्या चित्रकलेवर योग्य भर देण्यांत आलेला आहे  युरोपांतील मध्ययुगीन व आधुनिक श्रेष्ठ चित्रकारांच्या कलाकृतींचा उत्कृष्ट संग्रह तेथें आहे, एवढेंच नव्हे, तर अजिंठा चित्रांच्या प्रतिकृतींचा सुंदर संग्रह तेथें असून मध्ययुगीन कलेच्या निरनिराळ्या अवस्था आकर्षक रीतीनें प्रदर्शित केलेल्या आहेत

बडोद्याचे सुविख्यात सयाजीरावमहाराज यांच्या दानशूरतेमुळें एक अत्युत्कृष्ट असा कलाप्रदर्शनविभाग बडोदें येथें तयार झाला असून तेथील युरोपीय व भारतीय शैलींच्या चित्रसंग्रहाचें सविस्तर वर्णन डॉ॰ गेट्स यानीं आपल्या एका पुस्तिकेंत केलेलें आहे  त्रिवेन्द्रम् येथील संग्रहालयांत तेथील महाराजांच्या दानशूरतेमुळें व डॉ॰ जेम्स कझीन्स यांच्या उत्साहामुळें भारतीय व युरोपीय चित्रकलेचें समग्र समालोचन करण्यांत आलेलें आहे, इतकेंच नव्हे, तर तेथें चिनी व जपानी चित्रकलेचें आणि बृहद्भारतांतील (इंडोनेशीय) कलेचें देखील खास प्रदर्शनविभाग आहेत  भारतांतील एक धनिसमृद्ध असा हा कलाप्रदर्शनविभाग आहे

त्याचप्रमाणें म्हैसूर येथें एक कलाप्रदर्शनविभाग असून त्यांत आधुनिक भारतांतील आधुनिक श्रेष्ठ कलाकारांचीं चित्रें ठेवलेलीं आहेत  अजिंठा व बाघ येथील प्राचीन भित्तिचित्रांचे उत्कृष्ट नमुने ग्वाल्हेर संग्रहालयांत जतन करून ठेवण्यांत आलेले असून हैद्राबाद येथील संग्रहालयांत अजिंठा व वेरूळ येथील भित्तिचित्रांच्या प्रतिकृतींचा उत्कृष्ट संग्रह एका खास दालनांत ठेवलेला आहे  हैद्राबाद येथील सालारजंग संग्रहालयांत युरोपीय रंगचित्रांचा सुंदर संग्रह आहे

एक खास कलाप्रदर्शनविभाग बांधावा अशी मद्रास संग्रहालयाची फार दिवसांची इच्छा अलीकडेच साकार झाली आहे  ह्या राष्ट्रीय कलाप्रदर्शन विभागासाठीं देण्यांत आलेल्या व्हिक्टोरिया टेक्निकल इन्स्टिट्यूटच्या भव्य इमारतींत मद्रासच्या सरकारी संग्रहालयाचा एक भाग हलविण्यांत आलेला असून त्यांत भारतीय कलेच्या, विशेषतः दक्षिण भारतीय कलेच्या प्रत्येक अंगाचें समग्र दर्शन घडविण्यांत आलेलें आहे  कलाप्रदर्शनविभागांत प्राचीन, मध्ययुगीन व आधुनिक चित्रकलेसाठीं एक खास विभाग असून धातूंच्या निवडक पुतळ्यांसाठीं एक स्वतंत्र विभाग आहे

नवी दिल्ली येथील नवकल्प राष्ट्रीय प्रदर्शनालय हें सर्वस्वीं भारतीय कलेच्या आधुनिक अवस्थेसाठीं तयार केलेलें असून तेथील चित्रसंग्रह या कलेपुरताच मर्यादित आहे  या राष्ट्रीय संग्रहालयांत मोंगल व राजस्थानी शैलींच्या रंगचित्रांचा उत्कृष्ट संग्रह असून आता तें अजिंठा येथील प्राचीन चित्रकलेपासून तों थेट विजयनगर काळांतील मध्ययुगीन चित्रकलेपर्यंतच्या कलेच्या विविध अंगांचें दर्शन घडविणाऱ्या प्राचीन भित्तिचित्रांच्या प्रतिकृतींचा संग्रह जमवीत आहे  त्यायोगें या संग्रहालयांतील प्रदर्शनालयांत भारतीय चित्रकलेचें समग्र दर्शन होईल

## संग्रहालयाच्या इमारती

अगदीं अलीकडे अस्तित्वांत आलेल्या संग्रहालयांना इमारतींच्या बाबतींत चांगल्या सवलती मिळाल्या  आधुनिक संग्रहालयांच्या इमारतींशीं तुलना करतां, पूर्वीच्या संग्रहालयांना अगदीं जुनाट व अयोग्य इमारतींत आपला संसार थाटावा लागल्यामुळें त्यांची व्हावी तशी प्रगति होऊं शकली नाहीं  कधीकधीं तर सहज मिळूं शकणारी कोणती इमारत संग्रहालयासाठीं योग्य समजली गेली व त्यामुळें काहीं वस्तु उत्कृष्ट असून देखील त्यांची परिणामकारक रीतीनें मांडणी करतां आली नाहीं  अशा तऱ्हेनें उदाहरण म्हणून लखनौ येथील संग्रहालयाकडे बोट दाखविता येईल आणि हें संग्रहालय एकमेकांपासून दूर असलेल्या दोन इमारतींत विभागलें गेलें असल्यानें तर हा दोष अधिकच जाणवतो  अगदीं अलीकडे करण्यांत आल्यामुळें नवीन इमारतींत स्थापन झालेल्या काहीं संग्रहालयांच्या बाबतींत हें नमूद करण्यास समाधान वाटतें कीं, पूर्वी सहज मिळत गेलेल्या जुन्या इमारतींत काहीं वर्षें दाटीवाटीनें घालविल्याची पुरेपूर भरपाई या नवीन सुंदर इमारतींनीं झाली आहे  अलाहाबाद येथील नगरपालिका संग्रहालयाला नगरपालिका इमारतींतील जुन्या अपुऱ्या खोल्यांऐवजीं आतां एक योजनाबद्ध व सुंदर इमारत लाभली आहे  बनारस हिंदु विद्यापीठांतील भारतकलाभवन संग्रहालयाची नुकतीच बांधून पुरी झालेली इमारत फार छान आहे  रायपूर येथील संग्रहालयासाठीं एक उत्तम इमारत नुकतीच बांधून पूर्ण झाली असून तेथें अलीकडेच त्याची नव्यानें मांडणी करण्यांत आली आहे  मथुरा संग्रहालय, प्रथम संग्रहालयाला अयोग्य अशा एका इमारतींत सुरू करण्यांत आलें होतें, परंतु आतां तें एका पद्धतशीरपणें बांधलेल्या इमारतींत हलविण्यांत आलें असून तेथें संग्रहालयाची वाढ करण्यास भरपूर वाव आहे  मुंबईचें संग्रहालय इमारतीच्या बाबतींत फारच भाग्यवान् आहे  मद्रास संग्रहालय प्रशस्त जागीं उत्तम रीतीनें बांधण्यांत आलेलें असून, पुराणवस्तु ठेवण्यासाठीं त्यांत आधुनिक पद्धतीचा सर्वोत्कृष्ट असा खास विभाग आहे  अहमदाबाद येथें नुकत्याच सुरू करण्यांत आलेल्या 'संस्कृति केन्द्र' नावाच्या संग्रहालयासाठीं एका उत्तम इमारतीची योजना आखून तिचें बांधकामहि पूर्ण झालेलें आहे

संग्रहालयाची इमारत पद्धतशीरपणें बांधणें अत्यावश्यक असून, तींत प्रकाशाची चांगली व्यवस्था असलेलें योग्य प्रदर्शन-विभाग नसतील तर उत्कृष्ट वस्तु देखील परिणामकारक रीतीनें प्रदर्शित करतां येणार नाहींत  जीं संग्रहालयें, त्यांत वाढ करण्यासाठीं आजूबाजूस पुरेशी जागा न ठेवता

गरींच्या ठिकाणीं सुरू करण्यांत आलीं आहेत, त्यांत कालांतरानें दाटी झाल्याशिवाय राहणार नाहीं. संग्रहालय ही प्रायः एक वर्धमान संस्था असून वाढीसाठी तीस भरपूर वाव असला पाहिजे. पूर्वेकडील सर्वोत्तम समजल्या जाणाऱ्या भारतीय संग्रहालयाचेंच उदाहरण घ्या. दुर्दैवानें या संग्रहालयाची इमारत जुनी व अपुरी तर आहेच, शिवाय अधिक विस्तारासाठीं त्याच्या आजूबाजूस मिळण्यासारखी अशी जागाहि नाहीं.

योग्य रीतीनें बांधलेल्या संग्रहालयांत नेहमींचे प्रदर्शनविभाग, नोकरवर्गासाठीं कामाच्या खोल्या व राखीव संग्रह ठेवण्यासाठीं चांगली जागा यांच्यातिरिक्त संग्रहालयातील वस्तूंवर रासायनिक क्रिया करण्यासाठीं एक योग्य प्रयोगशाळाहि ठेवावी लागते. अशा प्रकारची आदर्श तरतूद मद्रास संग्रहालयांत केलेली असून शिवाय तेथें एक ' संग्रहालय-वाचनालय ' आहे. या वाचनालयाचा आतां एका मोठ्या सार्वजनिक वाचनालयामध्यें विकास झालेला आहे. या वाचनालयाचा संग्रहालयविषयक संशोधनाच्या कामीं अतिशय उपयोग होतो.

## मांडणी

संग्रहालयाजवळ असलेल्या सर्व वस्तु प्रदर्शित कराव्या असेंच सामान्यतः संग्रहालयांच्या बहुतेक चालकांना वाटतें. नेमकी हीच गोष्ट टाळणें अवश्य असतें. प्रेक्षकाला ज्या विषयाची माहिती करून द्यावयाची असेल तो विषय परिणामकारक रीतीनें विशद करण्यासाठीं आवश्यक असतील तेवढ्याच वस्तु प्रदर्शित कराव्या. संग्रहालयाजवळ असलेल्या इतर अवांतर वस्तु आणि खास अभ्यासासाठीं उपलब्ध असलेल्या इतर अतिरिक्त वस्तु व्यवस्थित रीतीनें साठवून ठेवण्याकरितां भरपूर जागा असली पाहिजे. अशा जागेंत या वस्तु शक्य तो चांगल्या रीतीनें मांडून ठेवल्या पाहिजेत आणि प्रदर्शनविभागांतील वस्तु जितक्या सुलभतेनें मिळू शकतात तितक्याच सुलभ रीतीनें या वस्तु देखील विद्यार्थ्यांस किंवा अभ्यासू विद्वानास पाहण्यास मिळाव्या पाहिजेत.

## नांवाच्या चिठ्ठ्या

या चिठ्ठ्यांवरील मजकूर संक्षिप्त, सुबोध व मुद्देसूद असावा. चिठ्ठ्यांवरील मजकूर वाचीत बसण्यास प्रेक्षकांना पुरेशी सवड व चिकाटी नसते. त्यामुळें थोडक्या वेळांत त्या वस्तूविषयीं जिज्ञासा निर्माण झाली पाहिजे आणि संग्रहालय पाहून गेल्यावर त्याच्या ज्ञानांत थोडी तरी भर पडली पाहिजे. सध्यां मोठ्या संग्रहालयांतून नांवाच्या चिठ्ठ्यांवरील मजकूर इंग्रजीव्यतिरिक्त दोन–तीन भारतीय भाषांत लिहिलेला असतो. तथापि, अशीं कित्येक संग्रहालयें आहेत कीं त्यांतील वस्तूंना अशा तऱ्हेच्या चिठ्ठ्या लावणें अवश्य आहे. संग्रहालयाच्या तसेंच संग्रहालयाला भेट देणाऱ्यांच्या दृष्टीनें अशा चिठ्ठ्यांना अत्यंत महत्त्व आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे.

## वस्तूंची भेट देणें किंवा अदलाबदल करणें याविषयींचें धोरण

संग्रहालय चळवळीच्या सुरुवातीच्या काळांत, ज्यांचा उत्तम जम बसलेला आहे अशीं कलकत्ता, मद्रास, लखनौ, इत्यादि ठिकाणचीं संग्रहालयें आपल्याजवळ असलेल्या अनेक वस्तु नव्यानें स्थापन होणाऱ्या संग्रहालयांना देणगीदाखल देत असत. अशा रीतीनें मिळालेल्या वस्तूंमुळें ज्यांचा विशेष फायदा झाला आहे अशा अनेक संग्रहालयांपैकीं मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालय हें एक आहे. एकमेकांना भेटीदाखल वस्तु देण्याच्या व वस्तूंची अदलाबदल करण्याच्या उदार प्रवृत्तीला उत्तेजन देऊन वस्तूंची देवघेव चालू ठेवणें हें सर्व संग्रहालयांचें आवश्यक धोरण असलें पाहिजे आणि ज्याअर्थी निरनिराळ्या क्षेत्रांतील भारताच्या वैभवाचें यथार्थ दर्शन घडविण्यासाठीं इतर संग्रहालयांतील वस्तु सहर्ष स्वीकारण्यांत येतात त्याअर्थी अशी भावना वृद्धिंगत होत आहे हें स्पष्ट होतें.

देशाचा इतिहास व संस्कृति यांचा योग्य रीतीनें प्रसार होण्यासाठीं, देशाच्या नैसर्गिक व सांस्कृतिक वैभवाचें सर्वांगीण दर्शन घडविणारें असें एकच संग्रहालय एखाद्या जागीं असून भागणार नाहीं. भारतीय कला, संस्कृति व वैभव यांचें थोडक्यांत पण समग्र दर्शन घडविणारी सामग्री ज्यांत आहे अशीं अनेक संग्रहालयें देशांत असलीं पाहिजेत. आपल्या संग्रहांतील गांधार शिल्पकृति ज्या प्रांतांतून मिळविल्या होत्या त्या प्रांताला परत करून ज्या मद्रास संग्रहालयाचा व्याप थर्स्टन यांनीं संकुचित केला त्याच मद्रास संग्रहालयामध्यें पुढें कांहीं वर्षांनंतर व्यापक व उदार दृष्टिकोन असलेले एक थोर भारतीय संग्रहालयवादी डॉ. ग्रॅव्हली यांनीं पुराणवस्तुविभागासाठीं बांधलेल्या नव्या जागेंत भारतीय कलेच्या प्रत्येक अवस्थेचें दर्शन घडविण्याची व्यवस्था केली. या कामीं पुराणवस्तुसंशोधन केन्द्राकडे तसेंच इतर अनेक संग्रहालयांकडे सहकार्याची याचना करण्यांत आली होती व असें सहकार्य तत्परतेनें मिळालें.

## शाळेसाठीं सोय

मद्रास संग्रहालयांत शाळांसाठीं सर्वांत चांगली सोय करण्यांत आलेली आहे. शाळेंतील विद्यार्थी आपल्या शिक्षकांसह वेळोवेळीं या संग्रहालयांत जातात व पुस्तकांत वाचलेल्या अनेक गोष्टींचें प्रत्यक्ष ज्ञान करून घेतात. विश्वविद्यालयीन विद्यार्थी, विशेषतः पदव्युत्तर अभ्यास करणारे विद्यार्थी, संग्रहालयांतील सामग्रीचा उत्तम उपयोग करून घेऊं शकतात. कला, मूर्तिशिल्पशास्त्र व नाणकशास्त्र यांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना संग्रहालयांतील वस्तूंकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं. या बाबतींत भारतीय संग्रहालयांतील पुराणवस्तुविभाग म्हणजे अनेक विश्वविद्यालयांतील आणि विशेषतः कलकत्त्यांतील विद्यार्थ्यांना व प्राध्यापकांना स्फूर्ति देणारें महान् केन्द्र बनलें आहे. संग्रहालयांना अनेक वेळा भेट देण्यांत विज्ञान व सृष्टिविज्ञान या विषयांच्या विद्यार्थ्यांचा देखील बराच फायदा होतो. कलकत्ता येथील भारतीय संग्रहालय आणि मद्रास संग्रहालय यांमधील प्राणिशास्त्रविभागांतील जातिविशिष्ट प्राण्यांचा संग्रह अभ्यासाच्या दृष्टीनें खरोखर अत्युपयुक्त आहेत. या संग्रहालयांतील वनस्पति व भूस्तरशास्त्रविषयक प्रदर्शनविभागामुळें देखील विद्यार्थ्यांना बरीच माहिती मिळते. पाठ्यपुस्तकांतून माहितीच्या रूपानें मिळणाऱ्या ज्ञानास प्रत्यक्ष उदाहरणाची जोड मिळाल्यास त्याची यथार्थ कल्पना येते आणि केवळ याच कारणासाठीं विज्ञानविषयक अभ्यास व संशोधन करण्यासाठीं कित्येक महाविद्यालयांनीं स्वतःचीं संग्रहालयें विकसित केलीं आहेत.

## संशोधन आणि प्रकाशनें

शाळांची सोय करण्याखेरीज प्रत्येक संग्रहालयानें संशोधन व प्रकाशन यावर आपलें लक्ष केंद्रित करण्यासाठीं झटलें पाहिजे, कारण संग्रहालयांना आपलीं संशोधनें व प्रकाशनें यांची देवाणघेवाण करून जगांतील तत्सम संस्थांशीं चांगल्या रीतीनें संबंध प्रस्थापित करता येतो व त्यायोगें परस्पर-

हित सहज साधतां येतें. डॉ. ग्रॅव्हेली यांच्या अविश्रांत मेहनतीमुळें संशोधनात्मक प्रकाशनांच्या बाबतींत आज मद्रास संग्रहालय इतर सर्व भारतीय संग्रहालयांच्या आघाडीवर आहे. डॉ. एच्. गेट्झ यांच्या प्रयत्नांमुळें बडोदें येथील संग्रहालयाची व कलाप्रदर्शनविभागाची एक स्वतःची पत्रिका असून तीतून नियमितपणें संग्रहालयांतील वस्तूंविषयीं मनोरंजक लेख प्रसिद्ध करण्यांत येतात. तसेंच या संग्रहालयांतील विविध वस्तूंबाबत एक पुस्तिकाहि नुकतीच प्रसिद्ध करण्यात आली आहे. मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयानें देखील अलीकडेच स्वतःची एक पत्रिका सुरू केली आहे ही गोष्ट खरोखर अत्यंत संतोषकारक आहे. भारतीय संग्रहालयानें पूर्वी अनेक पुस्तकें प्रकाशित केलीं होतीं. त्यानें आपलें प्रकाशनकार्य आतां पुन्हा सुरू केलें आहे. भारतीय संग्रहालयांतील निरनिराळ्या विभागांविषयींचीं सुरुवातीचीं प्रकाशनें — उदाहरणार्थ, डॉ. अँडरसन यांचें 'सस्तन प्राण्यांची माहिती (कॅटलॉग)' हें पुस्तक, जे. सी. रॉजर्स, व्ही. स्मिथ, नेल्सन राईट व ॲलन यांचीं नाण्यांसंबंधीं पुस्तकें — प्रथमतः संग्रहालयातर्फेंच प्रसिद्ध झालीं असलीं तरी भारतीय संग्रहालयाचें दप्तर व टिप्पणें धरून बहुतेक पुस्तकें व पत्रिका, भूस्तरशास्त्र, प्राणिशास्त्र व इतर खात्यांतर्फेंच प्रकाशित करण्यांत आलीं आहेत. "पुराणवस्तुविभाग मार्गदर्शिका" या पुस्तकाचे दोन भाग व भारतीय संग्रहालयाच्या पुराणवस्तुविभागांतील वस्तूंसंबंधीं इतर प्रकाशनें हीं पुराणवस्तुसंशोधन केन्द्रातर्फे प्रकाशित करण्यांत आलीं आहेत.

या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, माहितीपुस्तक (कॅटलॉग), मार्गदर्शिका व इतर प्रकाशनें तयार करतांना संग्रहालयांतील वस्तूंसंबंधींची माहिती विशद करण्याच्या बाबतींत पुराणवस्तुसंशोधनकेन्द्रानें बहुमोल साह्य केलें आहे. मद्रास संग्रहालयांतील अमरावती शिल्पकृतींसंबंधीं पहिला वर्णनात्मक लेख डॉ. बर्जेस — ज्यांनीं प्रथम भारहूत संग्रहालयावरहि लेख लिहिले होते — यांच्या प्रबंधांत समाविष्ट आहे. लाहोर संग्रहालयांतील बुद्धकालीन शिल्पकृतींसंबंधीं वर्णनात्मक यादी डॉ. डी. बी. स्पूनर यांनीं प्रथम तयार केली व नंतर श्री. हारग्रीव्ह्ज् यांनीं तींत सुधारणा केली. मथुरेच्या कलेक्टरच्या विनंतीवरून डॉ. वोगेल यांनीं मथुरा संग्रहालयातील वस्तूंसंबंधीं एक माहितीपुस्तक (कॅटलॉग) तयार केलें आहे. चंबा संस्थानांत केलेल्या उत्खननांत डॉ. वोगेल यांनीं मिळविलेल्या मौल्यवान् वस्तु प्रस्तुत संग्रहालयाला देऊन संग्रहालयस्थापनेच्या कामीं हातभार लावला, इतकेंच नव्हे, तर त्यांनीं तेथील वस्तूंसंबंधीं माहितीपुस्तकहि (कॅटलॉग) तयार केलें आहे.

हारग्रीव्ह्ज्नें लिहिलेल्या 'बुद्धाची शिलारूप कथा' या पुस्तकांत लाहोर संग्रहालयांतील निवडक गांधार शिल्पकृतींविषयीं चर्चा केलेली आहे. श्री. नटेश अय्यर यांनीं नागपूर संग्रहालयांतील पुराणवस्तुविभागांतील पुरातन वस्तूंची एक वर्णनात्मक यादी तयार केली आहे. "अलीकडे सांपडलेल्या कांहीं शिल्पकृति" या डॉ. हिरानंदशास्त्री यांनीं लिहिलेल्या प्रबंधांत लखनौ संग्रहालयांत ज्यांची नव्यानें भर पडली आहे अशा कलाकृतिसंबंधीं माहिती दिलेली आहे. सर जॉन मार्शल यांनीं सांची येथें अनेक वर्षें अशा प्रकारचें भरीव कार्य केलें, इतकेंच नव्हे, तर स्थानिक संग्रहालयांतील पुरातन वस्तूंसंबंधीं एक माहितीपुस्तक लिहिण्याचीहि त्यांनीं व्यवस्था केली. सन १९१० नंतर पुराणवस्तु-संशोधन आणि भारतीय संग्रहालय यांचा एकमेकांशीं निकटचा संबंध आल्यावर पुराणवस्तु संशोधनकेंद्राच्या साधनसामग्रीच्या साहाय्यानें संशोधन व उत्खनन करून या संग्रहाची पुनः मांडणी करण्यात व तो समृद्ध करण्यात आला. याशिवाय आर. डी. बानर्जी, रामप्रसाद चंदा व एन. जी. मजुमदार या एका मागोमाग आलेल्या अधीक्षकांनीं बरींच हस्तपुस्तकें आणि पुस्तिका लिहिल्या आहेत. मोठ्या संग्रहालयांनीं प्राणिशास्त्र व इतर विभागांसंबंधीं माहितीपुस्तकें तयार करून तीं वेळोवेळीं प्रसिद्ध केलीं आहेत. नागपूर संग्रहालयानें सर्प, पक्षी, मासे, सस्तन प्राणी, सरपटणारे प्राणी इत्यादि प्राण्यांविषयीं अनेक माहितीपुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. नागपूर संग्रहालयांत आणि मद्रास संग्रहालयांत सृष्टिविज्ञानविभागाकडे विशेष लक्ष पुरविल्याचें आढळून येतें आणि प्राणिशास्त्रज्ञ असलेल्या येथील संग्रहालयाध्यक्षांनीं प्राणिशास्त्राच्या शास्त्रशुद्ध अभ्यासावर वाजवी भर दिलेला आहे. मुंबई प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयांतील सृष्टिविज्ञानविभागात संग्रहालयाचे मेहनती संग्रहालयाध्यक्ष मि. एस्. एच्. प्रेटर यांनीं बऱ्याच उद्बोधक पुस्तिका प्रसिद्ध केल्या आहेत. या सृष्टिविज्ञानसंस्थेनें विद्वत्ताप्रचुर अशा अनेक ग्रंथमाला प्रसिद्ध केल्या असून तिच्यायोगें या विभागास नवचैतन्य प्राप्त झालें आहे. दार्जिलिंग प्राणिशास्त्रसंस्था आपल्या उद्बोधक मासिकपत्रिकेद्वारें वरील-प्रमाणेंच दार्जिलिंग संग्रहालयाच्या शैक्षणिक कार्यांत अमोल साहाय्य करते.

डेहराडून येथील वनसंशोधनसंस्थेच्या संग्रहालयाला सुदैवानें संस्थेच्या सर्व साधनसामग्रीचा पाठिंबा लाभलेला आहे. संस्थेनें या उत्कृष्ट संग्रहालयाच्या विविध विभागांच्या सर्व क्षेत्रांची माहिती देणारीं अनेक पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. येथील ग्राम वन्य संग्रहालयानेंहि वन्य वनस्पतिशास्त्रासंबंधीं एक हस्तपुस्तक आणि इमारती लाकडाच्या विविध जाती ओळखण्यासंबंधीं एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. पुराणवस्तुशास्त्र व कला या विषयाप्रमाणेंच प्राणिशास्त्र, मानवशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र या विषयांवर मद्रास येथील संग्रहालयानेंच अनेक पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत.

प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयाच्या कलाविभागामार्फत कलाविषयक अनेक उद्बोधक पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत. परंतु मध्यवर्ती आशिआई पुरातन वस्तु-संग्रहालय वगळल्यास बहुधा कोणत्याहि इतर संग्रहालयानें आपल्या कला-विभागांतील कलाकृतींची माहिती देणारे ग्रंथ प्रसिद्ध केलेले नाहींत. भारतीय संग्रहालयानें मात्र अलीकडे अवनिन्द्रनाथ टागोर या थोर कलावंताच्या बुरत्वानीच्या कलाकृतींसंबंधीं एक आकर्षक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे.

इतिहाससंशोधनसंस्थांशीं संलग्न असलेल्या कांहीं संग्रहालयांनीं आपापल्या पत्रिकांमधून संग्रहालयांतील वस्तूंसंबंधींची माहिती प्रसिद्ध केली आहे. पण, बहुधा राजशाही येथील वारेंद्र संशोधन संस्था, गौहत्ती येथील कामरूप अनुसंधान समिति, धारवाड येथील कन्नड संशोधन संस्था व पुणें येथील डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट अँड रिसर्च इन्स्टिट्यूट या संस्थांनींहि उपयुक्त प्रबंध प्रसिद्ध करून मोठी कामगिरी केली आहे.

## संग्रहालयांतील सार्वजनिक शैक्षणिक कार्य

अल्प किंमतीचीं सचित्र पोस्टकार्डें, मार्गदर्शिका आणि पुस्तिका हीं लोकांना विशेष आवडतात. मद्रासच्या संग्रहालयांतील वस्तूंचे व अजंठा गुहांतील चित्रांचे फोटो, छापलेलीं पोस्टकार्डें हीं भारतांतील अत्युत्कृष्ट सचित्र पोस्टकार्डें आहेत. पण इतर अनेक संग्रहालयांनीं देखील पोस्टकार्डांवरील चित्रांचे आपापले संग्रह प्रसिद्ध केले आहेत, हे नाकारतां येत नाहीं. आशुतोष संग्रहालयासारख्या नवीन संग्रहालयानें सुद्धा एक पोस्टकार्ड चित्रसंग्रह

सिद्ध केला आहे याशिवाय भारतीय संग्रहालय, प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालय, पाटणा संग्रहालय व बडोदा, अजमेर, ग्वाल्हेर आणि इतर ठिकाणच्या संग्रहालयांनी अशा प्रकारचीं सचित्र पोस्टकार्डें छापली आहेत काहीं संग्रहालयातून सार्वजनिक व्याख्यानासाठीं प्रशस्त सभागृहें आहेत संग्रहालयाच्या कार्यक्रमामध्ये त्यानाही महत्त्वाचें स्थान आहे नव्यानें बांधलेल्या संग्रहालयाच्या इमारतीच्या बाबतींत ही अत्यावश्यक बाब इमारतीचा आराखडा तयार करतानाच विचारात घेण्यात येते परवडत असल्यास प्रत्येक संग्रहालयात जनतेच्या जिव्हाळ्याच्या विषयावर उद्बोधक चित्रपट तयार करण्यासाठीं स्वतःची अशी चित्रीकरणाची सामग्री व सिने कॅमेरा असावा एखाद्या संग्रहालयात धातूच्या व दगडाच्या मूर्तींचे पुष्कळ नमुने असल्यास धातूची मूर्ति ओतण्याच्या व दगडातून ती कोरण्याच्या पद्धति चित्रपटाच्या साहाय्यानें दाखविता आल्यास तें खरोखर अतिशय उद्बोधक ठरेल त्याच प्रमाणें, एखाद्या विवक्षित कालखंडातील किंवा स्थळातील अनेक शिल्पकृति एका दालनात सादर केलेल्या असतील तेव्हा या कलाकृतींशीं संबंधित असलेल्या स्मारकातील कलेची संपन्नता आणि सौंदर्य दाखविणारे चित्रपट पहावयास मिळाल्यास प्रेक्षकांस ते मनोरंजक वाटेल नैसर्गिक वातावरणात वावरत असलेल्या जनावराची किंवा पक्ष्याची माहिती परिणामकारक चित्रपटाद्वारें दाखविल्यास संग्रहालयातील दृष्टिनिदानविभागाची 'आभासचित्रें' अधिक हुबेहूब व चित्तवेधक वाटतील

लोकांना आकर्षण आणि कुतूहल वाटेल अशा रीतीनें परिणामकारक मांडणी करून तसेंच लोकांच्या कल्पनाशक्तीचा वेध घेणारें आणि रसग्रहणाच्या बुद्धिनिष्ठ क्रियेकडे लक्ष खेंचून घेणारें सचित्र वाङ्मय निर्माण करण्यावर मुख्यतः संग्रहालयाच्या विकासाचें भवितव्य अवलंबून आहे

## संग्रहालयाध्यक्ष

संग्रहालयाध्यक्ष हा संग्रहालयाचा एक बोलकें प्रतीक आहे, हें विसरता कामा नये संग्रहालयाध्यक्षापाशीं असलेले जोम, उत्साह, ज्ञान वगैरे गुण व साधनसामग्री आणि व्यवस्थापक मंडळ व जनता यांकडून मिळालेली सहानुभूति व सहकार्य यावर संग्रहालयाचा विकास किंवा ऱ्हास बव्हंशीं अवलंबून असतो भारतात, संग्रहालयाध्यक्ष किंवा देखरेख करणारा अधिकारी सुद्धा नसलेलीं अनेक संग्रहालयें आहेत परंतु संग्रहालयाध्यक्ष असलेल्या संग्रहालयातून सुद्धा नोकरीच्या शर्ती इतक्या अनाकर्षक आहेत आणि त्याच्याकडे इतकें दुर्लक्ष केलें जातें कीं काहीं संग्रहालयाची प्रगति होण्याऐवजीं उलट ऱ्हासच होत असल्यास आश्चर्य नाहीं संग्रहालयांतील सामग्रीचा अभिरक्षक आणि तद्विषयक माहिती पुरविणारा या नात्यानें जीं कामें करावीं लागतात त्याच्याशिवाय संग्रहालयाध्यक्षाला इतरहि बरींच कामें करावीं लागतात उदाहरणार्थ, लोकांनीं मागविलेली माहिती पुरविणें, काहीं प्रश्नांचा अभ्यास करणें, लोकांच्या भावनेत आवाहन करून एखाद्या विषयाची अभिरुचि निर्माण करणें, एखाद्या पंडिताबरोबर सखोल आणि विद्वत्तापूर्ण चर्चा करणें, संग्रहालयाचा अभ्यासक आणि सामान्य माणूस या दोहोंचेंहि समाधान होईल अशा पद्धतीनें वस्तूंची मांडणी करणें व नावाच्या चिठ्ठ्या करणें त्या विद्वत्ताप्रचुर असल्या तरी भेट देण्यास येणाऱ्या प्रेक्षकाच्या दृष्टिकोनाचा जो सामान्यतः अनुभव येतो तो जमेस धरून तयार केलेल्या असाव्या संग्रहालयात प्रवेश करणाऱ्या प्रेक्षकाच्या खिशाला परवडेल अशा आकर्षक आणि माहितीपूर्ण साध्या, रेखा व भरपूर चित्रें असलेल्या मार्गदर्शिका तयार करणें, तसेंच विद्वानाला हवी असलेली सर्व माहिती ज्यात संकलित केलेली आहे व संग्रहालयातील एकंदर वस्तूंची ज्यात सविस्तर माहिती नमूद केलेली आहे, अशी माहिती पुस्तकें तयार करणें, त्याचबरोबर अभिरक्षकाची भूमिका स्वीकारून, प्रेक्षकाला सर्व सुखसोई उपलब्ध होतील असे प्रयत्न करणें आणि संग्रहालय पाहणें कंटाळवाणें होणार नाहीं अशी उपाययोजना करणें इत्यादि कामेंहि संग्रहालयाध्यक्षाला करावीं लागतात थोडक्यांत म्हणजे आनंदी वृत्तीनें व आदर्श वातावरणात संग्रहालय प्रेक्षकासमोर उभें करणें हें संग्रहालयाध्यक्षाचे कर्तव्य आहे संग्रहालय जणू कलादेवतेचें शान्त व शीतल स्थान आहे असें प्रेक्षकास वाटून, येथ त्यांना विसावा घेऊन त्याच्या बौद्धिक अनुभूतींत भर पडेल यासाठीं देखील संग्रहालयाध्यक्षानें झटलें पाहिजे

हित सहज साधता येत डॉ ग्रॅव्हेली यांच्या अविश्रांत मेहनतीमुळे संशोधनात्मक प्रकाशनांच्या बाबतींत आज मद्रास संग्रहालय इतर सर्व भारतीय संग्रहालयांच्या आघाडीवर आहे डॉ एऱ् गोट्स यांच्या प्रयत्नांमुळे बडोदें येथील संग्रहालयाची व कलाप्रदर्शनविभागाची एक स्वतंत्र पत्रिका असून तींतून नियमितपणें संग्रहालयांतील वस्तूंविषयी माहितीपूर्ण लेख प्रसिद्ध करण्यात येतात तसेंच या संग्रहालयांतील विविध वस्तूंबाबत एक पुस्तिकाहि नुकतीच प्रसिद्ध करण्यात आली आहे मुंबई येथील प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयानें देखील अलीकडेच स्वतःची एक पत्रिका सुरू केली आहे ही गोष्ट खरोखर अत्यंत संतोषकारक आहे भारतीय संग्रहालयांनीं पूर्वी थोडी पुस्तकें प्रकाशित केलीं होती त्यांनीं आपलें प्रकाशनकार्य आतां पुन्हा सुरू केलें आहे भारतीय संग्रहालयांतील निरनिराळ्या विभागविषयींचीं सुरवातीचीं प्रकाशन — उदाहरणार्थ, डॉ अँडरसन यांचें 'सस्तन प्राण्यांची माहिती (कॅटलॉग)' हें पुस्तक, जे सी रॉजर्स, व्ही स्मिथ, नेल्सन राईट व ॲलन यांचीं नाण्यांसंबंधीं पुस्तकें — प्रथमतः संग्रहालयातर्फेच प्रसिद्ध झालीं असलीं तरी भारतीय संग्रहालयांचें दप्तर व टिप्पणें घेऊन बहुतेक पुस्तकें व पत्रिका, भूस्तरशास्त्र, प्राणिशास्त्र व इतर खात्यांतर्फेच प्रकाशित करण्यात आलीं आहेत "पुराणवस्तुविभाग मार्गदर्शिका" या पुस्तकाचे दोन भाग व भारतीय संग्रहालयाच्या पुराणवस्तुविभागांतील वस्तूंसंबंधीं इतर प्रकाशन हीं पुराणवस्तुसंशोधन केन्द्रातर्फे प्रकाशित करण्यांत आलीं आहेत

या बाबतींत एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे की, माहितीपुस्तक (कॅटलॉग), मार्गदर्शिका व इतर प्रकाशनें तयार करतांना संग्रहालयांतील वस्तुसंबंधींची माहिती विशद करण्याच्या बाबतींत पुराणवस्तुसंशोधनकेन्द्रानें बहुमोल साह्य केलें आहे मद्रास संग्रहालयांतील अमरावती शिल्पकृतीसंबंधीं पहिला वर्णनात्मक लेख डॉ बर्जेस — ज्यांनी प्रथम भारहूत संग्रहालयावरहि लेख लिहिले होते — यांच्या प्रबंधांत समाविष्ट आहे लाहोर संग्रहालयांतील बुद्धकालीन शिल्पकृतीसंबंधीं वर्णनात्मक यादी डॉ डी बी स्पूनर यांनी प्रथम तयार केली व नंतर श्री हारग्रीव्हज् यांनी तींत सुधारणा केली मथुरेच्या कलेक्टरच्या विनंतीवरून डॉ वोगेल यांनी मथुरा संग्रहालयांतील वस्तूंसंबंधीं एक माहितीपुस्तक (कॅटलॉग) तयार केलें आहे चंबा संस्थानांत केलेल्या उत्खननांत डॉ वोगेल यांनी मिळविलेल्या मौल्यवान् वस्तु प्रस्तुत संग्रहालयाला देऊन संग्रहालयस्थापनेच्या कामीं हातभार लावला, इतकेंच नव्हे, तर त्यांनी तेथील वस्तूंसंबंधीं माहितीपुस्तकहि (कॅटलॉग) तयार केलें आहे

हारग्रीव्हज्नें लिहिलेल्या 'बुद्धाची शिलारूप कथा' या पुस्तकांत लाहोर संग्रहालयांतील निवडक गांधार शिल्पकृतींविषयीं चर्चा केलेली आहे श्री नटेश अय्यर यांनी नागपूर संग्रहालयांतील पुराणवस्तुविभागांतील पुरातन वस्तूंची एक वर्णनात्मक यादी तयार केली आहे "अलीकडे सांपडलेल्या कांहीं शिल्पकृति" या डॉ हिरानंदशास्त्री यांनी लिहिलेल्या प्रबंधांत लखनौ संग्रहालयांत ज्यांची नव्यानें भर पडली आहे अशा कलाकृतिसंबंधीं माहिती दिलेली आहे सर जॉन मार्शल यांनीं सांची येथें अनेक वर्षे अशा प्रकारचें भरीव कार्य केलें इतकेंच नव्हे, तर स्थानिक संग्रहालयांतील पुरातन वस्तूसंबंधीं एक माहितीपुस्तक लिहिण्याचीहि त्यांनी व्यवस्था केली सन १९१० नंतर पुराणवस्तु-संशोधन आणि भारतीय संग्रहालय यांचा एकमेकांशी निकटचा संबंध आल्यावर पुराणवस्तु संशोधनकेंद्राच्या साधनसामग्रीच्या साहाय्यानें संशोधन व उत्खनन करून या संग्रहाची पुनः मांडणी करण्यांत व तें समृद्ध करण्यांत आलें याशिवाय आर डी बानर्जी, रामप्रसाद चंदा व एन जी मजुमदार या एका मागोमाग आलेल्या अधीक्षकांनीं बरीच हस्तपुस्तकें आणि पुस्तिका लिहिल्या आहेत मोठ्या संग्रहालयांनीं प्राणिशास्त्र व इतर विभागासंबंधीं माहितीपुस्तकें तयार करून तीं वेळोवेळीं प्रसिद्ध केलीं आहेत नागपूर संग्रहालयानें सर्प, पक्षी, मासे, सस्तन प्राणी, सरपटणारे प्राणी इत्यादि प्राण्यांविषयीं अनेक माहितीपुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत नागपूर संग्रहालयांत आणि मद्रास संग्रहालयांत सृष्टिविज्ञानविभागाकडे विशेष लक्ष पुरविल्याचें आढळून येतें आणि प्राणिशास्त्रज्ञ असलेल्या येथील संग्रहालयाध्यक्षांनी प्राणिशास्त्राच्या शास्त्रशुद्ध अभ्यासावर बाजवी भर दिलेला आहे मुंबई प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयांतील सृष्टिविज्ञानविभागांत संग्रहालयाच मेहनती संग्रहालयाध्यक्ष मि एस्‌ एच्‌ प्रेटर यांनी बऱ्याच उद्बोधक पुस्तिका प्रसिद्ध केल्या आहेत या सृष्टिविज्ञानसंस्थेनें विद्वत्ताप्रचुर अशा अनेक ग्रंथमाला प्रसिद्ध केल्या असून तिच्यायोगें या विभागास नवचैतन्य प्राप्त झालें आहे दार्जिलिंग प्राणिशास्त्रसंस्था आपल्या उद्बोधक मासिक पत्रिकेद्वारें वरील-प्रमाणेंच दार्जिलिंग संग्रहालयाच्या शैक्षणिक कार्यांत अमोल साहाय्य करते

डेहराडून येथील वनसंशोधनसंस्थेच्या संग्रहालयाला सुदैवानें संस्थेच्या सर्व साधनसंपत्तीचा पाठिंबा लाभलेला आहे संस्थेनें या उत्कृष्ट संग्रहालयाच्या विविध विभागांच्या सर्व क्षेत्रांची माहिती देणारी अनेक पुस्तकें प्रसिद्ध केली आहेत येथील खास वन्य संग्रहालयानेंहि वन्य वनस्पतिशास्त्रासंबंधीं एक हस्तपुस्तक आणि इमारती लाकडांच्या विविध जाती ओळखण्यासंबंधीं एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे पुराणवस्तुशास्त्र व कला या विषयाप्रमाणेंच प्राणिशास्त्र, मानवशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र या विषयावर मद्रास येथील संग्रहालयानेंच अनेक पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत

प्रिंस ऑफ वेल्स संग्रहालयाच्या कलाविभागामार्फत कलाविषयक अनेक उद्बोधक पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत परंतु मध्यवर्ती आशिआई पुरातन वस्तु-संग्रहालय वगळल्यास बहुधा कोणत्याहि इतर संग्रहालयानें आपल्या कला विभागांतील कलाकृतींची माहिती देणारे ग्रंथ प्रसिद्ध केलेले नाहींत भारतीय संग्रहालयानें मात्र अलीकडे अवनिन्द्रनाथ टागोर या थोर कलावंताच्या सुरवातीच्या कलाकृतींसंबंधीं एक आकर्षक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे

इतिहाससंशोधनसंस्थांशीं संलग्न असलेल्या कांहीं संग्रहालयांनी आपापल्या पत्रिकांमधून संग्रहालयांतील वस्तूंसंबंधींची माहिती प्रसिद्ध केली आहे पण, बहुधा राजशाही येथील वारेंद्र संशोधन संस्था, गौहत्ती येथील कामरूप अनुसंधान समिति, धारवाड येथील कन्नड संशोधन संस्था व पुणें येथील डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट अँड रिसर्च इन्स्टिट्यूट या संस्थांनींहि उपयुक्त प्रबंध प्रसिद्ध करून मोठी कामगिरी केली आहे

## संग्रहालयांतील सार्वजनिक शैक्षणिक कार्य

अल्प किंमतीचीं सचित्र पोस्टकार्डें, मार्गदर्शिका आणि पुस्तिका हीं लोकांना विशेष आवडतात मद्रासच्या संग्रहालयांतील वस्तूंचे व अजंठा गुहांतील चित्रांचे फोटो, छापलेलीं पोस्टकार्डें हीं भारतांतील अत्युत्कृष्ट सचित्र पोस्टकार्डें आहेत पण इतर अनेक संग्रहालयांनीं देखील पोस्टकार्डांवरील चित्रांचे आपापले संग्रह प्रसिद्ध केले आहेत, हें नाकारता येत नाहीं आशुतोष संग्रहालयासारख्या नवीन संग्रहालयानें सुद्धां एक पोस्टकार्ड चित्रसंग्रह

प्रतिमा, (आ) अजिंठा येथील चित्रांची रंगचित्रें, (ई) बिद्रीची भांडी, (फ) धातूचें सामान, (ग) चिनी मातीची जुनी भांडी, (द) प्रागैतिहासिक पुरातन वस्तु, (ज) शस्त्रास्त्रें, (के) वस्त्रें, (ल) आरबी व फारशी भाषातील चमत्कार आणि अक्षरें असलेलीं हस्तलिखितें, (म) नक्कल आणि (न) सद्दीण सुमारें पहिल्या किंवा दुसऱ्या शतकांतील सातवाहन काळापासून मध्ययुगातील काकतीयांच्या काळापर्यंतच्या शिल्पकृतींचा एक उत्कृष्ट संग्रह या संग्रहालयात आहे त्यापैकीं पाणीगिरी, कोंडापूर, नेमुलगिरी इत्यादि ठिकाणीं सापडलेल्या प्राचीन शिल्पकृति फार महत्त्वाच्या आहेत मौर्यांच्या मूर्तीपैकी चारंगळ येथें सापडलेला एक लहानसा कलापूर्ण संग्रह विशेष दर्शनीय आहे

या संग्रहालयांतील पुराभिलेख संग्रहात फार जुनीं हस्तलिखितें आणि रुद्राबा राणीच्या (इ स १२७३) व रामचन्द्रदेव या यादव राजाच्या कारकीर्दीतील ताम्रपटासारखे अत्यंत महत्त्वाचे ताम्रपट आहेत या संग्रहालयातला नाण्यांचा संग्रह फार मोठा आहे, यात अप्रसिद्ध असे सातवाहन नाण्यांचे प्रकार आहेत तसेंच त्यात यादवकालीन विजयानगरच्या राजांची, मोंगलकालीन, तसेंच बहामनी राजांची व दक्षिणेंतील इतर राज्यांची नाणीं आहेत याशिवाय जुन्या शस्त्रास्त्रांचा एक अप्रतिम संग्रह आहे त्यातली कित्येक दक्षिणेंतच बनवलेलीं असावीं मध्ययुगात व अर्वाचीन कालांत भारतात आयात झालेल्या चिनी मातीच्या भांड्यांवरून चीन व भारत यांमध्यें बराच व्यापारी संपर्क होता असें दिसून येतें या विषयाला वाहिलेला एक स्वतंत्र विभागच येथें आहे या संग्रहालयातील बिद्रीच्या सामानाचा संग्रह हा सर्वांत मोठा आहे आणि तो अप्रतिम आहे अजिंठा व एलोरा येथील भित्तिचित्रांच्या मूळ आकाराच्या प्रतिकृति एका निराळ्या प्रशस्त इमारतींत प्रदर्शित केलेल्या आहेत ही इमारत भारताचे उपराष्ट्रपति डॉ स राधाकृष्णन् यांच्या हस्तें जनतेसाठीं १९५३ सालच्या जानेवारी महिन्यात खुली करण्यात आली

**शैक्षणिक कार्य** संग्रहालयाला जोडून असलेलें सुमारें ३,००० पुस्तकांचें छोटे ग्रंथालय विभागीय वापरासाठीं आहे व्याख्यानासाठीं दखील तरतूद केलेली आहे आणि प्रदर्शनें पण भरविलीं जातात मॅजिक लँटर्नच्या काचांचा एक संग्रह पण आहे विद्यार्थ्यांना सर्व प्रकारची मदत देणारे मार्गदर्शक आहेत

**प्रकाशनें** • १ धारमती, एक नवीन मोंगल टांकसाळ ले —के एम् अहमद कि १ रु

२ कोंडापूर येथील सातवाहन राजाचें एक नवीन नाणें ले एम् रामराव, कि १ रु

३ महीप राजवटीतील आणखी कांहीं नाणीं मस्की व कोंडापूर उत्खननें ले-व्ही व्ही मिराशी, कि १ रु

४ सातवाहनाचें एक कथलाचें नाणें-कोंडापूर उत्खननें ले-व्ही व्ही मिराशी, कि १ रु

५ राज्यसंग्रहालयांतील कांहीं दुर्मिळ नाणीं—बहामनी आणि मोंगल ले-के एम् अहमद, कि १ रु

६ हैदराबाद दख्खन येथील राज्यसंग्रहालयांतील कांहीं दुर्मिळ मोगल नाणीं ले-के एम् अहमद, कि १ रु

७ कोंडापूरच्या उत्खननात सापडलेली कुमहाग्रामक राजाची नाणीं • ले व्ही व्ही मिराशी, कि १ रु

८ कोंडापूर उत्खननात सापडलेली कांहीं दुर्मिळ महीष नाणीं व्ही व्ही मिराशी, कि १ रु

९ हैदराबाद संस्थानांतील उत्खननात सापडलेलीं शक क्षत्रप व त्रिकुटक नाणीं कि १ रु

१० मुद्रांचें सचित्र मस्तक कि १ रु

११ चालुक्यकालीन तांबी नाणीं ले—के एम् अहमद, किंमत १ रु

१२ हैदराबाद संग्रहालयांतील अरबी, फारशी आणि उर्दू हस्तलिखितांची सूचि ले मुहम्मद चौसे—कि ३ रु

१३ मसनवी मौलाना रूम इमदवा पण्तू उस्ताद अबदुल करीम कृत हिजरी साल ११०३ मधील हस्तलिखिताच्या छायाचित्रीकरणाच्या रीतीनें तयार केलेल्या प्रतिकृति

**कामाचे तास** गुरुवार व सरकारी सुट्यांखेरीजकरून सर्व दिवशीं सकाळीं ९ पासून दुपारीं १२ व दुपारीं २ ते संध्याकाळीं ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश** विनामूल्य

**नियंत्रक मंडळ** राज्यसंग्रहालय असल्यामुळें आंध्रप्रदेश सरकारच्या शिक्षणविभागाच सचिव याच्या नियंत्रणाखालीं आहे सर्वसाधारण देखरेख संचालक, पुराणवस्तुविभाग यांची असली तरी प्रत्यक्ष अधिकार संग्रहालयदक्षाच्या हातीं आहेत

**सेवकवर्ग** संग्रहालयाध्यक्ष, सूचिलेखक, सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष, दालन (Gallery) सहाय्यक, मुद्राधिकारी, हिशेबनीस चार कारकून, मेकॅनिक्स सुतार, गवंडी आणि सत्तावीस शिपाई

**आर्थिक तरतूद** वार्षिक अंदाजपत्रक १७०००० रुपयांचें आहे

**अभिप्राय** • हें संग्रहालय हैदराबाद येथें चांगल्या स्थळीं आहे दरदिवशीं सुमारें ५०० व दरवर्षी १,५०,००० वर प्रेक्षक भेट देतात

संग्रहालयाच्या इमारती अपुऱ्या आहेत आणि त्यात वाढ करण्याचे प्रयत्न चालू आहेत या संग्रहालयांतील वस्तु संशोधन, खरेदी, गुप्तनिधि, देणग्या आणि अदलाबदल इत्यादि विविध मार्गांनीं संपादन केलेल्या आहेत परस्पर संमतीनें इतर संग्रहालयांशीं नमुन्याची अदलाबदल करणें शक्य आहे प्रदर्शनवस्तूंची वैशिष्ट्यें दाखविण्याकरितां तक्ते, प्रतिकृति आणि चित्रें यांचा उपयोग कांहीं प्रमाणांत केला जातो नांवाच्या चिठ्ठ्या इंग्रजी, उर्दू व तेलुगू भाषेंत आहेत भारतीय संग्रहालय संघाचें हें संग्रहालय सभासद आहे

## (२) सालारजंग संग्रहालय

**स्थापना : १९५१**

**पूर्वेतिहास :** नबाब सालारजंग या नांवानेंच सर्वांना अधिक परिचित असलेले मीर युसुफ अलीखान यांच्या स्मरणार्थ या संग्रहालयाचें नांव ठेवलें आहे नबाब सालारजंग यांनीं कलावस्तूंचा एक फार मोठा संग्रह जमविला होता सालारजंग या सुप्रसिद्ध घराण्यांतील ते शेवटचे पुरुष होत ते मोठे रसिक होते १९४९ सालीं ते पैगंबरवासी झाले त्या वेळीं त्यांच्या प्रचंड संग्रहाच्या मदतीनें एक संग्रहालय उभारावें त्याचें स्वप्न अपुरें राहिलें परंतु

हैद्राबाद सरकारनें त्याच्या संग्रहाचें महत्त्व ओळखून शहरातील त्याच्या वाड्यात तो संग्रह व्यवस्थित रीतीनें मांडला. पाश्चात्य व पौर्वात्य संस्कृतींचा व्यास मनोज्ञ संगम झालेला आहे, अशा वाड्यांत असलेल्या या संग्रहालयाचें उद्घाटन पंतप्रधान श्री जवाहरलाल नेहरूंनी १६ डिसेंबर १९५१ रोजी केलें भारतसरकारने हें संग्रहालय २ डिसेंबर १९५८ रोजी आपल्या ताब्यात घेतलें.

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयाचे दोन प्रमुख विभाग आहेत–पौर्वात्य व पाश्चिमात्य पौर्वात्य विभागाच्या एकंदर ४० लहानमोठ्या खोल्या व व्हरांडे आहेत संग्रहालयात हस्तलिखितांचा एक समृद्ध संग्रह आहे यात मीर अली-अल्-खतीब, यानें लिहिलेला 'रौझत-अल्-मुहिब्बीन' नामक ग्रंथ, इमादची लेखनशैली दर्शविणारा 'लवा-ही-जामी,' सुलतान अली अल् मेषदी याच्या हस्ताक्षरातील 'शिहूई सुख्', आणि याकूत अल्-मुस्तास्समरी यानें नश्ख शैलीनें लिहिलेलें 'कुराण' यांही ग्रंथाचा समावेश होतो सुंग आणि मिंग काळातील (इ स १०००–१५००) व त्याचप्रमाणें नंतरच्या काग हें काळातील (इ स १५००–१७००) चिनीमातीच्या भांड्याचा अतिशय सुंदर संग्रह येथें आहे सिलिंडॉनच्या वस्तूंचा संग्रह त्यांतील धार्मिक प्रतीकें, कलात्मक आकृति, रंगछटा व चकाकी यामुळें अपूर्व झाला आहे हत्यारांच्या संग्रहांत कित्येक हत्यारें मोगलांच्या व इतर घराण्यांतील राजांच्या वेळचीं आहेत येथील मर्गज (जेड) मौल्यवान् दगडातील कोरीव काम अप्रतिम असून ते श्रेष्ठ कारागिरीचा सर्वोत्कृष्ट नमुना होय हत्यारांमध्यें पाचूंनी व माणकांनी मढविलेला नूरजहानचा खंजीर, हिरे, पाचू व माणकें यांनी मढविलेला जहांगीरचा खंजीर, शहाजहानची मिनाकाम केलेली कट्यार, औरंगजेबचा मर्गज खंजीर, नानासाहेबांची रत्नखचित तलवार व औरंगजेबाची साधी तलवार हीं विशेष उल्लेखनीय हत्यारें आहेत मर्गजाच्या दालनात अप्रतिम वस्तूंचा संग्रह आहे निरनिराळ्या भुकाऱ्याचा थर देऊन बनविलेल्या मसाल्याच्या पेट्या, आरशाच्या मागच्या चौकटी, हुक्कानळ्या, धनुष्यचकें, इत्यादि सुंदर कलाकृतीचे नमुने आहेत द्राक्षी रंगाच्या चिनी मर्गजाच्या वस्तूंचा व पाचूच्या रंगाचा शुद्ध मोंगलकालीन वस्तूंचा संग्रह खास तयार केलेल्या पेट्यांमध्यें ठेवलेला आहे

पौर्वात्य देशांतील अमीर-उमरावांच्या महालांतील अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण महत्त्वाच्या वस्तु म्हणजे गालिचे होत या संग्रहालयात अनेक प्रकारचे गालिचे आहेत त्यांत काशानचे मखमली जरीचे गालिचे, किरमानचे नंदनवनातील शिकार चित्र असलेले गालिचे, उत्तर पर्शियाचे विविध प्राचीन पद्धतींनी युक्त व रंगीबेरंगी चित्रांनीं भरलेले गालिचे आणि ताब्रीज, शिराज, इस्फहान व हेरात येथील वैशिष्ट्यपूर्ण आकृत्या असलेले व विणकामातील उच्च प्रतीचे कौशल्य दर्शविणारे इतर गालिचे, तसेंच युरोपीय व भारतीय विणकामाचे नमुने यांचा त्यांत समावेश होतो जयपूरकडील अप्रतिम जरीकाम केलेला एक मोठा गालिचा आणि एक हस्तीदंती गालिचा हे विशेष उल्लेखनीय आहेत

भारतीय चित्रप्रदर्शनविभागांत मोंगलकालीन राजाराणींच्या प्रेक्षणीय छोट्या तसबिरी आणि दाक्षिणात्य शैलींतील 'रागरागिणीं'च्या चित्रांचे तीन संच आहेत कांग्रा व रजपूत चित्रकला तीन दालनांतून प्रदर्शित करण्यांत आली आहे दक्षिणेकडील कला दर्शविणाऱ्या दालनात अनेक छोट्या तसबिरींबरोबर निजामअलीखानाच्या विवाहमिरवणुकीचें दृश्य दाखविणारीं दोन भव्य चित्रें आहेत. आधुनिक भारतीय चित्रकलेच्या सुप्रसिद्ध मुग्ध्, डी पी रॉयचौधरी, टागोर बंधु, मनीषी डे, शारदा उकील आणि इतर कित्येक चित्रकारांच्या चित्रांचा समावेश होतो

धातूवरील व लाकडावरील नक्षीकामात सोमस्कंद, नटराज आणि इतर सत्पुरुषांच्या प्रतिमा यहून ब्रॉंझच्या काहीं प्रतिमा आणि मथुरा, चोलीन व कालिकत येथील कोरीव नक्षीकाम केलेल्या लाकडी वस्तु यांचा संग्रहांत समावेश होतो आशियाई पद्धतीच्या बैठकीच्या शोभेच्या वस्तु (फर्निचर) इजिप्त व दमास्कस येथील कारागिरीचे नमुनेहि आहेत भारतीय पद्धतीच्या बैठकीच्या शोभेच्या वस्तूंत काश्मीर व दक्षिण भारतांतील कारागिरीचे नमुने आहेत परंतु सर्वांत उल्लेखनीय वस्तु म्हणजे हस्तीदंती खुर्च्यांचा संच होय हा अप्रतिम कलाकौशल्याचा असून तो टिपू सुलतानाचा आहे असें म्हणतात पाश्चिमात्य संग्रहविभागांत युरोपीय पद्धतीचें बैठकीच्या शोभेचें सामान असून त्यापैकीं काहीं सामान १४ व्या व १५ व्या लुईचें आहे असें म्हणतात त्यांत इटालियन शिल्पकाराने मेफिस्टोफिलीस व मार्गारेटा यांचीं लाकडावर कोरलेलीं चित्रें असून तीं अत्यंत मनोज्ञ आहेत तसेंच त्यांत चिनीमातीच्या व काचकामाच्या वस्तूंचा उत्कृष्ट संग्रह आहे बेंझोनीने तयार केलेला डोक्यावरून पदर घेतलेला संगमरवरी पुतळा म्हणजे १९ व्या शतकांतील कलाकौशल्याचा प्रशंसनीय नमुना आहे

पाश्चिमात्य चित्रकला प्रदर्शनविभागात लँडसिअर, वॅटस्, लीटन, कूपर व इतर प्रसिद्ध डच, ब्रिटिश, फ्रेंच व इटॅलियन चित्रकार यांनी काढलेलीं अप्रतिम चित्रें आहेत. त्याशिवाय वॉ स्टेवल्न काढलेलीं निसर्गाचीं दृश्यें आणि ह्यूबेन्स, राफेल, बोटिसेली, टिशीयन, वेलास्क्वीझ वगैरेसारख्या, जुन्या श्रेष्ठ चित्रकारांनीं काढलेल्या चित्रांच्या प्रतीहि ठेवलेल्या आहेत

या संग्रहालयात सन १९५६ मध्ये स्वतंत्र बालविभाग उघडण्यात आला त्यात ऐतिहासिक व कलात्मक खेळणीं प्रदर्शित करण्यात आलीं आहेत तसेंच त्यात युरोप, चीन व जपान येथील खेळणीं भारतीय खेळण्यांशीं, तुलना करण्याकरितां ठेवण्यात आलीं आहेत विजेवर चालणारी पेट्यांतील आगगाडी, बाहुल्या, घरें, संगीत पेटिका, आवाज करणारे पक्षी आणि गाणारे कॅनरी पक्षी हीं सर्व खेळणीं पाहून मुलांना फार मौज वाटते

**शैक्षणिक कार्य :** हा संग्रहालय फार लोकप्रिय असून सर्व देशांतील प्रवासी व परकीय प्रवासी हैद्राबादला गेल्यावर हा संग्रहालय न चुकतां पाहतात दरवर्षी नोव्हेंबर महिन्याच्या पहिल्या आठवड्यात संग्रहालय सप्ताह पाळण्यात येतो त्या वेळीं सर्व लोकांसाठीं व विद्यार्थ्यांसाठीं प्रवेश फी कमी करण्यात येते व त्यामुळें संग्रहालय पहावयास येणाऱ्यांची संख्या पुष्कळच वाढते शाळाकॉलेजांतून येणाऱ्या सुसंघटित पथकांतील विद्यार्थ्यांना संग्रहालयांतील सर्व गोष्टी दाखविण्यात येतात

**प्रकाशनें** संग्रहालय स्मृतिग्रंथ (सोव्हेनीर), किंमत २ रु सिलिंडॉन हत्यारें, भारतीय चित्रें, हस्तलिखितें, गालिचे, बिद्री सामान आणि युरोपीय चित्रें यांची माहितीपुस्तकें बहुतेक लवकरच प्रसिद्ध होतील

**कामाचे तास** - शुक्रवारखेरीज आणि ईद-उल्-फितर, ईद-उझ्-झुहा, मोहरमचा १० वा दिवस, धुल्दी आणि नवाब सालारजंगची पुण्यतिथि,

सोमवारच्या व काही महत्त्वाच्या दिवसांखेरीज इतर दिवशी संग्रहालय सकाळी १०-३० ते संध्याकाळी ५-३० पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** प्रथम संग्रहालय पाहण्यासाठी १ रुपया, मर्यादितविभाग पाहण्यासाठी ८ आणे आणि बालविभाग पाहण्यासाठी २ आणे. विद्यार्थ्यांच्या संघटित प्रवासांसाठी, सैन्यांतील लोकांसाठी आणि सेवकवर्गासाठी निम्मा दर.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय व वाचनालय भारत सरकारने २ डिसेंबर १९५८ रोजी आपल्याकडे घेतल्यानंतर आंध्रप्रदेश महसूल मंडळाचे सदस्य श्री अनंतरामन, आय्. सी. एस्. यांची त्यासंस्थेचे प्रभारी अधिकारी म्हणून नेमणूक करण्यांत आली आहे. सध्या हें संग्रहालय व वाचनालय त्यांच्या अधिकाराखाली आहे.

**सेवकवर्ग :** अधीक्षक श्री. एम्. डेह. रहवी, संयुक्त अधीक्षक श्री. एस्. एम्. अहमद रझवी, बी. ए., साहाय्यक अधीक्षक, चार प्रदर्शनविभाग साहाय्यक, आर्टिस्ट, बुकबाइंडर, २७ परिचारक, तीन परिचारिका, २९ पहारेकरी, दोन विद्युततज्ञ, दोन सेवक, सुतार, गवंडी, माळी, पत्रवाहक वगैरे. पौर्वात्य वाचनालयासाठी एक अधीक्षक, साहाय्यक अधीक्षक, दोन हस्तलेखनकलाकार, दोन रेकॉर्ड कीपर, बुकबाइंडर व पांच पेज फिक्सर आहेत. त्याचप्रमाणे संशोधनविभागांत दोन सल्लागार, पांच संशोधन साहाय्यक आणि बुकबाइंडर आहेत.

**आर्थिक तरतूद :** तिकिटें विकून येणाऱ्या उत्पन्नातून खर्च भागतो. चालू वर्षी अंदाजपत्रकांतील खर्चाची रक्कम रु. १,८९,४४३ इतकी असून अंदाजपत्रकांतील उत्पन्नाची रक्कम रु. १,१०,००० इतकी आहे.

**अभिप्राय :** सालारजंग संग्रहालयांत एकाच व्यक्तीनें संग्रहित केलेल्या वस्तु असून त्यांत त्यानें आपल्या हयातींत गोळा केलेल्या व त्याजकडे पूर्वापार चालत आलेल्या कलात्मक वस्तु आहेत. त्यामुळें संग्रहांत नवीन वस्तूंची भर टाकून तो वृद्धिंगत करण्याच्या बाबतींत अडचण येत होती. हें संग्रहालय अतिशय लोकप्रिय असून तें पाहण्यासाठी दरवर्षी साधारणपणें १,४८,००० पेक्षां अधिक लोक येतात. प्रेक्षकांची रोजची संख्या सुमारें ५०० आहे. संग्रहालयासाठी नवीन इमारत बांधण्याची योजना असून तीमुळें या संग्रहालयास राष्ट्रीय संग्रहालयाचें स्वरूप प्राप्त होईल अशी आशा आहे.

**कोंडापूर :** लोकसंख्या ?,०००

## पुराणवस्तु संग्रहालय

**स्थापना :** १९५२

**पूर्वेतिहास :** कोंडापूर हें प्रथम हैद्राबाद संस्थानांत होतें. संस्थानाच्या पुराणवस्तुविभागानें ह्या जागी उत्खनन केलें व त्यांत ख्रिस्तपूर्व सन २०० ते ख्रिस्ताब्द २०० या दरम्यानच्या काळांतील सातवाहनकालीन अनेक मनोरंजक वस्तु सापडल्या. संस्थान विलीन झाल्यानंतर पुराणवस्तुविभागानें ही जागा ताब्यांत घेतली व त्या जागीं संग्रहालय स्थापन केलें.

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयांत सातवाहनकालीन अनेक पुरातन वस्तूंचा बहुमोल संग्रह आहे. त्यांत मुख्यतः भांडीं, मातीच्या वस्तु, आकृत्या, मणी, बांगड्या, नाणीं व लोखंडी वस्तु इत्यादि आहेत

**शैक्षणिक कार्य :** प्रेक्षकांनीं विनंती केली असतां संग्रहाध्यक्ष संग्रहालयातील वस्तु त्यांना दाखवितात. वस्तूंवरील नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व तेलगू अशा दोन भाषांत लिहिलेल्या आहेत.

**प्रकाशनें :** ( १ ) कोंडापूर, ( २ ) एम्. जी. दीक्षित यांनी लिहिलेलें 'कोंडापूर येथील कांही मणी' या नांवाचें पुस्तक, ( ३ ) कोंडापूर येथील कोरीव व घडीव मोडी.

**कामाचे तास :** संग्रहालय सर्व दिवशी सकाळीं ९ ते संध्याकाळीं ५ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय भारत सरकारच्या पुराणवस्तुविभागाच्या संग्रहालयशाखेच्या नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहाध्यक्ष-श्री ग. सत्यनारायण, एम. ए., कारकून, तीन चौकीदार व एक झाडूवाला.

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकांत दरवर्षी - - रकमेची तरतूद आहे.

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकाची खास तरतूद केलेली नाही

**अभिप्राय :** प्रारंभी हें संग्रहालय मोठ्या उत्साहानें सुरू करण्यात आलें असलें तरी त्याजकडे अनेक वर्षे दुर्लक्ष झालेलें आहे आता त्याचें पुनरुज्जीवन करण्यात येत आहे

**नागार्जुनकोंडा :** लोकसंख्या अदाजें १,०००

### नागार्जुनकोंडा संग्रहालय

**स्थापना :** १९४९

**पूर्वेतिहास :** नागार्जुनकोंडा या पुरातन ऐतिहासिक जागी उत्खनन करून शोधून काढलेल्या पुरातन वस्तु ठेवण्यासाठी १९४८ साली हें संग्रहालय सुरू करण्यात आलें येथील संग्रहित वस्तूंमध्यें संगमरवरी दगडावर कोरलेल्या कलाकृति व बौद्धकालीन स्तूपातील इतर पुरातन वस्तु आहेत त्यात सातवाहनांची सत्ता संपुष्टात आल्यानंतर इसवी सनाच्या २ ऱ्या किंवा ३ ऱ्या शतकात होऊन गेलेल्या इक्ष्वाकु राजांच्या वेळच्या शिल्पकृतींच्या अत्युत्कृष्ट नमुन्यांचा समावेश होतो संग्रहालयाची नवीन इमारत टेकडीवर बांधावयाची असून तिची पायाभरणी नुकतीच करण्यात आली आहे कारण नागार्जुनकोंडा ही जागा नागार्जुनसागर धरणाखाली लवकरच बुडणार आहे

**व्याप्ति व संग्रह** संग्रहालयांत नागार्जुनकोंडा प्रदेशातील बौद्धकालीन स्तूपांचें, पालनाड संगमरवरी दगडामध्यें कोरलेल्या शिल्पकृतींचे हजारो भग्नावशेष असून त्यांत इक्ष्वाकुकालीन शिल्पकलेचे उत्कृष्ट नमुने पहावयास मिळतात

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयात सुमारें २४२ पुस्तकांचा छोटासा संग्रह असून संग्रहालयासाठीं हळूहळू वाचनालय सुरू करण्यात येत आहे जिज्ञासु लोकांना हीं पुस्तकें वाचावयास मिळतात संग्रहालयाध्यक्ष शाळा कॉलेजातील विद्यार्थ्यांच्या व इतर जिज्ञासू प्रेक्षकांच्या बरोबर संग्रहालयात फिरून त्यांना संग्रहालयांतील वस्तुसंबंधी माहिती देतात कांहीं निवडक विषयावर ते व्याख्यानेंहि देतात वस्तूवरील नांवाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व तेलगू भाषात आहेत

**प्रकाशनें :** (१) 'नागार्जुनकोंडा येथील बौद्धकालीन पुरातन वस्तु' लेखक—ए एच लॉंगहर्स्ट, भारताच्या पुराणवस्तुविषयक निरीक्षणकेन्द्राच्या मालिकेंतील स्मरणग्रंथ, क्रमांक ५४, (२) 'नागार्जुनकोंडा १९३८' लेखक—टी एन्. रामचंद्रन्, भारताच्या पुराणवस्तु-संशोधन केन्द्राच्या मालिकेतील स्मरणग्रंथ, क्रमांक ७१, (३) 'नागार्जुनकोंडाचा मार्गदर्शक' लेखक एन्. पी नायनार आणि (४) सचित्र पोस्टकार्डे

**कामाचे तास :** सर्व दिवशीं सकाळीं ९ ते संध्याकाळीं ५ पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालय संग्रहालयाध्यक्षाच्या ताब्यात असून तें भारत सरकारच्या पुराणवस्तु विभागाच्या संग्रहालयशाखेच्या अधीक्षकाच्या नियंत्रणाखाली असतें

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री एस्. पी नायनार, बी ए., कारकून व चार चौकीदार.

**आर्थिक तरतूद :** वार्षिक रु २५,०००

**अभिप्राय :** हें संग्रहालय नागार्जुनकोंडा येथें असून तेथून माचेरल रेल्वेस्टेशनपर्यंत जाण्यासाठीं मोटारीचा रस्ता आहे हें संग्रहालय पहाण्यासाठीं दररोज सुमारें २०० लोक येतात दिवसा व रात्रीं चौकीदाराचा पहारा असतो येथें प्रयोगशाळा नसली तरी रासायनिक प्रक्रियेचें काम साहाय्यक पुराणवस्तु-रसायनज्ञ, संग्रहालय शाखा, पुराणवस्तु विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली हा पहातो सध्याची जागा एका धरणयोजनेनुसार पाण्याखाली लवकरच जाणार असल्यामुळें संग्रहालय जवळच्या टेकडीवर इमारत बांधून तेथें हलविण्यात येणार आहे

**राजमहेंद्री** लोकसंख्या १,०५,२७५

### आंध्र इतिहास संशोधन संस्था संग्रहालय

**स्थापना .** १९२८

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय सन १९२८ मध्यें राजमहेंद्री येथील आंध्र इतिहास संशोधन संस्थेतील अभ्यासू विद्वानांच्या व मित्रमंडळींच्या प्रयत्ना मुळें सुरू करण्यात आलें. हें संग्रहालय ताम्रपट, नाणीं, इत्यादि संग्रहित साहित्याच्या मदतीने सुरू करण्यात आलें यापैकीं काहीं नाणीं श्री एस्. टी श्रीनिवास गोपालाचारी यांजकडून मिळविण्यात आलेलीं आहेत मद्रास सरकारनें काहीं चालुक्यकालीन सुवर्ण नाणीं भेटीदाखल दिलीं तसेंच भारताच्या निरनिराळ्या भागातील मित्रमंडळींकडून व डा श्री दुर्गाप्रसाद यांच्याकडूनहि पुष्कळ नाणीं भेटीदाखल मिळाली आहेत मातीच्या वस्तु, चित्रें, शिल्पकृति, शिलालेख इत्यादींसारख्या इतर पुरातन वस्तु आंध्रदेशांतील निरनिराळ्या जुन्या बौद्धकालीन ठिकाणाहून संग्रहित करण्यात आल्या आंध्र इतिहास संशोधन संस्थेच्या संस्थापक सदस्यांनी ही संस्था उभारण्याच्या कामीं मदत केली या सदस्यांत प्रा सुब्बराव, श्री धी व्ही कृष्णराव श्री एम् सोमशेखर व इतर कांहीं प्रमुख व्यक्ति आहेत

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय कला, पुराणवस्तुशास्त्र, नाणकशास्त्र, इतिहास, वाङ्मय व मानवशास्त्र या विषयांना वाहिलेलें आहे नाण्यांच्या संग्रहात शालंकायन, विष्णुकुंडीन व पूर्वेकडील चालुक्य यांच्या वेळचीं नाणीं, कलिंग देशाचे पूर्वेकडील गंग, वरंगळचे काकतीय, देवगिरीचे यादव व विजयनगरचे राजे यांच्या वेळचीं सुवर्णनाणीं, मोंगल राजांचीं रौप्य नाणीं, व तसेंच ईस्ट इंडिया कंपनीचीं नाणीं व चोल, पांड्य व सिंहल राजांच्या वेळचीं नाणीं व कांहीं छिद्राङ्कित नाणींहि आहेत भेट म्हणून मिळालेल्या २० ताम्रपटांकित दानपत्रांपैकीं दहा पूर्वेकडील गंग घराण्याचे, चार वेंगी येथील पूर्वेकडील चालुक्यांचे, चार विजयनगरच्या राजांचे व दोन कोंडाविडु येथील रेड्डींचे आहेत त्याशिवाय ताम्रपटांचे व शिलालेखांचे अनेक ठसे संग्रहात आहेत इ सनाच्या ६ व्या शतकातील जुन्या तेलगु भाषेतील दोन असल शिलालेखहि त्यांत आहेत. इतर पुरातन वस्तु राजमहेंद्री, मुन्‌लिंगम्, वरंगळ, कोंडवीडु, वेंगी व इतर ठिकाणांसंबंधीच्या आहेत आंध्र मधील निरनिराळ्या ठिकाणांच्या बौद्ध, जैन व हिंदू पुरातन स्मारकांच्या छायाचित्राशिवाय आंध्र देशांतील डोंगराळ भागातील सवर, चेंचु, कोया व सुगाली यासारख्या वन्य जमातींच्या छायाचित्रांचा संग्रह देखील आहे कलिंग, पल्लव, रेड्डी, वेंगी व विजयनगर राज्यांचे ऐतिहासिक नकाशेहि आहेत. त्याखेरीज भूर्जपत्रावरील जुन्या हस्तलिखितांचा उत्तम संग्रहहि यांत आहे

मोहरमच्या कांहीं महत्त्वाच्या दिवसांशिवाय इतर दिवशीं संग्रहालय सकाळीं १०–३० ते संध्याकाळीं ५–३० पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** सर्व संग्रहालय पाहण्यासाठीं १ रुपया, अर्धविभाग पाहण्यासाठीं ८ आणे आणि पावविभाग पाहण्यासाठीं २ आणे. विद्यार्थ्यांच्या संघटित पथकांसाठीं, मिलिटरीतील लोकांसाठीं आणि सेवकवर्गासाठीं निम्मा दर.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय व ग्रंथालय भारत सरकारनें २ डिसेंबर १९५८ रोजी ताब्यात घेतल्यानंतर आंध्रप्रदेश महसूल मंडळाचे सदस्य श्री. अनंतरामन, आय्. सी. एस्. यांची संग्रहालयाचे प्रभारी अधिकारी म्हणून नेमणूक करण्यांत आली आहे. सध्या हें संग्रहालय व ग्रंथालय त्यांच्या अधिकाराखालीं आहे.

**सेवकवर्ग :** अधीक्षक श्री. एम्. शेख. रहमी, संयुक्त अधीक्षक श्री. एन्. एम्. अहमद रहमी, बी. ए., साहाय्यक अधीक्षक, चार प्रदर्शनविभाग साहाय्यक, आर्टिस्ट, फोटोग्राफर, २७ परिचारक, तीन परिचारिका, २९ पहारेकरी, दोन विद्युततज्ज्ञ, दोन सेवक, सुतार, सहा झाडूवाले, धन्वंतरी वगैरे. पौर्वात्य वाचनालयासाठीं एक अधीक्षक, साहाय्यक अधीक्षक, दोन हस्तलेखनकलाधर, दोन इंडेक्स कीपर, दुरुस्तीकार व पांच पेज सिटर आहेत. त्याचप्रमाणें संशोधनविभागांत दोन सल्लागार, पांच संशोधन साहाय्यक आणि मुख्यादेवर आहेत.

**आर्थिक तरतूद :** निश्चित निधून येणाऱ्या उत्पन्नांतून खर्च भागतो. चालू वर्षी अंदाजपत्रकांतील खर्चाची रक्कम रु. १,८९,४४२ इतकी असून अंदाजपत्रकांतील उत्पन्नाची रक्कम रु. १,३०,००० इतकी आहे.

**अभिप्राय :** सालारजंग संग्रहालयांत एकाच व्यक्तीनें संग्रहित केलेल्या वस्तु असून त्यांनी त्या आपल्या हयातींत गोळा केलेल्या व त्यामुळें पूर्वापार चालत आलेल्या कलात्मक वस्तु आहेत. त्यामुळें संग्रहांत नवीन वस्तूंची भर टाकून तो वर्धिष्णु करण्याच्या बाबतींत अडचण येत होती. हें संग्रहालय अतिशय लोकप्रिय असून तें पाहण्यासाठीं दरवर्षी साधारणपणें १,४८,००० पेक्षां अधिक लोक येतात. प्रेक्षकांची रोजची संख्या सुमारें ५०० आहे. संग्रहालयासाठीं नवीन इमारत बांधण्याची योजना असून तीमुळें या संग्रहालयास राष्ट्रीय संग्रहालयाचें स्वरूप प्राप्त होईल अशी आशा आहे

**कोंडापूर :** लोकसंख्या ३,०००

**पुराणवस्तु संग्रहालय**

**स्थापना :** १९५२

**पूर्वेतिहास :** कोंडापूर हें प्रथम हैद्राबाद संस्थानांत होतें. संस्थानाच्या पुराणवस्तुविभागानें या जागीं उत्खनन केलें व त्यांत ख्रिस्तपूर्व सन २०० ते ख्रिस्तोत्तर २०० या दरम्यानच्या काळांतील सातवाहनकालीन अनेक मनोरंजक वस्तु सापडल्या. संस्थान विलीन झाल्यानंतर पुराणवस्तुविभागानें ही जागा ताब्यात घेतली व त्या जागीं संग्रहालय स्थापन केलें

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयात सातवाहनकालीन अनेक पुरातन वस्तूंचा बहुमोल संग्रह आहे. त्यांत मुख्यतः भांडीं, मातीच्या वस्तु, आकृत्या, मणी, बांगड्या, नाणीं व लोखंडी वस्तु इत्यादि आहेत

**शैक्षणिक कार्य :** प्रेक्षकांनी विनंती केली असतां संग्रहाध्यक्ष संग्रहालयांतील वस्तु त्यांना दाखवितात. वस्तूंवरील नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व तेलगू अशा दोन भाषांत लिहिलेल्या आहेत

**प्रकाशनें :** (१) कोंडापूर, (२) एम्. जी. दीक्षित यांनी लिहिलेलें 'कोंडापूर येथील कांहीं मणी' या नांवाचें पुस्तक, (३) कोंडापूर येथील खोदीव व घडीव भांडीं

**कामाचे तास :** संग्रहालय सर्व दिवशीं सकाळीं ९ ते संध्याकाळीं ५ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय भारत सरकारच्या पुराणवस्तुविभागाच्या संग्रहालयशाखेच्या नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहाध्यक्ष–श्री. ग. नरनारायण, एम्. ए., धरून, तीन चौकीदार व एक झाडूवाला.

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकांत दरवर्षी रु. १०,००० इतक्या रकमेची तरतूद आहे.

**अभिप्राय :** हें संग्रहालय उत्खनन स्थानाजवळ योग्य जागीं बांधलेलें आहे. संग्रहालयास भेट देणाऱ्यांची रोजची सरासरी संख्या २०० इतकी असून दरवर्षी सुमारें ८०,००० लोक तें पहावयास येतात. या संग्रहालयांतील वस्तु प्रामुख्यानें उत्खनन व संशोधन करून संपादन केलेल्या आहेत. पहारेकरी रात्रंदिवस या संग्रहाचें रक्षण करतात.

**मदनपल्ली :** लोकसंख्या १६,१४२.

**मदनपल्ली महाविद्यालय संग्रहालय**

**स्थापना :** १९३४.

**पूर्वेतिहास :** मदनपल्ली महाविद्यालयाचे त्या वेळचे प्रिन्सिपॉल डॉ. जे. एच्. कझिन्स यांनी दाखविलेल्या उत्साहामुळें, दक्षिण भारतीय चित्रकला व शिल्पकला प्रदर्शित करण्यासाठीं प्रदर्शनालयाचा विकास करण्याच्या हेतूनें हें संग्रहालय सन १९३४ मध्यें सुरू करण्यांत आलें. हें संग्रहालय सन १९४५ मध्यें निष्क्रिय झालें होतें. परंतु त्याचें आतां पुनरुज्जीवन करण्यात येत आहे.

**व्याप्ति व संग्रह :** मदनपल्लीच्या आसपासच्या भागांतून संग्रहित केलेल्या शिल्पकलेच्या वस्तु महाविद्यालयामध्यें 'चित्रालय' नांवाच्या प्रदर्शनविभागांत ठेवण्यांत आल्या आहेत. या वस्तूंत पंच उठावचित्रें आहेत. हीं उठावचित्रें पोर्ट्रेटसारखीं असून तीं चांगलीं उठावदार शिल्पकृतींसारखीं दिसतात. त्यांत डॉ. जे. एच्. कझिन्स यांनी संग्रहित केलेले विजयनगर पद्धतीचे नमुने आणि अजिंठा येथील भित्तिचित्रांच्या कांहीं प्रती व कोचीन संस्थानांतील जुन्या राजवाड्यांतील भित्तिचित्रांच्या प्रती आहेत या सर्व वस्तूंचें मिळून हें संग्रहालय बनलें आहे.

**शैक्षणिक कार्य :** कांहीं नाहीं

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं.

**कामाचे तास :** कॉलेजच्या वेळांत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय मदनपल्ली महाविद्यालयाच्या नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहालयासाठीं खास सेवकवर्ग ठेवलेला नाहीं.

**आर्थिक तरतूद** अंदाजपत्रकाची खास तरतूद केलेली नाही

**अभिप्राय :** प्रारंभी हें संग्रहालय मोठ्या उत्साहान सुरू करण्यात आलें असलें तरी त्याकडे अनेक वर्षे दुर्लक्ष मारलेलें आहे आता त्याचें पुनरुज्जीवन करण्यात येत आहे

**नागार्जुनकोंडा** लोकसंख्या अदांजे १,०००

**नागार्जुनकोंडा संग्रहालय**

**स्थापना** १९५१

**पूर्वेतिहास** नागार्जुनकोंडा या पुरातन ऐतिहासिक जागी उत्खनन करून शोधून काढलेल्या पुरातन वस्तु ठेवण्यासाठीं १९४८ सालीं हें संग्रहालय सुरू करण्यात आलें येथील संग्रहित वस्तूंमध्यें संगमरवरी दगडावर कोरलेल्या कलाकृति व बौद्धकालीन स्तूपातील इतर पुरातन वस्तु आहेत त्यात सातवाहनांची सत्ता संपुष्टात आल्यानंतर इसवी सनाच्या २ ऱ्या किंवा ३ ऱ्या शतकात होऊन गेलेल्या इक्ष्वाकु राजांच्या वेळच्या शिल्पकृतींच्या उत्कृष्ट नमुन्यांचा समावेश होतो संग्रहालयाची नवीन इमारत टेकडीवर बांधावयाची असून तिची पायाभरणी नुकतीच करण्यात आली आहे कारण नागार्जुनकोंडा ही जागा नागार्जुनसागर धरणाखाली लवकरच बुडणार आहे

**व्याप्ति व संग्रह** संग्रहालयात नागार्जुनकोंडा प्रदेशातील बौद्धकालीन स्तूपाचे, पारनाड संगमरवरी दगडामध्यें कोरलेल्या शिल्पकृतींचे हजारो भग्नावशेष असून त्यात इक्ष्वाकुकालीन शिल्पकलेचे उत्कृष्ट नमुने पहावयास मिळतात

**शैक्षणिक कार्य .** संग्रहालयात सुमारें २४२ पुस्तकांचा छोटासा संग्रह असून संग्रहालयासाठीं हळुहळू वाचनालय सुरू करण्यात येत आहे जिज्ञासू लोकांना हीं पुस्तकें वाचावयास मिळतात संग्रहालयाध्यक्ष शाळा-कॉलेजातील विद्यार्थ्यांच्या व इतर जिज्ञासू प्रेक्षकांच्या बरोबर संग्रहालयात फिरून त्यांना संग्रहालयांतील वस्तूसंबंधीं माहिती देतात काहीं निवडक विषयावर ते व्याख्यानहि देतात वस्तूवरील नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व तेलगू भाषात आहेत

**प्रकाशनें .** (१) 'नागार्जुनकोंडा येथील बौद्धकालीन पुरातन वस्तु' लेखक–ए एच लॉंगहर्स्ट, भारताच्या पुराणवस्तुविषयक निरीक्षणकेन्द्राच्या मालिकेतील स्मरणग्रंथ, क्रमांक ५४, (२) 'नागार्जुनकोंडा १९३८' लेखक–टी एन् रामचंद्रन्, भारताच्या पुराणवस्तु संशोधन केन्द्राच्या मालिकेतील स्मरणग्रंथ, क्रमांक ७१, (३) 'नागार्जुनकोंडाचा मार्गदर्शक' लेखक एस् पी नायनार आणि (४) सचित्र पोस्टकार्डें

**कामाचे तास** सर्व दिवशीं सकाळीं ९ ते संध्याकाळीं ५ पर्यंत उघडें असतें

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मंडळ** संग्रहालय संग्रहालयाध्यक्षाच्या स्वाधीन असून तें भारत सरकारच्या पुराणवस्तु विभागाच्या संग्रहालयशाखेच्या अधीक्षकाच्या नियंत्रणाखालीं असतें

**सेवकवर्ग** संग्रहालयाध्यक्ष–श्री एस् पी नायनार, बी ए, कारकून व चार चौकीदार

**आर्थिक तरतूद** वार्षिक रु २५०००

**अभिप्राय .** हें संग्रहालय नागार्जुनकोंडा येथें असून तेथून माचेर्ल रेल्वेस्टेशनपर्यंत जाण्यासाठीं मोटारीचा रस्ता आहे हें संग्रहालय पहाण्यासाठीं दररोज सुमारें ३०० लोक येतात दिवसा व रात्रीं चौकीदाराचा पहारा असतो येथें प्रयोगशाळा नसली तरी रासायनिक प्रक्रियेचें काम साहाय्यक पुराणवस्तु-रसायनज्ञ, संग्रहालय शाखा, पुराणवस्तु विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली हा पहातो सध्याची जागा एका धरणयोजनेनुसार पाण्याखालीं लवकरच जाणार असल्यामुळें संग्रहालय जवळच्या टेकडीवर इमारत बांधून तेथें हलविण्यात येणार आहे

**राजमहेंद्री** लोकसंख्या १,०५,२७५

**आंध्र इतिहास संशोधन संस्था संग्रहालय**

**स्थापना** १९२८

**पूर्वेतिहास .** हें संग्रहालय सन १९२८ मध्यें राजमहेंद्री येथील आंध्र इतिहास संशोधन संस्थेतील अभ्यासू विद्वानांच्या व मित्रमंडळींच्या प्रयत्नामुळें सुरू करण्यात आलें हें संग्रहालय ताम्रपट, नाणीं, इत्यादि संग्रहित साहित्याच्या मदतीने सुरू करण्यात आलें यापैकीं काहीं नाणीं श्री एस् टी श्रीनिवास गोपालाचारी यांजकडून मिळविण्यात आलेलीं आहेत मद्रास सरकारने काहीं चालुक्यकालीन सुवर्ण नाणीं भेटीदाखल दिलीं तसेंच भारताच्या निरनिराळ्या भागातील मित्रमंडळींकडून व स्व श्री दुर्गाप्रसाद यांच्याकडूनहि पुष्कळ नाणीं भेटीदाखल मिळालीं आहेत मातीच्या वस्तु, विटा, शिल्पकृति, शिलालेख इत्यादींसारख्या इतर पुरातन वस्तु आंध्रदेशातील निरनिराळ्या जुन्या बौद्धकालीन ठिकाणाहून संग्रहित करण्यात आल्या आंध्र इतिहास संशोधन संस्थेच्या संस्थापक सदस्यांनी ही संस्था उभारण्याच्या कामीं मदत केली या सदस्यात प्रा सुब्बराव, श्री वी व्ही कृष्णराव श्री एम् सोमशेखर व इतर काहीं प्रमुख व्यक्ति आहेत

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय कला, पुराणवस्तुशास्त्र, नाणकशास्त्र, इतिहास, वाङ्मय व मानवशास्त्र या विषयांना वाहिलेलें आहे त्याच्या संग्रहात शालंकायन, विष्णुकुंडीन व पूर्वेकडील चालुक्य यांच्या वेळचीं नाणीं, कलिंग देशाचे पूर्वेकडील गंग, वरंगळचे काकतीय, देवगिरीचे यादव व विजयनगरचे राजे यांच्या वेळचीं सुवर्णनाणीं, मोगल राजांचीं रौप्य नाणीं, व तसेंच ईस्ट इंडिया कंपनीचीं नाणीं व चोळ, पांड्य व सिंहल राजांच्या वेळचीं नाणीं व काहीं छिद्रांकित नाणींहि आहेत भेट म्हणून मिळालेल्या २० ताम्रपटांकित दानपत्रांपैकीं दहा पूर्वेकडील गंग घराण्याचे, चार वेंगी येथील पूर्वेकडील चालुक्यांचे, चार विजयनगरच्या राजांचे व दोन कोंडाविडु येथील रेड्डींचे आहेत त्याशिवाय ताम्रपटांचे व शिलालेखांचे अनेक ठसे संग्रहात आहेत इ सनाच्या ६ व्या शतकातील जुन्या तेलगु भाषेतील दोन अस्सल शिलालेखहि त्यात आहेत इतर पुरातन वस्तु राजमहेंद्री, मुखलिंगम्, वरंगळ, कोंडकोंडा, वेंगी व इतर ठिकाणासंबंधींच्या आहेत आंध्र मधील निरनिराळ्या ठिकाणांच्या बौद्ध, जैन व हिंदू पुरातन स्मारकांच्या छायाचित्रांशिवाय आंध्र देशातील किनाऱ्यावरील सवर, चेंचु, कोया व सुगली यासारख्या वन्य जमातींच्या छायाचित्रांचा संग्रह इथील आहे कलिंग, काकतीय, रेड्डी, वेंगी व विजयनगर राज्यांचे ऐतिहासिक नकाशेहि आहेत त्याखेरीज भूर्जपत्रावरील जुन्या हस्तलिखितांचा ठसा संग्रहि यात आहे

**शैक्षणिक कार्य** आंध्र इतिहास संशोधन संस्थेला जोडून एक ग्रंथालयहि आहे व त्याचा या संग्रहालयाला उपयोग करता येतो या ग्रंथालयात ५००० पुस्तकें असून ग्रंथालयास नगरपालिकेकडून व सरकारकडून अनुदान मिळतें हें संग्रहालय शाळेतील मुलासाठी व सर्व लोकासाठी खुलें असून त्यातील वस्तुसंबंधी माहिती देण्याची व्यवस्था करण्यात आली आहे महाविद्यालयीन व पदव्युत्तर अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना देखील संग्रहालयातील साहित्याचा अभ्यास करता यावा म्हणून आवश्यक त्या सवलती देण्यात येतात संस्थेच्या विद्यमानें मधून मधून व्याख्यानें देण्यात येतात व प्रदर्शनें भरविण्यात येतात संग्रहालयातील वस्तूवरील नावाच्या चिठ्ठ्या तेलगु व इंग्रजी भाषेत लिहिलेल्या आहेत आंध्र विद्यापीठाचा रौप्यमहोत्सव नुकताच साजरा झाला त्या प्रसंगी संस्थेने एक प्रदर्शन भरविलें होतें त्याचप्रमाणें भारतीय इतिहास परिषदेच्या अधिवेशनाच्या वेळीं भरविण्यात आलेल्या प्रदर्शनासाठीं या संस्थेच्या संग्रहालयातील वस्तु पाठविण्यात आल्या होत्या

**प्रकाशनें** संग्रहालयातील नाणीं, ताम्रपट व इतर साहित्य यासंबंधीचे लेख आंध्र इतिहास संशोधन संस्थेच्या पत्रिकेमध्ये प्रसिद्ध करण्यात येतात

**कामाचे तास** बुधवारखेरीज इतर सर्व दिवशीं संध्याकाळीं ४ ते ७ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मंडळ** संग्रहालयाचा कारभार आंध्र इतिहास संशोधन संस्था पाहते

**सेवकवर्ग** अवैतनिक प्रमुख चिटणीस श्री आर् सुब्बराव, एम् ए, एल टी, संयुक्त चिटणीस, ग्रंथपाल व कारकून

**आर्थिक तरतूद** या संग्रहालयासाठीं अंदाजपत्रकाची खास तरतूद नसते कारण मोफत वाचनालय व सार्वजनिक ग्रंथालय यासाठीं करण्यात येणाऱ्या सामान्य अनुदानपत्रकात संग्रहालयासाठींहि तरतूद करण्यात येते परंतु वर्गणीच्या व देणग्यांच्या रूपान आणि इंग्रजी व तेलगु भाषांतील पुस्तकांची विक्री करून दरवर्षी सुमारें ३,००० रुपये उत्पन्न मिळतें

**अभिप्राय** आंध्र इतिहास संशोधन संस्थेच्या इमारतींत हें संग्रहालय असून तेथें सहज जाता येतें संग्रहालयासाठीं स्वतंत्र इमारत नाहीं सध्याच्या जागेत वस्तूंची फार दाटी झालेली आहे व इमारतदेखील संग्रहालयास योग्य अशी नाहीं नगरपालिका संग्रहालयाची इमारत संपादन करून तींत हें संग्रहालय हलविण्यासंबंधीं सध्या प्रयत्न चालू आहे पौर्वात्य हस्तलिखितासाठीं एक मोठा हॉल नुकताच बांधण्यांत आला संग्रहालयासाठीं इमारत बांधण्याकरितां जमीन व १०,००० रुपयांची रक्कम देखील मिळविण्यात आली आहे प्रेक्षकांची दररोजची सरासरी संख्या १५ व दरवर्षीची सरासरी संख्या ६,००० इतकी आहे परंतु विशेष प्रसंगीं जेव्हां प्रदर्शनें भरविण्यात यतात त्या वेळीं प्रेक्षकांची पुष्कळ गर्दी होते नाण्यासारख्या मौल्यवान वस्तु मजबूत बंदिस्त पेटींत एका मोठ्या आल्मारीमध्यें ठेवण्यात येतात आणि इमारतीनजीक राहणारा कारकून त्याच्या सुरक्षिततेसंबधीं काळजी घेतो जरूर असेल तेव्हां या नाण्यांची छायाचित्रें घेण्याची किंवा त्याच्या प्रतिकृति तयार करण्याची व्यवस्था केलेली आहे संग्रहालयातील वस्तु खरेदी देणगी, अदलाबदल व पुरानिधि इत्यादि विविध मार्गांनीं संपादन केल्या आहेत पुरानिधींतील वस्तु स्वीकारण्याचा संग्रहालयास अधिकार मिळालेला आहे इतर संस्थांबरोबर वस्तूंची अदलाबदल करण्यास संग्रहालयाची नेहमीं तयारी असते

**तिरुपति** लोकसंख्या २७,२०७

## श्रीव्यंकटेश्वर संग्रहालय

**स्थापना** इ स १९५०

**पूर्वेतिहास** तिरुपति येथें संग्रहालय सुरू करण्याची कल्पना टी टी देवस्थानाच्या व्यवस्थापकाच्या मनांत पुष्कळ दिवस घोळत होती सन १९५० च्या जानेवारी महिन्यांत श्रीव्यंकटेश्वर ओरिएन्टल इन्स्टिट्यूटचा भाग म्हणून हें संग्रहालय सुरू करण्यात आलें ही संस्था संस्कृत, तेलगु व तामीळ या भाषांच्या तसेंच वाङ्मयीन संशोधनाच्या कार्यास वाहिलेली आहे या संस्थेतील तेलगूचे प्राध्यापक हे श्री वेतुरी प्रभाकरशास्त्री यांनी या कामीं पुढाकार घेतला आणि संग्रहालयासाठीं मौल्यवान साहित्य मिळवून उत्साहानें त्याचा संग्रह केला तीन महिन्यात त्यांनीं तिरुपतीच्या आसपासच्या भागांतूनच नव्हे तर गुंटूर व कृष्णा जिल्ह्यांतून देखील कित्येक शिलाशिल्पकृति व इतर मौल्यवान कलाकृति गोळा केल्या विशेषत मच्छलीपट्टम् येथील श्री कोटा सुब्बराव यांनीं संग्रहालयासाठीं अनेक वस्तु भेट म्हणून दिल्या या वस्तूचा एक कलाप्रदर्शन विभाग बनविण्यात आला असून त्यास मुसुरी के कृष्णराव यांचें नांव देण्यांत आलें आहे सध्या हें संग्रहालय नम्मलवार देवळाच्या आवारांतील एका मोठ्या प्रशस्त सभागृहात आहे परंतु इमारतींतील सध्याची जागा योग्य नसल्यामुळें टी टी देवस्थानाचे अधिकारी ओरिएन्टल इन्स्टिट्यूटच्या आवारांत संग्रहालयासाठीं खास नवीन इमारत बांधण्याचा विचार करीत आहेत

**व्याप्ति व संग्रह** या संग्रहालयात शिल्पमूर्ति व धातुमूर्ति, ताम्रपट नाणीं हत्यारें, लाकडी, दगडी व धातूच्या वस्तु रंगविलेलीं चित्रें व इतर विविध वस्तु आहेत

**शैक्षणिक कार्य** हें संग्रहालय विद्वान संशोधकाच्या ताब्यात असून तो जिज्ञासू विद्यार्थ्यांना व इतर प्रेक्षकांना संग्रहालयातील वस्तूविषयीं माहिती देतो वस्तूंना लावलेल्या नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजींत आहेत हें संग्रहालय पाहण्यासाठीं विद्यार्थ्यांच्या सहली काढण्यास त्यांना प्रोत्साहन देण्यात येतें

**प्रकाशनें** टी टी देवस्थान पत्रिका—या पत्रिकेंत संग्रहालयांतील काहीं वस्तूविषयीं वर्णनात्मक माहिती देण्यात येते

**कामाचे तास** सर्व दिवशीं सकाळीं १० ते संध्याकाळीं ४ पर्यंत उघडें असतें सार्वजनिक सुटीच्या दिवशीं मात्र तें बंद असतें

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मंडळ** टी टी देवस्थानाचा कार्यकारी अधिकारी संग्रहालयाचा कारभार पाहतो

**सेवकवर्ग** एक परिचारक

**आर्थिक तरतूद** संग्रहालयाचा खर्च टी टी देवस्थानाकडून चालविण्यांत येतो

**अभिप्राय :** या संग्रहालयात कलावस्तु व पुराणवस्तु ठेवलेल्या आहेत व ते गावापासून अगदी जवळच आहे. प्रेक्षकांची वार्षिक सरासरी संख्या १,००० असते. सध्याची इमारत योग्य नसल्यामुळे अधिकारी नवीन इमारत बांधण्याचा विचार करीत आहेत. दिवसा व रात्री खास पहारा ठेवण्याची तरतूद नाही व नाणी देवस्थानच्या तिजोरीत ठेवण्यांत येतात. संस्थेचे एक ग्रंथालय असून त्याचा संग्रहालयासाठी उपयोग होतो. संग्रहालयातील निरनिराळ्या प्रदर्शनात ठेवण्यासाठी मधून मधून वस्तु पाठविण्यात येतात. संग्रहालयातील वस्तु संशोधनाच्या व देणग्याच्या द्वारें मिळालेल्या आहेत. हें संग्रहालय आपल्या प्रकाशनांच्या मोबदल्यात इतर संग्रहालयांची प्रकाशनं मिळविते.

**विजयवाडा :** लोकसंख्या १,६१,१९८

**व्हिक्टोरिया ज्युबिली संग्रहालय**

**स्थापना :** सन १८८७

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय व्हिक्टोरिया टेक्निकल इन्स्टिट्यूट या नांवाने सन १८८७ मध्ये अस्तित्वांत आलें. त्यानंतर त्यास व्हिक्टोरिया ज्युबिली संग्रहालय हें नाव देण्यात आलें. व्हिक्टोरिया राणीच्या रौप्यमहोत्सवाच्या स्मरणार्थ लोकांकडून वर्गणी जमा करून मिळालेल्या पैशातून सध्याची इमारत १९२४ साली बांधण्यात आली आणि म्हणून तेंच नांव संग्रहालयास देण्यात आलेलें आहे.

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयातील बहुतेक वस्तु पुराणवस्तुशास्त्राच्या दृष्टीनें उद्बोधक आहेत. त्यात मूर्ति, शिल्पकलाकृति व शिलालेख आहेत. तसेच त्यात सृष्टिविज्ञानविषयक काही नमुने, प्लास्टरच्या रंगीत कलाकृति, प्रतिकृति, स्थानिक ग्रामोद्योगाचे नमुने व इतर वस्तु आहेत. कांही शिल्पकलाकृति व्हरांड्यात व बागेतहि मांडलेल्या आहेत.

**शैक्षणिक कार्य :** काही नाही.

**प्रकाशनें :** काही नाही.

**कामाचे तास :** सोमवारखेरीज इतर सर्व दिवशी सकाळी ८ ते ११ व दुपारी २ ते संध्याकाळी ५ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार कृष्णा जिल्हा मंडळ पाहतें.

**सेवकवर्ग :** क्यूरेटर, पाहरेकरी व माळी

**आर्थिक तरतूद :** जिल्हा मंडळाच्या अंदाजपत्रकात सेवकवर्गासाठी वगैरे १,२५० रुपयांची तरतूद करण्यात आलेली आहे.

**अभिप्राय :** हें संग्रहालय शहराच्या मध्यभागी अत्यंत रम्य जागी असून या जागेचे क्षेत्रफळ ३½ एकरापेक्षाहि जास्त आहे. संग्रहालयात सुधारणा करण्यास भरपूर वाव आहे. संग्रहालयाची इमारत त्यांत सध्या असलेल्या वस्तूंसाठी योग्य व पुरेशी असून वस्तु मांडून ठेवण्यासाठी जागाहि भरपूर आहे. रोज येणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या २० आहे. वस्तूंना लावलेल्या नावाच्या चिठ्या तेलगू भाषेत आहेत. जिल्ह्यातील बहुतेक महाविद्यालयांना व शाळांना संग्रहालयाबद्दल जिज्ञासा असून त्यातील विद्यार्थी संग्रहालयास वारंवार भेट देतात.

## आसाम

**गौहत्ती :** लोकसंख्या ९३,६१५.

**आसाम राज्य संग्रहालय**

**स्थापना :** १९४०

**पूर्वेतिहास :** गौहत्ती येथील आसाम राज्य संग्रहालय २१ एप्रिल १९४० रोजी स्थापन करण्यात आलें. इतिहास व पुराणवस्तुशास्त्राच्या संशोधनासाठी गौहत्ती येथें कामरूप अनुसंधान समिति (आसाम संशोधन संस्था) या नावाची संशोधन संस्था ता. ७ एप्रिल १९१२ रोजी स्थापन करण्यात आली होती. ह्या समितीने पुरातन वस्तूंचा उत्तम संग्रह केला होता व त्या संग्रहाच्या मदतीनच पुढें हें संग्रहालय स्थापन करण्यात आलें. हा संग्रह आसाम राज्य संग्रहालयाच्या नवीन इमारतीत नेण्यात आला. प्रसिद्ध इतिहासकार रायबहादुर के. एल. बारूआ, सी. आय्. ई., हे त्याचे संस्थापक-अध्यक्ष होते.

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय मुख्यत्वे पुराणवस्तुशास्त्रविषयक असून त्याची प्रमुख उद्दिष्टे पुरालेखविद्या, मूर्तिशिल्प आणि नाणकशास्त्रविषयक वस्तु संग्रहित करणें ही होत. या संग्रहालयात इसवी सनाच्या ८ व्या शतकापासून १६ व्या शतकापर्यंतच्या कालातील शिला व धातू यावर कोरलेल्या शिल्पकृति, आहोमपूर्वकालीन शिलालेख, इसवी सनाच्या ७ व्या शतकातील कुमार भास्करवर्मन् यांच्या कारकीर्दीतील दोन सनदा व इतर ताम्रपट, चिनीमातीच्या वस्तु, आहोमकालीन राजचिन्हें अशा प्रकारच्या विविध पुरातन वस्तूंचा बराच मोठा संग्रह आहे.

या संग्रहालयात भारताच्या पुराणवस्तुशास्त्र विभागाच्या सौजन्यामुळे मोहेंजोदारो आणि हराप्पा येथून मिळालेल्या पुरातन वस्तूंचा संग्रह बराच मोठा असून तो प्रातिनिधिक स्वरूपाचा आहे. बंदिस्त खोलीत ठेवलेल्या येथील नाण्यांचा संग्रह अतिशय मौल्यवान आहे. या संग्रहात उल्लेखिलेली नावें आणि परमर्दिक, कुशान, गुप्त, दिल्लीचे सुल्तान, मोगल बादशहा यांच्या कारकीर्दीतील नाण्यांचे काही नमुने त्याचप्रमाणे आसामी नाण्यांचा प्रातिनिधिक संग्रह यांचा समावेश होतो.

येथें हस्तलिखितांचाहि संग्रह असून त्यापैकी काही सचित्र आहेत. आसामी हस्तलिखितांचे लक्षात घेण्याजोगे वैशिष्ट्य असें की, तीं साची वृक्षाच्या (अगरु) सालीच्या पातळ पट्ट्यावर लिहिलेलीं आहेत.

**शैक्षणिक कार्य :** विभागाच्या उपयोगासाठी येथें एक ग्रंथालय असून पुस्तकें विकत घेण्यासाठी अनुदान दिलें जातें. इतिहास, मानववंशशास्त्र आणि कला या विषयांचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना संग्रहालयातील सामग्रीचा अभ्यासासाठी उपयोग करून घेण्याची सवलत असून आवश्यकता असेल तेव्हा त्यांना त्यासंबंधी माहिती दिली जाते. मधूनमधून संग्रहालयाचे अधिकारी व इतर लोक यांची व्याख्यानें ठेवण्यात येतात. प्रसंगविशेषी खास प्रदर्शनेंहि भरविली जातात. प्रदर्शन विभागात ठिकठिकाणी नावाच्या चिठ्या लावलेल्या असून त्या इंग्रजी व आसामी अशा दोन भाषांत आहेत. बालक तथा चित्रप्रदर्शनविभाग या नांवाचा एक नवीन विभाग नुकताच उघडण्यात आला असून तेथें आसामचें ऐतिहासिक व सांस्कृतिक दर्शन घडविणारी चित्रें व छायाचित्रें ठेवलेलीं आहेत.

**प्रकाशनें :** (१) ज्या कामरूप अनुसंधान समितीनें हें संग्रहालय स्थापन केलें त्या समितीची एक पत्रिका बरेच दिवसापासून प्रसिद्ध होत असून संग्रहालयविषयक लेख प्रकाशित करणारें एक मुखपत्र म्हणून ती समजली जाते (२) सचित्र पोस्टकार्डे (आसामच्या उत्कृष्ट १२ शिल्पांचा संच)

**कामाचे तास :** सोमवारखेरीजकरून इतर सर्व दिवशीं सकाळीं ९-३० ते दुपारीं ३-३० पर्यंत व रविवारी सकाळीं ७ ते १० पर्यंत हें संग्रहालय खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संचालक, लोकशिक्षण, आसाम यांच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखालीं हें संग्रहालय आहे

**सेवकवर्ग :** संग्रहाध्यक्ष—श्री पी डी चौधरी, एम् ए, बी एल साहाय्यक संग्रहालयाध्यक्ष—श्री एम् सी दास, एम् ए, कार्यालय साहाय्यक, संग्रहालय साहाय्यक, दरवान, दोन पट्टेवाले, दोन माळी व एक झाडूवाला

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अर्थसंकल्प ३०,००० रुपयांचा आहे

**अभिप्राय :** प्रदर्शनविभागांची जागा मर्यादित असल्यामुळें संग्रहालयात वस्तूंची बरीच गर्दी झाली आहे आसाम सरकार या संग्रहालयाचा विस्तार करण्याच्या विचारांत आहे बोहाग बिहू (आसामचा नववर्षदिन), माघ महिन्यातील दुर्गापूजा यांसारख्या महोत्सवप्रसंगीं संग्रहालय पहावयास येणाऱ्या लोकांची फार मोठी गर्दी होत असली तरी सरासरी दररोज १०० व वर्षांतून ३६,००० पेक्षा अधिक प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात संग्रहालयांतील नमुने कधींकधीं इतर संग्रहालयांकडे उसनवार पाठविले जातात संग्रहालयांतील वस्तु संशोधन, खरेदी, देणगी आणि गुप्तनिधि इ विविध मार्गांनी संपादन केल्या आहेत. गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं या संग्रहालयास मान्यता मिळाली आहे इतर संग्रहालयाबरोबर वस्तूंची अदला बदल करण्यात येते

## बिहार

**बुद्धगया :** लोकसंख्या ५७,४४१

### पुराणवस्तु संग्रहालय

**पूर्वेतिहास :** २८ डिसेंबर १९५६ रोजीं हें संग्रहालय सार्वजनिक प्रवेशासाठीं खुलें करण्यात आलें आणि त्याचा उद्घाटन समारंभ तिबेटचे धर्मगुरु दलाई लामा यांच्या हस्तें करण्यात आला

**व्याप्ति व संग्रह :** येथील संग्रहात, शिला व धातू यांवर कोरलेल्या बहुतेक प्रतिमा पालकालीन असून खिस्तपूर्व १ल्या शतकांतील शिळेवर कोरलेल्या दोन यक्षिणींच्या मूर्ति देखील आहेत हें संग्रहालय नुकतेंच स्थापन करण्यात आलेलें असून त्यात नवीन वस्तूंची भर घालून तें वाढविण्यांत येत आहे

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाध्यक्ष हे संग्रहालय पहावयास येणाऱ्या शालेय विद्यार्थ्यांना व इतर प्रेक्षकांना प्रदर्शित वस्तूंची माहिती देतात प्रत्येक वस्तूवर हिंदी व इंग्रजी या भाषांत लिहिलेल्या नांवाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** संग्रहालय दररोज सकाळीं ९ ते सायंकाळीं ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** भारत सरकारच्या पुरातत्त्वविभागांतील संग्रहालय शाखेच्या नियंत्रणाखालीं हें संग्रहालय आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री. हरिकिशोरप्रसाद, एम्. ए., कारकून, चिठ्ठ्याकर्ता, सहा परिचारक व एक झाडूवाला

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अर्थसंकल्प १५,५०० रुपयांचा आहे.

**अभिप्राय :** संग्रहालय योग्य ठिकाणीं वसलेलें असून जाण्यायेण्याच्या दृष्टीनं सोईचें आहे संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या दैनिक १७० असून वार्षिक ६१,४३२ एवढी असते हिंवाळ्यात त्या मानानं लोकांची गर्दी अधिक होते संग्रहालयातील वस्तु या जमवून, विकत घेऊन तसेंच देणगीच्या रूपानं मिळविलेल्या आहेत

**दरभंगा :** लोकसंख्या ८४,८१६

### चन्द्रधारी संग्रहालय

**स्थापना :** १९५६

**पूर्वेतिहास :** चन्द्रधारी संग्रहालयाच्या स्थापनेचें खरें श्रेय मधुबनी देवडीचे महाराज (दरभंगा) श्री चन्द्रधारी सिंग यांच्या औदार्यालाच दिलें पाहिजे त्यांनीं आपल्या हयातींत करून ठेवलेला कलात्मक वस्तूंचा समृद्ध संग्रह सुरवातीच्या वस्तु म्हणून या संग्रहालयास देण्यात आल्या होत्या. अशा प्रकारचें संग्रहालय उघडल्यास त्याचा आपल्या देशबांधवांना एतद्देशीय सांस्कृतिक इतिहासाचें ज्ञान करून देण्याच्या दृष्टीनं फार उपयोग होईल असें त्यांना वाटलें हस्तलिखितें, नाणीं, शस्त्रास्त्रें, रंगचित्रें आणि इतर कलात्मक वस्तु अशा ह्या विविधतापूर्ण संग्रहाचा उपयोग, १९५६ सालीं मिथिला संग्रहालय व ललितकलाप्रदर्शनासाठीं करण्यात आला आणि त्यानंतर तो संग्रह दरभंगा येथील सी एम् विद्यालयाच्या व्यवस्थेखालीं असलेल्या सार्वजनिक संग्रहालयात सुव्यवस्थित रीतीनं मांडून ठेवण्यात आला १९५६ च्या अखेरीस राज्यसरकारनें हें संग्रहालय आपल्या ताब्यांत घेण्याचें ठरविलें आणि एप्रिल १९५७ मध्यें राज्य-संग्रहालय म्हणून त्याचा कार्यारंभ झाला

**व्याप्ति व संग्रह :** सांस्कृतिक विभागाशिवाय येथें ललितकला, नाणकशास्त्र, भूस्तरशास्त्र, वस्त्रकला, लोककला, पुरातन शस्त्रास्त्रें, पुराणवस्तुशास्त्र व सृष्टिविज्ञान यासंबंधींचे स्वतंत्र विभाग आहेत

**शैक्षणिक कार्य :** मुख्यतः विभागाच्या उपयोगासाठीं येथें एक छोटें ग्रंथालय आहे, परंतु तेथील पुस्तकें इतर लोकांनाहि उपलब्ध होऊं शकतात दरवर्षी नवीन पुस्तकें विकत घेतलीं जातात कला, संस्कृति आणि संग्रहालयशास्त्र या विषयावर नियमितपणें व्याख्यानें ठेवून त्यांचा जनतेला लाभ देतां येतो शालेय तसेंच महाविद्यालयीन विद्यार्थी व पदव्युत्तर अभ्यासक यांना मदत करण्यासाठीं संग्रहालयात एक मार्गदर्शक व्याख्याता असतो नांवाच्या चिठ्ठ्या इंग्रजी, हिंदी व मैथिली अशा तीन भाषांतून लावलेल्या आहेत पाटणा विद्यापीठ व जवळपासच्या शिक्षणसंस्था ह्या संग्रहालयाचा तत्परतेनें उपयोग करून घेतात

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** दर शुक्रवार, शनिवार व रविवारी खुलें असतें. एप्रिल ते जून—सकाळीं ६-३० ते ११-३०; जुलै ते मार्च—सकाळीं १०-३० ते सायंकाळीं ५ पर्यंत.

**प्रवेश :** निःशुल्क

**नियामक मंडळ :** या संग्रहालयाचा कारभार राज्यसरकारच्या शिक्षण विभागाकडून पाहिला जातो

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री. के. के. मिश्र, एम्. ए., मार्गदर्शक, मुख्य कारकून-तथा हिशेबनीस, हस्तलेखनकार, कारकून-तथा टंकलेखक, पट्टेवाला, चौकीदार, दप्तरी तथा-कार्यालयीन पट्टेवाला, झाडूवाला व माळी, पत्रा ओढणारा व फराश हे अशकालीन सेवक आहेत.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाच्या वार्षिक अर्थसंकल्पात खालीलप्रमाणें तरतूद केलेली असते —

आवर्तक खर्च : रु. ११,३४० ००

अनावर्तक खर्च : रु. १९,०००-००

**अभिप्राय :** हें संग्रहालय मध्यवर्ती ठिकाणीं वसलेलें असून दररोज सरासरी २६ व वर्षाला १७८१ प्रेक्षक भेट देण्यास येतात. कांहीं प्रसंगीं म्हणजे जेव्हां प्रदर्शन, जत्रा किंवा जिल्हा परिषदा भरतात त्या वेळीं भेट देणाऱ्या प्रेक्षकांची संख्या अधिक असते सध्याची इमारत गैरसोयीची व अपुरी असून पुढे बांधावयाच्या नवीन इमारतीकरितां एक मोठी जागा राज्यसरकार संपादन करीत आहे नाणीं व जडजवाहीर लोखंडी तिजोरींत ठेवण्यांत येतात आणि त्यावर रात्रंदिवस सशस्त्र पहारा असतो. संग्रहालयांतील प्रदर्शित वस्तु, संशोधन, खरेदी, उत्खनन व देणगी इ. विविध मार्गांनी संपादन केल्या आहेत गुप्तनिधींतील वस्तू स्वीकारण्यासाठीं संग्रहालयास अद्यापि मान्यता मिळालेली नाहीं प्रस्तुत संग्रहालय हें भारतीय संग्रहालय संघाचा सदस्य आहे

**गया :** लोकसंख्या १,३३,७००

## गया संग्रहालय

**स्थापना :** १९५२

**पूर्वेतिहास :** एप्रिल १९४७ मध्यें गया येथें भारतीय संस्कृति संस्था स्थापन झाल्यानंतर गयेचा सांस्कृतिक इतिहास लिहून काढण्याची व एक संग्रहालय स्थापन करण्याची कल्पना निघाली सन १९५० मध्यें भारतीय संस्कृति संस्थेनें संग्रहालय उघडण्याबाबत एक औपचारिक ठराव संमत केला सन १९५२ मध्यें स्थानिक कला व उद्योग वस्तूंचें एक प्रदर्शन भरलें होतें व त्यामुळें संग्रहालयाकरितां सामग्री गोळा करण्यास जोराची चालना मिळाली आणि २७ नोव्हेंबर १९५२ रोजीं या संग्रहालयाचें औपचारिकरीत्या उद्घाटन झालें

**व्याप्ति व संग्रह :** शिलामूर्ति, खोदीव दरवाजे, भग्नावशेष, लहान स्तूप, कलाकुसरीचीं (चिनीमातीचीं) भांडीं, मातीच्या वस्तु इत्यादि तसेंच तांब्याच्या व चांदीच्या नाण्यांचा लहान संग्रह, पट्टे, कागद व हस्तिदंतावरील रेखाचित्रें, हस्तलिखितें, शस्त्रें आणि इतर विविध कलाकुसरीच्या वस्तु

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय नुकतेंच सुरू झालें असून विद्यार्थ्यांचें व अभ्यासकांचें लक्ष त्याकडे वेधलें जात आहे

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** कामाच्या सर्व दिवशीं, हिंवाळ्यांत सकाळीं १०-३० ते ४-३० व उन्हाळ्यांत सकाळीं ६-३० ते ११-३० पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** प्रौढांकरितां प्रत्येकी ६ नये पैसे तिकिट व मुलांना मोफत

**नियामक मंडळ :** जिल्हा न्यायाधीश, पोलीस अधीक्षक व इतर यांच्या संग्रहालय समितीकडून व्यवस्था पाहिली जाते

**सेवकवर्ग :** दोन कारकून, संग्रहालय पर्यवेक्षक, पहारेकरी, पट्टेवाला व झाडूवाला

**आर्थिक तरतूद :** या संग्रहालयाचा वार्षिक अर्थसंकल्प रु. ५,४०५ एवढा आहे

**अभिप्राय :** संशोधन, देणगी, खरेदी आणि गुप्तनिधि इ. मार्गांनी वस्तु संपादन करून संग्रह वाढविण्यात येतो वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठ्या हिंदी आणि इंग्रजी भाषांत लिहिल्या आहेत भारतीय संग्रहालय संघाचा प्रस्तुत संग्रहालय एक सदस्य आहे

**नालंदा :** लोकसंख्या अदमासें १,०००

## नालंदा संग्रहालय

**स्थापना :** १९१७

**पूर्वेतिहास :** भारत सरकारच्या धोरणानुसार ज्या ठिकाणीं पुरातन वस्तु शोधून काढण्यांत आल्या त्याच ठिकाणीं हें संग्रहालय १९१७ सालीं स्थापन करण्यांत आलें येथील वस्तुसंग्रह एका इमारतींतील २०' × १६'च्या तीन खोल्यांत मांडण्यात आला असून तिच्या दुसऱ्या भागाचा उपयोग, संग्रहालयास भेट देणाऱ्या किंवा तेथेंच काम करणाऱ्या पुरातत्त्वशास्त्र-विभागाच्या अधिकाऱ्यांकरितां विश्रामगृह म्हणून केला जातो १९५६-५७ सालच्या बुद्धजयंतीमहोत्सवाच्या वेळीं या इमारतीला जोडूनच दोन खोल्या व एक दिवाणखाना बांधण्यात आला

**व्याप्ति व संग्रह :** नालंदा, राजगीर आणि इतर जवळपासच्या ठिकाणीं मिळालेल्या शिलाशिल्पकृति, धातूंच्या मूर्ती, लाल मातीच्या आकृति, मातीचीं भांडीं, नाणीं, मुद्रा, लोखंडी वस्तु इत्यादि पुरातन वस्तूंचा येथील संग्रहांत समावेश केला आहे येथ ठेवलेल्या वस्तु ब्राह्मणकालीन व बुद्धकालीन मूर्तिकलेच्या दृष्टीनें प्रेक्षणीय आहेत कारण या दोन्ही धर्मपंथांच्या अनेक देव देवता तेथें आहेत कांहीं वस्तु गुप्तकालीन कला दर्शविणाऱ्या असल्या तरी येथील सामग्रीवरून बहुतेक पालकालीन कलेचेंच दर्शन घडतें

**शैक्षणिक कार्य :** येथील ग्रंथालयांत ३५० पुस्तकांचा व नियत-कालिकांचा एक छोटा संग्रह आहे जिज्ञासू प्रेक्षकांना त्यांचा लाभ घेतां येतो संग्रहालयाध्यक्ष हे स्वतः शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना तसेंच इतर जिज्ञासू लोकांना संग्रहालय दाखवून तेथील प्रदर्शनवस्तूंबद्दल माहिती पुरवितात निवडक विषयावर ते व्याख्यानेंहि देतात वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठ्या हिंदी व इंग्रजी भाषांत लिहिलेल्या आहेत कांहीं विशेष वस्तूंची विवरणात्मक माहिती नकाशे, तक्ते आणि चित्रें यांच्या साहाय्यानें दिली जाते पाटणा विद्यापीठ व इतर विद्यापीठें, महाविद्यालयें व शाळा येथील विद्यार्थ्यांच्या तुकड्या कांहीं वस्तूंचा तेथल्या तेथें अभ्यास करण्यासाठीं या संग्रहालयास भेट देतात

**प्रकाशनें :** (१) भारताच्या पुरातत्त्वशास्त्रविभागाच्या सरसंचालकाच्या वार्षिक अहवालांतील नालंदा येथील उत्खननासंबंधीचे अहवाल, (२) श्री ए घोषकृत नालंदा मार्गदर्शिका (इंग्रजी), (३) श्री जे के रॉयकृत नालंदा मार्गदर्शिका (बंगाली), (४) श्री हिरानंद शास्त्रीकृत नालंदा मार्गदर्शिका (हिंदी), (५) श्री ए. घोषकृत राजगीर मार्गदर्शिका (इंग्रजी)

**कामाचे तास :** सर्व दिवशीं सकाळीं ९ ते सायंकाळीं ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** प्रौढांस २ आणे आणि मुलें व विद्यार्थ्यांस १ आणा

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार संग्रहालयाध्यक्ष पाहतात आणि त्यावर अधीक्षक संग्रहालयशाखा, पुरातत्त्वशास्त्रविभाग, भारत सरकार, नवी दिल्ली, यांचें सर्वसाधारण प्रशासकीय नियंत्रण असतें.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री. एस एल. नागर, बी ए, कारकून, प्रवेशपत्रिका देणारा कारकून, चित्रकार-नक्शी, स्टोअरकीपर, संग्रहालय परिचारक नऊ, माळी दोन, एक झाडूवाला व एक पहारेकरी.

**आर्थिक तरतूद :** वार्षिक रु. २८,७००.

**अभिप्राय :** बिहार-बख्तियारपूर रेल्वेच्या फाट्यावर नालंदा रेल्वेस्टेशनपासून फक्त एक मैलावर सोयिस्कर ठिकाणी हें संग्रहालय वसलेलें आहे. दररोज सरासरी १७५ व वर्षांतून सुमारे ७२,००० लोक हें संग्रहालय पाहावयास येतात सूर्यदेवाच्या स्थानिक यात्रेच्या निमित्तानें वर्षांतून दोनदा म्हणजे एप्रिल व नोव्हेंबरमध्यें, राजगीर येथील त्रैवार्षिक यात्रेच्या वेळीं आणि इतर रजेच्या दिवशीं संग्रहालय पाहावयास येणाऱ्यांची संख्या बरीच मोठी असते. संग्रहालयाची इमारत प्रदर्शनवस्तूंसाठीं पुरेशी नाहीं, खोल्या लहान आहेत आणि मूळची इमारत ही संग्रहालयाकरितां बांधलेली नसल्यामुळें खोल्यांमध्यें पुरेसा प्रकाशहि नसतो. राखीव संग्रह संग्रहालयाच्या इमारतींतच दोन लहान खोल्यांत ठेवलेले आहेत, परंतु जागा अगदींच अपुरी पडते येथें प्रयोगशाळा नाहीं, परंतु संग्रहालयशाखेचा साहाय्यक पुरातत्त्वरसायनज्ञ हा येथील वस्तूंच रासायनिक क्रियेनें संरक्षण करण्याचें काम बघतो दुसऱ्या संग्रहालयांतील वस्तु प्रदर्शनार्थ ठेवणें हें या संग्रहालयाच्या कक्षेंत येत नसल्यामुळें उसनवार वस्तु येथें आणल्या जात नाहींत या संग्रहालयांतील वस्तु मुख्यत्वें पुरातन ऐतिहासिक ठिकाणांहून आणि नजिकच्या भागांतून संशोधनानें मिळविलेल्या आहेत

**पाटणा :** लोकसंख्या २,८३,४७९

## पाटणा संग्रहालय

**स्थापना :** १९१७

**पूर्वेतिहास**—सन १९१५ मध्यें पाटणा येथें संग्रहालय स्थापन करण्याचा प्रश्न बिहार व ओरिसा सरकारनें हातीं घेतला. तथापि, संग्रहालयाची खरी सुरुवात १९१७ मध्यें झाली. त्या वेळीं स्थानिक उच्च न्यायालयाच्या इमारतींतील कांहीं खोल्यांमध्यें संग्रहित वस्तु ठेवण्यांत आल्या. संग्रहांतील वाढत्या वस्तु ठेवण्यासाठीं सन १९२९ मध्यें, संग्रहालयाची सध्याची मोंगल–रजपूत नमुन्याची इमारत बांधण्यांत आली आणि तिचें उद्घाटन, बिहार–ओरिसाचे तत्कालीन राज्यपाल हिज एक्सेलन्सी सर ह्यू लॅन्सडाऊन स्टिफेनसन यांच्या हस्तें झालें

**व्याप्ति व संग्रह :** येथील संग्रहांत, पुरालेख विद्या व नाणकशास्त्र विषयक वस्तु धरून पुरातत्त्वशास्त्रीय, मानववंशशास्त्रीय, भूस्तरशास्त्रीय, सृष्टिविज्ञान व कलाविषयक वस्तु, शस्त्रास्त्रें आणि तैलचित्रें, आणि इतर वस्तूंचा समावेश होतो ह्या वस्तु तळमजल्यावरील व पहिल्या मजल्यावरील खोल्यांत आणि व्हरांड्यांत ठेवलेल्या आहेत

संग्रहालयांतील अश्मयुगीन हत्यारें हीं बहुतेक बिहारच्या छोटानागपूर विभागांतील वेगवेगळ्या ठिकाणचीं आहेत परंतु, कुऱ्हाडीचें पातें यासारख्या ताम्रयुगीन वस्तु बिहारमधील निरनिराळ्या भागांत सापडलेल्या आहेत

पुरातन शिल्पकृतींच्या नमुन्यांपैकीं दिदारगंज यक्षी हा मौर्यकालीन कलाकृतीचा एक उत्कृष्ट नमुना आहे आरशासारखी स्वच्छ चकाकी असलेली ही वस्तु भारतीय स्त्रीसौंदर्याचें एक उत्कृष्ट प्रतीक आहे बसरा येथील चक्रचिंकित सिंहशीर्षाकृति, लोहानीपूर येथील जैन तीर्थंकराचा शिर व हातपाय नसलेला अतिप्राचीन पुतळा आणि बुलंदीबाग येथील शिलाचक्रें हीं देशील मौर्यकालीन कलेचीं इतर उत्तम उदाहरणें दाखवितां येतील कुम्रहार येथील ठिकाणीं सापडलेली लालसर रंगाच्या दगडांत कोरलेली मिथुन कलाकृति हें शुंगकालीन कलेचें सुंदर प्रतीक आहे. गुप्तकालीन शिल्पकारांच्या शिल्पकौशल्याचें दर्शन घडविणारी भव्य विष्णुमूर्ति संग्रहालयाच्या इमारतीच्या उत्तरेस ठेवलेली आहे गया, शहाबाद, वैशाली, इ अनेक ठिकाणाहून मिळविलेल्या व गुप्त कालीन त्याचप्रमाणें पाल व सेनकालीन कलाकौशल्याची साक्ष पटविणाऱ्या इतर अनेक वस्तु येथें आहेत ज्यांची कालनिश्चिती झाली आहे अशा वस्तुंपैकीं एक म्हणजे इ सनाच्या ९ व्या शतकांतील देवपाल राजाच्या कारकीर्दींतील एक मूर्ति येथें आहे

दि डॉ स्पूनर आणि पाटणा संग्रहालयाचे माजी संग्रहालयाध्यक्ष यांनी बुलंदीबाग आणि कुम्रहार येथें केलेल्या उत्खननांत आणि बिहार सरकारच्या लोकस्वास्थ्य विभागानें जलनिस्सारण योजनेसाठीं केलेल्या खोदकामांत लाल मातीच्या अनेक आकर्षक आकृति मिळालेल्या आहेत लाल मातीच्या वस्तूंच्या या संग्रहांत मथुरा, कौशाम्बी, भिता, राजगीर आणि इतर ठिकाणच्या वस्तूंचा समावेश होतो त्यावरून मौर्यपूर्वकालापासून गुप्तकालीन बरेच प्रातिनिधिक स्वरूप पाहावयास मिळतें वैशाली (बसरा) येथील उत्खननांत अनेक मातीच्या आकृति, मुद्रा आणि मुद्रांकित वस्तु सापडल्या आहेत

त्याचबरोबर पाटणा येथील संग्रहालयांत ब्रॉंझच्या मूर्तींचा चांगला संग्रह आहे सन १९३० मध्यें कुर्किहार येथें जमिनींत गाडलेल्या अनेक पालकालीन व सेनकालीन ब्रॉंझच्या मूर्ती सापडल्या त्यांचें वैशिष्ट्य असें कीं, बऱ्याचशा मूर्तींचे डोळे मूलतः चांदीचे अथवा मौल्यवान खड्यांनीं बसविलेले होते कुर्किहार येथील मूर्तींशीं साधर्म्य असलेल्या नालंदा येथील अनेक ब्रॉंझच्या मूर्ति भारताच्या पुरातत्त्वशास्त्रविभागाच्या सरसंचालकाकडून घेऊन येथें ठेवलेल्या आहेत भारतांतून इंडोनेशियापर्यंत बुद्धधर्माचा प्रसार कसा होत गेला हें जाणून घेण्याच्या दृष्टीनें ह्या मूर्ति उद्बोधक आहेत

मोहेंजोदारो येथील पुरातन वस्तूंचा संग्रह सरसंचालक, पुरातत्त्वशास्त्र विभाग यांजकडून उसनवारीनें मिळाला आहे.

येथील नाण्याचा संग्रह विपुल असून त्यात पालमाऊ, पाटणा, मोंघीर इत्यादि ठिकाणाहून मिळविलेली छिद्रांकित चांदीचीं नाणीं आणि पाटणा, बसार व नालंदा येथील उत्खननांत मिळालेल्या ताम्रमुद्रा व आदिवासीकालीन नाण्यांचा समावेश होतो बंगाल व जौनपूर येथील सुलतान, दिल्लीचे सुलतान व मोंगल सम्राट याच्या काळांतील सर्व प्रकारच्या नाण्यांचे नमुने येथें ठेवलेले आहेत

कलाविभागात मोंगल, राजपूत, कांग्रा, बसोली आणि चम्बाकालीन रंगचित्राचे नमुने ठेवलेले आहेत तिबेटी देवळावरील पताकांचा मोठा संग्रह राहूल सांकृत्यायन यानीं देणगी म्हणून दिलेला आहे

एक प्रदर्शनविभाग शस्त्रास्त्रें व विजयचिन्हें यांकरिता राखून ठेवलेला आहे

मानववंशशास्त्रविषयक व औद्योगिक वस्तु ह्या प्रामुख्यानें बिहार व ओरिसातील आहेत

सृष्टिविज्ञानविषयक वस्तूंसाठी एक प्रदर्शनविभाग राखून ठेवला आहे भूस्तरशास्त्रविषयक वस्तूमध्यें उल्कापाषाण देखील आहेत येथील संग्रहात भरण्यासारखी एक चीज म्हणजे एक भव्य व जतन करून ठेवलेलें असें अश्मीभूत झाड होय

**शैक्षणिक कार्य :** विभागीय उपयोगाकरिता या संग्रहालयाचें एक चांगलें ग्रंथालय असून त्यात ३,४५८ पुस्तकें व नियतकालिकें आहेत महत्त्वाच्या प्रदर्शनवस्तूसंबंधीची माहिती लोकांना देण्यासाठी येथें एक अधिकृत मार्गदर्शक असतो मार्गदर्शिका तसेंच सचित्र पोस्टकार्डे विक्रीस ठेवलेली आहेत प्रदर्शनविभागामध्यें हिंदी, उर्दू आणि इंग्रजी अशा तीन भाषामध्यें नावाच्या चिट्ठ्या लावलेल्या आहेत काहीं विशिष्ट वस्तु स्पष्ट करण्यासाठी तक्ते व साचे यांची देखील मदत घेतली जाते

**प्रकाशनें :** ( १ ) पुराणवस्तुशास्त्रविभागाची मार्गदर्शिका ( शिलाशिल्पें, लाल मातीच्या वस्तु व ब्रॉंझच्या मूर्ति ), रु १.

( २ ) बौद्धशिल्पकृतींसंबंधीं माहितीपुस्तक,

( ३ ) निवडक बौद्ध शिल्पकृति,

( ४ ) ४८ वस्तूंचीं सचित्र पोस्टकार्डें किंमत प्रत्येकीं २ आणे

( ५ ) ब्रॉंझ व शिला शिल्पाच्या निवडक प्रदर्शनवस्तु व सृष्टिविज्ञान विषयक नमुने यांच्या पोस्टकार्ड आकाराच्या १४ चित्राच्या तीन पुस्तिका ( प्रत्येकीं ८ चित्रें ),

( ६ ) पाटणा संग्रहालयाचा वार्षिक अहवाल

**कामाचे तास :** सोमवार, होळीचे तीन दिवस, दुर्गापूजेचे दोन दिवस आणि स्वातंत्र्यदिन खेरीजकरून इतर सर्व दिवशीं खुलें असतें. एप्रिल ते सप्टेंबर–सकाळीं ८ ते ११ व दुपारीं ३ ते ६ ऑक्टोबर ते मार्च–सकाळीं १० ते सायंकाळीं ५.

**प्रवेश :** विनामूल्य; फक्त शुक्रवारीं प्रत्येक प्रेक्षकास ४ आणे फी द्यावी लागते

**नियामक मंडळ** या संग्रहालयाचा कारभार व्यवस्थापक समितीच्या सल्ल्यानुसार राज्य सरकार पाहते व्यवस्थापक समितींत संग्रहालयाध्यक्ष धरून अकरा सदस्य असतात

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री सय्यद हसन शेरे, एम् ए (लंडन), एल एल बी, (अलिगड), रासायनिक साहाय्यक, मार्गदर्शक, छायाचित्रकार, नमुनाकार, हस्तलेखनकलाकार, मुख्य कारकून, कारकून–टंकलेखक, साक्षर मार्गदर्शक, दफ्तरी, सुतार, आठ चौकीदार, पाच पट्टेवाले, तीन फराश, सहा माळी व तीन झाडूवाले

**आर्थिक तरतूद :** अर्थसंकल्पातील वार्षिक तरतूद रु १४,३८० एवढी आहे

**अभिप्राय :** हें संग्रहालय या राज्याच्या राजधानीमध्यें सोयीस्कर ठिकाणीं वसलेलें आहे हें संग्रहालय पाहावयास दररोज सरासरी ३०० व वर्षातून १,०५,००० प्रेक्षक येतात मोठ्या जत्रेच्या वेळीं आणि कार्तिक पौर्णिमा, मकरसंक्रांत यासारख्या सणाच्या दिवशीं प्रेक्षकांची संख्या फार मोठी असते संग्रहालयाची इमारत सोयिस्कर असली तरी तिची वाढ करणें जरूर आहे राखीव वस्तुसंग्रह आणि समकृति ठेवण्यास येथें पुरेशी जागा नाहीं नाणीं व इतर जडजवाहीर बंदिस्त खोलींत ठेवलेलें असतें प्रदर्शन विभागावर दिवसा परिचारकाचा आणि रात्रीं सशस्त्र पोलीस रक्षकाचा पाहारा असतो संग्रहालयातील महत्त्वाच्या प्रदर्शनवस्तूंची छायाचित्रें, ओतीव कृति आणि प्रतिकृति विकत मिळतात संग्रहालयातील वस्तु खरेदी, गुप्तनिधि, देणगी व देवाण–घेवाण इ विविध मार्गांनीं संपादन केलेल्या आहेत ह्या संग्रहालयास गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं मान्यता मिळाली आहे इतर संग्रहालयाबरोबर देवाण–घेवाण तत्त्वावर समकृतींची अदलाबदल करण्यात येते हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें एक सदस्य आहे.

**वैशाली :** लोकसंख्या २०,०००

## वैशाली संग्रहालय

**स्थापना :** १९४५

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय, वैशाली परिसरात उत्खननाशिवाय मिळालेल्या पुरातन वस्तूंच्या खाजगी संग्रहातून निर्माण झालें बहुतेक वस्तु चक्रमदासचे श्री बिजुलीसिंग यानीं जमविलेल्या असून त्यानाच संग्रहालयाचे रक्षक म्हणून नेमण्यात आलें आहे त्याचा सध्याचा हुद्दा संग्रहालयाध्यक्षाचा आहे सद्यःस्वरूपांतील संग्रहालय हें ३१ मार्च १९४५ रोजी अस्तित्वात आलें आणि लवकरच तें वैशाली संघानें आपल्या ताब्यात घेतलें सन १९४८ मध्यें वैशाली संघानें वैशाली येथें उत्खननकार्य सुरू केलें आणि त्याप्रीत्यर्थ रु ६,००० खर्च झाला पुराणवस्तुशास्त्रविभागाच्या सहकार्यानें हीं कामें करण्यात आल्यामुळें येथील वस्तुसंग्रहात बरीच मोलाची भर पडली वैशाली येथें सापडलेल्या वस्तूंच्या प्रतिकृतीदेखील पाटणा संग्रहालयाकडून मिळविण्यात आल्या आणि उत्खननाशिवाय सापडणाऱ्या वस्तु जमविणें चालूच होतें सन १९५० मध्ये बिहार सरकारने या संग्रहालयाच्या इमारतबांधणीसाठीं रु २३,००० चें अनुदान मंजूर केलें ही इमारत पूर्ण होत आली आहे

**व्याप्ति व संग्रह :** वैशाली प्रदेशांतील सुमारें १०० खेडेगांवातून मिळालेल्या पुरातन वस्तु या संग्रहालयात ठेवलेल्या आहेत

**शैक्षणिक कार्य**– वैशाली संघाचें, सुमारें १३,०० पुस्तकांचं एक सर्वसाधारण पुस्तकालय येथें आहे त्याचा संग्रहालयासहि उपयोग होतो

जवळपासच्या गांवातून येणाऱ्या प्रेक्षकांना, संग्रहालयातील प्रदर्शनवस्तूंची सर्वसाधारण पूर्वमाहिती वैशाली संघाच्या स्थानिक अधिकाऱ्यांकडून पुरविण्यात येते. वैशाली महोत्सवाच्या वेळी अथवा खास व्यवस्था केली असल्या-खेरीज महाविद्यालयीन व पदव्युत्तर विद्यार्थ्यांना प्रदर्शनवस्तूंची माहिती करून देण्याची कोणतीहि अन्य व्यवस्था नाही. स्थानिक शाळा व समाज-शिक्षणकेंद्र यांच्याकरितां लवकरच विद्युचित्रदीपाची व्यवस्था केली जाणार आहे नियमित व्याख्यानें ठेवण्याची येथें व्यवस्था नसली तरी प्रसंगोपात्त बाहेरून येणाऱ्या प्रेक्षकांकडून संग्रहालयांत अथवा संग्रहालयाच्या जवळच अशी व्याख्यानें ठेवली जातात संग्रहालयातील वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठया हिंदी व इंग्रजी भाषांत लिहिलेल्या आहेत, पण त्या पुरेशा नाहीत.

**प्रकाशनें :** संग्रहालयाची स्वतंत्र अशी प्रकाशनें नाहीत परंतु वैशाली संघ या संग्रहालयाच्या मूळ संस्थेमार्फत काही प्रकाशनें निघालेली आहेत

**कामाचे तास :** सकाळी ८ ते सध्याकाळी ५ पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** प्रारंभी संग्रहालयाचा कारभार वैशाली संघाकडून पाहिला जात असे, परंतु हल्लीं तो तसा पाहिला जातो की नाही हे सांगतां येत नाही.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष श्री. विजुली सिंग व एक शिपाई

**आर्थिक तरतूद :** वैशाली संघ आणि बुरखी तथा वैशाली शैक्षणिक विकास कार्यालय यांच्याकडून संग्रहालयासाठी काही निधीची तरतूद होत असे, परंतु वस्तूंच्या संग्रहासाठी व आकस्मिक खर्चासाठी असलेल्या २५० रुपयांच्या रकमेखेरीज पगार वगैरेसाठी कोणतीच तरतूद नाही असें दिसून येतें

**अभिप्राय :** संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या इसमांची रोजची सरासरी संख्या ५० असली तरी, दरवर्षी होणाऱ्या वैशाली उत्सवाच्या (मार्च–एप्रिल-मध्यें येणारी महावीर जयंति) काळात ही संख्या १००० ते २००० पर्यंत असते आणि सबंध वर्षात संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या इसमांची संख्या २५००० इतकी असते संग्रहालयासाठी बांधलेली नवीन इमारत सध्या पुरेशी आहे संग्रहालयात दिवसा व रात्रीं रक्षण व पहारा करण्याची जबाब-दारी संग्रहालयाच्या रक्षकावर आहे आणि नाणीं व इतर मौल्यवान वस्तु कडीकुलपात ठेवलेल्या असतात राखीव संग्रहासाठीं व समप्रति (duplicates) ठेवण्यासाठीं पुरेशी जागा नाही विभागाच्या उपयोगी पडावें म्हणून एक ल्हानसें ग्रंथालय बांधण्यात येत आहे संग्रहालयासाठीं वस्तु गोळा करण्याचीं साधन, संशोधन, खरेदी, उत्खनन, देणगी व अदलाबदल ही होत परंतु गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं या संग्रहालयास मान्यता दिलेली नाही हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे संग्रहालयाची सुधारणा करण्यासाठी आखलेल्या योजनेंत समाजशिक्षणकेंद्राचा विकास करण्याचें योजिलें आहे या केंद्रात, संग्रहालयात ठेवलेल्या वस्तूंचे महत्त्व व अर्थ याविषयी स्थानिक गावकऱ्यांना सर्वसाधारण कल्पना देण्यात येईल त्याचप्रमाणें प्रदर्शन वस्तूंची माहिती देणारें एक हिंदी नियतकालिक काढून त्यासाठींच काचचित्रें व चलचित्रें तयार करण्यात यावीं असें प्रस्तावित केले आहे

## मुंबई

**अहमदाबाद :** लोकसंख्या ७,८८,३३३

### (१) नगरपालिकेचें संग्रहालय (सांस्कृतिक केंद्र)

**स्थापना :** १९५७

**पूर्वेतिहास :** या संग्रहालयाचें उद्घाटन तारीख ११ जानेवारी १९५७ रोजीं झालें आणि संग्रहालयाच्या नवीन इमारतींतील प्रदर्शन सभागृह नुकतेंच बांधून झालें असल्यामुळें प्रस्तुत योजना अजून पुरी झालेली नाही. संग्रहित वस्तु मांडून ठेवण्यात आल्या असून संग्रहालयास मूर्त स्वरूप येत आहे

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयांत पुढील शाखांचा समावेश होईल अशी त्याची योजना आहे आणि संग्रहालयांत ठेवावयाच्या वस्तूंचा अद्याप संग्रह करण्यात येत आहे.

(१) सृष्टिविज्ञान शाखा,

(२) प्राचीन स्मारक शाखा,

(३) मानवविज्ञान शाखा,

ह्या मुख्य शाखांशिवाय, संग्रहालयाच्या इमारतींत, प्रदर्शनाचें दालन, सभागृह, ग्रंथालय, कारखाना, थिएटर व उपहारगृह यांचा समावेश करण्यात आला आहे

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय अगदीं अलीकडे सुरू करण्यात आल्यामुळें त्यात अजून पुरेसा वस्तूंचा संग्रह करण्यात आलेला नाही आणि ते सुसज्ज करण्यात आल्याबरोबर शैक्षणिक व सांस्कृतिक कार्याचें एक केंद्र बनेल संग्रहालयाच्या कार्यात मदत करण्यासाठीं, सिनेमांत दाखवावयाचीं काचचित्रें, टेप रेकॉर्डिंगज् व रंगचित्रांच्या प्रतिकृति यांच्या स्वरूपात सुमारें ५,४०० डॉलर किंमतीची साधनसामग्री देण्याबाबत युनेस्कोकडून आश्वासन मिळालें आहे संग्रहालयाच्या इमारतीचा सध्या खास व आंतर-राष्ट्रीय प्रदर्शनासाठीं उपयोग करण्यात येत आहे कला, शिल्प व विज्ञान यासंबंधींच्या प्रदर्शनाकडे शैक्षणिक व सांस्कृतिक संस्था आकर्षित होतात तज्ज्ञ व विद्वान लोकांना काचचित्रांच्या साहाय्यानें व्याख्यानें देण्यासाठीं बोलावण्यात येतें ।

**प्रकाशनें :** संग्रहालय नुकतेंच सुरू करण्यात आलें आहे आणि इंग्रजींतील व गुजरातींतील पुढील दोन लहान पुस्तिकांखेरीजकरून प्रकाशन अजून प्रसिद्ध झालेलीं नाहींत

(१) अहमदाबाद सांस्कृतिक केंद्र

(२) संस्कार केंद्र, अहमदाबाद, (गुजरातीमध्यें)

**कामाचे तास :** रविवार व शनिवार दुपार खेरीजकरून सर्व दिवशीं सकाळीं ११ ते सध्याकाळीं ६ पर्यंत उघडें असतें प्रदर्शनें भरतात तेव्हां व रविवारीं जास्त वेळ उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचें नियंत्रण व कारभार म्युनिसिपल कमिशनर व संग्रहालय सल्लागार समिति यांच्या मार्फत महानगरपालिकेकडून पाहण्यात येतो

**सेवकवर्ग :** सचालक—ही जागा अजून भरण्यात आली नाहीं सहाय्यक सचालक—श्री आर जे पटेल, छायालेखक व विद्युत्चालक, दर्शक कलाकार, कारकून, पहारेकरी, शिपाई व झाडूवाले

**आर्थिक तरतूद :** चालू वर्षाकरितां अदाजपत्रकांत ५०,००० रुपयांची तरतूद करण्यांत आली आहे

**अभिप्राय :** सग्रहालयें शहरांतल्या मध्यवर्ती अशा व चागल्यांत चांगल्या जागीं असून तेथून नदीचा देखावा दिसतो सग्रहालयाची इमारत हा आधुनिक शिल्पकलेचा एक उत्कृष्ट नमुना असून तिचा नकाशा एम् कॉर्बुजिअर यानीं तयार केला प्रयोगशाळा, ग्रंथालय व सग्रहालयाचे इतर आनुषंगिक भाग स्थापन करण्यांत येत आहेत जानेवारी ते एप्रिल १९५७ पर्यंत सुमारें तीन लक्ष लोक हें सग्रहालय पाहून गेले आणि ' माणसाचें कुटुंब ' या प्रदर्शनाच्या वेळीं सुमारें दोन लक्ष लोक येऊन गेले समाधान कारक असा कायम स्वरूपाचा सग्रह नसल्यामुळें सग्रहालय पूर्णपणें सुसज्ज झालेलें नाहीं आणि तें नियमितपणें चालू होण्यास काही वेळ लागेल पदार्थ सग्रहालयात सध्यां कोणतीहि नाणीं किंवा मूल्यवान् वस्तु नसल्या तरी, देखरेख ठेवण्याकरिता आळीपाळीन काम करणारे तीन पहारेकरी आहेत

हें सग्रहालय मूलत शिक्षणविषयक आहे व त्यामुळें इतिहास, वाङ्मय व विज्ञान यांसारख्या विषयासबंधींच्या वस्तूहीं त्यात सहज समावेश होईल मानवाच्या भोंवतालचें विश्व, मानवजाती व मानवाचें कर्तृत्व ह्या गोष्टी, मुख्य इमारतीच्या सभोंवतीं बांधलेल्या तीन निराळ्या इमारतींत असलेल्या तीन लहान सग्रहात प्रदर्शित करण्यात येतील आणि सग्रहालयाच्या मुख्य इमारतींत नेहमीं बदलणारें प्रदर्शन भरविण्यात येतील हें सग्रहालय भारतीय सग्रहालय सघाचें सदस्य आहे

## (२) शेठ भोलाभाई जेशिंगभाई ज्ञानार्जन व सशोधन सस्थेचें सग्रहालय

**स्थापनेचें वर्ष :** माहीत नाहीं

**पूर्वेतिहास :** हें सग्रहालय एक स्वतंत्र विभाग म्हणून अजून सुरू करण्यात आलेलें नाहीं सस्था बरेच दिवसांपासून पुरातन वस्तु मोठ्या सख्येन जमवीत असून तिचा हा सग्रह होऊं घातलेल्या सग्रहालयाची सुरुवातच होय असें म्हणता यइल

**व्याप्ति व सग्रह** (१) हस्तलिखित—सस्कृत ६,१५०, गुजराती, हिंदी व व्रज-भाषातील २,५४३, फारशी व अरबी भाषातील २२७, ताडपत्रावर लिहिलेली ६, (२) ताम्रपट २, (३) रंगचित्रें ७९, (४) नाणीं ३,५८२, (५) सकीर्ण पुरातन वस्तु ९५, आणि (६) अश्मीभूत अवशेष १३२

**शैक्षणिक कार्य :** सस्थेचें एक ग्रंथालय असून नजिकच्या काळात ती जेव्हा आपल्या मालकीच्या इमारतींत जाईल तेव्हा सग्रहालयाचें कार्य नियमितपणें सुरू होईल

**प्रकाशनें :** काहीं नाहीं

**कामाचे तास** कामाच्या सर्व दिवशीं सस्थेच्या कार्यालयाच्या वेळात उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मडळ :** सग्रहालय हें सस्थेचा एक भाग असून सस्था त्यावर देखरेख ठेवते

**सेवकवर्ग :** सग्रहालयासाठीं निराळा सेवकवर्ग नाहीं

**आर्थिक तरतूद :** सस्थेपासून वेगळी अशी कोणतीहि तरतूद अदाजपत्रकांत केलेली नाहीं

**अभिप्राय :** कांहीं नाहीं

**अमरेली :** लोकसख्या २७,८२६

## श्री. गिरधरभाई शिशुसग्रहालय

**पूर्वेतिहास :** श्री प्रतापराय जी मेहता यांनीं अमरेलीजवळ असलेल्या गोहिल्वाड गिरो या नावानें ओळखल्या जाणाऱ्या ठिकाणीं सापडलेल्या ऐतिहासिकदृष्टया महत्त्वाच्या अशा अनेक वस्तूंचा सग्रह केला होता आणि तो या सार्वजनिक ग्रंथालयाचा भाग म्हणून बॉकर लायब्ररी म्हणजेच सार्वजनिक पुस्तकालयास जोडून असलेल्या एका खोलींत प्रदर्शित केला होता ही घटना १९३४ मध्यें घडली नंतर श्री मेहता यानीं मुंबई राज्याचे अर्थ-मंत्री डॉ जीवराज मेहता यास या संस्थेत रस घालण्याची विनति केली अमरेली नगरपालिकेनें देखील मदत करण्याचें मान्य केलें आणि जिल्हा मडळान वार्षिक अनुदान देण्याची तयारी दर्शविली तसेंच मुंबई सरकारनें शिशुसग्रहालयासाठीं रगमहाल ही इमारत दिली आणि त्या वेळचे मुख्य मंत्री मुरारजी देसाई याच्या हस्तें १९५५ मध्यें त्याच उद्घाटन झाल मुलाचें सग्रहालय म्हणून या पदार्थसग्रहालयाची कल्पना श्री पी जी मेहता याची होती म्हणून सस्थापकाच्या पित्याच्या स्मरणार्थ त्यास गिरधरभाई शिशुसग्रहालय असें नांव देण्यात आल आहे अमरेलीच्या व आजूबाजूच्या मुलासाठीं हें सग्रहालय आता एक शैक्षणिक केंद्र बनलें आहे श्री मेहता यानीं या सग्रहालयाच्या बाबतींत फारच आस्था दाखविल्यामुळें या संग्रहालयात विद्यार्थ्यांसाठीं सौंदर्यात्मक, सास्कृतिक व बौद्धिक शिक्षण घेण्याचें विस्तृत क्षेत्र प्राप्त झालें आहे

**व्याप्ति व सग्रह** . या पदार्थसग्रहालयात पुढील शाखा आहेत (१) अमरेली पुरातन वस्तुशाखा, (२) कला व पुराणवस्तुशास्त्र शाखा, (३) मानवजातिशास्त्र शाखा, (४) सृष्टिविज्ञान शाखा, (५) मत्स्यायन, (६) बाहुल्या शाखा, (७) विज्ञान शाखा, (८) कथा शाखा, (९) आतरराष्ट्रीय शाखा आणि (१०) मत्स्यालय

**शैक्षणिक कार्य** . बालवाडीच्या मुलाना, शाळेंतील विद्यार्थ्यांना व सग्रहालयास भेट देणाऱ्या इतर प्रेक्षकाना या सग्रहालयात ठेवलेल्या वस्तू सबधीं माहिती देण्यात येते संग्रहालयात ठेवलेल्या वस्तूंसबंधीं मुलाना सोप्या व शैक्षणिक स्वरूपाच्या गोष्टीहि सागण्यात येतात चित्रपट दाखविण्यात येतात व व्याख्यानहि ठेवण्यांत येतात सग्रहालयात ठेवलेल्या वस्तूची माहिती देण्याच्या बाबतींत शाळेंतील शिक्षक स्वेच्छेन मदत करतात नांवाच्या चिठ्ठ्या सामान्यत गुजरातींत व क्वचित हिंदी भाषेंत आहेत एक छोटेंसें ग्रंथालय असून त्यात संग्रहालयातच सदर्भासाठीं म्हणून पहाण्यास ३०० पुस्तकें व सहा नियतकालिकें आहेत

**प्रकाशनें :** (१) सग्रहालयाची पुस्तिका, आणि (२) भारतातील ग्रामीण विभागातील शिशुसग्रहालयें या विषयावरील एक लहानसें पुस्तक

**कामाचे तास** . फेब्रुवारी ते जून—सकाळीं ८॥ ते ११॥ व दुपारी ३॥ ते ६॥, जुलै ते जानेवारी—सकाळीं ९ ते १२ आणि दुपारी ३ ते ६

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मंडळ :** समहालयाचा कारभार, अमरेली नगरपालिका व श्री. गिरधरभाई संग्रहालय समिति यांच्याकडून पाहिला जातो.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष श्री. हिरालाल पी. शाह, कारकून व तीन शिपाई.

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अंदाजपत्रक १३,४६० रु इतके आहे.

**अभिप्राय :** संग्रहालय योग्य अशा ठिकाणी असून तेथे सहज जाता येते समहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांची संख्या दरसाल ८,४४२ इतकी असते ज्या इमारतीत संग्रहालय आहे ती इमारत अतिशय जुनी आहे राहत्या इमारतीचे पदार्थसंग्रहालयात योग्यप्रकारे कसे रूपांतर करता येते याचे हे एक उदाहरण आहे परंतु प्रदर्शनविभाग व सामान ठेवण्याची जागा पुरेशी नाही नकाशे, तक्ते, नमुने वगैरेंचा प्रदर्शनात भरपूर उपयोग केला आहे समहालयावर दिवसा व रात्री देखरेख ठेवण्याची व्यवस्था केली आहे संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांसाठी शक्य तितक्या सुखसोयी केल्या आहेत

**औंध :** लोकसंख्या ५,०००

## श्रीभवानी संग्रहालय

**स्थापना :** १९३८

**पूर्वेतिहास :** कै बाळासाहेब पंतप्रतिनिधि, औंधचे राजेसाहेब यांनी या संग्रहालयाची स्थापना केली व आपल्या हयातीत, सुमारे ५० वर्षांच्या कालावधीत त्याचा विकास घडवून आणला राजवाड्याच्या निरनिराळ्या खोल्यात ज्या वस्तु पडलेल्या होत्या त्या एकत्र करून मुळपिढचे राजेसाहेब, सन्माननीय कुंवर सर जगदीशप्रसाद, गव्हर्नर जनरलच्या एक्झीक्युटिव्ह कौन्सिलचे सदस्य यानी १९३८ मध्ये बांधलेल्या एका स्वतंत्र इमारतीत त्या ठेवण्यात आल्या

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयातील वस्तूत मुख्यत जुन्या व नव्या या दोन्ही धाटाच्या भारतीय व युरोपियन शैलीच्या रंगचित्रांचा समावेश आहे त्यात ७०० पेक्षा अधिक भारतीय रंगचित्रे आहेत व १५ व्या शतकापासून २० व्या शतकापर्यंतच्या युरोपातील महान् चित्रकारांच्या अनेक चित्रकृति आहेत कांगरा शैलीच्या ९६ चित्रांचा एक उत्कृष्ट संच आहे स्थूलमानाने त्याची पुढीलप्रमाणे वर्गवारी करता येईल •

१ (अ) जयपूर शैली (रागरागिणींची चित्रे)
(ब) मोगल शैली (रागरागिणींची चित्रे)
(क) रजपूत शैली (बारा महिन्यांचे सचित्र दर्शन)
(ड) कांगरा शैली (अष्टनायक व इतर चित्रे)
(इ) हिमालयीन शैली (सप्तसनींचे सचित्र दर्शन)
(फ) गढवाल शैली (भारवीचे किरातार्जुनीय महाकाव्य ९५ चित्रांत दाखविलेले)
(ग) पंजाबी शैली (रागरागिणी व रुक्मिणीस्वयंवर याचे सचित्र दर्शन)
(ह) विजापूर शैली (मुसलमान सतांची व ऐतिहासिक चित्रे)
(आय्) महाराष्ट्र शैली (ऐतिहासिक व धार्मिक चित्रे)
(जे) नेपाळी शैली (श्लोक रूपांतील मैत्रेय-बुद्ध-कथा आणि दशावतार कथा)
(के) आधुनिक भारतीय शैली (पौराणिक, ऐतिहासिक देखावे वगैरे)
(ल) आधुनिक बंगाली शैली (पौराणिक, ऐतिहासिक वगैरे)
(म) पॉम्पी येथील भित्तिचित्रे – प्रतिकृति
(न) अजंठा भित्तिचित्रे-प्रतिकृति
(ओ) सित्तनवासल भित्तिचित्रे–चार प्रतिकृति
(प) प्राचीन युरोपियन महान् चित्रकारांची चित्रे (प्रतिकृति व अस्सल)
(क्यू) आधुनिक युरोपीय शैली (देखावे वगैरे अस्सल चित्रे)

याशिवाय या समहात, प्राचीन शिल्पकृति, ब्रॉझच्या प्रतिमा (भारतीय, युरोपीय, आशिआई शैलीच्या प्रतिकृति किंवा अस्सल कृति), शिलालेख, सोन्याची प्राचीन नाणी, मौल्यवान् सख्यावरील कोरीवकाम, चंदनाच्या व हस्तिदंताच्या वस्तु, राज्यांत तयार केलेल्या कलाकृति आणि फारसी, अरेबिक, मराठी व संस्कृत हस्तलिखिते याचा समावेश करण्यात आला आहे

**शैक्षणिक कार्य :** या समहालयास श्री भवानराव ग्रंथालय विभाग जोडण्यात आला असून तो लोकाना पाहण्यास खुला आहे त्यात ऐतिहासिक व सांस्कृतिक दृष्ट्या महत्त्वाची असलेली जवळ जवळ २००० हस्तलिखिते धरून निरनिराळ्या विषयांवरील १६,६७५ पुस्तके असून भारतीय व परकीय कलेविषयींची महत्त्वाची पुस्तके असलेला एक खास कलाविभाग आहे समहालयास भेट देण्यासाठी येणाऱ्या लोकाना व विद्यार्थ्यांना संग्रहालयाचा साहाय्यक समहालयात ठेवलेल्या वस्तूंच्या व्यवस्थेसंबंधींची माहिती देतो मुंबई राज्यातील शाळांतील व महाविद्यालयांतील विद्यार्थी विशेषत हिंवाळ्यांत माध्यमिक शाळा जेव्हा सहली काढतात त्या वेळी हे संग्रहालय पाहण्यास येतात

**प्रकाशनें :** १ श्रीभवानी समहालय व कलाप्रदर्शनविभाग, औंध (सचित्र पत्रिका), १९३८ याची मार्गदर्शिका, औंध सस्थान मुद्रणालय, लेखक—श्रीमंत भवानराव पंत प्रतिनिधि, बी ए, औंधचे राजे पृष्ठे ७७, मूल्य ४ आणे

२ कोठें काय आहे (श्रीभवानी समहालय व ग्रंथालयाची मराठी मार्गदर्शिका) १९३५, औंध सस्थान मुद्रणालय, पृष्ठे २५ लेखक—श्रीमंत भवानराव पतप्रतिनिधि, बी ए, औंधचे राजे

३ हिंदी चित्रांचे वैशिष्ट्य (भारतीय कलेची खास वैशिष्ट्ये), पृष्ठे १३ ८३, लेखक—कै श्री बाळासाहेब पंतप्रतिनिधि, औंधचे राजे प्रदर्शित केलेल्या रंगचित्रांच्या अस्सल प्रती समहालयात ठेवल्या आहेत

४ (१) अजंठा—१९३०, औंध सस्थान मुद्रणालय पृष्ठे १३२ १४
(२) सचित्र रामायण—१९१६, ब्रिटिश इंडियन प्रेस, पृष्ठे ७२ ६०
(३) शिवाजी चित्रसमह—तीन भाग

**कामाचे तास :** मंगळवार खेरीजकरून सर्व दिवशी दुपारी ११ ते ५॥

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हे संग्रहालय सचालक, अभिलेख व ऐतिहासिक स्मारक, मुंबई सरकार, याच्या प्रत्यक्ष प्रशासकीय नियत्रणाखाली आहे

**सेवकवर्ग :** समहालय साहाय्यक—श्री एम् आर् इनामदार व सहा नोकर

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकांतील वार्षिक तरतूद ६,००० रु. इतकी आहे

**अभिप्राय :** हें संग्रहालय रहिमतपूर रेल्वेस्टेशनपासून सुमारें दहा मैलांच्या अंतरावर असून तें पाहण्यास परेच प्रेक्षक येतात १९५१–५२ सालीं १७,२३५ प्रेक्षक हें समहालय पाहून गेले दरसाल जानेवारी महिन्यात भरणाऱ्या पौष यात्रेच्या वेळीं हें संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांची संख्या बरीच मोठी असते प्रदर्शनांत ठेवलेल्या वस्तूंसाठीं संग्रहालयाची इमारत सध्या पुरेशी आहे, परंतु त्यांत आणखी वस्तूंची भर पडली तर आणखी जागा लागेल तीन सशस्त्र पहारेकरी रात्रंदिवस संग्रहालयावर पहारा करीत असतात. नाणीं व इतर मौल्यवान् वस्तु बंदिस्त खोलींत ठेवलेल्या असतात वस्तु ठेवण्याची जागा सध्या पुरेशी आहे. संग्रहालयाच्या प्रत्येक खोलींत संग्रहालय पाहाण्यासाठीं येणाऱ्या लोकांच्या सोयीसाठीं दगडी बैठका आहेत आणि त्यांच्या उपयोगासाठीं जवळच एक विश्रांतिगृह आहे हा संग्रह बहुतांशीं दिवंगत राजेसाहेब यांनीं भारतांत व परदेशांत काढलेल्या दौऱ्यांत खरेदी केलेल्या वस्तूंचाच आहे

**बडोदें :** लोकसंख्या २,११,४०७.

**बडोदें संग्रहालय व चित्रप्रदर्शनविभाग, सयाजी बाग**

**स्थापना :** १८९४

**पूर्वेतिहास :** हिज हायनेस महाराजे सयाजीराव ३ रे गायकवाड यांनीं बडोदें संग्रहालयाची स्थापना केली. महाराजांनीं आपल्या अनेक देशांतील दौऱ्यांत कलेच्या व सौंदर्याच्या दृष्टीनें महत्त्वाच्या असलेल्या दुर्मिळ वस्तूंचा पद्धतशीरपणें संग्रह केला व त्या संग्रहालयासाठीं दिल्या या संग्रहालयाचा शिलान्यास १८८७ सालीं झाला व त्याचें बांधकाम १८९४ मध्यें पूर्ण झालें चित्रप्रदर्शनविभागाचें बांधकाम १९०८ मध्यें सुरू करण्यात येऊन तें १९१४ मध्यें पूर्ण झालें; परंतु तो १९२१ मध्यें खुला करण्यात आल्याचें प्रत्यक्ष जाहीर करण्यात आलें. नंतर आणखी खोल्यांचीसुद्धा तरतूद करण्यात आली १९४३ मध्यें वस्तु चांगल्या रीतीनें प्रदर्शित करता याव्या म्हणून मांडणी बदलण्यांत आली १९४८ मध्यें हें संस्थान मुंबई राज्यात विलीन करण्यात आलें आणि मुंबई राज्याच्या शिक्षण विभागानें या संग्रहालयाचा ताबा घेतला गुजरात प्रदेशांतील हें संग्रहालय सर्वांत मोठें व अतिशय महत्त्वाचें आहे

संग्रहालयाचे पहिले संचालक मि जे एफ् ब्लेक यांनीं १८९५ मध्यें महाराजांनीं दिलेल्या संग्रहाच्या साहाय्यानें या संग्रहालयाची स्थापना केली आणि कला, पुराणवस्तुशास्त्र व सृष्टिविज्ञान यास वाहिलेल्या त्याच्या निरनिराळ्या शाखांसह त्याची उत्तरोत्तर वाढ होत गेली संस्थानचे पुराणवस्तुशास्त्रज्ञ म्हणून कांहीं काळ काम करीत असलेले मि आर् बी फूट यांनीं संग्रहालयाच्या भूगर्भशास्त्रशाखेस साहाय्य केलें बडोदें संस्थानचे कला संचालक म्हणून असलेले डॉ ह कोहन-वीनर यांनीं कलाप्रदर्शन विभागाची मांडणी केली १९४३ सालापासून डॉ गोएट्झ यांनीं संग्रहालय व चित्रप्रदर्शनविभाग यांत आणखी वाढ केली

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयात प्राणिशास्त्र, भूस्तरशास्त्र व व्यावहारिक वनस्पतिशास्त्र, मानववंशशास्त्र आणि बृहत् भारताची आणि भारतीय कला व पुराणवस्तुशास्त्र आणि चीन, जपान, इजिप्त, इराक, इराण, ग्रीस, रोम व मध्ययुगीन युरोप यांची कला व संस्कृति यास वाहिलेल्या शाखांचा समावेश आहे

तळमजल्यावर 'युरोपीय खोल्या' असें नांव असलेल्या चार खोल्या आहेत आणि त्यात ७ व्या शतकापासून १८ व्या शतकापर्यंत व १८ व्या शतकापासून २० व्या शतकापर्यंतच्या काळातील ग्रेको-रोमन कला व युरोपीय कलावस्तु प्रदर्शित करण्यात आल्या आहेत लहान प्रतिमा, छापलेलीं चित्रें व नाणीं यांसाठीं एक खास खोली आहे. आशियांतील कलासंस्कृति सहा प्रदर्शनविभागातून दाखविलेली आहे एका प्रदर्शनविभागास 'बृहद् भारतीय प्रदर्शनविभाग' असें नांव दिलें आहे व त्यात ब्रह्मदेश, सिलोन, सयाम, मलाया, इंडो-चायना व इंडोनेशिया या देशांतील वस्तूंचा समावेश करण्यात आला आहे; दुसऱ्या विभागाचें नाव 'जपानी खोली' असें आहे, तिसऱ्या विभागाचें 'तिबेटी–नेपाळीज्' असें नाव आहे; चौथ्याचें 'इजिप्टो–बॅबिलोनियन' असें असून बाकीच्या दोन विभागांचीं 'चिनी' व 'इस्लामी' अशीं नांवें ठेवण्यात आलीं आहेत शेवटच्या दोन विभागात इराण, इराक, तुर्कस्थान, सिरिया, इजिप्त व स्पेन या देशांतील कलावस्तूंचा समावेश केलेला आहे भारतीय संस्कृति व कला यांची माहिती देणारे पाच प्रदर्शनविभाग असून त्यांपैकीं एकांत इतिहासपूर्व व इतिहासाच्या प्रभातकालीन प्राचीन वस्तूंची माहिती दिली आहे दुसऱ्यात मौर्य घराण्यापासून खिस्तोत्तर ११ व्या शतकापर्यंतच्या काळातील कला व संस्कृति यांच्या प्रगतीचा इतिहास दाखविण्यात आला आहे यांपैकीं एक प्रदर्शनविभाग बडोदें संस्थानच्या इतिहासास वाहिलेला आहे; दुसऱ्या विभागात इ स १२०० नंतरच्या काळातील औद्योगिक कलावस्तु व रंगचित्रें ठेवण्यात आलीं आहेत; आणखी एका विभागास 'बडोदें खोली' असें नांव आहे व तींत मुख्यत्वेंकरून गुजराती व मराठी कला दर्शविणाऱ्या वस्तु ठेवण्यात आलेल्या आहेत

१५ व्या शतकापासून १८ व्या शतकापर्यंतचीं रंगचित्रें दोन खोल्यांत मांडलीं आहेत आणि १९ व्या शतकातील रंगचित्रें दुसऱ्या एका खोलींत आहेत आधुनिक भारतीय कला दोन प्रदर्शनविभागांतून दाखविली आहे मुनर प्रदर्शनविभाग व रोएरिच प्रदर्शनविभाग या नावाचे आणखी दोन प्रदर्शनविभाग आहेत

संग्रहालयाची सृष्टिविज्ञानशाखा दहा प्रदर्शनविभागांतून विभागली आहे यांपैकीं पाच प्राणिशास्त्रविषयक आहेत व बाकीच्या भूस्तरशास्त्र व प्राचीन प्राणिविद्या यासंबंधीं आहेत दोन प्रदर्शनविभाग मानववंशशास्त्रविषयक आहेत

प्राणिशास्त्रविषयक शाखेंत प्रातिनिधिक स्वरूपाचा संग्रह असून तींत पृष्ठरज्जुयुक्त प्राणी व पृष्ठरज्जुविहीन प्राणी दाखविले आहेत पक्षी, सरपटणारे प्राणी व पाण्यात व जमिनीवर राहणारे प्राणी आणि मासे यांच्यासाठीं देखील प्रदर्शनविभाग आहेत

भूस्तरशास्त्रविषयक शाखेंत खडक, खनिज पदार्थ, अश्मीभूत वस्तु वगैरेंचा समावेश आहे

व्यावहारिक वनस्पतिशाखेंत कृषिविषयक व औषधी रोपट्यांसंबंधींची माहिती आहे

मानववंशशास्त्रशाखेंत, भारतीय लोकांची संस्कृति व भारताच्या आदिम जमातीं यांचीं चित्रें आहेत तिबेट, चीन, जपान, आफ्रिका, अमेरिका व न्यू गिनी या देशांत गोळा केलेल्या वस्तूंचा देखील तींत समावेश आहे

पाषाणयुगाच्या व तदनंतरच्या इतिहासपूर्व संस्कृतीशिवाय, भारतीय कला व संस्कृति याविषयींची माहिती मोहनजोदारो व हरप्पा या अगदीं पूर्वीच्या

काळापासून इ स १५ व्या शतकापर्यंत दिली आहे मौर्य, शुंग, कुशाण, गांधार वगैरेंसारख्या निरनिराळ्या कलाशैलींचे केवळ शास्त्रचे नमुनेच नाहीत, तर शिल्पकृति व ब्राँझचे पुतळे धरून राज्यातील फार महत्त्वाच्या अनेक अस्सल कृति आहेत मात्रिकाचे दर्शन घडविणारा इदारकडील सुमारें खिस्तोत्तर ६ व्या शतकातील शिल्पकृतींचा एक संच आणि अकोटकडील ब्राँझचे असंख्य जैन पुतळे यामुळें येथील प्राचीन वस्तुशास्त्रविषयक प्रदर्शन विभागामध्यें फार महत्त्वाची भर पडली आहे

पहाडी, बासोली, कांगरा, मंडी, कुलु वगैरेंसारख्या निरनिराळ्या शैलीच्या गुजरात व राजस्थानकडील रंगचित्रांच्या जैन व हिंदु अल्पाकृति, मोगल चित्रें—यांत रझमा—नामाचे दर्शन घडविणारी कांहीं चित्रें आहेत—आणि हमझानामाचें एक पान या गोष्टी येथील भारतीय कलाविभागात प्रदर्शित केल्या आहेत

मोंगल काळाच्या पूर्वीच्या कला व मोंगलकालीन कला आणि त्यांतून निर्माण झालेल्या कला धरून बंगाल, ओरिसा, दक्षिण भारत व दक्षिण प्रदेश येथील कापड, लाकडाचें कोरीव काम, लाखेच्या वस्तु, हस्तिदंताचें व जडजवाहिराचें काम, इत्यादि कलाच नित्योपयोगी नमुने या संग्रहांत ठेवलेले आहेत गायकवाड घराण्याच्या काळी बडोदें संस्थानांतच विकास पावलेल्या कलेस वाहिलेली एक खास शाखा आहे

बृहद् भारतीय कलेसाठीं असलेल्या विभागात सिलोन, सयाम, कंबोडिया, बाली व जावा येथील कांहीं नमुने आहेत

चिनी विभागात कांहीं कापडाच्या नमुन्यांशिवाय उत्कृष्ट चित्रें व शिल्पकृति, कागदपत्रें, ब्राँझचे पुतळे आणि नक्षीदार तबकड्या, जेड, हस्तिदंत, लाकूड, लाख, भांडीं व चिनीमातीची भांडी यावरील नक्षीकाम आहे

जपानी विभागांत ब्राँझचे पुतळे, लाकडावरील कोरीव काम, हस्तिदंत व हाडापासून बनविलेल्या पुतळ्या, चिनीमातीच्या कृतीचे नमुने, रंगविलेली चित्रें, धातूवरील नक्षीकाम, कापड व लाखेचें काम आहे

त्याचप्रमाणें नेपाळ, तिबेट व मंगोलिया येथील कांहीं नमुने आहेत बुद्ध देवतांच्या स्वरूपांतील काही अल्पाकृतींसह प्रज्ञापरमित्र वगैरेंची ताडपत्रावरील हस्तलिखितें आहेत

इजिप्तो बॅबिलोनियन प्रदर्शनविभागात प्रसिद्ध कृतींच्या प्लॅस्टरच्या अनेक रंगीत प्रतिकृति आहेत तसेंच कांहीं उत्कृष्ट कलाकृति पण आहेत

नैर्ऋत्य आशिया व आफ्रिका येथील इस्लामिक संस्कृतीचें दर्शन इराणहून आणलेल्या शहानाम्याची सचित्र हस्तलिखितें व अल्पाकृति व तत्सम अनेक हस्तलिखितें यातून घडतें

**शैक्षणिक कार्य :** जनतेला ज्याचा सुलभ रीतीनं उपयोग करतां येतो असें एक चांगलें ग्रंथालय आहे व त्यात सुमारें ५,४७४ पुस्तकें व ४,१०० नियतकालिकें आहेत शनिवारी दोन तास दोन स्त्री-मार्गदर्शिका काम करीत असतात दिव्याच्या साहाय्यानं दाखवावयाची कांचचित्रें व कांहीं चलत् चित्रांचा मोठा संग्रह आहे बडोदें संस्थान विलीन होण्यापूर्वी व्याख्यानें देण्यासाठीं पाहुणे बोलावण्यात येत व तत्प्रीत्यर्थांच्या खर्चासाठीं खास अनुदान होतें व्याख्यानांसाठीं एक चांगलें सभागृह आहे सध्या व्याख्यानें क्वचितच होतात खास प्रदर्शनासाठीं सुसज्ज असा दिवाणखाना आहे नावाच्या चिठ्ठ्या अर्थपूर्ण असून त्या मुख्यत्वें इंग्रजींत आहेत बडोदें संग्रहालयाच्या सहकार्यानें तेथील विद्यापीठ संग्रहालयशास्त्राचे वर्ग चालवीत असतें

**प्रकाशनें :** (१) बडोदें येथील संग्रहालय व चित्रशाळा यांतील वस्तूंची व कलाकृतींची माहिती देणारी पुस्तिका—हे एच् गोत्स, (२) बडोदें संग्रहालय व चित्रशाळा पत्रिका, (३) मंडळवृत्तांत, (४) अभिजात युरोपीय कलेंतील पूर्वेसंबंधीची कल्पना, (५) युरोपीय चित्रासंबंधीं माहिती पुस्तक, (६) मराठ्यांची कला व तिच्या समस्या, (७) दृक्शिक्षण आणि (८) निवडक प्रदर्शन-वस्तूंच्या चित्रांची पोस्टकार्डें

**कामाचे तास :** प्रजासत्ताक दिन, स्वातंत्र्य दिन व दिवाळी यांसारखे पांच महत्त्वाचे रजेचे दिवस वगळून इतर सर्व दिवशीं संग्रहालय सकाळीं ९–३० वाजल्यापासून सायंकाळीं ५ वाजेपर्यंत खुलें असतें, शनिवारी दुपारी ३ ते सायंकाळीं ५ वाजेपर्यंतची वेळ ही केवळ स्त्रियांसाठीं राखून ठेवलेली आहे

**प्रवेश :** मोफत फक्त गुरुवारी प्रेक्षकाकडून प्रत्येकी २ आणे अथवा १२ न पैसे ही फी घेतली जाते

**नियामक मंडळ :** संग्रहालय मुंबई सरकारच्या शिक्षण विभागाच्या अधिकाराखालीं आहे

**सेवकवर्ग :** संचालक—श्री. व्ही एल देवकर, एम ए, रक्षक—श्री बी एल मनकड, बी ए (ऑनर्स), एलएल बी आणि श्री पी जी गुप्ता, एम् एस् सी, मुख्य कारकून, तीन कारकून, छायाचित्रकार व मानचित्रकार, प्रदर्शनालय साहाय्यक (गॅलरी असिस्टंट), पेंढा भरणारा, ग्रंथपाल, माहिती पुस्तकें तयार करणारा, सुतार, दोन नाईक, दोन जमादार, २१ पट्टेवाले आणि ८ रखवालदार

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अंदाजपत्रक सुमारें एक लाख रुपयांचें असतें

**अभिप्राय :** संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या १,००० आणि वर्षाची ४,००,००० इतकी आहे परंतु खास प्रदर्शनाच्या वेळीं आणि जन्माष्टमी, दसरा, अनंतचतुर्दशी आणि ईद यासारख्या सणाच्या दिवशीं संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रेक्षकांची संख्या फारच मोठी असते नाणीं पोलादी पेट्यांत आणि गोदरेज तिजोरींत ठेवलीं जातात वस्तुसंग्रहासाठीं जागा पुरेशी नाहीं आणि खोल्या जाण्यायेण्यास अडचणीच्या आहेत प्रयोगशाळेची सोय पुरेशी नाही, परंतु गरज लागेल तेव्हां महाराजा सयाजीराव विद्यापीठाकडून ती केली जाते संग्रहालयातील वस्तु संशोधन, खरेदी, गुप्तनिधि, उत्खनन, देणगी व अदलाबदल इत्यादि विविध मार्गांनीं संपादन केलेल्या आहेत गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं या संग्रहालयास मान्यता मिळाली आहे इतर संग्रहालयांबरोबर वस्तूंची अदलाबदल करण्याची व्यवस्था केली जाते शक्य तेथें नकाशे, तक्ते, प्रतिकृति, ओतीव प्रतिकृति, चित्रें, इ साधनांचा उपयोग केला जातो परंतु या कारणासाठीं निधि व जागा सर्वसाधारणपणें अपुरीच पडते हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचा संस्थापक-सदस्य आहे संग्रहालयाच्या कला, मानववंशशास्त्र व प्राणिशास्त्र विभागाचें प्रथम आधुनिकीकरण करण्याच्या योजना तयार आहेत आणि नंतर मुलांसाठीं संग्रहालय तयार करणें, चित्रपट, व्याख्यानें व शाळांतील मुलांची सोय, सोप्या भाषेंत पुस्तिका प्रसिद्ध करणें यांसारखे इतर प्रश्न हातीं घेण्याचा विचार आहे आठवड्यातून एकदां शुक्रवारी सकाळीं ८ ते १० वाजेपर्यंत व दुपारी २ ३० ते रात्रीं ८ ३० वाजेपर्यंत संग्रहालयशास्त्राचे वर्ग घेतले जातात

**बडोदें येथील महाराजा सयाजीराव विद्यापीठाच्या पुराणवस्तु विभागाचें संग्रहालय**

**स्थापना :** इ स १९५०

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय सन १९५० मध्यें पुराणवस्तुशास्त्रविभाग बरोबरच अस्तित्वात आलें विद्यापीठ अनुदान मंडळाच्या मदतीनें संग्रहालयांतील सोयींत वाढ करण्यात आलेली आहे. एक कायम दालन आणि खास प्रदर्शनविभाग उघडण्यासबंधी योजना आहे व त्या इमारतीचें बांधकाम चालू आहे

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयांत मुख्यत्वेंकरून गुजरातेतील व नर्मदेच्या खोऱ्यातील पुराणवस्तुशास्त्रविषयक वस्तु ठेवलेल्या आहेत आणि विभागाचा शिक्षकवर्ग व विद्यार्थिवर्ग यानीं केलेल्या संशोधनाचें व उत्खननाचें हें संग्रहालय म्हणजे एक दृश्यफल आहे पुरातन वस्तूंची अदलाबदल करूनहि मेलबोर्न येथील आस्ट्रेलियन पुराणवस्तुशास्त्रसंस्थेकडून काहीं साहित्य मिळविण्यात आलें आहे हें संग्रहालय मुख्यत्वेंकरून विद्यार्थ्यांस शिकविण्या साठीं व तुलनात्मक अभ्यासासाठीं स्थापन करण्यात आलें आहे आणि विद्यापीठाच्या विभागानीं उत्खनन करून शोधून काढलेल्या पुरातन वस्तूंचा संग्रह करणें आणि शिकविण्यासाठीं ज्याची मदत होईल अशा भारतीय तसेंच परकीय वस्तूंचा संग्रह करणें हीं या संग्रहालयाचीं कामें आहेत

**शैक्षणिक कामें :** विद्यापीठाच्या पुराणवस्तुविभागाच्या विद्यार्थ्यांस व संशोधनास मदत व्हावी हाच या संग्रहालयाच्या स्थापनेमागील खास उद्देश आहे हें मुख्यत्वेंकरून अध्यापन संग्रहालय आहे व विद्यार्थ्यांस या बाबतींत सर्व सोयी उपलब्ध करून दिल्या जातात वस्तूंच्या नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व गुजराथी भाषेंत लिहिलेल्या आहेत संग्रहातील वस्तूंची प्रतिकृती बनविण्यासाठीं तक्ते, आकृत्या व नकाशे याचा सरसहा उपयोग करण्यात आलेला आहे

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** सर्व दिवशीं सकाळीं ११ वाजल्यापासून संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** मोफत

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय बडोदें येथील महाराजा सयाजीराव विद्यापीठाच्या पुराणवस्तुशास्त्र व प्राचीन भारतीय संस्कृति विभागाचा भाग आहे

**सेवकवर्ग** . संग्रहालयाची व्यवस्था उक्त विभागाकडून संग्रहालयाध्यक्षाच्या मदतीनें पाहिली जाते विभागाच्या संशोधनाच्या कार्यक्रमाची व्यवस्थाहि संग्रहालयाध्यक्ष पाहतो

**आर्थिक तरतूद** . हें संग्रहालय विद्यापीठाच्या पुराणवस्तुविभागाचा एक भाग असल्यानें त्याकरितां कोणतीहि खास अदाजपत्रकीय तरतूद केली जात नाहीं

**अभिप्राय :** विद्यापीठ अनुदान मंडळाच्या मदतीनें सर्व आधुनिक सुखसोयींनीं युक्त अशी एक नवीन इमारत बांधली जात आहे वस्तू जतन करण्यासाठीं आणि इन्व्हायर्न्मेंटल आर्किआलॉजी या विषयासाठीं आवश्यक असलेल्या प्रयोगशाळेचा प्रस्तुत इमारतीच्या योजनेंत अतर्भाव आहे उत्खनन, संशोधन व अदलाबदल इत्यादि विविध मार्गांनीं संग्रहाम्यांतील वस्तु संपादन केलेल्या आहेत

**भावनगर :** लोकसंख्या १,३७,९५१

**बार्टन पुरातन वस्तु संग्रहालय**

**स्थापना :** इ स १८९५

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय सन १८९५ मध्यें बार्टन वाचनालयाच्या इमारतींत उघडण्यात आलें नतर तें जुन्या सामळदास महाविद्यालयाची मूळची प्रयोगशाळा म्हणून असलेल्या इमारतींत हलविण्यांत आलें

**व्याप्ति व संग्रह :** येथील संग्रहात शिल्पकृती, शिलालेख, ताम्रपट, संस्कृत हस्तलिखितें, नाणीं, विटा, वालभी येथील मातीच्या भांड्याचे अवशेष, सिहोर भित्तिचित्राच्या नकला, धातूच्या मूर्ति, तैलचित्रें आणि अश्मीभूत वस्तु, या भागात तयार केलेले हस्तकलाचे नमुने व शेतीचीं अवजारें यासारख्या इतर सकीर्ण वस्तु आहेत

**शैक्षणिक कार्य** . संग्रहालयास भेट देणाऱ्या लोकाना संग्रहालयातील वस्तूंची माहिती करून दिली जाते आणि संग्रहालयाध्यक्ष मधून मधून व्याख्यानें देण्यासाठीं शाळाना व महाविद्यालयास भेटी देतात. महाविद्यालयातील व शाळेंतील विद्यार्थ्यांना संग्रहालयाविषयीं विशेष कुतूहल वाटतें

**प्रकाशनें** . (१) संस्कृत व प्राकृत शिलालेख (१८९६), (२) फारशी शिलालेख (१८८९) आणि (३) प्राचीन लेखसंग्रह (१८८५) गुजरातींत.

**कामाचे तास :** शुक्रवारचीं आणि गुरुवारची दुपार सोडून इतर सर्व दिवशीं सकाळीं ८–३० ते दुपारीं १२ वाजेपर्यंत आणि दुपारीं ३ ते संध्याकाळीं ७ वाजेपर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** मोफत

**नियामक मंडळ :** गांधी स्मृति विश्वस्त संस्था.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री इंद्रशंकर रावळ, कारकून, चार पट्टेवाले आणि चौकीदार

**आर्थिक तरतूद :** रु २८,७४६

**अभिप्राय :** संग्रहालयास रोज सरासरीनें ४० ते ५० आणि वर्षांत १०,३२० इतके प्रेक्षक भेट देतात संग्रहालयाची इमारत त्यातील प्रदर्शनवस्तूंच्या मानानें पुरेशी आहे नाणीं तिजोरींत ठेवलीं जातात आणि चौकीदार संग्रहालयाचें रक्षण करतो राखीव संग्रह ठेवण्यासाठीं कोणतीहि जादा जागा नाहीं संग्रहालयातील वस्तु उत्खनन, गुप्तनिधि आणि देणगी इत्यादि विविध मार्गांनीं संपादन केलेल्या आहेत गुप्तनिधि स्वीकारण्यासाठीं संग्रहालयास मान्यता मिळाली आहे हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचा संस्थापक-सदस्य आहे

**भूज :** लोकसंख्या ३०,९८५

**कच्छ संग्रहालय**

**स्थापना** . इ स १८७७

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय कच्छच्या संस्थानिकानीं कलावस्तूंचा संग्रह करण्याविषयीं फारच आस्था दाखविल्यामुळें आणि आपल्या कलाकारांच्या व कारागिराच्या अत्यंत कुशल कारागिरीस त्यानीं उत्तेजन दिल्यामुळें सन १८७७ मध्यें स्थापन करण्यात आलें आणि संस्थानिकानीं खरेदी करून संग्रहालयास भेट दिलेल्या कलाकुसरीच्या नमुन्यांनीं संग्रहालयांत अमोलिक भर पडली अशा रीतीनें कच्छच्या कलाकुसरीच्या व उद्योगधंद्याच्या

प्रातिनिधिक अशा ४,००० वस्तु या संग्रहालयात संग्रहित करण्यात आलेल्या आहेत संग्रहालय हमीरसर तलावाच्या काठी ठळक जागी असलेल्या एका उत्तम लाल दगडी इमारतीत स्थापन केलेले आहे

**व्याप्ति व संग्रह .** या संग्रहालयात प्रदर्शित केलेल्या वस्तूंच्या द्वारें कच्छमधील निरनिराळ्या सांस्कृतिक कार्यांचे दर्शन घडतें वस्तूंवर नावाच्या चिठ्या लावलेल्या असून त्यांत त्या त्या वस्तूंचा संक्षिप्त इतिहास, कलाकाराचें नांव व तारीख इत्यादि मजकूर आहे कच्छशीं संबंधित अशा मूर्ति, नाणी व ऐतिहासिक महत्त्वाच्या अशा निरनिराळ्या इतर वस्तूंशिवाय प्रदर्शन वस्तूंत कच्छशीं संबंध असलेल्या अशा सर्व चांदीच्या वस्तु भरतकामाचे नमुने, एनॅमलच्या वस्तु व प्रादेशिक वैशिष्ट्य दर्शविणारी साज इत्यादींचा समावेश केलेला आहे

**शैक्षणिक कार्य .** शहरातील व शेजारच्या प्रदेशातील शाळेंत जाणारी मुलें संग्रहालयास भेट देतात आणि प्रदर्शन-वस्तूंचा अभ्यास करण्यासाठी त्यांना सोयी उपलब्ध करून दिल्या जातात तसेंच स्थानिक सरकारी कला-विद्यालयांतील विद्यार्थ्यांस संग्रहालयात येऊन रेखाचित्रें तयार करण्यास उत्तेजन दिलें जातें संग्रहालयातील वस्तूंचा उपयोग करून मधून मधून प्रदर्शनें भरविलीं जातात वस्तूंवर इंग्रजी व गुजराती या दोन भाषांत लिहिलेल्या नावाच्या चिठ्या लावलेल्या आहेत इतरांनीं कारागिरांस संग्रहालयांतील दागिन्यांच्या नमुन्यांचा व रचनेचा अभ्यास करण्यास उत्तेजन दिलें जातें

**प्रकाशनें** काही नाही

**कामाचे तास .** शनिवार दुपार, रविवार व रजेचे दिवस वगळून इतर सर्व दिवशीं संग्रहालय सकाळीं ११ वाजल्यापासून संध्याकाळीं ६ वाजेपर्यंत उघडें असतें

**प्रवेश .** विनामूल्य

**नियामक मंडळ .** संग्रहालय मुंबई सरकारच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग** संग्रहालयाध्यक्ष, पंखा भरणारा, क्षेत्रछायाचित्रकार, कारकून, कारकून,–टंकलेखक व तीन शिपाई

**आर्थिक तरतूद** संग्रहालयाचे वार्षिक अंदाजपत्रक रु ८०,९३० इतकें आहे

**अभिप्राय** संग्रहालय एका आदर्श जागीं असून प्रेक्षकांस भेट देण्यास सोयीस्कर असें आहे संग्रहालयास रोजी सरासरीने ५० व एका वर्षांत १८ ००० इतके प्रेक्षक भेट देतात परंतु गोकुळ अष्टमी, शीतळा देवीची जत्रा आणि प्रदर्शनाच्या दिवशीं संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रेक्षकांची संख्या पुष्कळच असते संग्रहालयाची इमारत सोयीस्कर आणि पुरेशी मोठी आहे दिवसरात्र पहाऱ्याची व्यवस्था आहे आणि मौल्यवान वस्तु सुरक्षित रीत्या कडीकुलपांत ठेवलेल्या आहेत राखीव संग्रह ठेवण्यासाठीं जागा पुरेशी आहे, परंतु समकृतींचा संग्रह विशेष नाहीं सध्या संग्रहालयाचें ग्रंथालय नाहीं, परंतु असें ग्रंथालय सुरू करण्याचे प्रयत्न चालू आहेत संग्रहालयातील वस्तु संशोधन, खरेदी, उत्खनन, गुप्तनिधि आणि देणगी इ विविध मार्गांनीं संपादन केल्या आहेत प्रदर्शन-वस्तूंची माहिती देण्यासाठीं नकाशांचा व तक्त्यांचा उपयोग केला जातो

मुंबई : लोकसंख्या २८,११,२७०

## (१) पश्चिम भारतातील प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालय

**स्थापना : इ स १९०४**

**पूर्वेतिहास :** पश्चिम भारतातील प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयाच्या इतिहासास सन १९०४ मध्यें सुरुवात झाली असें म्हणतां येईल या वर्षी मुंबई शहरांत एक संग्रहालय स्थापन करण्याच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं सरकारनें एक समिति नेमली होती सन १९०५ मध्यें प्रिन्स आणि प्रिन्सेस ऑफ वेल्स यांच्या भेटीच्या संबंधात भरलेल्या सार्वजनिक सभेंत या भेटीचें एक कायम स्मारक म्हणून एक सार्वजनिक संग्रहालय स्थापन करण्याचें ठरविण्यांत आलें नियोजित संग्रहालयासाठीं सरकारनें संग्रहालयाची विद्यमान जागा दिली आणि सरकारनें तसेंच नगरपालिकेनें संग्रहालयासाठीं वार्षिक अनुदान देण्याचें कबूल केलें रॉयल व्हिजिट मेमोरियल फंड (१९०५), सरकारनें दिलेलें तीन लक्ष रुपयांचें अनुदान व नगरपालिकेनें दिलेलें अडीच लक्ष रुपये मिळून संग्रहालयासाठीं निधि उपलब्ध करून देण्यात आला व त्यांत सर करीमभॉय इब्राहीम यांनीं आपली देणगी म्हणून तीन लक्ष रुपयांची व सर कावसजी जहांगीर यांनीं अर्धा लक्ष रुपयांची भर घातली तीन सलग गट असलेली इमारत बांधून मधला गट कला व पुरातन वस्तुशास्त्रासाठीं आणि बाजूचे गट सृष्टिविज्ञान व उद्योग या विषयासाठीं वापरण्याची मूळ कल्पना होती परंतु निधि अपुरा पडल्यामुळें ही कल्पना मूर्तस्वरूप धारण करूं शकली नाहीं आणि फक्त मधल्या गटाचें बांधकाम सुरू करण्यात आलें इमारत शिल्पशास्त्री मि जी विटेट यांनी इंडो सॅरसेनिक धर्तीवर तिची रचना करून बांधली व तिला सुमारें नऊ लाख रुपये खर्च आला सन १९१४ मध्यें इमारतीचें बांधकाम पुरें झाल्यानंतर पहिल्या महायुद्धांत लष्करी रुग्णालय म्हणून तिचा उपयोग करण्याची परवानगी देण्यात आली सन १९२१ मध्यें इमारत विश्वस्त मंडळाच्या स्वाधीन करण्यात आली व ती सुव्यवस्थित राखण्याचें व तिची व्यवस्था पाहण्याचें काम या विश्वस्त मंडळाकडे सोपविण्यात आलें संग्रह गोळा करण्यात आल्यावर व प्रदर्शनवस्तूंची मांडणी झाल्यावर संग्रहालयाचे तीन प्रमुख विभाग–कला पुरातनवस्तुशास्त्र आणि सृष्टिविज्ञान लोकांसाठीं सन १९२१ मध्यें खुले करण्यात आले

विश्वस्तांनीं त्यानंतर अदानें साडेपांच लक्ष रुपये खर्चाचें एक नवीन दालन बांधण्याचें काम हातीं घेतलें परंतु निधि अपुरा पडल्यामुळें इमारतीच्या योजनेंत कपात करण्यांत आली आणि सृष्टिविज्ञानविभागाचा संपूर्ण संग्रह ठेवण्यासाठीं २॥ लक्ष रुपये खर्चाचें हें इमारतींत वाढ करण्याचें काम इ स १९३५ मध्यें पुरें करण्यात आलें सृष्टिविज्ञानविभाग आता मुख्य इमारतींत हलविण्यांत येऊन वाढ केलेल्या इमारतीच्या तळमजल्यावर स्थापना करण्यात आला आणि कला व पुराणवस्तुशास्त्रविभागाचा संग्रह इमारतीच्या पहिल्या मजल्यावर मांडण्यात आला हा नवीन वाढविलेला भाग लोकांना पाहण्यासाठीं सन १९३८ मध्यें खुला करण्यात आला सर दोराबजी टाटा विश्वस्त निधीच्या विश्वस्तांनीं संग्रहालयास आतां अर्धा लक्ष रुपयांची देणगी दिली संग्रहालयाच्या सृष्टिविज्ञानविभागात मुंबई सृष्टिविज्ञान संस्थेचा संग्रह ठेवण्यात आला होता त्या संस्थेनें आपल्या सदस्यांकडून वर्गणीच्या रूपानें २३,००० रुपये जमविले होते व या रकमेंत या

विभागासाठीं सरकारनें खास अनुदान म्हणून १७,५०० रुपयांची भर घातली ही नवीन इमारत म्हणजे सृष्टिविज्ञानविभागाची वाढ करण्यासाठीं जादा जागेची तरतूद करण्याविषयींच्या एका मोठ्या योजनेचा फक्त एक भाग आहे पुरेशा निधींच्या अभावामुळें मुंबईसारख्या औद्योगिक शहरास अत्यंत आवश्यक असलेला असा उद्योगविभाग अद्याप संग्रहालयांत उघडण्यांत आला नाहीं

संग्रहालयानें ३२ वर्षे काम केलें आहे व शहराच्या शैक्षणिक व नागरिक जीवनांतील आपल्या वाट्याचें काम पार पाडलें आहे संग्रहालयास आतापर्यंत अनेक विद्वान व विख्यात इसमांनीं, विद्यार्थ्यांनीं व इतर इसमांनीं भेट दिलेली आहे युद्धपरिस्थितीमुळें अधिक मौल्यवान व महत्त्वाच्या प्रदर्शन वस्तु जरी संग्रहालयाबाहेर सुरक्षित इमारतींत हलविण्यांत आल्या असल्या तरी संग्रहालयांत मांडण्यांत आलेल्या प्रदर्शन-वस्तूंनीं संग्रहालयाची संपूर्ण जागा व्यापलेली आहे आणि त्या असंख्य प्रेक्षकांना आकर्षून घेण्यास पुरेशा आहेत

**व्याप्ति आणि संग्रह :** संग्रहालयांत तीन विभाग आहेत : (१) कला, (२) पुराणवस्तुशास्त्र व (३) सृष्टिविज्ञान आणि मूळ योजनेनुसार त्यांत एका औद्योगिक विभागाचा देखील अंतर्भाव करावयाचा होता असा औद्योगिक विभाग स्थापन करण्याच्या प्रश्नाचा विश्वस्तांकडून आतां विचार केला जात आहे

**कलाविभाग :** कलाविभागांत भारतीय व परदेशी चित्रांचा मौल्यवान संग्रह, चिनी पोर्सेलेनच्या वस्तु, मौल्यवान दगड व लाखेचा मुलामा केलेल्या जपानी वस्तु, भारतीय व आशियाई धातूंच्या वस्तु, हस्तिदंती वस्तु, खापील कॅलिको, भरतकामाच्या वस्तु, शाली, शस्त्रास्त्रें, चिलखतें व इतर युरोपीय व भारतीय पुरातन वस्तु यांचा समावेश होतो स्वर्गीय सर रतन टाटा सर व दोराब टाटा यांनीं दिलेल्या उदार देणग्यांमुळेंच हा विभाग अस्तित्वांत येऊं शकला व त्यांत वेळोवेळीं खरेदी व देणग्यांच्या द्वारें भर पडत गेली

संग्रहालयाच्या विश्वस्तांनीं मुंबई सरकारच्या मदतीनें सन १९१५ मध्ये श्री पुरुषोत्तम मावजी यांजकडून १,४२,५०० रुपयांस भारतीय चित्रें, कपडे, भारतीय नाणीं, चिलखतें इ संग्रह जेव्हां खरेदी केला तेव्हांच या विभागाचा मूळ गाभा तयार झाला या संग्रहांत साताऱ्याच्या प्रसिद्ध राजघराण्याचे अवशेष आणि संग्रहालयांतील अत्युत्कृष्ट मोंगल रंगचित्रें आहेत

स्वर्गीय सर रतन टाटांनीं देणगी म्हणून दिलेल्या संग्रहांत युरोपीय व भारतीय चित्रें व मौल्यवान दगड, चिलखतें, चिनी पोर्सेलेनच्या वस्तु, वस्त्रें, संगमरवरी पुतळे, व्हेनिशियन कांचेचे ग्लास, धातूंच्या वस्तु, चिनी व जपानी चित्रें व निरनिराळ्या इतर कलाकृति आहेत यांपैकीं बहुतेक, त्या सन १९२२ मध्यें मुंबईस आणल्या जाण्यापूर्वीं इंग्लंडांत यॉर्क हाऊस या ठिकाणीं ठेवलेल्या होत्या विशेषतः मूल्यवान चिनी व पोर्सेलेनच्या वस्तु हें या संग्रहाचें ठळक वैशिष्ट्य आहे व कलातज्ज्ञांकडून त्याची अतिशय प्रशंसा केली जाते

सन १९३१ मध्यें सर दोराब टाटा यांनीं संग्रहालयास युरोपीय रंगचित्रें, संगमरवरी पुतळे, शस्त्रास्त्रें देणगी म्हणून दिलीं आणि त्यानंतर सन १९३३ मध्यें त्यांचें निधन झाल्यावर पोर्सेलेनच्या, पितळेच्या व ब्रॉंझच्या वस्तु आणि भारतीय चित्रें इ देणगीदाखल मिळालीं

सन १९२५ मध्यें सर अकबर हैदरी यांनीं आपला भारतीय चित्रें, सचित्र हस्तलिखित, ड्रॉइंग्ज इ वस्तूंचा सुंदर संग्रह संग्रहालयास कांहीं काळ प्रदर्शित करण्यासाठीं दिला आणि सन १९३८ मध्यें खानबहादूर सय्यद अहमद यांनीं तयार केलेल्या अजंठा भित्तिचित्रांच्या ३० पेक्षां अधिक नकला संग्रहालयास भेट दिल्या सर अकबर हैदरी यांचा संग्रह महायुद्ध चालू असतां सन १९४० मध्यें संग्रहालयांतून तात्पुरता काढून घेण्यांत आला होता परंतु त्यांच्या मृत्यूनंतर दख्खनी रंगचित्रांचे कांहीं अत्युत्कृष्ट नमुने आणि जाड्याभरड्या कापडावर अथवा खादीच्या कापडावर काढलेलीं तीन भव्य रंगचित्रें त्यांच्या वारसांकडून संग्रहालयास देणगीदाखल मिळालीं हीं रंगचित्रें दख्खनी अथवा मोंगल कलेचीं आतापर्यंत उपलब्ध असलेल्या कापडावरील अथवा कागदावरील रंगचित्रांपैकीं अत्यंत महत्त्वाचीं व त्यांच्या आकाराचा विचार करतां सर्वांत मोठीं रंगचित्रें आहेत

सन १९२८ मध्यें मुंबई सरकारनें २००० पेक्षां अधिक प्रदर्शनवस्तु असलेला "कला विद्यालय संग्रह" म्हणून ओळखला जाणारा संग्रह कला विभागाच्या स्वाधीन केला या संग्रहांत धातूंच्या वस्तु, भारतीय व इराणी मातीचीं भांडीं, चांदीचे व सोन्याचे दागिने, हस्तिदंती व चंदनी लाकडाच्या कोरीव वस्तु, कागदी लगद्याच्या वस्तु, रेशमी व सुती वस्त्रें, कॅलिको प्रिन्टस् इ वस्तूंचा समावेश होतो विदरी वस्तु हें या संग्रहाचें वैशिष्ट्य म्हणतां येईल एकरंगी चित्रांचीं पोस्टकार्डे तयार करण्यांत आलीं होतीं सन १९२७ मध्यें त्यांपैकीं २५ छापून प्रसिद्ध करण्यांत आलीं होतीं परंतु तीं भारतीय रंगचित्रांचें सौंदर्य व रंग यांचें पाहिजे त्याप्रमाणें दर्शन घडवीत नाहींत असें आढळून आल्यामुळें त्यांच्याऐवजी रंगीत पोस्टकार्डे छापण्यांत आलीं व तीं फारच लोकप्रिय झालीं आहेत

सन १९४० मध्यें शस्त्रें व चिलखतें यांचें प्रदर्शन करण्यासाठीं उत्तम व्यवस्था करण्यांत आली सर्व तपशिलाकडे लक्ष देऊन त्या त्या काळीं प्रचलित असलेले वेष परिधान करणाऱ्या योद्ध्यांच्या प्रतिकृति तयार करून त्या कांचेच्या कपाटांत ठेवण्यांत आल्या व त्या परिणामकारक रीतीनें प्रदर्शित व्हाव्या म्हणून त्यांवर कृत्रिम प्रकाश पाडण्याची सोय करण्यांत आली

**पुराणवस्तुशास्त्र विभाग :** पुराणवस्तुशास्त्र विभागाचा सुरुवातीचा संग्रह म्हणजे पुणें पुराणवस्तुशास्त्रसंग्रहालयाकडून मिळालेला पुरातन भारतीय नाण्यांचा संग्रह आणि रॉयल एशिआटिक सोसायटीकडून उसनवार घेण्यांत आलेला शिल्पकलावस्तूंचा संग्रह अशा दोन समृद्ध संग्रहांचा मिळून बनलेला होता सन १९३५ मध्यें मद्रास इलाख्यांतील मि. एच्. डब्ल्यू. सेटनकार यांजकडून गोळा करण्यांत आलेलीं अनेक इतिहास पूर्वकालीन दगडी आयुधें मुंबईच्या सृष्टिविज्ञानसंस्थेकडून मिळविण्यांत आलीं सन १९३४ मध्यें के आर् कामा प्राच्य संस्थेनें, मि मॅकीन आणि डॉ जे एम् उनवाला यांजकडून संस्थेस बक्षीस मिळालेल्या सुसा आणि इराणमधील इतर ठिकाणीं मिळालेल्या पुरातन वस्तु संग्रहालयास दिल्या सन १९३५ मध्यें संग्रहालयास भारताचे पुराणवस्तुशास्त्र विभागाचे महासंचालक यांजकडून मोहेंजोदारो येथें सापडलेल्या इतिहासपूर्व कालीन पुरातन वस्तूंपैकीं त्याचा वाटा मिळाला मुंबई विद्यापीठाचे समाजशास्त्रविषयाचे प्राध्यापक डॉ जी एस् घुर्ये यांनीं खैरपूर संस्थानांत (सिंध) निरनिराळ्या जागीं उत्खनन करून गोळा केलेलीं इतिहासपूर्वकालीन दगडी आयुधें, मातीचीं भांडीं, मातीचीं खेळणीं व इतर वस्तु संग्रहालयास देणगी म्हणून दिल्या पुढें सन १९३९ मध्यें त्यांनीं लिंबडीच्या ठाकोर

श्री एम् एन् चक्रवर्ती, एम् ए., कला आणि पुराणवस्तुशास्त्रविभागाचे साहाय्यक संग्रहालयाध्यक्ष—श्री प्रमोदचंद, बी. एस् एफ् एस (जॉर्ज टाऊन, यू एस् ए.); नाणकशास्त्रज्ञ—श्री पी एल गुप्ता, एम् ए; संग्रहालयाध्यक्ष, सृष्टिविज्ञानविभाग—श्री व्ही के चारी, बी ए, एल टी, प्रदर्शनविभाग साहाय्यक, साहाय्यक संग्रहालयाध्यक्ष, सृष्टिविज्ञानविभाग, छायाचित्रकार, सुतार आणि इतर तांत्रिक साहाय्यक, मुख्य कारकून, हिशेबतपासनीस, तीन टंकलेखक-कारकून, दहा चौकीदार, हवालदार, तीन नाईक, पांच शिपाई, तेरा रक्षक, एकोणीस हमाल आणि झाडूवाले

**आर्थिक तरतूद:** संग्रहालयाचे वार्षिक अंदाजपत्रक ३,२८,५७० रुपयांचे आहे

**अभिप्राय:** संग्रहालय मुंबई शहरात मध्यवर्ती ठिकाणीं असून त्याला सहज भेट देता येऊ शकते दररोज सरासरी ४००० प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात, तर रविवारी व अन्य सुट्याच्या दिवशीं ही संख्या ८००० ते १०००० पर्यंत असते विद्यार्थ्यांना प्रदर्शन-वस्तूंचा सवडीनें अभ्यास करतां येणें शक्य व्हावें म्हणून मंगळवार व गुरुवार या दिवशीं ४ आणे प्रवेशमूल्य आकारलें जातें संग्रहालयाच्या इमारतीचा आराखडा व बांधणी संग्रहालयाकरितां सोयीस्कर असली तरी त्याच्या निरनिराळ्या विभागांच्या विस्ताराच्या दृष्टीनें सध्याची जागा अपुरी पडते. राखीव संग्रह आणि प्रतिकृति जपून ठेवण्यासाठीं पुरेशी जागा नसून प्रयोगशाळेची सोयहि अगदीं अपुरी आहे दिवसाच्या वेळीं संग्रहालयाच्या प्रदर्शन विभागात पहारा करण्याकरिता रक्षक ठेवले असून त्याशिवाय कामाच्या दर सहा तासाकरिता रात्रंदिवस एक चौकीदार संग्रहालयात पहारा करतो रात्रीच्या वेळेस नेहमीं दोन चौकीदार संग्रहालयात पहाऱ्यावर असतात नाणीं आणि इतर मौल्यवान वस्तु खास तयार केलेल्या एका बंदिस्त खोलीत ठेवल्या जातात संग्रहालयाच्या प्रदर्शन-विभागांत प्रेक्षकांच्या सोयीसाठीं बाकें, खुर्च्या तसेंच पाण्याची व्यवस्था करण्यात आली आहे संग्रहालयाचीं प्रकाशन, सचित्र पोस्टकार्डें, चित्रें इत्यादींच्या विक्रीकरिता विक्री विभाग आहे छायाचित्रें, ओतीवकृति आणि प्रतिकृति देण्याबाबतची काहीं कायम व्यवस्था नसली तरी तशी विनंती करण्यात आल्यास ती शक्यतों पुरी केली जाते संग्रहालयातील वस्तु खरेदी, देणगी, उसनवारी, गुप्तनिधि, देवाणघेवाण वगैरे विविध मार्गांनीं मिळविल्या आहेत परंतु त्या उत्खनन द्वारें मिळविलेल्या नाहींत गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं संग्रहालयाला मान्यता मिळालेली असून इतर संग्रहालयें व संस्था यांचेबरोबर प्रकाशनें व प्रदर्शनीय वस्तूंच्या प्रतिकृतींची देवाणघेवाण करण्याचे सर्व प्रयत्न केले जातात आवश्यकता असेल तेव्हां नकाशे, तक्ते, नमुने आणि चित्रांची मदत घेतली जाते

## (२) व्हिक्टोरिया आणि आल्बर्ट संग्रहालय, व्हिक्टोरिया गार्डन्स

**स्थापना:** इ स १८५५

**पूर्वेतिहास:** मुंबई इलाख्यांत एखादें संग्रहालय स्थापण्यासंबंधीची चळवळ डॉ बुइस्ट ह्या पुराणवस्तुविषयीं आवड असलेल्या गृहस्थाच्या प्रेरणेनें सुरू झाली आणि सन १८४८ मध्यें सर जॉन रसेल क्लार्क हे राज्यपाल असतांना ह्या कार्यास विशेष चालना मिळाली पुढें सन १८५१ मध्यें लंडन येथे भरलेल्या भव्य प्रदर्शनामुळें वरील कल्पना आणखीच बाळसे धरूं लागली सन १८५५ मध्यें डॉ इम्पी यांच्या अध्यक्षतेखालीं पांच सदस्यांची एक संग्रहालय समिति स्थापन होऊन या समितीकडे अर्थविषयक वस्तूंचें एक संग्रहालय उघडण्याचें काम सोपविण्यांत आलें त्या वर्षी डॉ बुइस्ट यांची या संग्रहालयाचे अवैतनिक संग्रहाध्यक्ष आणि चिटणीस म्हणून नेमणूक करण्यात आली सृष्टिविज्ञान, अर्थशास्त्र, भूगर्भशास्त्र, उद्योग आणि कला यांच्या मध्यवर्ती संग्रहालयाचें कार्यक्षेत्र १ आणि ३१ ऑगस्ट व ३ सप्टेंबर १८५५ च्या सभांच्या टिपणात पूर्णपणें निश्चित करण्यात आलें होतें संग्रहालयाच्या कामाला ६००० रुपये रक्कम मिळवून सुरुवात झाली नोकरवर्गासाठीं दरमहा ८६ रुपये भत्ता देण्यात आला बऱ्याच अवधीपर्यंत जमविलेल्या वस्तूंचें प्रदर्शन करण्यात आलें नाहीं मात्र सन १८५६ मध्यें लॉर्ड कॅनिंग यांच्या आगमनाप्रीत्यर्थ थोड्याशा अवधिकरितां ह्या वस्तूंचें प्रदर्शन भरविण्यात आलें होतें नोव्हेंबर १८५६ मध्यें डॉ बुइस्ट यांच जागीं डॉ बेर्डर यांची नेमणूक झाली डिसेंबर १८५६ मध्यें संग्रहालयाला आणखी २००० रुपयांचें अनुदान देण्यात येऊन मार्च १८५७ पासून संग्रहालय सर्वसामान्य जनतेकरितां खुलें करण्यात आलें पण त्याच वर्षी भारतात बंड झालें आणि हें संग्रहालय जेथें उघडण्यात आलें होतें तें टाऊन बराकीचें भोजनगृह रिकामें करून देण्यासंबंधीचा सक्त हुकूम ब्रिगेडियरनें काढला हें काम अत्यंत तातडीनें करावें लागल्यामुळें जवळजवळ सर्व प्रदर्शनवस्तु नाहींशा झाल्या किंवा त्यांची मोडतोड झाली यातून ज्या थोड्या वस्तु शिल्लक राहिल्या त्या टाऊन हॉलमध्यें हलविण्यात आल्या सरकारनें सन १८५८ मध्यें डॉ बर्डवूड यांना संग्रहालयाचे अध्यक्ष नेमलें आणि त्याच वर्षी सर जमशेटजी जिजीभॉय, माननीय श्री जगन्नाथ शंकरशेट आणि श्री भरमजी नसरवानजी यांनीं संग्रहालयाला अनुक्रमें १००० रु, ५०० रु व ६०० रुपये, अशा देणग्या दिल्या, आणि श्री मगलदास नथुभॉय यांनीं संग्रहालयाला एक सुंदर नक्षीकाम केलेला काळ्या लाकडाचा पडदा भेट म्हणून दिला हा पडदा संग्रहालयात अजूनहि पाहावयास मिळतो भाऊ दाजी, सन्माननीय श्री शंकरशेट आदि सदस्य असलेल्या व्हिक्टोरिया गार्डन्स आणि संग्रहालय कमिटीनें राणी व्हिक्टोरियाबद्दलच्या आदराचें प्रतीक म्हणून संग्रहालयाची इमारत बांधण्याचें त्याच वर्षी ठरविलें जनतेकडून वर्गणीच्या रूपानें १,१६१४१ रुपयांची रक्कम मिळाली, तर सरकारनें १ लक्ष रुपयांची देणगी देऊन संग्रहालयासाठीं जागाहि दिली ह्या जागेची नंतर कृषि-उद्यानशास्त्र संस्थेच्या जागेशीं अदलाबदल करण्यांत आली ह्या बदललेल्या जागेंतच सध्याचें संग्रहालय आहे संग्रहालयाचा कोनशिला समारंभ हिज एक्सलन्सी सर एच बी ई फ्रीअर यांच्या हस्तें १९ नोव्हेंबर १८६२ रोजीं पार पडला. पंचांतील मतभेदामुळें सदर इमारतीला अवाढव्य खर्च येईल असें पाहून इमारतीच्या आराखड्यांत बदल करण्यासाठीं देण्यात येणाऱ्या सूचना यांच्या अशी विनंति डॉ बर्डवूड आणि भाऊ दाजी यांनीं केली होती पण तिचा फारसा उपयोग झाला नाहीं परंतु सन १८६८ मध्यें सरकारनें आणखी १ लक्ष ४३ हजार रुपये खर्च करून इमारतीचें काम पूर्ण केलें ह्या इमारतीला एकूण ३,५१,८३८ रुपये खर्च आला एच् आर् एच् प्रिन्स कॉन्सॉर्ट यांच्या मृत्यूनंतर संग्रहालयाचें नांव बदलून त्याला व्हिक्टोरिया आणि आल्बर्ट संग्रहालय असें नवें नांव देण्यांत आलें डॉ. बर्डवुड सन १८६८ मध्यें सेवानिवृत्त झाले आणि त्यांच्या

जागी डॉ. ग्रे यांची सन १८७१ मध्यें नेमणूक करण्यात आली मुंबईचे राज्यपाल एच्. ई. दी राइट ऑनरेबल सेमोर फित्झेराल्ड यांच्या हस्तें २२ मे १८७२ रोजी संग्रहालयाचें औपचारिकरीत्या उद्घाटन झाले सरकार दरवर्षी संग्रहालयाला देत असलेली ७०० रुपयांची रक्कम अगदींच अपुरी होती, परंतु सरदारांकडून आर्थिक मदत मिळू लागली सृष्टिविज्ञान विषयक संग्रहास १८८१ मध्यें प्रथमच सुरवात करण्यात आली आणि १८८३ मध्यें मासांच्या भिन्न भिन्न नमुन्यांचा एक सुंदर संग्रह संपादन करण्यात आला सरकारनें १८८५ मध्यें प्रदर्शन-वस्तु खरेदी करण्यासाठी १,२०० रुपये आणि डागडुजीच्या खर्चासाठी ६०० रुपये याप्रमाणें अनुदानाच्या रकमेंत वाढ केली ऑक्टोबर १८५५ पासून संग्रहालयाची व्यवस्था मुंबई नगरपालिकेकडे सोंपविण्यात आली आणि डॉ. मॅकडोनाल्ड (१८५०-१९०३), डॉ. धर्न्से (१९०३-१९१८), एम्. फर्ने (१९१८-१९३०) आणि श्री पै (१९३०-१९३९) या संग्रहालयाध्यक्षांच्या कारकीर्दीत त्याची चांगली वाढ झाली सन १९०२ मध्यें संग्रहालयात आणखी सुधारणा करण्यात आल्या व सृष्टिविज्ञानानुसार नैसर्गिक स्थितींतील प्राणीजीवनाचीं दृश्यें दाखविणारे नमुने मांडण्यात आले उद्योगधंद्यांच्या बाबतींत, कच्च्या मालापासून तयार वस्तु निर्माण करण्याच्या वेगवेगळ्या प्रक्रिया, प्रतिकृति आणि छायाचित्रें यांच्या साहाय्यानें दाखविण्याचा सर्वतोपरी प्रयत्न करण्यात आला

**व्याप्ति व संग्रह :** हें मुख्यतः औद्योगिक व कृषिविषयक संग्रहालय आहे त्याचे कृषि, मानववंशशास्त्र, धर्म आणि पुराणशास्त्र, रंगीत चित्रें, हत्यारें, उद्योग, चिनीमातीचीं भांडीं, भूगर्भशास्त्र, जुनी मुंबई इत्यादि विभाग पाडण्यात आले आहेत त्यात जुन्या मुंबईसंबंधींचीं छायाचित्रें, नकाशे व तक्ते यांचा एक खास संग्रह आहे

तळमजल्यावर उजव्या बाजूस काश्मिरातील कागदाच्या लगद्याच्या वस्तु, आग्र्याचीं जडावाचें काम केलेलीं दगडी भांडीं, अहमदाबाद आणि म्हैसूरचें जडविलेलें लाकूडकाम आणि तंजावरच्या झाडाच्या गाभ्यापासून केलेल्या वस्तु मांडल्या आहेत शेती, खेड्यातील स्वच्छता, उसाची आणि भाताची लागवड यांच्या बाबतींतील सुधारणा दाखविणाऱ्या प्रतिकृति, सुधारलेले नांगर, शेतीचीं अवजारें, रहाट, मोट इ., भारतीय खेड्याची सर्व आवश्यक सामाजिक सुखसोयी दर्शविणारी प्रमाणबद्ध प्रतिकृति, तसेंच गलिच्छ वस्त्याचें उच्चाटण आणि आदर्श रचना दाखविणारी एक प्रतिकृति इत्यादि गोष्टी मध्यवर्ति दिवाणखान्यातील उजव्या बाजूच्या पहिल्या दोन रांगांतून मांडलेल्या आहेत गॅलरीतील पहिल्या रांगेत मुंबई, सेरामपूर, लखनौ, मुल्तान, कलकत्ता, अलाहाबाद, ग्वाल्हेर, जयपूर, पटण येथें आणि इतर काही देशांत तयार केलेली चिनीमातीची भांडीं ठेवलेलीं असून, दुसऱ्या रांगेत कोरीव काम केलेलीं, धातूंचे थर दिलेलीं, बिद्री, एनॅमल केलेलीं बंगालचीं पंजाबांतील भांडीं, जयपूर, सांची, (दक्षिण) हैद्राबाद, लाहोर येथील धातूचें कोरीव काम केलेलीं आणि धातूंचे थर दिलेलीं भांडीं, तसेंच (दक्षिण) हैद्राबाद, लखनौ आणि मुर्शिदाबाद येथील बिद्रीचीं भांडीं, मुर्शिदाबाद लखनौ, बनारस, जयपूर, पुणें, नाशिक, म्हैसूर, मद्रास आणि मदुरा येथील भारतीय पद्धतीचीं घरगुती आणि समारंभप्रसंगींचीं भांडीं आणि दिवे, हिंदू देवतांच्या प्रतिमा, कुटिरोद्योगाचे नमुने, उदा. आग्रा येथील सोप स्टोन, चेंदूर आणि उडुपि येथील, नारळ, लाकूड आणि शंखांच्या वस्तु; कागदाच्या लगद्यापासून जयपूर येथें बनविलेल्या भारतीय पक्ष्यांच्या प्रतिकृति, भारत व जपान या देशांतील फळें आणि भाजीपाला, आणि रत्नागिरी, त्रावणकोर व कटक येथें शिंगापासून बनविलेल्या वस्तु ठेवण्यात आल्या आहेत वायव्येकडील कोपऱ्यातील खोलींत सि. सेटन कार यांनी भेट म्हणून दिलेल्या भारत, आफ्रिका आणि युरोपांतील प्रागैतिहासिक दगडी हत्यारांचा एक छोटासा संग्रह ठेवला आहे नैर्ऋत्येकडील कोपऱ्यावरच्या खोलींत वस्तूंचा एक संग्रहच ठेवला आहे पायऱ्या चढून वर गेल्यास हिमालयात पसरलेल्या जमातींतील मृतांच्या तोंडावर लावले जाणारे मुखवटे व हिमालयातील दृश्यें, सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट्स् येथें बनविलेल्या जुन्या मशिदींची सुंदर छायाचित्रें आणि आग्रा किल्ल्यातील शिवाजीच्या दरबाराची प्लॅस्टरची प्रतिकृति दिसेल वरच्या मजल्यावर उत्तरेकडे काश्मीर, कच्छ, जयपूर, मुंबई, म्हैसूर, मद्रास, कलकत्ता आणि बनारस येथील प्रचलित शैली दर्शविणारी चांदीचीं भांडीं आणि दागिने यांचे नमुने ठेवले आहेत मुंबई राज्य आणि मुंबई बेट यासंबंधींचे स्थलवर्णनशास्त्रदृष्ट्या महत्त्व असलेले उंच सखल प्रदेश दाखविणारे नकाशे, चित्रें आणि दुर्मिळ मूळ आराखडे यांचा संग्रह, ईशान्य आणि वायव्येकडील जुन्या खोल्यांत ठेवलेल्या आहेत पश्चिम भागात कलकत्ता, मुर्शिदाबाद, लखनौ, बनारस, दिल्ली, लाहोर, तंजावर, त्रिवंद्रम, मिरज आणि पुणें या ठिकाणचीं वाद्यें, तोंडानें फुंकून वाजविण्याचीं तसेंच धनुकली इ. दुसऱ्या एखाद्या वस्तूच्या सहाय्यानें वाजवावयाचीं वाद्यें ठेवलीं आहेत त्याच भागात भारतातील भिन्नभिन्न प्रदेशांत ५० वर्षांपूर्वी घेतल्या जाणाऱ्या विभिन्न वेशभूषांच्या प्रतिकृति, भारतातील वेगवेगळ्या धार्मिक पंथांतील लोकांच्या प्रतिकृति, भारतांतील लोकप्रिय खेळांच्या प्रतिकृति, आणि मुंबई राज्यात प्रचलित असलेलीं वेगवेगळ्या प्रकारचीं शिरस्त्राणें आणि लखनौ, गुजरात व कच्छ येथील भरतकाम व छापलेलीं वस्त्रें व कॅलिको कापडाचे तुकडे ठेवलेले आहेत आग्नेय कोपऱ्यातील खोलींत नवग्रह आणि अष्टदिक्पाल (ग्रह आणि दिशारक्षक) यांचीं १८ व्या शतकांतील चित्रें, मोगल, राजपूत, म्हैसूर, बंगाल, पाटणा आणि आधुनिक भारतीय शैलीचा अशा सर्व रंगीत चित्रांचा एक छोटासा संग्रह, पाटणा शैलीचीं अभ्रकावर काढलेलीं चित्रें, हिंदूंच्या धार्मिक विषयावरील लहान रंगीबेरंगी चित्रें व फारसी आणि जैन हस्तलिखितें आणि १८ व्या शतकाच्या अखेरीस जयपूर शैलीनुसार तयार केलेल्या रागमाला नावाच्या रंगीत चित्रांचा एक छोटासा संग्रह ठेवण्यात आला आहे भारतीय हत्यारें, धनुष्य, बाण, खंजीर आणि तलवारी यांचे नमुने, चिलखत, परिधान केलेल्या एका रजपूत योद्ध्याची प्लास्टरपासून बनविलेली प्रतिकृति विजयचिन्हें व पदकें इत्यादि वस्तु दक्षिण भागात मांडल्या असून पूर्वभागात, रामायण व महाभारत या धर्मग्रंथांतून निवडलेल्या, हिंदु पुराणांतील देवदेवता, भारतीय उद्योगधंद्यांतील मालाचे नमुने, उदाहरणार्थ, हाडावरील कोरीव काम, गुजरात व इतर ठिकाणचें शिंपल्यावरील कोरीव काम, गुजराथ, म्हैसूर व ब्रह्मदेश येथील लाखकाम, मौल्यवान अगेट दगडाचे व त्यापासून बनविलेल्या तयार वस्तूंचे नमुने व त्याबरोबरच खंबायत येथील हत्यारें, म्हैसूर व त्रिवेन्द्रम येथील हस्तिदंताच्या कोरीव वस्तूंचा एक छोटा संग्रह, दिल्ली, जयपूर पुणें आणि म्हैसूर येथें बनविलेले, मौल्यवान वस्तु ठेवावयाचे जाळीदार करंडे आणि इतर निवडक वस्तु आणि गुजराथ, म्हैसूर व त्रिवंद्रम येथील चंदनावरील कोरीव काम केलेल्या वस्तु ठेवल्या आहेत

तळमजल्यावर एक छोटीशी नाण्यांची एक लहान खोली असून तीत इंडो-बॅक्ट्रियन, इंडो-पार्थियन, इंडो-सीथियन, कुशानकालीन, पाश्चिमात्य, क्षत्रपकालीन, गुप्तकालीन, काबुलच्या राजांची, मोगल, गुजराथच्या सुलतानांची, ईस्ट इंडिया कंपनीची आणि मोगल साम्राज्यानंतरच्या भारतीय संस्थानांतील अशी विविध प्रकारची नाणीं ठेवलीं आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाला जोडून असलेलें वाचनालय विभागाच्या तसेंच जनतेच्या उपयोगासाठीं आहे मात्र तेथून पुस्तकें बाहेर नेण्याची परवानगी दिली जात नाहीं वाचनालयात एकूण १०,०० पुस्तकें व २ नियतकालिकें असून पुराणवस्तुशास्त्र, वास्तुशास्त्र, मानववंशशास्त्र, भूगर्भशास्त्र, इतिहास, नाणकशास्त्र आणि संग्रहालयशास्त्रावरील ग्रंथ आहेत संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांना या वाचनालयाचा चांगला फायदा मिळतो दरवर्षी सरासरी १०,००० शाळकरी विद्यार्थी गटश आपल्या शिक्षकासह संग्रहालयाला भेट देतात आणि संग्रहालयाध्यक्ष त्यांच्याबरोबर फिरून सर्व प्रदर्शनविभागाची त्यांना माहिती देतात अभ्यासासाठीं अनेक महाविद्यालयीन विद्यार्थी आपल्या प्राध्यापकांसह भूगर्भशास्त्र विभागास भेटी देतात संग्रहालयातील नानाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व हिंदी अशा दोन्ही भाषांतून लिहिलेल्या आहेत सर्वच इतर वर्णनात्मक खुलासेहि याच दोन भाषात असल्यामुळें प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांनाहि त्या वाचतां येतात

**प्रकाशनें :** व्हिक्टोरिया आणि आल्बर्ट संग्रहालय (पुस्तिका),—एक आणा याप्रमाणे एकंदर नऊ आवृत्त्या निघाल्या असून १९४६ सालापासून आजपर्यंत एकूण २८,००० प्रती छापण्यांत आल्या आहेत

**कामाचे तास :** संग्रहालय दर सोमवारीं आणि महाशिवरात्र, होळी, गोकुळाष्टमी, गणेश चतुर्थी, दसरा, दिवाळी, प्रजासत्ताक दिन आणि स्वतंत्र्य दिन अशा महत्त्वाच्या सुट्टयांच्या दिवशीं बंद रहातें इतर सर्व दिवशीं ते सकाळी १०॥ ते संध्याकाळीं ५॥ पर्यंत आणि रविवारीं सकाळीं ८॥ ते संध्याकाळीं ५॥ पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** दर प्रौढ व्यक्तीला रविवारीं, शुक्रवारीं आणि सार्वजनिक सुट्टीच्या दिवशीं ३ नये पैसे प्रवेशमूल्य आकारलें जातें (बुधवारीं प्रवेश दिला जात नाहीं) बुधवार हा दिवस स्त्रिया, मुलें आणि विद्यार्थ्यांचे गट यांच्यासाठीं राखून ठेवला आहे

**नियामक मंडळ :** बृहन्मुंबईचे डेप्युटी म्युनिसिपल कमिशनर

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष—डॉ एस् सी उपाध्याय, एम ए, एल् एल बी, टी एच्, पीएच् डी संग्रहालय सहाय्यक (कारकून), संग्रहालय चित्रकार, सहाय्यक संग्रहालय चित्रकार, नाईक, नऊ शिपाई, चार हमाल आणि पाच पहारेकरी

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाचें वार्षिक अंदाजपत्रक ५३,००० रुपये इतकें आहे.

**अभिप्राय :** हें संग्रहालय शहराच्या मध्यवर्ती भागांत असून दररोज सरासरी ३,५८८ प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात सुट्टीच्या दिवशीं ही संख्या बरीच जास्त असते संग्रहालयाची इमारत अतिशय जुनी असून ती अपुरी व गैरसोयीची आहे शिवाय तीन राखीव प्रदर्शनवस्तूंचा संग्रह करण्याकरिता पुरेशी जागादेखील नाहीं संग्रहालयांत प्रयोगशाळेबाबतही पुरेशा सोयी उपलब्ध नाहींत संग्रहालयातील वस्तु मुख्यत्वें खरेदी करून मिळविलेल्या आहेत

सेंट झेवियर कॉलेज संग्रहालय, भारतीय ऐतिहासिक संशोधन संस्थेचे संग्रहालय व "शैक्षणिक आणि विज्ञान संग्रहालयें" या विभागात पाहा

**धरमपूर, लोकसंख्या ५,०९६**

## लेडी विल्सन संग्रहालय

**स्थापना : १९२८**

**पूर्वेतिहास :** परदेशीय लोकांशीं हस्तकौशल्याबाबत स्पर्धा करण्याची ईर्षा लोकांत निर्माण व्हावी या हेतूनें धरमपूर संस्थानाच्या महाराजांनीं सन १९२८ मध्यें हें संग्रहालय स्थापन केलें त्यात स्थानिक किंवा भारतीय वस्तूंपेक्षा परदेशातील वस्तूंचाच भरणा जास्त जास्त आहे यामागील उद्देश असा की परदेशात याबाबत किती प्रगति झालेली आहे हें लोकांना दाखवून यावें व लोकांना संग्रहालयात प्रदर्शित केलेल्या वस्तु व त्यांनीं स्वत बनविलेल्या वस्तु यांची तुलना करून आपली सुधारणा करून घेता यावी हें संस्थान सन १९४८ मध्यें भारतीय संघराज्यात विलीन झाल्यानंतर संग्रहालयाची व्यवस्था मुंबई राज्याच्या उद्योगविभागाकडे आली संग्रहालयानें दोन इमारती व्यापलेल्या आहेत वर एक गॅलरी व ५,८५० चौरस फूट क्षेत्रफळ असलेल्या मुख्य इमारतींत पुढील प्रदर्शन—वस्तु आहेत— (क) काचेच्या वस्तु, (ख) हस्तीदंताच्या वस्तु (ग) दगड व लाकूड यांवरील कोरीव काम, (घ) धातुकाम, (च) चिनीमातीची भांडीं, (छ) कापड, (ज) गवत आणि बांबूपासून तयार केलेल्या वस्तु, (झ) लाखकाम आणि जडावाचे काम, (ट) नाणीं, (ठ) चलनी नाणीं आणि पोस्टाचीं तिकिटें, (ड) जंगल आणि शेतकीविषयक वस्तु, (ढ) भूगर्भशास्त्रविषयक आणि प्राणिशास्त्रविषयक नमुने, (ण) चित्रप्रदर्शनविभाग, (त) वस्त्रप्रावरणें आणि दागिने व (थ) मातीचीं भांडीं आणि विटा

२,३०४ चौ फूट क्षेत्रफळ असलेल्या दुसऱ्या इमारतींत निरनिराळ्या प्रकारचीं वाद्यें मांडून ठेवलीं आहेत

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयाचे पुढील विभाग आहेत• (क) उद्योग आणि शेतकी, (ख) सृष्टिविज्ञान आणि प्राणिशास्त्र, (ग) भूगर्भशास्त्र, (घ) पुराणवस्तुशास्त्र (नाणीं, चित्रें व मातीचीं भांडीं), (च) मानववंशशास्त्र (दागिने आणि कपडे) (छ) वाद्यें, (ज) चित्रप्रदर्शन विभाग, (झ) वनविज्ञान आणि (ट) शस्त्रें

संग्रहालयाला वारंवार भेटि देणाऱ्या शाळकरी मुलांना संग्रहालयाध्यक्ष स्वतःच सर्व प्रदर्शनवस्तूंची माहिती सांगतात प्रादेशिक भाषा गुजराथी असल्यामुळें सर्व वस्तूंवर इंग्रजीप्रमाणेंच गुजराथी भाषेंतून देखील नावांच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** रविवारखेरीज इतर सर्व दिवशीं सकाळीं ९ ते १२ आणि दुपारीं ३ ते ६ पर्यंत, संग्रहालय उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय मुंबई सरकारच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष श्री डी एच् कोसर, एम ए, कारकून, एक शिपाई, तीन हमाल आणि दोन पहारेकरी

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाचें वार्षिक अंदाजपत्रक ११,०७० रुपयांचें आहे

**अभिप्राय :** संग्रहालय सोयीस्कर अशा जागीं असून प्रदर्शनवस्तूंच्या दृष्टीनें इमारत सोयीची व पुरेशी आहे राखीव वस्तु आणि समकृति ठेवण्यासाठीं भरपूर राखीव जागा आहे दररोज सरासरी ११७ व दरवर्षी सुमारें ४३,००० प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात दसरा, मोहरम, दिवाळी यासारख्या खास प्रसंगी बरेच लोक संग्रहालय पहावयास येतात रात्रीं आणि दिवसा संग्रहालयावर पहारा आणि देखरेख करण्याकरितां दोन पहारेकरी ठेवले आहेत संग्रहालयाच्या इमारतींत बंदिस्त खोली नसल्याकारणानें सर्व नाणीं स्थानिक ट्रेझरी कचेरींत ठेवलीं जातात प्रदर्शनविभागांतील वस्तु धरमपुरच्या महाराजांनीं खरेदी करून संग्रहालयाला देणगी म्हणून दिल्या आहेत हें संग्रहालय आदिमजाती-क्षेत्रांत असल्यामुळें संग्रहालयाची संपूर्ण घडणच बदलून त्याचें मुख्यत मानवशास्त्रविषयक संग्रहालयांत रूपांतर करून संग्रहालयास जोडून एक आदिमजाती संशोधन संस्था उघडण्याचा विचार चालू आहे हें संग्रहालय 'भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे

**धुळें :** लोकसंख्या २२,५१७

## इतिहासाचार्य व्ही. के. राजवाडे संशोधन मंडळ संग्रहालय

**स्थापना :** १९३२

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय राजवाडे संशोधन मंडळाबरोबरच तारीख ५ जानेवारी १९३२ रोजीं स्थापण्यांत आलें ह्यांतील बहुसंख्य वस्तु श्री इतिहासाचार्य व्ही. के. राजवाडे यांनीं संग्रहित केलेल्या असून वेळोवेळीं त्यांत भर टाकण्यांत आली आहे मंडळानें संग्रहालयाच्या इमारतीसाठीं जागा देण्याबाबत सरकारला केलेल्या विनंतीनुसार मुंबई सरकारनें जागा मंजूर केली इमारतीचें काम सुरू होऊन तळमजल्याच्या बांधकामाला २५,००० रुपये खर्च आला

**व्याप्ति व संग्रह :** येथील प्रदर्शनवस्तूंमध्यें मोगल व राजपूतकालीन रंगीत चित्रें, नाणीं, ताम्रपट, दगडी पुतळे, धातूंच्या मूर्ती, जुनीं हस्तलिखितें, ऐतिहासिक दस्तऐवज आणि दगडी उपकरणें आणि मातीचीं भांडीं असलेल्या इतिहासपूर्वकालीन वस्तु आणि ऐतिहासिक विषयावरील चित्रप्रदर्शनविभाग आहे

**शैक्षणिक कार्य.** येथें सुमारें २,००० पुस्तकांचें एक चांगलें संदर्भ ग्रंथालय आहे मंडळाकडे अदलाबदलीच्या तत्त्वावर सुमारें बारा संदर्भ नियतकालिकें येतात संग्रहालय पहाण्यास येणाऱ्या शाळकरी, महाविद्यालयीन आणि पदव्युत्तर अभ्यास करणारे विद्यार्थी यांना संग्रहालयाध्यक्ष स्वतः संग्रहालय दाखवितात व निरनिराळ्या वस्तूंची माहिती देतात संग्रहालयांतील वस्तूंवरील नावाच्या चिठ्ठ्या मराठींत लिहिलेल्या आहेत

**प्रकाशनें :** राजवाडे संशोधन मंडळातर्फे 'संशोधक' नांवाचें एक त्रैमासिक प्रसिद्ध केलें जातें

**कामाचे तास :** मंगळवार सकाळ आणि कांहीं सुट्टीचे दिवस याखेरीज करून इतर सर्व दिवशीं संग्रहालय सकाळीं ८॥ ते ११ आणि संध्याकाळीं ४॥ ते ८ वाजेपर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** ह्या संग्रहालयाचा कारभार राजवाडे संशोधन मंडळाच्या व्यवस्थापक समितीकडून चालविला जातो

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष– श्री. डी. आर्. भट, शिपाई आणि पहारेकरी

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाकरितां खर्चाची वेगळी तरतूद नाहीं

**अभिप्राय :** संग्रहालय सोयीस्कर जागीं असून दररोज सरासरी ५ व वर्षाला सुमारें २,००० प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात नाण्यांचा संग्रह पोलादी कपाटांतून सुरक्षितपणें ठेवण्यांत आला असून रात्रीं पहाऱ्यासाठीं एक पहारेकरी पण ठेवण्यांत आला आहे सध्याची इमारत लहान असून लवकरच संग्रहालय नव्या इमारतींत हलविण्याचें बेतांत आहे संग्रहालयांतील वस्तु संशोधनाद्वारें व देणगीदाखल मिळविण्यांत आल्या आहेत

**जामनगर,** लोकसंख्या १,०४,४१९

## जामनगर पुरातन वस्तुसंग्रहालय

**स्थापना :** १९४६

**पूर्वेतिहास :** जामनगर येथील पुरातन वस्तुसंग्रहालय सन १९४६ मध्यें पूर्वीच्या नवानगर संस्थानानें स्थापन केलें हें संग्रहालय लाखोटे नांवाच्या इमारतींत आहे व तें सध्या मुंबई सरकारच्या नियंत्रणाखालीं आहे

**व्याप्ति व संग्रह :** हें मुख्यतः पुरातनवस्तुशास्त्रविषयक संग्रहालय असून त्यांत खालील विभाग पाडलेले आहेत (अ) शिल्पकला, (ब) पुरालेखविद्या नाणकशास्त्र, (क) हस्तलिखितें, (ड) रंगचित्रें (फ) इतिहासपूर्वकालीन, (ग) सृष्टिविज्ञान, (ह) हस्तकला आणि (य) भूस्तरशास्त्र

यांतील शिल्पाकृति मुख्यत्वें जुन्या नवानगर राज्यांतील घुमली, गोप, पिंडारा, गायवी, भरणा, पडतार व बेट यासारख्या महत्त्वाच्या ठिकाणाहून गोळा केलेल्या असून त्यांत हिंदु व जैन देवदेवतांच्या मूर्ति, वास्तुशिल्पकृति व सजावटीच्या वस्तु, स्मारक शिल्पकृत इत्यादींचा अंतर्भाव होतो पुरालेखविद्याविभागांत शिलालेखांचा आणि ताम्रपटांचा समावेश होतो शिलालेखांपैकीं महत्त्वाचे म्हणजे बेट, भरणा व आमरण येथील १३ व्या शतकांतील जैन शिलालेख व घुमली येथील हरणी शिलालेख होत ताम्रपटांत सहाव्या शतकांतील गुप्तकालीन भूदानविषयक येथील सैंधव राजानें आणि इ. स. १०४५ मध्यें भूदानविषयक कुंकुमलोल देवालयाला दिलेल्या अनुदानाचा उल्लेख असलेल्या ताम्रपटांचा मुख्यतः अंतर्भाव होतो नाणकशास्त्रविषयक विभागांत क्षत्रप, गुप्त (कुमारगुप्त), यौधेय, मुसलमान (मोंगल आणि गुजराथचे सुलतान) यांचीं नाणीं आणि इतर स्थानिक नाणीं तसेंच क्षत्रपकालीन मुद्रांचा अंतर्भाव होतो चित्रप्रदर्शनविभागांत शिवपुराणांतील प्रसंग चित्रित करणारीं राजपूत शैलीचीं रंगचित्रें आणि नूरजहान व राजघराण्यांतील इतर व्यक्तींचीं मोंगलकालीन रंगचित्रें आहेत त्याचप्रमाणें त्यांत सन १५९१ मध्ये अकबर व नवानगरचे जामसाहेब यांच्या सैन्यामध्यें भूचरमोरी येथें झालेली लढाई दर्शविणारें एक भव्य चित्र आहे प्रदर्शनविभागाचें संपूर्ण छत जामसाहेब श्री रणमलजी यांच्या मृगयेचीं दृश्यें व कृष्णाची रासलीला दर्शविणाऱ्या रंगचित्रांनीं भरलेलें आहे संग्रहालयाच्या हस्तलिखित विभागांत इ. सन १६ व्या शतकांत लिहिलेलीं पुस्तकें आहेत आणि त्यांतील कांहीं पुस्तकें म्हणजे नागरी व फारसी लिपीच्या हस्तलेखनकलेचे उत्कृष्ट नमुनेच होत इतिहासपूर्वकालीन

विभागांत हलार व सोरठ जिल्ह्यांतील अनेक पुरातन ठिकाणीं उत्खननांत सापडलेलीं फुटकीं मडकीं व तुकडे, निरनिराळ्या मातीच्या आकृति, मणी शस्त्र, बांगड्या, चमकदार लाल मातीचीं भांडीं, त्याचप्रमाणें, काळी, लाल व पिवळट रंगाचीं भांडीं, राजस्थानांतील जयपूर जवळ असलेलें बैरट व मध्यभारतांतील महेश्वर येथील काळ्या रंगाचीं भांडीं तसेंच डॉ एच्. डी सांकलिया यांच्या नेतृत्वाखालीं केलेल्या नर्मदेच्या खोऱ्यांतील संशोधनकार्यांत गोळा केलेलीं महेश्वर येथील मातीचीं सचित्र भांडीं आहेत सृष्टिविज्ञानविभागांतील वस्तु जमविण्यास नुकतीच सुरुवात झाली असून त्यांत एक हरिणाचें शिर व दोन गेंड्याच्या कवट्या आहेत हस्तकलाविभागांत लोकहस्तकृति मांडलेल्या आहेत या संग्रहालयांत बाल विभाग नवीनच उघडण्यांत आला असून त्यांत जुनागडहून मिळालेलीं खेळणीं पेंढा भरलेलीं जनावरें इत्यादि वस्तु ठेवलेल्या आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयांत एक लहानसें ग्रंथालय असून त्यांत संस्कृत, हिंदी व गुजराथी साहित्य, इतिहास, कला, वस्तुशिल्प आणि पुराणवस्तुशास्त्र या विषयासंबंधींचीं एकूण ७५० पुस्तकें आहेत हें ग्रंथालय फक्त विभागीय कामकाजासाठींच आहे याशिवाय विशिष्ट प्रकारची रचना असलेलें एक सभागृहहि येथें आहे त्यांत विद्यार्थ्यांना प्रदर्शनवस्तूंची सचित्र माहिती करून देण्यासाठीं निरनिराळे तक्ते, नकाशे व छायाचित्रें हि लावलेलीं आहेत संग्रहालयाला भेट देणाऱ्या निरक्षर प्रेक्षकांसाठीं या सभागृहांत सोप्या व सुबोध भाषेंत व्याख्यानें दिलीं जातात स्थानिक व बाहेरून येणाऱ्या शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना संपूर्ण संग्रहालय दाखवून तेथील प्रदर्शनवस्तूंसंबंधीं क्रमवार माहिती दिली जाते पदव्युत्तर विद्यार्थ्यांना कला, इतिहास व पुरालेखविद्या या विषयींच्या अभ्यासासाठीं सवलती दिल्या जातात संग्रहालयाध्यक्ष हे फोटो, तक्ते, नकाशे, इ साहित्यासह प्राथमिक व माध्यमिक शाळांना भेट देऊन विद्यार्थ्यांना निरनिराळीं सांस्कृतिक वैशिष्ट्यें सुबोध भाषेंत समजावून सांगतात प्रदर्शनविभागांतील नावाच्या चिठ्या इंग्रजी व गुजराथी भाषांत लिहिलेल्या असून त्या अर्थपूर्ण आहेत

जनतेस सांस्कृतिक व कलासौंदर्यविषयक शिक्षण देणारें एक सांस्कृतिक केंद्र म्हणून संग्रहालय कार्य करूं शकतें हें दर्शविण्यासाठीं १९५२ सालीं २९ सप्टेंबर ते ३ ऑक्टोबरपर्यंत एक सांस्कृतिक सप्ताह साजरा करण्यांत आला या सप्ताहाचा शेवट शरद् पौर्णिमेच्या दिवशीं झाला त्यादिवशीं, मूर्तिशास्त्र, पुराणोक्त प्राचीन जागतिक भूगोल, प्राचीन भारतीय वैद्यकशास्त्र, प्राचीन शैक्षणिक पद्धति व पुराणवस्तुशास्त्राचें महत्त्व यासारख्या निरनिराळ्या सांस्कृतिक विषयांवर व्याख्यानें देण्यासाठीं स्थानिक विद्वान मंडळींना पाचारण केलें होतें विद्यार्थीवर्गाव्यतिरिक्त अनेक मंडळींनीं या व्याख्यानांचा लाभ घेतला सांस्कृतिक कार्यक्रमांत लोकगीत, नृत्यें इ चा अन्तर्भाव करण्यांत आला होता सप्ताहांत रात्रीं काव्यगायन आणि नाटिकांचा कार्यक्रम ठेवण्यांत आला होता गतकालाचें मूर्त स्वरूपांत दर्शन घडविणाऱ्या या सांस्कृतिक कार्यक्रमांत हजारों स्त्रीपुरुषांनीं भाग घेऊन शरद् पौर्णिमा अति उत्साहानें साजरी केली

**प्रकाशनें** - काहीं नाहीं

**कामाचे तास :** रविवार व शनिवार दुपार खेरीज करून सर्व दिवशीं सकाळीं ९–३० ते दुपारीं १२–३० व दुपारीं २ ते संध्याकाळीं ६ पर्यंत

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें वस्तुसंग्रहालय मुंबई राज्य सरकारच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवक वर्ग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री जे एम् नानावटी, एम् ए., एक कारकून, चार शिपाई व चौकीदार

**आर्थिक तरतूद :** यासाठीं वार्षिक अर्थसंकल्पांत रु ९,४६२ एवढ्या रकमेची तरतूद केलेली आहे

**अभिप्राय :** संग्रहालय गावालगतच सोयीस्कर ठिकाणीं वसलेलें आहे दर दिवशीं भेट देण्यासाठीं येणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या २०० असून वार्षिक ७२,००० इतकी आहे महाशिवरात्र, होळी, श्रावणी, सोमवार, जन्माष्टमी, रमझान व बकरी-ईद या दिवशीं प्रेक्षक मोठ्या संख्येनें संग्रहालयास भेट देतात संग्रहालयाची इमारत सध्या उपलब्ध असलेल्या वस्तुसंग्रहाच्या दृष्टीनें अगदीं योग्य असून राखीव कलाकृतींचा संग्रह करण्यासहि मोकळी जागा आहे नाण्यांसाठीं असलेल्या पेटींत ठेवलेलीं प्रातिनिधिक स्वरूपाचीं निवडक नाणीं खेरीज करून इतर सर्व नाणीं लोखंडी तिजोरींत ठेवलेलीं आहेत येथील वस्तु संशोधन व उत्खनन या मार्गांनीं मिळवून जमविलेल्या गुप्त निधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं या संग्रहालयास अद्यापि मान्यता देण्यांत आलेली नाहीं हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचे सदस्य आहे

**जुनागढ :** लोकसंख्या ६२,७३०

## जुनागढ संग्रहालय

**स्थापना** १९०१

**पूर्वेतिहास** या संग्रहालयाची स्थापना १९०१ मध्यें झाली असून त्यांत अनेक वर्षांत संपादन केलेल्या पुरातन वस्तूंचा बहुमोल संग्रह आहे पुराणवस्तुशास्त्रविभागानें सन १९४९ मध्यें जुनागडजवळ इंटवा येथें उत्खनन केलें त्यांत सापडलेलीं मातीचीं भांडीं, लाल मातीच्या शोभेच्या वस्तु, मुद्रा व इतर वस्तु प्रदर्शनासाठीं या संग्रहालयांत आणल्या गेल्या या संग्रहालयांत पुरालेख विद्याविषयक एक विभाग असून त्यांत जुनागड येथील अशोककालीन शिलालेख सर्वांत महत्त्वाचा आहे

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय पुराणवस्तुशास्त्र, कला व हस्तकला, सृष्टिविज्ञान व भूस्तरशास्त्र या विषयांपुरतेंच मर्यादित आहे पुराणवस्तु विभागांत ब्राह्मी, संस्कृत व फारशी भाषेंतील कोरीव लेख (यांतील काहीं दोन भाषेंत आहेत), नाणीं, उत्खननांत सापडलेल्या वस्तु, ताम्रपट, शिल्पकृति इ० आहेत संग्रहालयांतील उल्लेखनीय शिल्पकृतींत, सूर्य, शेषशायी विष्णु गणेश, महिषमर्दिनी, सूर्यतोरण इ च्या मूर्तींचा समावेश होतो

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयांत एक छोटेसें संदर्भ-ग्रंथालय असून बाहेरील लोकांनाहि त्याचा उपयोग करता येतो संग्रहालय पहावयास येणाऱ्या शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना संग्रहालयाध्यक्ष प्रदर्शनवस्तूंसंबंधीं माहिती देतात नावाच्या चिठ्या गुजराथी व हिंदी भाषांतून लिहिलेल्या आहेत जुनागडमधील शैक्षणिक संस्थांच्या दृष्टीनें हें संग्रहालय फार उपयुक्त ठरलेलें आहे

**प्रकाशनें** - काहीं नाहीं

**कामाचे तास :** रविवार सोडून दर दिवशीं सकाळीं ८-३० ते दुपारी १२-३० व दुपारी ३ ते सध्याकाळी ६ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय मुंबई सरकारचे संचालक, पुराभिलेख व ऐतिहासिक स्मारक विभाग, यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष, कारकून, चार शिपाई व एक पहारेकरी

**आर्थिक तरतूद :** या संग्रहालयासाठी अर्थसंकल्पांत वार्षिक रु ८,४३६ एवढ्या रकमेची तरतूद केली आहे

**अभिप्राय :** दर दिवशीं येणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या २५० ते ३०० असून वार्षिक १,००,००० इतकी आहे उत्सवांच्या व सणांच्या दिवशीं ही संख्या जास्त असते संग्रहालयाची इमारत सध्या पुरेशी असून राखीव प्रदर्शनवस्तु ठेवण्यासाठींहि तींत जागा आहे

या संग्रहालयातील वस्तु संशोधन, खरेदी व उत्खनन इ मार्गांनी तसेंच देणगीद्वारें मिळविलेल्या आहेत हें संग्रहालय भारतीय संग्रहालय-संघाचें सदस्य आहे

**कोल्हापूर :** लोकसंख्या, १,३६,८३५

**कोल्हापूर वस्तुसंग्रहालय**

**स्थापना :** १९४६

**पूर्वेतिहास :** कै रावबहादूर के एन. दीक्षित यांनी या संग्रहालयाचें तारीख १० जानेवारी १९४६ रोजीं औपचारिक उद्घाटन केलें त्यावेळीं सुरुवातीस या संग्रहालयांत सन १९४४-४६ मध्यें ब्रह्मपुरी येथें केलेल्या उत्खननात सापडलेल्या वस्तूंचा प्रदर्शनवस्तु म्हणून अंतर्भाव करण्यात आला होता तेव्हां संग्रहालय संचालक, पुरावस्तुशास्त्र विभाग, कोल्हापूर यांच्या अधिकाराखालीं होतें व त्यांच्या त्या अधिकारानुसार प्रा के जी कुंदनगर व श्री वी जी प्रधान यांनीं, कोल्हापूर संस्थान सन १९४९ मध्यें मुंबई राज्यात विलीन होईपर्यंत त्याचें कामकाज पाहिलें विलीनीकरणानंतर हें संग्रहालय, संचालक पुराभिलेख विभाग, मुंबई सरकार यांच्या नियंत्रणाखालीं आलें कोल्हापूर संस्थानाच्या निरनिराळ्या भागातून पूर्वीच गोळा केलेल्या अनेक शिळेवरील शिल्पकृतींची जून १९४८ मध्यें या संग्रहालयात व्यवस्थेशीर मांडणी करण्यात आली कोल्हापूरच्या नैर्ऋत्येस नऊ मैलांवर असलेल्या बौद्ध भवाच्या लेण्यात केलेल्या उत्खननांतील उपलब्ध वस्तु आणि त्या ठिकाणीं मिळालेल्या काहीं पुरातन शिल्पकृति कोल्हापूरला आणून या संग्रहालयात ठेवण्यात आल्या सन १९५०-५१ व १९५१-५२ या वर्षांत संग्रहालयासाठीं संपादन करण्यात आलेल्या वस्तूंत शिल्पकृति, वीरगळ, वास्तुशिल्पकृति, निरनिराळ्या भारतीय संस्थानांतील व परदेशांतील प्राचीन हिंदु, मुसलमान, मराठा कालांतील व आधुनिक कालांतील नाणीं, ताम्रपट, रंगचित्रें, सरकारी संस्थांत तयार झालेल्या औद्योगिक वस्तु आणि प्राणिशास्त्रविषयक नमुने धरून इतर संकीर्ण वस्तु यांचा समावेश होतो

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयात मुख्यत उत्खननांत सापडलेल्या आणि कोल्हापूर जिल्ह्याच्या वेगवेगळ्या भागातून व आता बेळगांव जिल्ह्यात समाविष्ट करण्यात आलेल्या रायबागसारख्या ठिकाणाहून मिळविलेल्या पुरावस्तुशास्त्रविषयक चीजांचा अंतर्भाव होतो उत्खननात मिळालेल्या वस्तूंपैकीं बहुतेक वस्तु ब्रह्मपुरी उत्खननात सापडलेल्या असून त्या ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकापासून इ सन १३ व्या शतकापर्यंतच्या कालांतील आहेत काहीं वस्तु यानंतरच्या कालांतीलहि आहेत पुरावस्तुशास्त्रविषयक वस्तु व्यतिरिक्त या संग्रहालयांत काहीं रंगचित्रें आणि ऐतिहासिक व शैक्षणिकदृष्ट्या महत्त्वाच्या अशा औद्योगिक व संकीर्ण स्वरूपाच्या वस्तु आहेत सांवतवाडी, नाशिक व बागल येथून मराठाकालीन व अव्वल ब्रिटिश अामदानींतील अलीकडेच संपादन केलेल्या जुन्या शस्त्रास्त्रांमुळें संग्रहालयांत शस्त्रास्त्रविभाग उघडणें शक्य झालें आहे त्याचप्रमाणें स्थानिक कलावंताच्या वारसदारांना कोल्हापूर येथून रंगचित्रें मिळून चित्रकलाविभाग उघडण्यात आला आहे सावंतवाडीच्या जुन्या संग्रहालयांतून मिळविलेल्या स्त्रीपुरुषांच्या पूर्णाकृति-रंगचित्रांच्या नमुन्यांचा सावंतवाडी विभागात समावेश होतो गेल्या काहीं वर्षांत संचालक, पुराभिलेखविभाग, मुंबई, यांजकडून बरींच नाणीं, शिल्पकलाकृति व इतर पुरातन कलाकृति संग्रहालयास मिळालेल्या आहेत

**शैक्षणिक कार्य :** या संग्रहालयात ऑनरन पुरावस्तुशास्त्र, नाणकशास्त्र, संग्रहालय इ० विषयांवरील पुस्तकांचे ग्रंथालय सुरू व्हावयाचें आहे ख्रिस्ती शकाच्या सुरुवातीपासून मराठी राज्याच्या ऱ्हासकालापर्यंत या भागांतील सांस्कृतिक जीवनांत कसकशी स्थित्यंतरें होत गेलीं यांवर प्रकाश पाडणाऱ्या अनेक प्राचीन व प्रदर्शनीय वस्तु या संग्रहालयात असल्यामुळें इतिहासाच्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें हें संग्रहालय अत्यंत उपयुक्त झालें आहे त्याचप्रमाणें औद्योगिक व कलात्मक दृष्टीनें उद्बोधक असलेल्या काहीं प्रदर्शनवस्तूहि या संग्रहालयांत आहेत या प्रदर्शनवस्तूंना सामान्यत इंग्रजी व मराठी अशा दोनहि भाषांतून नांवांच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत शालेय विद्यार्थी आपल्या शिक्षकांसह आणि महाविद्यालयीन विद्यार्थी गटागटांनी संग्रहालयास वारंवार भेटी देऊन प्रदर्शनवस्तु अभ्यासतात संग्रहालयाच्या प्रवेशद्वाराजवळच, संग्रहालयाचा पूर्वेतिहास व तेथील प्रदर्शित साहित्याचें स्वरूप स्पष्ट करणारा एक माहितीपूर्ण फलक लावलेला आहे आसपासच्या प्रदेशांतील शैक्षणिक संस्थानांहि या संग्रहालयासंबंधीं बरीच आस्था आहे

**प्रकाशनें :** संग्रहालयानें विशेष स्वरूपाचें असें कोणतेंहि साहित्य प्रकाशित केलेलें नाहीं ब्रह्मपुरी उत्खननांत सापडलेल्या वस्तूसंबंधींचा एक अहवाल डेक्कन कॉलेज पोस्ट-ग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणें, या संस्थेनें १९५२ मध्यें प्रसिद्ध केला आहे या संग्रहालयासंबंधींची माहिती देणारी एक पुस्तिका तयार करण्याचें काम चालू आहे

**कामाचे तास :** सोमवार व राज्यपत्रांत निर्दिष्ट केलेले सुटीचे दिवस सोडून दरदिवशीं सकाळीं ११ ते सध्याकाळीं ६ पर्यंत, आणि शनिवारी दुपारीं ३ ते सध्याकाळीं ६ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय संचालक, पुराभिलेख व ऐतिहासिक स्मारक विभाग, मुंबई राज्य, यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** कोल्हापूर दप्तर कार्यालयाचे सरकारकून यांच्या ताब्यांत हें संग्रहालय असून ते त्याच्या दैनंदिन कारभारावर लक्ष ठेवतात व त्यासाठीं त्यांना भत्ता दिला जातो या कामांत त्यांना एक कारकून, दोन शिपाई व एक रात्रपाळीचा पहारेकरी अशा पूर्णकालिक नोकरवर्गाची मदत मिळते

**आर्थिक तरतूद :** या संग्रहालयासाठीं अर्थसंकल्पात वार्षिक रु. ६,०८० इतक्या अनुदानाची तरतूद केली आहे.

**अभिप्राय :** शहराच्या मध्यभागीं असलेल्या नगरसभागृहाच्या इमारतीत हें संग्रहालय वसलेलें असून त्या सभोवती रमणीय बागबगीचा आहे. संग्रहालयास रोज भेट देणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या सुमारें १०० असून वार्षिक २९,७०५ इतकी आहे. भेट देणाऱ्यांपैकीं मोठा वर्ग शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांचाच असतो. शालेय विद्यार्थ्यांच्या तुकड्या विशेषतः त्यांच्या शैक्षणिक वर्षाच्या पहिल्या सत्राच्या अखेरीस संग्रहालय पहावयास येतात. ज्योतिबाची यात्रा, स्काऊट, जांबोरी, स्थानिक प्रदर्शनें, विद्यापीठ सामने अशा प्रसंगी जेव्हा कोल्हापूरबाहेरचे पुष्कळसे लोक शहरांत येतात तेव्हा संग्रहालयास भेट देणाऱ्यांची संख्या बरीच वाढते. संग्रहालयाकरितां वस्तु खरेदी करण्यासाठीं खास निधीची तरतूद करण्यांत आलेली नाहीं. कांहीं सरकारी व सार्वजनिक संस्थांकडून पुराणवस्तुशास्त्रविषयक वस्तु व इतर कलाकृति देणगीदाखल मिळतात. ब्रह्मपुरी टेकडीच्या उत्खननात सापडलेल्या रामकृति व इतर कांहीं वस्तु एका कोठीघरात ठेवलेल्या असून नाणीं व इतर मौल्यवान् चिजा एका तिजोरींत ठेवलेल्या आहेत. राखीव संग्रह ठेवण्यासाठीं जागा अपुरी आहे. या मार्गानीच केवळ या संग्रहालयातील वस्तु गोळा करण्यात आलेल्या आहेत. कारण भारत सरकारनें या संग्रहालयात गुप्तनिधीतील वस्तु स्वीकारण्यासाठीं मान्यता दिलेली नाहीं. कोल्हापूर वस्तुसंग्रहालयानें मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयास थोड्या प्रदर्शन वस्तु देऊन देवघेवीच्या व्यवहारास सुरुवात केलेली आहे. कांहीं प्रदर्शन वस्तूंचीं वैशिष्ट्यें दाखविण्यासाठीं कांहीं ठिकाणीं चित्रें व ओतीवकृति यांचाहि उपयोग करण्यात येतो. मूलतः केवळ पुराणवस्तुशास्त्रविषयक असलेलें हें संग्रहालय अन्य दृष्टीनेंही विकसित करण्याचे प्रयत्न चालू असून तेथें चित्रकला, शस्त्रें व शस्त्रागार आणि सृष्टिविज्ञानविषयक विभागासाठीं देखील वस्तूंचा संग्रह करण्याचें काम सुरू करण्यात आलें आहे.

**नागपूर :** लोकसंख्या ४,४९,०९९

**मध्यवर्ति संग्रहालय**

**स्थापना :** १८६३

**पूर्वेतिहास :** सन १८६३ मध्यें सर रिचर्ड टेंपल हे मध्यप्रांताचे चीफ कमिशनर असताना नागपूरच्या मध्यवर्ति संग्रहालयाची स्थापना झाली. सुरवातीस संग्रहालयानें, संग्रहालय इमारतीचें एक दालन व एक खोली इतकीच जागा व्यापली होती. सुरवातीच्या संग्रहात शिल्पकलाकृति, वास्तुशिल्प कृति, शिलालेख व आदिवासींनीं वापरलेलीं व सरकारनें जप्त केलेलीं हत्यारें इतक्याच वस्तूंचा समावेश होता. मूळची संग्रहालय निधि-समिति रद्द झाल्यामुळें संग्रहालयाचा कारभार सरकारच पहात असे. सृष्टिविज्ञानविषयक प्रदर्शनविभाग आणि भारतीय कला व हस्तकला विभाग सुरू केल्यामुळें संग्रहालयाचा व्याप वाढला. भूस्तरशास्त्रविषयक नमुने, वन्य, शेतकी व औद्योगिक वस्तु यांचा समावेश असलेला व्यावहारिक विभाग प्रथम व्हिक्टोरिया टेक्निकल इन्स्टिट्यूटमध्यें होता तो १९१२ मध्यें नागपूर संग्रहालयात आणण्यात आला. संग्रह वाढल्यामुळें, संपूर्ण इमारत संग्रहालयासाठीं वापरण्यात येऊं लागली.

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयांतील वस्तु मुख्यतः या प्रांतांतीलच आहेत. तथापि, भारतांतील इतर राज्यांतून मिळविलेले नमुने व कलाकृतीहि येथें ठेवण्यात आल्या आहेत. येथील संग्रहात (१) कला व उद्योग, (२) पुराणवस्तुशास्त्र, (३) मानववंशशास्त्र, (४) अर्थोत्पादकवस्तु, (५) भूस्तरशास्त्र व (६) सृष्टिविज्ञानविषयक वस्तूंचा समावेश होतो.

कला व उद्योग विभागात स्थानिकांच्या व लखनौ, जयपूर, अलीगड येथून आणि मुंबई व मद्रास येथील कलानिकेतनांतून (स्कूल्स् ऑफ आर्ट) मिळविलेलीं मातीचीं भांडीं, व्हिक्टोरियन काळांतील मातीचीं भांडीं, चिनी व व्हेनिशियन फुलदाण्या, सिंध, जयपूर व ब्रह्मदेश येथील लाखेचीं भांडीं व इतर पात्रें, मध्य भारतातील पितळेचीं नक्षीचीं भांडीं, आग्रा येथील बिद्रीचें व जडावाचें काम केलेलीं पाषाणाचीं भांडीं, रत्नागिरी येथील शिंगापासून बनविलेल्या चिजा, विशाखापट्टम येथील हस्तिदंती कलाकृति, कटक येथील चांदीचीं भांडीं व वस्तु, लाहोर व दिल्ली येथील चंदनी कलाकृति, निरनिराळीं वस्त्रें (मध्यप्रदेशांतील सुती व रेशमी व बऱ्हाणपूर येथील सुप्रसिद्ध जरीकामाच्या उद्योगाचे नमुने) इ. चा समावेश होतो. रंगचित्रकलाप्रदर्शन विभाग हा कलाविभागाचा वाढविलेला भाग असून त्यात जुनीं व आधुनिक भारतीय रंगचित्रें लावलेलीं आहेत.

पुराणवस्तुशास्त्र विभागांत, मध्य भारताच्या सांस्कृतिक इतिहासाचीं निरनिराळीं पर्वें दर्शविणाऱ्या पुरातन वस्तूंमध्यें (अ) इतिहासपूर्वकालातील अश्मयुगपूर्व व अश्मयुगीन वस्तु, तसेंच ताम्र, ब्राँझ व अश्मयुगांतील अवजारें आणि या संग्रहालयाच्या वाट्यास आलेल्या मोहेंजोदारो (सिंध) येथें सांपडलेल्या प्राचीन वस्तु, (ब) ब्राह्मणकालीन पाषाण शिल्प कृति, बौद्ध, जैन व गौड स्मारक त्याचप्रमाणें कांहीं धातूंच्या मूर्ति, (क) चालुक्य, त्रिपुरी, रत्नपूर व रायपूर येथील चेदी, यादव व राष्ट्रकूट यांचे शिलालेख व ताम्रपट आणि सतींचीं शिलास्मारकें आणि (ड) नाण्यांचा चांगला प्रातिनिधिक संग्रह यांचा समावेश होतो. नाणीं सार्वजनिक प्रदर्शनविभागातून मांडलेलीं नाहींत, परंतु अभ्यासाकरितां तीं मिळू शकतात. प्रदर्शनविभागांत या नाण्यांच्या त्याचप्रमाणें यौधेय, कुशाण, व गुप्तकालीन व दिल्ली येथील सुलतानांच्या, मोगल बादशहांच्या व महाकोशल राजांच्या नाण्यांच्या प्लॅस्टरच्या ओतीव कृति ठेवलेल्या आहेत. इतर संकीर्ण वस्तूंत मोगल व भोसले घराण्यांतील रंगचित्रें, एक मोगल फर्मान, मराठा घोडदळाच्या तुताऱ्या आणि ख्रिस्तपूर्व २,००० वर्षांपूर्वीची एक बाबिलोनी मुद्रा आहे.

संग्रहालयाच्या मानववंशशास्त्रविभागांत, शस्त्रें व चिलखतें यांचा संग्रह आहे. त्यांत निरनिराळ्या प्रकारचे परशु, फरश्या, तलवारी, सुरे, चाकू, बरच्या, भाले, धनुष्यबाण, पिस्तुलें, लहान व मोठ्या बंदुका, पितळी व पोलादी चिलखतें, ढाली, शिरस्त्राणें इ. आहेत. त्याचप्रमाणें तेथें वाद्यें, शेतीचीं अवजारें व मृगयेचीं साधनें, सापळे, फासे, जाळीं, गृहपयोगी वस्तु, अरणिमंथा, दागदागिने, विविध प्रकारच्या टोप्या, पगड्या, पागोटीं, तसेंच तपकिरीच्या डब्या, कगवे, गोंड, कोरकू आणि इतर आदिवासी जमाती वापरत असलेल्या वस्तु आहेत. त्याचप्रमाणें त्यात ब्राह्मण व इतर जाती-जमाती यांचे जीवनदर्शन घडविणारे मातीचे चित्रनमुने, त्याचप्रमाणें प्रांतातील आदिवासी जमातींचीं छायाचित्रें आहेत.

अर्थोत्पादन वस्तुविभागात प्रदर्शित नमुन्यांची तीन गटांत मांडणी केली आहे (अ) मुख्यत स्थानिक सागवानी लाकूड व इतर झाडें यापासूनच्या वन्य वस्तु देशी औषधें व औषधिद्रव्यें याचे नमुने, डिंक, राळ, कातडी कमविण्यासाठीं लागणाऱ्या साली व रंगद्रव्यें, खाद्यपदार्थ गळिताचीं धान्यें, निरनिराळ्या गवताचे प्रकार, मेण व लाख, लोकर, रेशीम, कातडीं व तंतु, (ब) कापूस, कडधान्यें, डाळी, गळिताचीं धान्यें, तंबाखू व इतर पिकें, यांच्या विविध जाति इ० शेतीचें उत्पन्न, फळें व भाज्यांचे प्रकार दाखविणारे लाकडी नमुने, आणि (क) मातीचीं भांडीं, धुरडकाम, कापड, काच, कागद, साबण इ० औद्योगिक वस्तूंचे तयार नमुने आणि गूळ व लाखेची निर्मिती दाखविणारे नमुने. त्याचप्रमाणें संग्रहालयात मध्य भारतातील ग्रामोद्योग निर्मित वस्तूंचा एक विभाग [ एम्पोरियम ] हि आहे

भूस्तरशास्त्र विभागात खडक व विशिष्ट खनिजें यांच्या नमुन्यांचा पद्धतशीर रीत्या केलेला संग्रह, मॅगनीज, लोखंड, पितळ यासारख्या त्या प्रदेशात उपलब्ध होणाऱ्या अर्थोत्पादनक्षम खनिज धातूंचे व इतर कमी महत्त्वाच्या धातूंचे नमुने, बॉक्साईट, कोळसा, इमारती दगड माती, ओवाइड, काच, मुरुम व खडी व क्षार यांचे नमुने, आणि अश्मीभूत वनस्पतींचा, पृष्ठ रज्जुयुक्त पृष्ठवंशी व पृष्ठरज्जुविहीन प्राण्यांचा एक मनोरंजक संग्रह आहे

सृष्टिविज्ञानविभागात या प्रांतात सांपडणाऱ्या पृष्ठरज्जुयुक्त प्राण्यांचा एक बराच पूर्ण असा संग्रह आहे त्यात गोड्या पाण्यातील व खाऱ्या पाण्यातील मासे, उत्क्रांतीच्या निरनिराळ्या अवस्थांतील लहान व मोठे बेडूक, सुसरी, कासवें, पाली, विषारी व बिनविषारी साप, पक्षी, त्यांचीं अंडीं, आणि घरटीं आणि मांसभक्षक प्राणी, खुर असलेलीं जनावरें, माकडें व वानरें, वटवाघळें, उंदीर व कीटकभक्षक सस्तन प्राणी या वर्गांतील प्रातिनिधिक नमुन्यांचा समावेश होतो व हे प्राणी वर्गीकरण करून ठेवण्यात आलेले आहेत

पृष्ठरज्जुविहीन प्राण्यासंबंधींच्या प्रदर्शनविभागात नलिकोदर प्राणी, शोषकमायी, कामठें इ० जातीचे प्राणी, कृमि जलचर प्राणी संधिपाद प्राणी, शिंपायुक्त प्राणी, इ० एकजातीय प्रमुख प्राण्यांच्या आकारात हळूहळू कम कशीं स्थित्यंतरें होत गेलीं हें प्रातिनिधिक चित्रकृतींच्या द्वारें स्पष्ट केलेले आहे कीटकप्रदर्शनविभागात स्थलकालविशिष्ट कीटकांचीं प्रमुख वैशिष्ट्यें व त्यांची आर्थिकदृष्ट्या उपयुक्तता यासंबंधींची माहिती दिलेली आहे सृष्टिविज्ञानविभागाचा विस्तार करण्यात आला असून प्राणी व पक्षी यांच्या नैसर्गिक निवासस्थानासारखी रचना केल्यामुळें तो फार आकर्षक झाला आहे सर्वां हे प्राणी व पक्षी कांचेच्या नवीन कपाटामधून प्रदर्शित केले आहेत या प्रदर्शनविभागाखेरीज या विषयाचें उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना अभ्यासासाठीं व संशोधनासाठीं बराच मोठा राखीव वस्तुसंग्रह येथें उपलब्ध आहे

**शैक्षणिक कार्य** या संग्रहालयास जोडूनच मुख्यत विभागीय कामकाजासाठीं म्हणून एक ग्रंथालय आहे परंतु केवळ संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांना त्याचा उपयोग करण्याची परवानगी देण्यात येते ग्रंथालयात ७ ००० पुस्तकें असून १२ नियतकालिकें मागविलीं जातात संग्रहालयात संशोधनकार्य करणाऱ्या व्यक्तींना संदर्भासाठीं व अभ्यासासाठीं येथें बराच मोठा राखीव ग्रंथसंग्रह उपलब्ध आहे संग्रहालयास भेट म्हणून देण्यात आलेल्या सामग्रीची नोंद ठेवण्यात येते आणि यथील संग्रहालयांतील वस्तूंची छायाचित्रें, छाप व ओतीव कृति इतरत्र पुरविल्या जातात संग्रहालय आपल्या संग्रहासंबंधींची संदर्भ पुस्तकें व पुस्तिका-मार्ग प्रसिद्ध करतें त्याचप्रमाणें शैक्षणिक कारणासाठीं अथवा प्रदर्शनासाठीं एखाद्या संस्थेनें काहीं सामग्री मागितल्यास तेंहि तें उसनवार पुरवतें संग्रहालयात एका मार्गदर्शक व्याख्यात्याची नेमणूक आहे व तो संग्रहालय पहावयास येणाऱ्या प्राथमिक, पूर्वमाध्यमिक व माध्यमिक शाळांतील विद्यार्थ्यांना व इतरांना प्रदर्शनवस्तूंबद्दल सविस्तर माहिती देतो संग्रहालयास भेट देणाऱ्या महाविद्यालयीन पदव्युत्तर व संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांना खास सवलती देण्यात येतात

**प्रकाशनें**.(१) नागपूर संग्रहालयाचें दप्तर, (२) नागपूर प्रदेशातील सर्प, (३) मध्यप्रांतातील पक्ष्यांची सूचि, (४) मध्यप्रांतातील पक्ष्यांचें म्याप, (५) नागपूरमधील अंबाझरी तलावांतील तद्देशीय माशांचीं पाहणी, (६) मध्यप्रांतातील सस्तन प्राण्यांची सूचि, (७) मध्यप्रांतातील फुलपाखरांची सूचि, (८) मध्यप्रांतातील भूजलचर प्राणी, (९) मध्यप्रांतातील मत्स्यवर्गाची पाहणी, (१०) मध्यप्रांतातील अश्मीभूत प्राणी, भाग १, सस्तन प्राणीवर्ग

**पुस्तिका**.(१) पुराणवस्तुशास्त्रविभागांतील प्रदर्शनवस्तूंच्या वर्णनात्मक सूचीची प्रस्तावना, (२) पुराणवस्तुशास्त्रविभागातील प्रदर्शनवस्तूंची वर्णनात्मक सूची, (३) मध्यप्रांत व वऱ्हाडच्या ऐतिहासिक आराखडा, (४) अटी येथील शिलालेख, (५) होशंगाबाद येथील खडकावरील रंगचित्रें, (६) मध्यवर्ती संग्रहालय, नागपूर, येथें ठवलेल्या शिलालेखांविषयींचीं टिपणें

**कामाचे तास** सोमवार, दसरा, दिवाळी, होळी, प्रजासत्ताक दिन आणि स्वातंत्र्य दिन हे दिवस सोडून रोज खुलें असतें हिंवाळ्यांत खुलें राहण्याची वेळ सकाळीं ९ ते संध्याकाळीं ५, उन्हाळ्यात सकाळीं ८-३० ते संध्याकाळीं ५-३०

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मंडळ** हें संग्रहालय, शिक्षण संचालक, मुंबई राज्य, पुणें, यांच्या नियंत्रणासाठीं आहे

**सेवकवर्ग** संग्रहालयाध्यक्ष–डॉ एस् एस् पटवर्धन, डी एस्सी, पुराणवस्तुशास्त्रविषयक साहाय्यक–श्री ०ी पी रोडे, एम् एम्, मानवशास्त्रविषयक साहाय्यक–श्री पी एम् मुळे, एम् एस्सी, चित्रकार, छायाचित्रकार, पेंढा भरणारा मार्गदर्शक, व्याख्याता, मुख्य कारकून, कारकून व २० शिपाई

**आर्थिक तरतूद** वार्षिक अर्थसंकल्प रु ५०,०००

**अभिप्राय** संग्रहालयास रोज भेट देणाऱ्यांची सरासरी संख्या १२ असून वार्षिक ४,००० इतकी आहे तथापि, गणपतिउत्सव, दुर्गापूजा, ईद, स्वातंत्र्यदिन व स्थानिक जत्रांच्या दिवशीं संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रेक्षकांची गर्दी जास्त असते नाणीं व इतर मौल्यवान चिजा एका खास बंदिस्त खोलींत कुलुपबंद कपाटांत सुरक्षित ठेवलेल्या आहेत राखीव संग्रह व संस्कृति संग्रहीत करण्यासाठीं परीच जागा आहे वस्तुसंग्रहाचे मार्ग खरेदी करणें, ठिकठिकाणाहून वस्तु गोळा करणें, उसनवार आणणें, देणगीरूपानें मिळविणें व गुप्तनिधींतील वस्तु संपादन करणें, हे होत

पुस्तीमधील वस्तु स्वीकारण्यासाठी या संग्रहालयास मान्यता मिळाली आहे. इतर संग्रहालयांत उपलब्ध असलेल्या योग्य त्या वस्तु मिळविण्यासाठी या संग्रहालयांतील समकृतींची देवाणघेवाण चालू असतें. प्रदर्शनविभागांतील नांवांच्या चिठ्ठ्या इंग्रजी, मराठी व हिंदी या तीन्ही भाषांत लिहिलेल्या असून त्या अर्थपूर्ण आहेत. प्रदर्शनवस्तूंची खास वैशिष्ट्यें, सचित्र नकाशे, तक्ते, नमुने, शोभीवकृति, चित्रें, रंगचित्रें, यांच्या साहाय्यानें दर्शविलीं आहेत. हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे. संग्रहालयास भेट देणाऱ्या सर्वसामान्य जनतेंत इतिहास, समाजशास्त्र आणि राज्याची आर्थिक स्थिति या विषयासंबंधी जिज्ञासा निर्माण करण्याच्या दृष्टीनें तसेंच सर्वसाधारण शिक्षण योजनेनुसार या संस्थेसाठी जागा मिळविण्याकरितां संग्रहालयाची आधुनिक धर्तीवर पुनर्रचना करण्यासंबंधीची एक सुधारणा योजना जुन्या मध्य-प्रदेश सरकारसमोर होती. ह्या योजनेंत संग्रहालयासाठी एक प्रशस्त इमारत बांधण्याची व भूगर्भशास्त्र, अर्थशास्त्र, मानवशास्त्र आणि शिक्षणशास्त्र या विभागांची वाढ करून त्यावर विद्याविभूषित असे सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष नेमण्याची तरतूद आहे. त्याचप्रमाणें वन, शेतकी, उद्योग व लोकस्वास्थ्यविभाग त्या त्या खात्याच्या सहकार्यानें संपादित करण्याची तरतूद देखील प्रस्तुत योजनेंत आहे.

**पुणें** : लोकसंख्या ४,८०, ९८२.

## भारतीय इतिहास संशोधक मंडळ संग्रहालय

**स्थापना** : १९१०.

**पूर्वेतिहास** : मंडळ स्थापन झालें त्या वेळेपासून म्हणजे सन १९१० पासून मंडळाचे सभासद ऐतिहासिक कागदपत्रें मिळविण्यासाठी फिरत आहेत व त्यांनी मिळविलेल्या ऐतिहासिक कागदपत्रांपैकीं कांहीं कागदपत्रें मंडळास देण्यांत आलेली आहेत. ही साधनसामग्री म्हणजेच ह्या संग्रहालयांतील संग्रह होय व ती उपलब्ध असलेल्या जागेंत मांडून ठेवलेली आहे. मंडळाजवळचें द्रव्यबळ अपुरें असल्यामुळें व राज्य सरकारास विनंति करूनही त्याकडून संग्रहालयाच्या व्यवस्थेसाठी कोणतेंही अनुदान न मिळाल्यामुळें मंडळास आपल्या कामांत सुधारणा व प्रगति करण्याच्या कामीं अडचणी निर्माण झाल्या. न्यू जर्सी (अमेरिका) येथील ख्रिस्तवासी डॉ. जस्टिन ई. ॲबॉट यांनी आपल्या मृत्युपत्रांत या संस्थेला ३०,००० डॉलरची रकम देणगीदाखल दिली ही गोष्ट येथें उल्लेखिण्यासारखी आहे.

अलीकडेच म्हणजे ऑगस्ट १९५५ मध्यें मुंबईच्या राज्यपालांनीं या संस्थेस भेट दिली. संस्थेनें मिळविलेली कागदपत्रें पाहून राज्यपालांना मोठें समाधान वाटलें व त्यांनीं अशी इच्छा प्रदर्शित केली कीं, हें संग्रहालय पश्चिम भारतातील मध्यवर्ति संग्रहालय म्हणून गणलें जाऊन तें विद्वानांच्या अखंड परंपरेमुळें विद्येचें केंद्र म्हणून प्रख्यात असलेल्या पुणें ह्या शहरीं राहावें. ह्या संग्रहालयासाठीं इमारत बांधण्याबाबत प्रयत्न झाले तर ह्या कामांत शक्य ती सर्व मदत देण्यास भारत सरकार व मुंबई सरकार उत्सुक आहेत. सध्यांच्या इमारतीजवळील जागा मुंबई सरकारमार्फत रु ७,००० एवढ्या किंमतीस मिळविण्यात आली आहे. संकल्पित इमारतीला सुमारें नऊ लाख रुपये खर्च येईल असा अंदाज आहे.

**व्याप्ति व संग्रह** : संग्रहालयानें आतांपर्यंत ऐतिहासिक घराण्यांपासून मराठी, संस्कृत, फारसी, हिंदी आणि कानडी भाषेंतील सुमारें १०,००,००० पेक्षां अधिक कागदपत्रें आणि संस्कृत, मराठी, फारसी व हिंदी भाषेंत ताडपत्र व कागद यांवर लिहिलेली १८,००० पेक्षां जास्त हस्तलिखितें मिळवून तीं जपून ठेवलेलीं आहेत. त्याचप्रमाणें सुमारें ५,००० नाणीं, ऐतिहासिक व सांस्कृतिक दृष्ट्या महत्त्वाचीं अशीं १,१००.पेक्षां जास्त रंगचित्रें, सुमारें ४० ताम्रपट व शिलालेख आणि शिल्पकृति, शस्त्रें, नकाशे, खेळण्याचे पत्ते, कपडे व पुरातनवस्तु यांसारख्या जवळ जवळ ७०० किरकोळ वस्तु व कऱ्हाड (उत्तर सातारा) येथें उत्खननांत मिळालेले, त्याचप्रमाणें नाशिक येथें गोळा केलेले ऐतिहासिक अवशेष मिळवून ते जपून ठेवलेले आहेत.

ह्या मिळविलेल्या दस्तऐवजांत मराठे राजे, पेशवे, मोंगल बादशहा, आदिलशाही, निजामशाही व कुतुबशाही सुलतान यांच्या राजमुद्रा असलेलीं त्यांचीं मूळचीं अस्सल पत्रें आहेत. हस्तलिखितांत अद्वितीय असें फारशी हस्तलिखित असून त्यांत दक्षिणेंतील १२ प्राचीन रंगचित्रें आहेत. नाण्यांच्या संग्रहांत दुर्मिळ अशीं नाणीं आहेत. अकबर, कबीर व मराठा राजे वगैरेंच्या प्रतिमांच्या कांहीं छोट्या व सुंदर अशा तसबिरी आहेत. शिल्पकृतींत धन्वंतरीची मूर्ति उल्लेखनीय आहे. महाराष्ट्रांतील बंदरें व प्रदेश यांचे नकाशे व हिंदी धनाढ्यीचें-एक मत्स्ययंत्र किंवा होकायंत्र सुद्धां त्यांत आहे. ह्या सर्व वस्तु दात्यांकडून देणगीदाखल मिळाल्या हें विशेष उल्लेखनीय आहे. रंगचित्रांमध्यें कांचेवरील पेशवाई रंगचित्रें, मनोवेधक राग व ताल रंगचित्रें व करव्यांत नाना फडणवीस यांचा दरबारी पोशाख आहे.

**शैक्षणिक कार्य** : संस्थेशीं संलग्न असें एक ग्रंथालय असून त्याचा वस्तुसंग्रहालयाला सुद्धा उपयोग होतो. या ग्रंथालयांत सुमारें १०,००० पुस्तकें आहेत. विद्यार्थी व शाळेतील शिक्षक यांना सर्व प्रदर्शनविभागांत फिरवून त्यांना तेथील वस्तूंच्या अभ्यासांत शक्यतों सर्व मदत व मार्गदर्शन केलें जातें. तसेंच संस्थेत बाहेरील पंडितांचीं व्याख्यानें ठेवण्याची देखील व्यवस्था केली जाते. संग्रहालयांतील वस्तूंची छायाचित्रें, शोभीवकृति व प्रतिकृति येथें विकल्या जातात. कधीं कधीं लहान प्रमाणावर प्रदर्शनें भरविलीं जातात. नांवांच्या चिठ्ठ्या मराठी व इंग्रजी भाषांतून आहेत, परंतु त्या पुरेशा अर्थवाही नाहींत.

**प्रकाशनें** : १. मंडळाच्या संग्रहालयाचा मार्गदर्शक—मराठी (हें पुस्तक हल्लीं उपलब्ध नाहीं.), २. संग्रहालयांत प्रदर्शित केलेल्या निरनिराळ्या वस्तूंच्या छायाचित्रांचा संग्रह, ३. मराठी इतिहासाचे शिल्पकार (दहा ऐतिहासिक प्रतिमांच्या प्रतिकृति), ४. भा. इ. सं. मंडळाच्या संग्रहांतील नाण्यांचें माहितीपुस्तक.

**तयार होत असलेलीं प्रकाशनें** : ५. भा. इ. सं. मंडळांतील जुन्या हिंदी रंगचित्रांचें माहितीपुस्तक, ६. भा. इ. सं. मंडळांतील नाण्यांचें माहितीपुस्तक व ७. भा. इ. सं. मंडळांतील नाण्यांच्या निवडक रंगचित्रांचा संग्रह.

**कामाचे तास** : संग्रहालय शुक्रवार व इतर सुट्टयांच्या दिवसांखेरीज रोज सकाळीं ८ ते १० व संध्याकाळीं ४ ते ८ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश** : विनामूल्य.

**नियामक मंडळ :** मंडळाची व्यवस्थापक समिति व सदस्यांची आम सभा यांच्याकडून संग्रहालयाची व्यवस्था पाहिली जाते. ऐतिहासिक संशोधन मंडळ सर्वसाधारणपणें हिंदुस्थानच्या व विशेषेंकरून मराठा इतिहासविषयीचें संशोधनकार्य करतें.

**सेवकवर्ग :** संग्रहालयासाठी खास असा सेवकवर्ग नाहीं. सोसायटीचे चिटणीस प्राध्यापक जी. एच्. खरे, हे संग्रहालयाध्यक्ष म्हणून देखील काम करतात व ते सोसायटीच्या इतर सेवकवर्गाच्या मदतीनें संग्रहालयावर देखरेख ठेवतात.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं निराळी अशी पैशाची तरतूद केलेली नाहीं.

**अभिप्राय :** पैशाच्या अभावीं सोसायटीला पहारेकरी सुद्धा नेमण्याची व्यवस्था करता येत नाहीं. सबब संस्था साधारणतः बंदच असते. विद्यार्थिवर्ग व इतर जिज्ञासु मंडळी संस्थेस भेट देतात त्या वेळेपुरतें संग्रहालय उघडण्यात येऊन त्यांना सर्व प्रदर्शनवस्तु दाखविण्यात येतात. सेवकवर्ग असा तिथें नेमलेलाच नाहीं. संस्थेची सध्यांची इमारत अगदींच अपुरी व गैरसोयीची आहे. तिच्याच्या सुरक्षिततेसाठीं काहींच व्यवस्था केलेली नसून शास्त्रीय संग्रह व वस्तूंच्या समरूपि ठेवण्यासाठींसुद्धा निराळी अशी जागा सदरहू इमारतींत नाहीं. संग्रहालयांत प्रयोगशाळा नाहीं. संग्रहित केलेल्या सर्व वस्तु संशोधन, उत्खनन व देणगी या मार्गांनीं गोळा करण्यात आलेल्या असून, त्यात विकत अशा घेतलेल्या वस्तु क्वचितच आढळतात. गुप्तनिधींतील वस्तु ठेवण्याबाबत या संग्रहालयास मान्यता दिलेली नाहीं.

## डेक्कन कॉलेजच्या पदव्युत्तर संशोधन संस्थेचें संग्रहालय

**स्थापना :** १९३५

**पूर्वेतिहास :** हें ऐतिहासिक संग्रहालय मुख्यत्वेंकरून मराठा इतिहासासाठीं असून रावबहादुर डा. बी. पारसनीस, यांनी सातारा येथें १९२५ सालीं त्याची स्थापना केली. तें मुंबई सरकारनें विकत घेतल्यानंतर सन १९३९ सालीं डेक्कन कॉलेजच्या पदव्युत्तर संशोधन संस्थेला जोडलें गेलें.

**व्याप्ति व संग्रह :** ह्या संग्रहालयाचे दोन भाग केलेले असून त्यापैकीं एक भाग अर्वाचीन इतिहासासाठीं (मराठा रियासतींचा) असून दुसरा भाग इतिहासपूर्वकालीन पुराणवस्तूंचा आहे. ऐतिहासिक संग्रहात मराठी रुमाल ठेवण्यात आले आहेत. त्यात हस्तलिखितांचीं (१७७२-१८००) सुमारें पानें आहेत. नाना फडणवीस यांचें दप्तर, ज्यानीं मराठ्यांचा इतिहास घडविला असे लष्करी अधिकारी व मुत्सद्दी यानीं लिहिलेल्या पत्रांच्या व बातमीपत्रांच्या अस्सल प्रति, तसेंच पेशवे व निरनिराळ्या राजांच्या दरबारीं असलेले त्यांचे वकील व बातमीदार यानीं लिहिलेलीं पत्रें व दस्तऐवज (सुमारें १०,०००), मराठी हस्तलिखितें (बखरी इ.), मराठींत लिहिलेल्या स्वहस्ताच्या सह्या व लेख (पेशवे व मुत्सद्दी यांचीं पत्रें), इंग्रजी भाषेंतील हस्तलिखितें (त्यांतील बहुतेक पत्रें मद्रासचे राज्यपाल लॉर्ड मॅकार्टनी १७८१-८५, यानीं लिहिलेलीं व त्यांना आलेलीं पत्रें आहेत), हिंदुस्थानातील ब्रिटिश रियासतीशीं संबंध आलेल्या प्रमुख व्यक्तींचीं दस्तुरखुद्द पत्रें, फारसी हस्तलिखितें, फारसी फरमानें, पत्रें इ. (त्यात औरंगजेब बादशहा व विजापुरचे राजे यानीं लिहिलेलीं पत्रें आहेत), संस्कृत वगैरे भाषेंत लिहिलेलीं किरकोळ पत्रें, काहीं निरनिराळ्या तऱ्हेच्या पुराणवस्तु, सुमारें १,४०० नाणीं (त्यांतील बहुतेक मोगलकालीन आहेत), जुने नकाशे व आराखडे (त्यात फ्रेंच भूगोलकार सॅम्सन डी ॲबेव्हिले यानीं १६५४ सालीं तयार केलेला हिंदुस्थानचा नकाशा आहे. ह्या नकाशांत पहिल्या मोगल बादशहाचें साम्राज्य दाखविलेलें असून सन १७३४ सालीं काढलेल्या शहराच्या आराखड्याचे २० तक्ते आहेत. लढाईच्या देखाव्यांचीं रंगचित्रें, हिंदी शहरें व स्मारकें यांचीं छायाचित्रें आणि इंग्रजी व मराठी भाषेंतील दुर्मिळ ग्रंथांच्या प्रती (त्यात अत्यंत जुना म्हणजे १५८८ सालचा ग्रंथ आहे) इत्यादि साहित्य प्रस्तुत संग्रहालयात आहे. तेथील ग्रंथालयात इतिहास, चरित्र, प्राचीन प्रवाश्यानीं लिहिलेले प्रवासवृत्तांत व पुराणवस्तुशास्त्रावरील सुमारें २,६०० ग्रंथ आहेत.

अलिकडेच म्हणजे १९५८ सालीं या संग्रहालयाला जमखिंडीच्या राणीसाहेबांकडून कलाकुसरीच्या वस्तु व शस्त्रास्त्रें यांचा चांगला साठा मिळाला आहे. त्यात तलवारी, खंजीर, भाले, ढाली, इत्यादि आयुधें, शिल्पकृति, चिनीमातीचीं भांडीं, चंदनी लाकडापासून व हस्तिदंतापासून बनविलेल्या कोरीव वस्तु, त्याचप्रमाणें दिवे, निरनिराळ्या धातूंच्या वस्तु आणि नाणीं यांचा समावेश होतो.

गुजरात, दक्षिण, कर्नाटक, आंध्र व मध्यप्रदेश यांमध्यें सन १९४१ पासून संस्थेनें उत्खनन करून मिळविलेल्या वस्तूंचें पुराणवस्तुसंग्रहालय बनविण्यात आलें आहे. त्यांत निरनिराळ्या अश्मयुगांत वापरलीं गेलेलीं हत्यारें, त्याचप्रमाणें या काळांतील सांगाडे व अश्मीभूत वस्तु यांचा समावेश होतो. आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, अमेरिका, युरोप व पॅलेस्टाइन येथून अदलाबदलीनें मिळविलेल्या तौलनिक महत्त्वाच्या वस्तुही ह्या अश्मयुगीन हत्यारांच्या दालनांत ठेविलेल्या आहेत. ताम्रयुग दालनात अश्मयुगापासून इ. सनाच्या १५ व्या शतकापर्यंतच्या महाराष्ट्रीय संस्कृतीचा विकास कसकसा होत गेला याची कल्पना देणारा एक विभाग आहे. महाराष्ट्र, गुजराथ, मध्यप्रदेश, मोहेंजोदारो, इराक, इराण व तुर्कस्थान येथील ताम्रयुगीन काळांतील सापडलेलीं मातीचीं भांडीं सुद्धा येथील कांचेच्या कपाटांमध्यें मांडलेलीं आहेत.

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय एका शैक्षणिक संस्थेमध्यें ठेवलेलें आहे. सुमारें ४०,००० पुस्तकें असलेलें संस्थेंतील उत्कृष्ट ग्रंथालय हें खास संशोधनकार्यासाठीं वाहिलेलें आहे. संग्रहालयास भेट देणाऱ्या इसमांना सर्व दृष्टीनें मदत केली जाते. संग्रहालयाध्यक्ष, ग्रंथालयाध्यक्ष व इतिहास विभागाचा शिक्षकवर्ग यांजकडून त्यांना शक्य ती सर्व मदत देण्यात येते. संस्थेला एक छायाचित्र विभागसुद्धा जोडलेला आहे व त्याचप्रमाणें एक लहानशी प्रयोगशाळा देखील चालविली जात आहे. संग्रहालयाचे अधिकारी व संग्रहालयाशीं संबंधित नसलेले बाहेरील व्यासंगी विद्वान व विशेषज्ञ यांच्या व्याख्यानांचे कार्यक्रम देखील ठेवण्यात येतात. स्लाइडच्या कांचांचा एक लहानसा संग्रह असून पुरवणी व्याख्यानें देण्यासाठीं त्यांचा शिक्षकवर्गाला उपयोग होतो. अधूनमधून काहीं खास व प्रासंगिक प्रदर्शनें नियमित भरविलीं जातात. पुणें विद्यापीठ, इतर विद्यापीठें, व इतर विद्याव्यासंगी संस्था देखील संग्रहालयाच्या बाबतींत विशेष स्वारस्य दाखवितात. जेव्हां जेव्हां नवीन वस्तु मिळतात तेव्हां शाळा, महाविद्यालयें व खासगी व्यक्ति यांना त्या वस्तु पाहण्यासाठीं खास आमंत्रण देण्यात येतें.

**प्रकाशनें :** ऐतिहासिक संग्रहालय (१) फारसी व अरबी भाषेंतील हस्तलिखितांची यादी, लेखक ए. एच. शेख, डेक्कन कॉलेजच्या पदव्युत्तर व संशोधन संस्थेची पत्रिका वर्ष ४ थें, अंक ३ रा, (२) नागपूरच्या हकिगती—भाग १, ले. टी. एस. शेजवलकर.

**कामाचे तास :** रविवार व इतर सुट्टयांच्या दिवसांखेरीज रोज सकाळी ११ ते सायंकाळी ५ पर्यंत व शनिवारी सकाळी ११ ते दुपारी २ पर्यंत संग्रहालय उघडे असते

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हे संग्रहालय डेक्कन कॉलेजच्या पदव्युत्तर व संशोधन संस्थेचा भाग असून सरकारनियुक्त अशा १२ सभासदांच्या मंडळाकडून त्याचा कारभार पाहिला जातो

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष, पुराणवस्तुसंग्रहालय–श्री येहू ए अन्सारी, एम् ए, ऐतिहासिक संग्रहालय–श्री पी एल सासवडकर, एम् ए व दोन शिपाई

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठी रु १,७५० ते रु २,००० पर्यंत वार्षिक खर्चाची तरतूद केलेली आहे यात प्रत्यक्ष कार्यार्थ फिरतासाठी येणाऱ्या खर्चाचाहि अंतर्भाव होतो ह्या तरतुदीत संग्रहालयाध्यक्ष व शिपाई यांच्या पगाराचा समावेश बहुतेक केलेला नसल्यामुळे त्यासाठी वार्षिक अंदाजपत्रकान्यतिरिक्त जादा रकमेची व्यवस्था केली पाहिजे ग्रंथालयावर दरवर्षी रु १०,००० इतकी रक्कम खर्च केली जाते त्यात नियतकालिकांवर होणाऱ्या ३,००० रु खर्चाचा अंतर्भाव केलेला आहे

**अभिप्राय :** संग्रहालयाची सध्याची इमारत सोयीस्कर व प्रदर्शनासाठी प्रशस्त अशी असली तरी संग्रहालयाच्या वाढीसाठी अधिक जागेची गरज आहे संग्रहालयात राखीव अशा वस्तु व समकृति ठेवण्यासाठी पुरेशी जागा आहे संस्थेमध्ये छायाचित्रांचा एक निराळा विभाग आहे संग्रहालयाला जोडलेले ग्रंथालय योग्य असेच आहे संग्रहालयासाठी खास पहारेकरी नसला तरी संस्थेच्या खास पहारेकऱ्यांकडून संग्रहालयावर रात्रंदिवस पहारा केला जातो नाण्यांच्या प्रदर्शनासाठी वदिस्त खोलीची जरूरी असून सध्या नाणी प्रदर्शनासाठी मांडण्यात येत नाहीत संग्रहालयातील वस्तु संशोधन, खरेदी, गुप्तनिधि, उत्खनन व देणगी या मार्गांनी मिळविलेल्या वस्तु आहेत. गुप्तनिधींतील वस्तु ठेवण्याची ह्या संग्रहालयाला मान्यता आहे नावांच्या चिठ्ठ्या सध्या फक्त इंग्रजी भाषेत लावण्याची व्यवस्था केलेली आहे रोज सरासरी ५० व दरवर्षी सुमारे २०,००० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात

**प्रभासपट्टण :** लो स ४३,०४४

**प्रभासपट्टण संग्रहालय**

**स्थापना :** १९५१

**पूर्वेतिहास :** प्रभासपट्टण संग्रहालय ता १७ मार्च १९५१ रोजी उघडण्यात आले आजूबाजूच्या भागात सापडलेल्या शिल्पकृति, शिलालेख वगैरेसारख्या पुरातन वस्तु त्या संग्रहालयात ठेवण्यात आल्या आहेत जुने सोमनाथ, शार-नो-टिंबो व नगरपुर-नो टिंबो यथील उत्खननात सापडलेल्या विविध मातीच्या भांड्यांचा चांगला साठा या संग्रहालयात ठेवलेला आहे प्रभासपट्टण हे पुरातन शहर काही शतकांपूर्वी वरील ठिकाणीच वसलेले होते असे मानले जाते वरील संग्रहात काही शिलालेख सुद्धा आहेत

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयात संस्कृत व फारशी भाषेत लिहिलेले शिलालेख व नाणी आणि शिल्पाकृति ठेविलेल्या आहेत

**शैक्षणिक कार्य :** हे संग्रहालय अलिकडेच उघडण्यात आले असून शाळेतील व महाविद्यालयीन विद्यार्थी नेहमी येथील वस्तु पहावयास येतात अलिकडेच संग्रहालयास जोडून एक लहान ग्रंथालय देखील उघडण्यात आले आहे

**प्रकाशनें :** अजून कोणतेंच साहित्य प्रकाशित करण्यात आलेले नाही

**कामाचे तास :** शनिवार दुपार, रविवार व सरकारी सुट्टीच्या दिवसांखेरीज रोज सकाळी ८ ते दुपारी १२ व सायंकाळी ३ ते ६ पर्यंत संग्रहालय सुरू असते

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालय मुंबई सरकारच्या नियंत्रणाखाली येते

**सेवकवर्ग :** पर्यवेक्षक, शिपाई व चौकीदार

**आर्थिक तरतूद :** वार्षिक खर्च रु ३,६२० इतका आहे

**अभिप्राय :** या संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या दैनिक ३०, वार्षिक १२,५०० असते संग्रहालयाची इमारत अनुरूप अशी असून तिच्यात संग्रह ठेवण्यास पुरेशी जागा आहे चौकीदार इमारतीवर पहारा देतो उत्खनन, देणगी व संशोधन या मार्गांनी संग्रहालयातील वस्तु मिळविल्या जातात नावांच्या चिठ्ठ्या इंग्रजी, गुजराथी व हिंदी या भाषांतून लावलेल्या आहेत

**राजकोट :** लो स १,३२,०६९

**वॉटसन संग्रहालय, राजकोट**

**स्थापना :** १८८८.

**पूर्वेतिहास :** हे संग्रहालय १८८८ साली स्थापन करण्यात आले व काठेवाडमधील निरनिराळ्या संस्थानांकडून त्याला पुरातन वस्तूंचा बराच मोठा साठा मिळाला संग्रहालयास कर्नल जॉन वॉटसन यांचे नाव देण्यात आले कर्नल वॉटसन पुरातन वस्तूंचे मोठे शौकीन होते काठेवाडच्या इतिहासाबद्दल त्यांना विशेष औत्सुक्य वाटे ते सन १८८६ पासून १८८९ पर्यंत काठेवाडचे पोलिटिकल एजंट होते सन १९४७ मध्ये सौराष्ट्र युनियनने पुराणवस्तु विभागाची स्थापना केली व त्या विभागाने त्या वस्तुसंग्रहालयाचा कारभार आपल्या हाती घेतला सध्या हे संग्रहालय मुंबईसरकारच्या नियंत्रणाखाली चालविण्यात येते

**व्याप्ति व संग्रह :** सुधारलेल्या व्यवस्थेनुसार संग्रहालयाचे भूगर्भशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र, कला, हस्तकला आणि सृष्टिविज्ञान असे विभाग केलेले असून त्याप्रमाणे वस्तूंची मांडणी केलेली आहे संग्रहालयात शेतकी, शरीररचना-शास्त्र, कला आणि उद्योग, वनस्पतिशास्त्र, भूगोल व परदेशांतून आणलेल्या निरनिराळ्या अजब वस्तु असे लहान लहान विभाग पाडण्यात आले आहेत

पुराणवस्तु विभागात ख्रिस्तपूर्व सन ३०० ते इ स १२०० पर्यंतच्या काळांतील मुख्यत्वे सौराष्ट्रामध्ये सापडलेल्या शिल्पकलेच्या नमुन्यांचे प्रदर्शन-विभाग आहेत घुमली येथील इ स १२ व्या शतकातील स्थापत्य अवशेष, गुप्तकालीन मातीची भांडी, मुख्यत्वे क्षत्रप कुशाणीय व मध्ययुगीन राजे यांच्याकडून मिळालेले इत्यादि, तसेच ठिकठिकाणच्या नाण्यांपासून आधुनिक नाण्यांपर्यंतच्या नाणकशास्त्रांचे दर्शन घडविणारी नाणी व हस्तलिखितें यांसाठी निराळे प्रदर्शनविभाग राखून ठेवले आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयात मुख्यत्वे विभागाच्या उपयोगाकरिता एक लहानसे ग्रंथालय आहे परंतु ग्रंथालयाचा बाहेरील अभ्यासु विद्वानांना

देखील उपयोग होतो. येथें पदव्युत्तर अभ्यासासाठी सोय केलेली असून व्याख्याने ठेवण्यात येतात. शाळेतील विद्यार्थ्यांना संग्रहालयांत ठेवलेल्या वस्तु दाखवून त्याविषयी त्यांना योग्य ती माहिती देण्यात येते. शाळा, विद्यालयें व अभ्यासु विद्वान मंडळी यांना या संग्रहालयाबद्दल फारच स्वारस्य वाटते.

**प्रकाशनें :** कांही नाहीं.

**कामाचे तास :** गुरुवारखेरीज रोज सकाळीं ८ ते १२ व दुपारीं ३ ते ६ पर्यंत संग्रहालय उघडें असतें.

**प्रवेश :** प्रवेशशुल्क तीन नये पैसे घेतलें जातें.

**नियामक मंडळ :** संचालक, पुराभिलेख व ऐतिहासिक स्मारकें, मुंबई राज्य, यांच्या नियंत्रणाखालीं हें संग्रहालय आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री. के. रामकुमार, एम्. ए., एल्‌एल्. बी., कारकून, चार शिपाई व एक पहारेकरी.

**आर्थिक तरतूद :** ह्या संग्रहालयाचा वार्षिक खर्च ८,६२० रु. आहे.

**अभिप्राय :** शहराच्या मध्यभागीं सोयीस्कर अशा जागेत हें संग्रहालय आहे. रोज सरासरी ७५ व दरवर्षी सरासरी १२,००० लोक भेट देतात. महाशिवरात्रिमाच्या महोत्सवाच्या दिवशीं भेट देणाऱ्या प्रेक्षकांची संख्या फारच मोठी असते. सध्याच्या संग्रहासाठीं सुद्धा विद्यमान इमारत अपुरीच असल्यामुळें ती वाढविली पाहिजे. राखीव संग्रहासाठीं आवश्यक असलेली जागा त्या इमारतींत नाही. नाणीं बंदिस्त पेट्यांतून ठेवलेलीं असतात व शिपायांपैकीं एकाला पहारेकऱ्याचें काम करावें लागतें. संशोधन, गुप्तनिधि, देणग्या व उत्खनन या मार्गांनीं वस्तूंचा संग्रह केला जातो. गुप्तनिधींतील वस्तु ठेवण्यास ह्या संग्रहालयाला मान्यता देण्यात आली आहे. इंग्रजी व गुजराती अशा दोन भाषांतून नावाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत. भारतीय वस्तुसंग्रहालय संघाचें हें संग्रहालय एक सदस्य आहे.

**साबरमती :** (अहमदाबाद) लोकसंख्या ७,८८,३३३

## गांधी स्मारक संग्रहालय

**स्थापना :** १९४९

**पूर्वेतिहास :** सन १९४९ सालीं गांधी स्मारक निधीनें महात्मा गांधी यांच्या पवित्र स्मृतीसाठीं भारतात निरनिराळ्या ठिकाणीं चार संग्रहालये उभारण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें नवी दिल्ली, सेवाग्राम, साबरमती व मदुराई येथें गांधी स्मारक संग्रहालयें सुरू करण्यात आलीं. इतर संग्रहालयांप्रमाणें साबरमती संग्रहालयाचें देखील एकच काम आहे. तें म्हणजे गांधींच्या संबंधींचीं कागदपत्रें व इतर अवशेष गोळा करून ते जतन करणें. यांत गांधींनी लिहिलेलीं व त्यांच्यावर इतरांनी लिहिलेले ग्रंथ, पत्रें, रंगचित्रें, छायाचित्रें इत्यादींचा अंतर्भाव होतो. महत्त्वाच्या अशा भारतीय व परकीय भाषांत लिहिलेलें गांधीजींवरील सर्व वाङ्मय, भारतांतील व परदेशांतील व्यक्तींस गांधींनी लिहिलेलीं पत्रें व त्या पत्रांच्या छायामुद्रित प्रती हें संग्रहालय गेलीं आठ वर्षे गोळा करीत आहे.

**व्याप्ति व संग्रह :** गांधीजींनीं स्वतः वापरलेल्या वस्तु, प्रतिमाचित्रें व गांधीजींसंबंधींचें वाङ्मय अशासारख्या वस्तु येथें गोळा केलेल्या आहेत. प्रदर्शनासाठीं मांडलेल्या वस्तूंत गांधीजींचा चरखा, गांधींनी स्वतः शिवलेला अंगरखा, ते वापरीत असलेलें (लिहावयाचें) मेज व अशाच तऱ्हेच्या त्यांच्या इतर वैयक्तिक वस्तूंचा अंतर्भाव होतो. ह्या संग्रहांत एकसारखी भर पडतच असून तो अधिकाधिक समृद्ध होत आहे. गांधीजींनी जेथें १२ वर्षे वास्तव्य केलें त्या 'हृदय कुंज' नांवाच्या इमारतीमध्यें एक लहानसा चित्रांचें प्रदर्शन विभाग तयार करण्यात आला आहे. प्रस्तुत विभागांत मोठमोठ्या छायाचित्रांच्या साहाय्यानें गांधीजींच्या जीवनाचें सुस्पष्ट दिग्दर्शन केलेलें आहे.

**शैक्षणिक कार्य :** गांधीजींचे जीवन व ध्येय यांविषयींचें सांगोपांग शिक्षण देशाला मिळावें हा या संग्रहालयाचा उद्देश आहे. या संग्रहालयांत एक संपूर्ण ग्रंथालय असून त्यांत गांधीजींनी लिहिलेलीं व त्यांच्यावर लिहिलेलीं पुस्तकें व गांधीवादी विचारसरणी, तत्त्वज्ञान व तंत्र विशद करणारें इतर वाङ्मय आहे. त्यांत निरनिराळ्या भारतीय व परदेशी भाषांत लिहिलेले ग्रंथ असून कै. महादेव देसाई यांचा पुस्तकसंग्रहसुद्धा येथेंच आहे. ग्रंथालयांत एकूण ५,५०० ग्रंथ व नियतकालिकें आहेत. ग्रंथालयाला जोडलेल्या वाचनालयांत गांधीजींनी सुरू केलेल्या साप्ताहिकांचे क्रमवार बांधून ठेवलेले गठ्ठे आहेत. गांधींनी लिहिलेलीं पत्रें, टिपणें व अर्ज यांच्या छायामुद्रित प्रती येथें पहावयास मिळतात.

**प्रकाशनें :** (१) गांधीजींचा दक्षिण आफ्रिकेंतील लढा, ६ भाग

**आल्बम :** (२) गांधीजींची तपोभूमि, आश्रमाच्या छायाचित्रांचा संग्रह

(३) मार्गदर्शिका—हिंदी भाषेंत.

**कामाचे तास :** रोज सकाळीं ८ ते सायंकाळीं ७ वाजेपर्यंत.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** गांधी स्मारक निधि.

**सेवकवर्ग :** संचालक श्री. चंदूलाल बी. दलाल, व्यवस्थापक, कारकून व दोन शिपाई.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाचा वार्षिक अर्थतरतूद २२,००० रु. चा आहे व खर्चाची व्यवस्था साबरमती आश्रम रक्षण व स्मारक विश्वस्तनिधीकडून केली जाते.

**अभिप्राय :** गांधीजींच्या जीवन व ध्येय यांविषयींचें अमोल वाङ्मय एकत्र करणारें संदर्भग्रंथालय प्रस्तुत संग्रहालयात असल्यामुळें तें खूपच लोकप्रिय झालेलें असून अनेक प्रेक्षक संग्रहालय पहाण्यासाठीं येत असतात. रोज सरासरी १०० लोक संग्रहालयास भेट देतात व गांधी पुण्यतिथीच्या व इतर सुदीच्या दिवशीं प्रेक्षकांची संख्या यांहीपेक्षा मोठी असते.

**सेवाग्राम :** लो. सं. ३९,८२०

## गांधी स्मारक संग्रहालय

**स्थापना :** १९४९

**पूर्वेतिहास :** सन १९४९ सालीं गांधी स्मारक निधीनें महात्मा गांधींच्या पवित्र स्मृतीसाठीं भारतात निरनिराळ्या ठिकाणीं चार संग्रहालयें उभारण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें नवी दिल्ली, सेवाग्राम, साबरमती व मदुराई येथें गांधी स्मारकसंग्रहालयें सुरू करण्यात आलीं. इतर संग्रहालयांप्रमाणें सेवाग्राम संग्रहालयाचा उद्देश देखील गांधीजींच्या संबंधींचीं कागदपत्रें व त्यांच्या जीवनाशीं निगडित असलेल्या इतर वस्तु गोळा करून त्यांचे जतन करणें हा आहे. यांत स्वतः गांधींनीं लिहिलेले व त्यांच्यावर इतरांनीं लिहिलेले ग्रंथ, पत्रें, रंगचित्रें, छायाचित्रें इत्यादींचा अंतर्भाव होतो. हें संग्रहालय महत्त्वाच्या भारतीय व परकीय भाषांत लिहिले गेलेलें गांधीजींवरील सर्व वाङ्मय,

भारतातील व परदेशातील व्यक्तींस गांधीजींनी लिहिलेली पत्रें व त्या पत्रांच्या छायामुद्रित प्रती गेलीं आठ वर्षे गोळा करीत आहे

**व्याप्ति व संग्रह :** गांधीजींनी स्वतः वापरलेल्या वस्तु, प्रतिमाचित्रें व गांधीजींसंबंधीचें वाङ्मय अशा प्रकारच्या वस्तु येथें गोळा केलेल्या आहेत. प्रदर्शनासाठीं मांडलेल्या वस्तूंत गांधीजींचा चरखा व त्यांच्या वैयक्तिक वस्तु यांचा अंतर्भाव होतो. संग्रहात एकसारखी भर पडत असून तो समृद्ध होत आहे

**शैक्षणिक कार्य :** गांधीजींचें जीवन व ध्येय यांविषयींचें साग्रोपांग शिक्षण देशाला मिळावें हा या संग्रहालयाचा उद्देश आहे. या संग्रहालयात एक संदर्भ-ग्रंथालय असून त्यात गांधीजींनी लिहिलेलीं पुस्तकें व गांधीवादी विचारसरणी, तत्त्वज्ञान व तंत्र विशद करणारें इतर वाङ्मय आहे. त्यात निरनिराळ्या भारतीय व परदेशी भाषांत लिहिलेले ग्रंथ आहेत. ग्रंथालयाला जोडलेल्या वाचनालयात गांधीजींनी सुरू केलेल्या साप्ताहिकांचे क्रमवार बांधून ठेवलेले गठ्ठे आहेत. गांधीजींनी लिहिलेलीं पत्रें, टिपणें व त्यांचे अर्ज यांच्या छायामुद्रित प्रती येथें बघायला मिळतात

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** रोज सकाळीं १० ते सायंकाळीं ५ पर्यंत संग्रहालय उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** गांधी स्मारक निधि

**सेवकवर्ग .** आश्रमाचे मुख्याधिकारी श्री. चिमणलाल शहा हेच संग्रहालयावर देखरेख करतात

**आर्थिक तरतूद :** गांधी स्मारक निधींतून त्या निधीच्या कार्याचा एक भाग म्हणून प्रस्तुत संग्रहालयाच्या खर्चाची तरतूद केली आहे

**अभिप्राय :** या संग्रहालयाची योजना जरी इतर संग्रहालयाबरोबर १९४९ साली आखली गेली आणि त्यासाठीं वस्तूंचा संग्रह करण्याचें काम सुरू करण्यात आलें तरी या संग्रहालयास अजून निराळें असें अस्तित्व नाहीं, आणि यामुळेंच संग्रहालयासाठीं निराळा संचालक व इतर सेवकवर्ग अजून नेमलेला नाहीं. आश्रमाधिकारीच सध्या ह्या संग्रहालयावर देखरेख करतात

**सुरत** लोकसंख्या २,२३,१८२

## सरदार वल्लभभाई पटेल संग्रहालय

**स्थापना :** १८९०

**पूर्वेतिहास .** हें संग्रहालय पूर्वी विंचेस्टर संग्रहालय म्हणून ओळखलें जात असे. त्या वेळेच्या सुरतेच्या जिल्हाधिकाऱ्यानें त्याची सन १८९० साली स्थापना केली. सध्या गांधीबाग म्हणून ओळखल्या जाणाऱ्या व्हिक्टोरिया बागेंत हें संग्रहालय सुरू करण्यात आलें होतें. निरनिराळे नमुने, नकाशे, कलाकुसरीच्या व हस्तकौशल्याच्या विविध वस्तु यांच्या साहाय्यानें वेगवेगळे विषय शिकविण्यात मदत होऊन मुलांच्या ज्ञानसंपादनाचा विकास व्हावा या हेतूनें हें संग्रहालय स्थापण्यांत आलें. तेव्हाचे साहाय्यक जिल्हाधिकारी विंचेस्टर यांनी सुरत शहरात खूपच सुधारणा घडवून आणली. त्यांचेंच नाव या संग्रहालयास देण्यात आलें. डिसेंबर १९५२ मध्यें सुरत शहरें नगरपालिकेनें आपली शताब्दि साजरी केली. त्यावेळीं जें प्रदर्शन भरविण्यात आलें त्यामुळे विंचेस्टर संग्रहालयाचा विकास करण्याच्या कामीं नवीन उत्साह निर्माण झाला. संग्रहालयासाठीं वस्तु जमविण्यात आल्या व त्यांत जुनीं रंगचित्रें, शिल्पकृति, वास्तुकलाकृति, भूगर्भशास्त्रविषयक नमुने, हस्तलिखितें, वाद्यें, शस्त्रें, पाखुऱ्याचा संग्रह इत्यादि वस्तूंची भर घालण्यात आली. सन १९५६ मध्ये १ लक्ष रुपये खर्चून संग्रहालयासाठीं एक प्रशस्त इमारत बांधण्यांत आली. गेल्या कांहीं वर्षांत येथील वस्तुसंग्रहात बरीच भर पडली आहे. आतां हें संग्रहालय म्हणजे या प्रदेशातील कला, हस्तकला, व संस्कृतीचें केंद्रच बनलेलें आहे

**व्याप्ति व संग्रह :** रजपूत, मोगल, कांगडा व गुजराथी शैलींचीं व राग-रागिण्यांचीं रंगचित्रें, कल्पसूत्राचीं रंगीत हस्तलिखितें, लाकूड व कांचेवरील रंगचित्रें, मातीच्या वस्तु, शिला शिल्पकृति, धातूच्या मूर्ति, खेळणी व बाहुल्या, जुनें लाकडी सामान, किनखाब, तंछोई, मशरू, एमरू, ग्यासचा, सिरोदन, गार्जी बाधणी, पाटोळा, मागल, घाटडी, छायल, ढाका मलमल इ. निरनिराळ्या प्रकारचीं वस्त्रें, जरीकाम केलेले छापील व रंगीत कापड, सौराष्ट्र, कच्छ, पंजाब व सिंध येथील भरतकामाचे प्रकार, भारतीय पौराणिक कथांतले प्रसंग चित्रित करणारे व हातछपाई केलेले, जुने रंगवलेले व विणलेले पिछवई, सुंदर कोरीव काम केलेला एका जुन्या घराचा भाग व लाकडावर कोरीव काम केलेल्या इतर वस्तु, धातूच्या व एनॅमलच्या कलाकृति, हस्तिदंत व चंदनावरील कोरीव काम इ०, जुनी पागोटीं, जामा, पिछोडी, शेला व उपवस्त्र, कमरखा, साडी, कब्जा, चोळी इ० यांसह गुजराथी पद्धतीचे पोषाख, कागदावरील व भूर्जपत्रावरील हस्तलिखितें, ताम्रपत्राकित दानपत्रें, ढाली, तलवारी, धनुष्य बाण इ० सारखीं आयुधें, वाद्यें, आणि पेंढा भरलेल्या पशुपक्ष्यांचा एक छोटासा प्राणिशास्त्रविषयक संग्रह

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयात विभागीय उपयोगासाठीं एक छोटेसें ग्रंथालय आहे. संग्रहालयाध्यक्ष, हे विनंति केल्यास संग्रहालयातील वस्तूंविषयीं माहिती देतात. वस्तूंच्या चिठ्ठ्या गुजराती, हिंदी, व इंग्रजी अशा तीन भाषांत लिहिलेल्या आहेत. शाळांतील हजारों मुलें या संग्रहालयास भेट देतात

**प्रकाशनें :** संग्रहालयातील वस्तूंची छायाचित्रें असलेली पुस्तिका, किंमत २५ नये पैसे

**कामाचे तास :** बुधवारी व सरकारनें जाहीर केलेले कांहीं सुटीचे दिवस सोडून इतर दिवशीं संग्रहालय सकाळीं ९ ते ११ पर्यंत व दुपारी ३ ते ६-३० पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** एका सल्लागार समितीकरवीं नगरपालिका संग्रहालयाचा कारभार पहाते

**सेवकवर्ग .** अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष—श्री आर सी पुरुकृष्णा, कारकून, शिपाई, माळी व रात्रपाळीचा पहारेकरी

**आर्थिक तरतूद .** अर्थसंकल्पातील वार्षिक तरतूद रु. २०,००० इतकी आहे

**अभिप्राय .** हें एक लोकप्रिय संग्रहालय आहे. तें चांगल्या ठिकाणीं असून जाण्यायेण्यास सोयीचें आहे. संग्रहालयाच्या सध्याच्या इमारतीतील जागा अपुरी आहे. अलंकार, जडजवाहीर, दुर्मिळ नाणीं यांसारख्या मौल्यवान चिजा चांगल्या बंदोबस्तात ठेवलेल्या आहेत. या संग्रहालयांत प्रयोगशाळेची सोय नाहीं. या संग्रहालयातील वस्तु संशोधन व दुरुस्तीच्या द्वारें, तसेंच कांहीं

वसनवार मिळविलेल्या आहेत हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे या संग्रहालयाचें पूर्वीचें नाव 'व्हिक्टोरिया संग्रहालय' असें होतें, तें नुकतेंच बदलून त्यास आतां, 'सरदार वल्लभभाई पटेल संग्रहालय, सुरत' असें नाव देण्यांत आलें आहे

**वल्लभ विद्यानगर :** लोकसंख्या, २५,७६७.

## कला व पुराणवस्तु संग्रहालय

**स्थापना** १९४९

**पूर्वेतिहास :** गुजरातमधील निरनिराळ्या विभागांत प्रत्यक्ष संशोधन केल्यानंतर मिळालेली सामग्री गोळा करून, वल्लभ विद्यानगर येथील पुराणवस्तुशास्त्र संस्थेच्या पुराणवस्तु संग्रहालयाची स्थापना करण्यांत आली मध्य गुजरातमधील वस्तु गोळा करण्याचें श्रेय श्री भाईलालभाई डी पटेल, श्री भिखाभाई के पटेल, श्री ए व्ही पंड्या व इतर यांनीं या बाबतींत दाखविलेली आस्था व उत्साह या गोष्टींस आहे डॉ एन ए गोरे, या पारशी विद्वान गृहस्थानें आपल्या ग्रंथालयाबरोबरच मौल्यवान अशा ब्राँझच्या व इतर पुरातन वस्तूंची देणगी या संग्रहालयाला दिलेली आहे

**व्याप्ति व संग्रह :** येथें शिल्पकृति, नाणीं, ब्राँझचे पुतळे, शिलालेखांचे ठसे, प्रागैतिहासिक पुरातन-वस्तु, लाकडावरील कोरीव कलाकृति यांचा संग्रह आहे

शिल्पकृतींपैकीं, सोजित्रा येथून मिळालेली एक शिरआकृति आहे ती क्रिस्ती शकाच्या सुरुवातीच्या काळांतील असावी आणि गुजरातमधून मिळालेल्या अशा प्रकारच्या पुरातन वस्तूंपैकीं ती सर्वांत जुनी असल्यामुळें तिला अत्यंत महत्त्व आहे गभीरा, घोरगढ, खेडा इत्यादि ठिकाणाहून मिळालेल्या मध्ययुगीन काळांतील इतर अनेक शिल्पकृतींचा येथें संग्रह आहे. सुमारें २,५०० ब्राँझ कलाकृतींचा सुधी याजकडील संग्रहहि महत्त्वाचा आहे त्याचप्रमाणें, येथील नाण्यांच्या संग्रहांत क्षिप्राकित, आदिवासीकालीन, सातवाहन व गुप्तकालीन इंडो ससानियन व नंतरच्या काळांतील गुजरातमधील मुसलमान राजांचीं नाणीं आहेत रामपुर, तारापुर येथील शिलालेखांचे ठसे, पहिल्या भीमदेवाची कच्छ महेश्वर ताम्रपत्रें, ईश्वर राजाची कलाछाला ताम्रपत्रें इ० धारसी ताम्रपत्रांकित दानपत्रें यांचा पुराभिलेख विद्या विभागांत समावेश होतो

गुजरातमधील नर्मदेच्या खोऱ्यांतील अश्मयुगीन वस्तु, माहिष्मती (महेश्वर), नागदा (मध्य भारत), चिखलदरा, प्रभासा, करंगी येथील सूक्ष्माश्म व चित्रांकित मातीच्या वस्तु आणि मंडलेश्वर ते ओंकारेश्वरच्या दरम्यान नर्मदानदीच्या किनाऱ्यावरील इतिहासपूर्वकालीन टेकाड्यांतून सापडलेल्या पुरातन वस्तु इ० या प्रागैतिहासिक विभागांत समावेश होतो त्याचप्रमाणें या संग्रहांत ओरसंग व करजन खोऱ्यांत सापडलेल्या कांहीं अश्मयुगीन वस्तु आणि होशंगाबाद येथें नर्मदाकांठच्या वालुकामय प्रदेशांत सापडलेला एक अश्मीभूत अवशेष हेंहि आहेत

या संग्रहालयांत पश्चिम भारताचीं स्थलवर्णनविषयक व इतर वैशिष्ट्य दाखविणारे मोठे नकाशे आणि प्राचीनकालापासून गुजरातमधील वास्तुकला, शिल्पकला, चित्रकला व प्राचीनलिपिविद्या या कलांच्या विकासाचें सम्यक् दर्शन घडविणारे वर्णनात्मक तक्ते आहेत त्याचप्रमाणें इतिहासपूर्वकालीन मातीच्या वस्तु व त्यांचीं कलात्मक वैशिष्ट्यें यांच्या तौलनिक अभ्यासासाठीं तक्ते देखील ठेवलेले आहेत.

**शैक्षणिक कार्य :** या संस्थेचें ग्रंथालय संग्रहालयांतच ठेवलेलें असून तेथें वाचनालयाचीहि सोय केलेली आहे. स्थानिक सरदार वल्लभभाई विद्यापीठास या संग्रहालयाबद्दल विशेष आस्था असून तें संग्रहालयाच्या कार्यांत सक्रिय भाग घेतें संग्रहालयांतील वस्तूंसंबंधीं शालेय विद्यार्थ्यांना माहिती देण्याकरितां व्यवस्था केलेली आहे संग्रहालयांत प्रदर्शित केलेले नकाशे, तक्ते, छायाचित्रें इ च्या संग्रहाचा अभ्यास करण्याकरितां असलेल्या संग्रहालयीन दालनांत पदव्युत्तर व विश्वविद्यालयीन विद्यार्थी भरपूर फायदा घेतात चित्रकलेचा इतिहास, भारतातील व परदेशांतील मातीकामाचे तुलनात्मक नमुने, जुनी भारतीय वर्णमाला व त्यासारखी इतर भारतीय संस्कृतीचीं अंगोपांगें विशद करणारे अनेक चित्रमय तक्ते येथें आहेत नांवाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व गुजराती या दोन भाषांतून लिहिलेल्या आहेत

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** रविवार व सरकारी सुटीचे दिवस सोडून इतर दिवशीं संग्रहालय सकाळीं ९ ते १२ पर्यंत व दुपारीं २-३० ते ५-३० पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** पुराणवस्तुशास्त्र संस्थेच्या अधिकाराखालीं हें संग्रहालय असून तें चारुतर विद्यामंडळ, वल्लभ विद्यानगर, या संस्थेचा एक विभाग आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयासाठीं खास असा सेवकवर्ग नाहीं पुराणवस्तुशास्त्र संस्थेचे संचालक हेच संग्रहालयाचे रक्षक म्हणून काम पहातात

**आर्थिक तरतूद :** अर्थसंकल्पातील वार्षिक तरतूद रु १०,००० इतकी आहे

**अभिप्राय :** शिक्षणप्रसाराची खरीखुरी गरज भागविण्याच्या दृष्टीनें संग्रहालय भरवस्तींत थाटलेलें असून तें पहावयास येणाऱ्या लोकांची दैनंदिन सरासरी संख्या ५०० असते संग्रहालयासाठीं स्वतःची इमारत नसल्यामुळें, संग्रहांत वाढ झाली की जागा बदलणें भाग पडतें सध्या हें संग्रहालय श्री जे बँक ऑफ बॉम्बे, वल्लभविद्यानगर, या संस्थेच्या एका सभागृहांत थाटलेलें आहे. वस्तुसंग्रहांत एकसारखी वाढ होत असून संग्रहालयास स्वतंत्र इमारत असण्याची अत्यंत आवश्यकता आहे संग्रहालयांतील पुरातनवस्तु रासायनिक संस्कार करण्यासाठीं स्थानिक विज्ञान व स्थापत्य महाविद्यालयांतील प्रयोगशाळांची मदत घेतली जाते वस्तुसंग्रहासाठीं जागा अपुरी पडते संशोधन व देणगीच्या द्वारें संग्रहालयांतील वस्तु संपादन केलेल्या आहेत संग्रहालय, भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे

**दिल्ली :** लोकसंख्या, ९,१४,७९०

## (१) पुराणवस्तु संग्रहालय, लाल किल्ला

**स्थापना :** १९०९

**पूर्वेतिहास :** सन १८६८ मध्यें एका नगरपालिका संग्रहालयाची दिल्लींत स्थापना झाली, परंतु विविध वस्तूंचा एक दुर्लक्षित संग्रह या पलीकडे त्याची प्रगति होऊं न शकल्यामुळें पुढें तें बंद करण्यात आलें सन १९०९ सालीं स्थापन करण्यांत आलेल्या विद्यमान संग्रहालयांत त्यांतील कांहीं महत्त्वाच्या वस्तु दाखल करण्यांत आल्या व हें संग्रहालय नौबतखाना, दिल्ली किल्ला येथें

ठेवण्यांत आलें सन १९११ मध्यें तें त्याच्या सध्यांच्या स्थानी म्हणजे मुमताज महाल येथें हलविण्यात आलें.

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय, सर्वस्वी मोंगलकालीन ऐतिहासिक वस्तुसंग्रहाप्रीत्यर्थ स्थापन केलेलें असून त्यात सुलतान व मोंगलकालीन शिल्पकृति व शिलालेख, शस्त्रास्त्रें, फर्मानें, सनदा व नकाशे यांसारखे जुने दस्तऐवज, १८५७ च्या उठावाचे अवशेष, गालिचे, हस्तलिखितें, हस्तलेखनकलेचे नमुने इ. सारख्या विविध वस्तु समाविष्ट आहेत. संग्रहालयाची जागा म्हणजे एक व्हरांडा व ८२'×३१' व ४३'×२१' एवढ्या आकाराचे दोन दिवाणखाने आहेत. बाहेरच्या दिवाणखान्यात लाकडी सामान व इतर सङ्कीर्ण वस्तु, जुनी शस्त्रें, मुद्रा, मुद्रा–पाषाण व राजमुद्रा, खोदीव वस्तुकृति, रेखाचित्रें, छायाचित्रें, नकाशे, १८५७ च्या उठावाचे अवशेष, गालिचे, हस्तलिखितें, छापलेली पुस्तकें, मोंगलकालीन पेहेराव, इ. विविध वस्तु ठेवलेल्या आहेत. आंतील दिवाणखान्यात मोंगलकालीन चित्रें, हस्तलेखन कलेचे नमुने, ऐतिहासिक महत्त्वाची फर्मानें, सनदा व इतर दस्तऐवज व नकाशे आहेत. व्हरांड्यात, कोरीव काम व खोदकाम केलेल्या वस्तु प्रदर्शित केलेल्या आहेत. १८५७ च्या समरप्रसंगासंबधीं राष्ट्रीय संग्रहालयात भरलेल्या प्रदर्शनानंतर अलिकडेच बादशहा बहादुरशहा व बेगम झीनत महाल यांच्या पूर्णाकृति प्रतिमा, त्यांच्या स्वत च्या वस्त्रप्रावरणांनी व अलंकारांनी सजविलेल्या स्वरूपात, या संग्रहालयात प्रदर्शित करण्यासाठी मिळालेल्या आहेत.

**शैक्षणिक कार्य :** या संग्रहालयात, विभागीय उपयोगासाठीं म्हणून ७४८ पुस्तकें व नियतकालिकें यांचा एक छोटासा संग्रह आहे व त्याचा जिज्ञासूंनाहि संदर्भासाठीं उपयोग करता येतो. शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थी तसेंच जिज्ञासू प्रेक्षक यांना, संग्रहालयाध्यक्ष हे स्वत बरोबर हिंडून प्रदर्शनवस्तूंची माहिती देतात. तसेंच निवडक विषयावर ते व्याख्यानेंहि देतात. संग्रहालयातील बहुतेक वस्तूंवर हिंदी, उर्दू व इंग्रजी या भाषांत लिहिलेल्या नावाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत. संग्रहालयात, तक्ते, नकाशे इत्यादींत हळूहळू वाढ करण्यात येत आहे. विद्यापीठ व इतर संस्था या संग्रहालयाबद्दल बरीच आस्था दाखवितात.

**प्रकाशनें :** (१) संग्रहालयाचें माहितीपुस्तक, १९२६, (२) धी कॉइनेज अँड मेट्रॉलॉजी ऑफ धी सुलतान्स् ऑफ देहली–लेखक एच्. नेल्सन राईट आणि (३) संग्रहालयाचे वार्षिक अहवाल, भारताच्या पुराणवस्तुशास्त्र विभागाचे महासंचालक यांच्या वार्षिक अहवालांत अंतर्भूत आहेत.

**कामाचे तास :** संग्रहालय सर्वच वर्षभर खुलें असतें. उन्हाळ्यात सकाळीं ८ ते ११ व दुपारीं ४ ते सध्याकाळीं ७ पर्यंत. हिंवाळ्यात–सकाळीं १० ते दुपारीं १ पर्यंत व दुपारीं ३ ते ६ पर्यंत.

**प्रवेश :** संग्रहालयप्रवेशासाठीं कोणतीहि खास फी ठेवलेली नाहीं. परंतु लाल किल्यांतील पुराणवस्तु विभाग पहाण्यासाठीं प्रौढांना १२ नये पैसे व मुलें व विद्यार्थी यासाठीं ६ नये पैसे इतकें प्रवेश मूल्य ठेवलेलें आहे.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाची व्यवस्था संग्रहालयाध्यक्ष पाहतात. सर्वसाधारण प्रशासनविषयक नियंत्रण, अधीक्षक संग्रहालय शाखा, पुराणवस्तुशास्त्र विभाग, भारत सरकार यांचें आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष श्री नरींदर नाथ, एम्. ए., एक कारकून, पाच परिचारक, दोन रात्रपाळीचे पहारेकरी व एक झाडूवाला.

**आर्थिक तरतूद :** रु. २४,०००.

**अभिप्राय :** हें संग्रहालय लाल किल्यासारख्या योग्य ठिकाणीं असून जाण्यायेण्यास सोयीचें आहे. संग्रहालय पाहावयास येणाऱ्या प्रेक्षकांची दैनिक संख्या सुमारें १,२०० असून वार्षिक ४,५०,००० इतकी असते. १५ ऑगस्ट, वसंत पंचमी, नाताळ, इ. सुट्टयाच्या दिवशीं या संख्येंत अर्थातच भर पडते. संग्रहालयाची रात्रंदिन राखण करण्यासाठीं चार चौकीदार नेमलेले आहेत. नाण्यांच्या खोलीमध्यें भक्कम पोलादी तिजोऱ्यांत नाणीं व इतर मौल्यवान् चिजा ठेवलेल्या असतात. राखीव वस्तुसंग्रहासाठीं भरपूर जागा आहे. खुद्द संग्रहालयात प्रयोगशाळेची सोय नाहीं परंतु संग्रहालय शाखेच साहाय्यक पुराणवस्तु रसायनज्ञ हे पुरातन वस्तूंवर आवश्यक ते संस्कार करतात. इतर संग्रहालयांकडून उसनवारीने वस्तु स्वीकारल्या जातात व त्यांना पाठविल्याहि जातात. वस्तुसंग्रहाचा मुख्य मार्ग खरेदी हा आहे.

## (२) भारतीय युद्ध स्मारक संग्रहालय

**स्थापना :** १९१९

**पूर्वेतिहास :** संग्रहालयाची स्थापना सन १९१९ मध्यें झाली व दिल्लीच्या लाल किल्यांतील पुराणवस्तुविभागातील नौबतखान्याच्या वरच्या मजल्यावर तें थाटलेलें आहे.

**व्याप्ति व संग्रह :** युद्धातील विजयचिन्हें प्रदर्शित करणें हा या संग्रहालयाचा उद्देश आहे. सन १९१४ ते १९१८ च्या पहिल्या जागतिक युद्धांत वापरलीं गेलेली शस्त्रास्त्रें, दारुगोळा, तेव्हाचीं छायाचित्रें, इ. या येथें संग्रह आहे.

ही विजयचिन्हें विशेषेंकरून मेसोपोटेमिया, पूर्व आफ्रिका आणि वायव्य सरहद्द प्रदेश येथील निरनिराळ्या आघाडीवर झालेल्या युद्धांत मिळालेलीं आहेत. तसेंच त्यात युद्धविषयक चित्रें, छायाचित्रें, प्रकाशनें, शिक्के, नाणीं व चलनी नोटा, दारुगोळा, पलटणींचे बिल्ले, इ. वस्तु देखील आहेत.

**शैक्षणिक कार्य :** पहाण्यासाठीं ठेवलेल्या प्रत्येक जयचिन्हाला नावाच्या चिठ्ठ्या लावलेल्या असून कित्येकदा संग्रहालय पाहावयास येणारांना संग्रहालयाध्यक्ष ते स्वत फिरून दाखवितात व माहिती सांगतात. अनेक शैक्षणिक संस्थांचे सदस्य हे संग्रहालय पाहण्यासाठीं भारतातून व परदेशातून येथें येतात.

**प्रकाशनें :** काहीं नाहींत.

**कामाचे तास :** रोज खुलें असतें. उन्हाळ्यात सकाळीं ८ ते ११ पर्यंत व दुपारीं ४ ते सध्याकाळीं ७ पर्यंत. हिंवाळ्यात सकाळीं १० ते दुपारीं १ पर्यंत व दुपारीं ३ ते सध्याकाळीं ६ पर्यंत.

**प्रवेश :** भारतीय युद्ध स्मारक संग्रहालय हें दिल्ली येथील लाल किल्याच्या पुराणवस्तुविषयक आवारात आहे व या आवारांत प्रवेश मिळण्यासाठीं दरेक प्रौढ इसमाकडून १२ नये पैसे व लहान मुलांकडून ६ नये पैसे फी घेण्यात येते. मात्र पाहाण्यासाठीं निराळी फी आकारण्यांत येत नाहीं.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय दिल्ली येथील चीफ कमिशनरच्या नियंत्रणाखालीं असून चीफ कमिशनर हा या संग्रहालयाचा अध्यक्ष असतो आणि वैज्ञानिक संशोधन व सांस्कृतिक कार्य मंत्रालय अंदाजपत्रकात मंजूर केलेल्या रकमा यांच्या मार्फत देतें.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष-श्री. अमघर अलीखान, एक कारकून, एक शिपाई, एक परिचारक, एक झाडूवाला व रात्रीच्या पहाऱ्यासाठी एक चौकीदार.

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकांत रु. १४,००० इतक्या रकमेची वार्षिक तरतूद केलेली असून ही रक्कम वैज्ञानिक संशोधन व सांस्कृतिक कार्य मंत्रालयाकडून दिल्ली येथील चीफ कमिशनरमार्फत देण्यांत येते.

**अभिप्राय :** हें संग्रहालय सोईस्कर ठिकाणी असून तें पाहण्यासाठी येणाऱ्या प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या २,००० व वार्षिक सरासरी संख्या सुमारें ७,३०,००० इतकी असते. प्रजासत्ताक दिन, मेणास्नान, वैशाखी व दसरा यांसारख्या विशेष प्रसंगी प्रेक्षकांची संख्या फार मोठी असते. संग्रहालयाची इमारत येथील वस्तूंसाठी सुयोग्य व प्रशस्त अशी आहे. संग्रहालयातील वस्तु संरक्षण मंत्रालयाकडून देणगीदाखल मिळालेल्या आहेत.

**नवी दिल्ली :** लोकसंख्या २,७६,३१४

**( १ ) गांधी स्मारक संग्रहालय :** ( गांधी मेमोरियल म्युझियम).

**स्थापना :** सन १९४९

**पूर्वेतिहास :** महात्मा गांधींची पवित्र स्मृति कायम राहावी म्हणून भारतात निरनिराळ्या ठिकाणी चार संग्रहालयें स्थापन करावीं असें गांधी स्मारक निधीनें सन १९४९ मध्यें ठरविलें व त्याप्रमाणें नवी दिल्ली, सेवाग्राम, साबरमती व मदुराई येथें गांधी स्मारक संग्रहालय सुरू करण्यांत आलें. नवी दिल्ली येथील संग्रहालय हें चार संग्रहालयांचें मध्यवर्ति आहे. गांधीजीं-संबंधींचें सर्व कागदपत्र व त्यांच्या नित्य वापरातील वस्तु—यांत गांधीजींनी लिहिलेली व त्यांच्यावर लिहिली गेलेली पुस्तकें, पत्रें तसेंच रंगचित्रें, छायाचित्रें इ. वस्तूंचा समावेश होतो—गोळा करणें व त्या जतन करणें हा या संग्रहालयाचा मुख्य उद्देश आहे. हें संग्रहालय प्रथम मुंबई येथें सन १९४९ मध्यें सुरू करण्यांत आलें व नंतर १९५१ मध्यें तें नवी दिल्ली येथील नं. ५, मानसिंग रोड येथें हलविण्यांत आलें. राजघाट येथें तयार होत असलेल्या स्वतंत्र्या इमारतींत आतां हें संग्रहालय हलविण्यात यावयाचें आहे.

गेलीं आठ वर्षे हें संग्रहालय भारतांतील व परदेशांतील सर्व प्रमुख भाषांतील गांधीविषयक वाङ्मय तसेंच गांधीजींनी भारतांतील व त्याचप्रमाणें परदेशांतील हजारों व्यक्तींना लिहिलेली पत्रें गोळा करीत असून त्यांच्या फोटोस्टाट प्रती तयार करण्यांत आल्या आहेत. त्याचप्रमाणें गांधीजींची अनेक छायाचित्रें, रंगचित्रें आणि अक्षरांचे पुतळे एकत्र करण्यांत आले आहेत. गांधीजींनी प्रार्थनेच्या वेळीं केलेल्या भाषणांच्या ध्वनिमुद्रिकाहि भारत सरकारकडून मिळविण्यात आल्या आहेत. हें साहित्य मांडून ठेवण्याची व्यवस्था संग्रहालयानें केली आहे.

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहांत गांधीजींची आठवण करून देणाऱ्या त्यांच्या स्वतःच्या वस्तु, गांधीजींची चित्रें व महात्मा गांधींसंबंधीं लिहिलेलें वाङ्मय आहे. संग्रहांत एकंदर ७० पेक्षां अधिक वस्तु असून त्यांत गांधीजींचें घड्याळ, चष्मा, चपला, ते वापरत असलेली मोडी, त्यांना प्राणघातक ठरलेल्या तीन गोळ्यांपैकीं एक गोळी, त्यांच्या मृत्यूच्या वेळचे त्यांच्या अंगावरील रक्तानें माखलेले कपडे या वस्तु आहेत. गांधीजींच्या जीवनांतील निरनिराळे टप्पे व त्यांचें कार्य यांचें दर्शन घडवून देणारी जवळजवळ ७०० निवडक छायाचित्रें आहेत. या संग्रहांतील गांधीजींच्या ३२ तैलचित्रांमध्यें मि. डब्ल्यू. लँगमर यांनी काढलेलें पूर्णाकृति तैलचित्रहि आहे. आणखी नवीन वस्तूंची भर घालण्याची व्यवस्था करून संग्रहालयाकडून संग्रह सुसंपन्न करण्यात येत आहे.

**शैक्षणिक कार्य :** गांधीजींचें जीवन व ध्येयें यांविषयीं देशांतील लोकांना सांगोपांग परिपूर्ण माहिती करून देण्यासाठी हें संग्रहालय स्थापन करण्यांत आलें आहे. हें संग्रहालय केवळ संग्रहालयांतच गांधीजींच्या वस्तु प्रदर्शित करण्याची व्यवस्था करीत नसून भारतीय राष्ट्रीय काँग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाच्या प्रसंगीं भरविण्यांत येणाऱ्या प्रदर्शनांत बापू-मंडप उभारण्याचीहि व्यवस्था करतें. संग्रहालयांत संदर्भ ग्रंथालय असून त्यांत गांधीजींनी व गांधीजींवर लिहिलेली पुस्तकें आणि गांधीवादी विचार, मतप्रणाली व तंत्र यांचें संशोधन करण्यासाठी उपयुक्त असें इतर तद्विषयक वाङ्मय आहे. ह्या संग्रहालयांत भारतीय व इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, रशियन, डच, इटॅलियन, स्वीडिश, जपानी, चिनी, थाई, ग्रीक, इंडोनेशियन, पोर्तुगीज, स्पॅनिश वगैरे परकी भाषांतील ९,००० पुस्तकें व ८० नियतकालिकें आहेत. ग्रंथालयाला संलग्न असलेल्या वाचनालयांत गांधीजींनी सुरू केलेल्या साप्ताहिकांच्या फाईली असून सुमारें ४० मासिकें, साप्ताहिकें व दैनिकें संदर्भासाठी उपलब्ध आहेत. गांधीजींच्या पत्रांच्या, टिपणांच्या व अर्जांच्या ५,००० हून अधिक फोटोस्टाट प्रती पाहण्यासाठी उपलब्ध आहेत. संदर्भासाठी वर्दिस पुरविण्याच्या कार्यांतीलच माहिती देण्याचें कार्यहि लवकरच सुरू करण्यांत यावयाचें आहे. गांधीजींच्या जीवनावरील चित्रपट आठवड्यांतून दोनदां दाखविण्याची व्यवस्था करण्यांत येते.

**प्रकाशनें :** कांही नाहीं.

**कामाचे तास :** संग्रहालय सकाळीं १० ते सायंकाळीं ५ वाजेपर्यंत सर्व दिवशीं उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** गांधी स्मारक निधि.

**सेवकवर्ग :** आतापर्यंत काकासाहेब कालेलकर हे संग्रहालयाचे संचालक होते. संग्रहालयांतील सेवकवर्गांत साहाय्यक संग्रहालयाध्यक्ष, साहाय्यक ग्रंथपाल व इतर दहा इसम आहेत.

**आर्थिक तरतूद :** गांधी स्मारक निधि आपल्या कार्याचा भाग म्हणून या संग्रहालयाला आर्थिक मदत देते. आर्थिक तरतूद रु. ६०,००० इतकी आहे.

**अभिप्राय :** हें संग्रहालय व गांधीजींच्या जीवनासंबंधीं व ध्येयासंबंधींचें बहुमोल वाङ्मय असलेलें ग्रंथालय फारच लोकप्रिय असून तें पाहण्यासाठीं रोज सुमारें १०० लोक येतात. संग्रहालयाची इमारत बांधण्यांत येत असून ती तयार झाल्यानंतर हें संग्रहालय निश्चितपणें महत्त्वाचें सांस्कृतिक केंद्र बनेल. चित्रपटासाठीं एक प्रेक्षागृह असून त्यामुळें व ग्रंथालयामुळें संग्रहालयातील प्रदर्शनविभागाच्या उपयुक्ततेंत भर पडली आहे.

**(२) राष्ट्रीय नवकला प्रदर्शनालय** ( नॅशनल गॅलरी ऑफ मॉडर्न आर्ट)

**स्थापना :** सन १९५३.

**पूर्वेतिहास :** चित्रकला व शिल्पकला या दोन्ही कलेच्या अप्रतिम कलाकृति लोकांना सादर करण्याकरितां देशाच्या राजधानींत एक प्रदर्शनालय

स्थापन करण्याची आवश्यकता बरेच दिवस भासत होती ही उणीव दूर करण्या साठीं सन १९५४ मध्यें राष्ट्रीय नवकला प्रदर्शनालय स्थापन करण्यांत आलें

हें प्रदर्शनालय २९ मार्च १९५४ मध्यें "जयपूर हाउस" या प्रशस्त इमारतींत उघडण्यांत आलें यातील प्रदर्शनवस्तूंमध्यें उच्च कारागिरीच व मौल्यवान् कलाकृतींचे अनेक नमुने आहेत

**व्याप्ति व संग्रह :** या प्रदर्शनालयाच्या व्याप्तिनुसार येथील प्रदर्शन वस्तूमुळें सन १८५७ पासूनच्या चित्रकलेचें व शिल्पकलेचें दर्शन घडतें या संग्रहात १७७४ कलाकृति असून त्यात दक्षिण भारत, गुजरात व नेपाळ येथील धातुमूर्ति, हातानं छापलेलीं व भरतकाम केलेलीं वस्त्रें, रजपूत व कांग्रा शैलीचीं रंगचित्रें, अवनींद्रनाथ टागोर, नंदलाल बोस, गगनेंद्रनाथ टागोर, अब्दुर रहमान चुगताई, क्षितींद्रनाथ मजुमदार यांनीं व इतरांनीं काढलेलीं बंगाली शैलीचीं चित्रें, अमृत शेरगिल यांचीं जवळ जवळ सर्व चित्रें, रवींद्रनाथ टागोर व इतर कित्येक कलाकारांच्या महत्त्वाच्या कलाकृति आहेत समकालीन चित्रांखेरीज सर्व भारतातून आलेल्या आधुनिक शिल्पकृतीहि त्यात आहेत तसेंच वुडकट्स्, लिनो-कट्स्, एचींग, ॲक्वा टिंट्स्, यांसारखे ग्राफिक आर्टचेहि त्यात नमुने आहेत

**शैक्षणिक कार्य :** मार्गदर्शन करण्यासाठीं नेमलेला इसम प्रेक्षकांना प्रदर्शनवस्तूंविषयीं माहिती देतो आणि प्रेक्षकांना ऑफिसच्या कामा नंतर संग्रहालय बघता यावें म्हणून तें रात्रीपर्यंत उघडें ठेवण्यात येतें वस्तूंवर लावलेल्या चिठ्या इंग्रजींत व हिंदींत आहेत समकालीन कलेशीं लोकांचा परिचय व्हावा आणि हल्लीं देशातील कलेमध्यें विविध अवस्थांत कसकसा बदल होत जात आहे, याबद्दल लोकांना माहिती व्हावी हा प्रस्तुत प्रदर्शनालयाचा उद्देश आहे हा हेतु असल्यामुळें शिक्षणसंस्थांतील विद्यार्थी प्रदर्शनालयास भेट देतात तेव्हां त्यांना अभ्यासासाठीं सर्व सोयी उपलब्ध करून देण्यात येतात, तसेंच चित्रपट दाखविण्याची व व्याख्यानें देण्याची व्यवस्था मधूनमधून करण्यात येते

**प्रकाशनें :** सचित्र पोस्टकार्डें, मार्गदर्शिका व माहितीपुस्तकें तयार करण्याचें योजिलें आहे

**कामाचे तास :** संग्रहालय सोमवार व कांहीं महत्त्वाचे सरकारी सुट्टीचे दिवस खेरीज करून सर्व दिवशीं सकाळीं १० ते दुपारीं १ व दुपारीं २ ते सायंकाळीं ८ वाजेपर्यंत उघडें असते

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय वैज्ञानिक संशोधन व सांस्कृतिक कार्ये मंत्रालयाच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग** संग्रहालयाध्यक्ष—श्री पी के दासगुप्ता, बी ए, एफ् आर् एस्, सी (लंडन), ग्रंथपाल—के डी बॅनर्जी, बी. एम्. सी, डिप् लिब्, अधीक्षक, तंत्रसाहाय्यक, छायाचित्रकार, आठ कारकून, हिशेबनीस, लघुलेखक, सुतार, स्टोअरकीपर, तीन जमादार, तीन शिपाई, ११ प्रदर्शनविभाग परिचारक, सात चौकीदार व चार झाडूवाले

**आर्थिक तरतूद** अंदाजपत्रकांतील वार्षिक तरतूद रु १,८५,००० इतकी आहे

**अभिप्राय :** हें प्रदर्शनालय इंडिया गेटजवळ असून तेथें जाण्यायेण्याची चांगली सोय आहे प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या १०० पेक्षां अधिक आहे दिल्लीच्या विषम उष्णतामानापासून चित्रांचें संरक्षण व्हावें म्हणून प्रदर्शनविभाग एअर कंडिशण्ड करण्यांत आले आहेत भारताच्या राष्ट्रीय संग्रहालयात रसायनज्ञ म्हणून काम करणारे श्री टी आर गायरोला हे या प्रदर्शनविभागातही काम करतात

## ( ३ ) भारताचें राष्ट्रीय संग्रहालय

**स्थापना :** सन १९४९

**पूर्वेतिहास .** अशा प्रकारचें संग्रहालय स्थापन करण्याच्या प्रश्नावर भारत सरकार सन १९१२ पासून विचार करीत होतें कला, पुराणवस्तुशास्त्र व मानवशास्त्र यांच राष्ट्रीय संग्रहालय स्थापन करण्याची योजना पुराणवस्तु शास्त्राच्या केंद्रीय सल्लागार मंडळान जानेवारी १९४५ मध्यें विचारात घेतली आणि या मंडळानें अशी शिफारस केली कीं, भारतामधील व भारताविषयीं सांस्कृतिक अभ्यासाचा समन्वय व विकास साधण्याच्या कामीं एक अत्यावश्यक बाब म्हणून, विलंब न लावता, एक संग्रहालय स्थापन करण्यात यावें सदर योजना भारत सरकारन तत्त्वत मान्य केली आणि तपशील तयार करण्याकरितां सर मॉरिस ग्वायर यांच्या अध्यक्षतेखालीं एक समिति स्थापन करण्यात आली सदर समितीनें सादर केलेल्या अहवालावर विकासमंडळानें ऑगस्ट १९४६ मध्यें विचार केला आणि ती योजना प्रथम पंचवार्षिक विकास योजनेत समाविष्ट करण्यास मंजुरी दिली

परंतु आर्थिक टंचाईमुळें योजनेंत दोन वेळां सुधारणा करण्यात आली आणि सुधारलेल्या योजनेनुसार कला, पुराणवस्तुशास्त्र व मानवशास्त्र यासंबंधींचें राष्ट्रीय संग्रहालय स्थापन करण्याचें ठरविण्यात आलें त्यात संचालक कार्यालय व पुढील पाच विभाग समाविष्ट करण्यांत आले ( १ ) ऐतिहासिक पुराणवस्तु विभाग, ( २ ) कलाविभाग, ( ३ ) प्रागैतिहासिक पुराणवस्तुशास्त्रविभाग, ( ४ ) नाणकशास्त्र व पुरालेखविद्याविभाग, आणि ( ५ ) मानवशास्त्र ( सांस्कृतिक व शारीरिक ) विभाग ही योजना सन१९५० ५१ या वित्तीय वर्षी सुरू करून आठ अवस्थांत पूर्ण करावयाची होती

राष्ट्रीय संग्रहालयासाठीं देशाच्या निरनिराळ्या भागांतून देणगीच्या रूपानें, उसनवार तत्त्वावर किंवा खरेदीद्वारें सुमारें ५० लाख रुपये किंमतीच्या पुरातन वस्तु व मौल्यवान कलाकृति संग्रहित करण्यांत आलेल्या असून त्यामुळें संग्रहालयाचा महत्त्वाचा मूलभूत भाग तयार झाला आहे या वस्तु नवी दिल्ली येथील राष्ट्रपति भवनाच्या दरबार दिवाणखान्यात व त्यालगतच्या जाण्यायेण्याच्या मार्गांत व खोल्यांत प्रदर्शित करण्यात आल्या आहेत कला, पुराणवस्तुशास्त्र व मानवशास्त्र यासंबंधींच्या राष्ट्रीय संग्रहालयासाठीं योग्य इमारतीची गरज फार पूर्वीपासून भासत होती आणि तारीख १२ मे १९५५ रोजीं भारताचे पंतप्रधान श्री जवाहरलाल नेहरू यांच्या हस्तें राजपथ व जनपथ जेथें मिळतात त्या ठिकाणीं राष्ट्रीय संग्रहालयाच्या नवीन इमारतीचा शिलान्यास समारंभ साजरा करण्यात आला, तेव्हां हा उद्देश मूर्तस्वरूपांत येण्यास सुरुवात झाली या तीन मजली अष्टकोनी इमारतीसाठीं अदाजें रु १,५०,००,००० इतका खर्च यईल

**व्याप्ति व संग्रह .** या संग्रहालयांत ३२० शिलाशिल्प कलाकृति, पश्चिम भारत, राजस्थानी, पहाडी आणि मोंगल शैलीचीं ८,००० रंगचित्रें, सुमारें ६१५ ब्रॉंझ धातूच्या मूर्ति—त्यांपैकीं कांहींतर अप्रतिम आहेत, सुमारें १,००० कापडाचे नमुने, ४२,०० फारशी व अरबी हस्तलिखितें, २,५००

संस्कृत, पाली, प्राकृत व देवनागरी हस्तलिखितें, १०,००० नाणीं व मर्गज (जेड) व जडजवाहिराचा एक मौल्यवान साठा आहे शस्त्रास्त्रविभागसुद्धा संघटित केला जात आहे त्यात हैदराबाद येथील ५,००० शस्त्रांची भर पडल्यामुळें तो अधिकच समृद्ध झाला आहे लाकडावरील कोरीव काम, हस्तिदंत, काचेचें सामान व निद्री यांसारख्या किरकोळ धातूंच्या कलात्मक वस्तूंचा देखील या संग्रहालयातील साठ्यात अंतर्भाव केलेला आहे प्रागैतिहासिक विभागात मोहेंजोदारो व हरप्पा, झुकर, चंगर, अमरी, चारो, गोराडी, नाल इत्यादींसारख्या पुराणवस्तुशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाच्या असलेल्या ठिकाणीं मिळविलेल्या वस्तु ठेविलेल्या आहेत त्यात पंजाबमधील अंबाला जिल्ह्यातील रुपार या ठिकाणीं अलीकडेच केलेल्या उत्खननात सापडलेल्या वस्तु 'सिंधु दालनात' ठेवण्यात आल्या आहेत

शिल्पकृति निरनिराळ्या प्रदर्शन विभागात मांडलेल्या असून त्यांची मौर्य, शुंग, कुशान, गांधार, सातवाहन, इक्ष्वाकु, गुप्त, पाल, सेन, पहिले पश्चिमेकडील चालुक्य, नंतरचे पश्चिमेकडील चालुक्य, होयसल, चोळ व भारतीय अशा निरनिराळ्या शाखांमध्यें त्यांची वर्गवारी केलेली आहे ही वर्गवारी मथुरा, नागार्जुनकोंडा, देवगड, ग्वाल्हेर, बिकानेर, ऐहोळे, पट्टदकल, सारनाथ, नालंदा, कोणार्क, हळेबिड इत्यादी ठिकाणच्या प्राचीन व मध्ययुगीन शिल्पकृतींच्या अनुरोधानें केलेली आहे त्यात अजून बऱ्याच शिल्पप्रकाराची वाण असून पुढील काही वर्षांत हा संग्रह सर्व शिल्पप्रकारांनीं परिपूर्ण करण्याचा विचार आहे प्रदर्शनविभागात मांडलेल्या काही अत्युत्कृष्ट शिल्पकृतींत मथुरा येथें सापडलेली उभ्या बुद्धाची मूर्ति, रामपूर्व वृषभस्तंभ, लोकनाथाची मूर्ति, ऐहोळ येथील यक्षमूर्ति इत्यादि शिल्पकृतींचा अंतर्भाव होतो

सिंधुखोऱ्यात सापडलेल्या मातीच्या भांड्यावरील अहिच्छत्र, कौसंबी, कौंडापूर, अखनूर, नालंदा इत्यादि ठिकाणीं सापडलेली मातीची सुंदर भांडी देखील ह्या पुराणवस्तुसंग्रहालयात आहेत ह्या मातीच्या भांड्यात मोठ्या नक्षीयुक्त तबकड्या असून त्यावर दक्षयज्ञनाश, भैरव स्वरुपातील शिव, महाभारतातील युद्धप्रसंग चित्रित केलेले आहेत त्याचप्रमाणें अखनूर येथें सापडलेल्या ल्हान आकाराच्या गुप्त राजाच्या मस्तकाकृति व अर्धपुतळे, अहिच्छत्र येथील अत्यंत सुंदर केशभूषा केलेलें पार्वतीचें शिर, निरनिराळीं मिथुन युग्में व हैदराबादमधील कोंडापूर इत्यादि ठिकाणीं आढळलेल्या प्राचीन नमुन्यांचा सुद्धा त्यात अंतर्भाव होतो

ब्रॉंझ धातूच्या वस्तूंच्या संग्रहात अलीकडे बरीच भर पडली असून तो समृद्ध झाला आहे त्यांत सर एस्. व्ही. राममूर्ति यांच्या संग्रहातून मिळालेल्या सुंदर अशा सहा चोळ कलाकृति असून त्यांपैकीं तिरुवरणुलम येथें सापडलेली चतुरतांडव स्वरूपातील नटराजाची मूर्ति आहे ही ब्रॉंझ धातूची मूर्ति अगदीं अद्वितीय अशी आहे मोहेंजोदारो येथें सापडलेली व ब्रॉंझच्या ज्ञात मूर्तीपैकीं अतिप्राचीन समजली जाणारी म्हणजेच नर्तिकेची ब्रॉंझची मूर्ति ह्या संग्रहालयास मोठ्या सुदैवानें मिळाली आहे त्याशिवाय नालंदा या पूर्वभारतीय मध्ययुगीन शिल्पपद्धतीच्या अनेक लहान ल्हान ब्रॉंझच्या कलाकृति तेथें असून बुद्धाची उभी मूर्ति, कारुणिक स्वरूपातील बोधिसत्त्व, लहान नवसाचे स्तूप, मुलामा दिलेल्या मूर्ति इ. वस्तूंचा त्यात अंतर्भाव होतो दरबार-सभामंडपात अलीकडेच यातील निवडक वस्तूंचें प्रदर्शन मांडण्यांत आलें आहे

या वस्तुसंग्रहालयात रंगचित्रांचा उत्कृष्ट संग्रह आहे त्यात राजस्थानी शैलीच्या निरनिराळ्या कलमतंत्राचा भरणा जास्त आहे त्याचप्रमाणें पहाडी शैलीच्या व मुख्यतः कांगडा बसोल्ही, कुल्लु व गढवाल या प्रारंभीच्या शैलीपासून पूर्णविकसित झालेल्या कांगडा शैलीपर्यंतची रंगचित्रें देखील त्यात आहेत मोंगल कालीन कृतींचा विभाग हा जरी तुलनेनें ल्हान असला तरी तुझुक-ए-जहांगिरी येथें सापडलेल्या निवडक अशा ल्हान ल्हान रामपूर मूर्ति त्यात आहेत त्याचप्रमाणें काही मौल्यवान रंगचित्रेंही तेथें आहेत या चित्रांच्या मागील बाजूवर मोंगल बादशहा, राजपुत्र व सरदार लोक यांनीं काढलेले ठसे देखील आहेत भारतीय चित्रकलेच्या प्राथमिक अवस्थेचें स्वरूप दाखविण्यासाठीं अजिंठा, बाघ, पितळखोरा व बदामी येथील भित्तिचित्रांच्या प्रतिकृति प्रस्तुत संग्रहालयात ठेवण्यात आल्या आहेत

टोंक ग्रंथसंग्रहालयातील सुमारें ३,७०० हस्तलिखितें व श्री जटागंकर शास्त्री यांच्याकडून मिळालेल्या बऱ्याच संस्कृत हस्तलिखितांनीं संग्रहालयाचा हस्तलिखितांचा विभाग बराच समृद्ध झाला आहे बाबरनामा या प्रसिद्ध हस्तलिखित ग्रंथाची सचित्र प्रतिकृति (तर्जुमा) या ग्रंथसंग्रहालयात आहे त्याचप्रमाणें कुराणाच्या कित्येक दुर्मिळ आवृत्त्या, व मोगलांच्या राजमुद्रा व स्वाक्षऱ्या असलेली मोंगल राजकुमारांच्या ग्रंथसंग्रहालयातील इतर हस्तलिखितें त्यात ठेवलेली आहेत

नाण्यांच्या संग्रहात गुप्त राजांनीं पाडलेल्या बयाणा साठ्यातील मौल्यवान नाण्यांचे नमुने ठेवलेले आहेत सुमारें १,७०० ससेनियन नाणीं आणि सुलतान व मोंगल या महंमदी राजघराण्यांचीं कितीतरी नाणीं त्यात आहेत दक्षिणेतील नाण्यांचा महत्त्वाचा साठा संग्रहालयानें नुकताच मिळविलेला आहे

पुरालेखसंग्रह वाढविण्यात येत असून त्याची प्राथमिक तयारी म्हणून प्राचीन व मध्ययुगीन राजघराण्यांनीं दिलेल्या देणग्या ज्यात नोंदल्या आहेत अशा महत्त्वाच्या ताम्रपटांचा मौल्यवान संग्रह खरीदण्याची व्यवस्था केली जात आहे

सर ऑरेल स्टीन यानीं मिळविलेल्या मध्य आशियायी पुराणवस्तूंचा एक ल्हानसा संग्रह या संग्रहालयात आहे

राष्ट्रीय संग्रहालयातील समकालीन भारतीय पेहरावाच्या संकल्पित दालनासाठीं भारतातील प्रत्येक भागातून समकालीन भारतीय पेहरावाचा बराच मोठा संग्रह एकत्र करण्यात आला आहे.

राष्ट्राध्यक्ष, उपराष्ट्राध्यक्ष, पंतप्रधान व इतर व्यक्ति याना वेळोवेळीं मिळालेल्या भेटीदाखल वस्तु त्यानीं ह्या संग्रहालयांत पाठवून दिलेल्या आहेत

अलीकडेच प्रदेश व कलाशैली यानुसार संग्रहालयातील प्रदर्शन विभागांची पुनश्च विभागणी करण्यात आली आहे विद्युद्दीपित केलेले लिपिशास्त्र विषयक तक्ते तेथें मांडलेले आहेत ह्या तक्त्यांत ब्राह्मी, नागरी, बंगाली, तामीळ ग्रंथ, कानडी, तेलुगू या भारतीय लिप्यांची उत्क्रांति व तिबेट, पूर्व तुर्कस्तान, सिलोन, ब्रह्मदेश, अनाम, मलाया, जावा, बोर्निओ इत्यादि परदेशात त्यांचा कसा विकास होत गेला हें स्पष्ट केलेलें आहे त्याचप्रमाणें भारतीय नाणीं, भारतीय मूर्तिकला व वर्णमालेतील प्रत्येक वर्ण या सर्वांचा इतिहास देणारे तक्ते तयार करून दरबार हॉलमध्यें मांडले जातात सर्वसाधारण लोकात ह्याविषयासंबंधीं शैक्षणिक औत्सुक्य निर्माण व्हाव हा यातील मुख्य उद्देश आहे त्याचप्रमाणें भारतीय जवाहीर, फर्निचर, वस्त्रें व स्थापत्य यांच्या उत्क्रांति अवस्था दर्शविणारे वेगवेगळे प्रदर्शन विभाग उघडण्याचें नियोजित केलें आहे

मध्य आशियांतील पुरातत्त्वज्ञ सुप्रसिद्ध सर ऑरेल स्टीन यांनी वायुगाख्यात भागात संशोधन करून आणलेल्या भित्तिचित्रांचा सुंदर संच सुद्धा राष्ट्रीय वस्तुसंग्रहालयात आणला असून त्याची अजून पुनर्मांडणी व्हावयाची आहे. हे आतापर्यंत मध्य आशियाई पुराणसंग्रहालयांत ठेवले होते.

**शैक्षणिक कार्य :** राष्ट्रीय संग्रहालयाच्या गरजा भागविण्यासाठी एक चांगले ग्रंथालय निर्माण करण्यांत येत आहे. संग्रहालयास भेट देण्यास आलेल्या प्रसिद्ध व्यक्ति, विद्यार्थी व इतर प्रेक्षक या सर्वांना मार्गदर्शक व्याख्याते व प्रदर्शन विभाग-साहाय्यक माहिती सांगून मदत करतात. पुराणवस्तुविभागांत कला व पुराणवस्तुशास्त्र यासंबंधीच्या निरनिराळ्या विषयावरील २,००० काचचित्रे आहेत. ही काचचित्रें राष्ट्रीय संग्रहालयास हवी तेव्हा मिळू शकतात. राष्ट्रीय संग्रहालयानें सुद्धां आपला काचचित्रांचा संग्रह बनविण्याचें काम सुरू केलें आहे. संग्रहालयानेंफे सन १९५८ पासून खास व नियतकालिक प्रदर्शनें भरविण्यात आलीं. हिंदी व इंग्रजी भाषेत अनुरूप अशा नावाच्या चिठ्ठ्या निरनिराळ्या प्रदर्शन विभागांत लावलेल्या आहेत. स्थानिक विश्वविद्यालय व इतर संस्था या संग्रहालयासंबंधीं बरीच आस्था दाखवतात.

**प्रकाशनें :**

(१) राजभवनमध्यें भरलेल्या भारतीय कलाप्रदर्शनाचें माहिती पुस्तक, किं. रु. १, (२) भारतीय कलाकृति संग्रह प्रदर्शन, किंमत रु. ३ व रु. ७, (३) भारताच्या राष्ट्रीय संग्रहालयातील प्रदर्शन विभागाचा मार्गदर्शक, किंमत रु. १, (४) १६ सचित्र पोस्टकार्डांचा संच (भारतीय शिल्प), किं. ६४ नवे पैसे, (५) १५ सचित्र पोस्टकार्डांचा संच (बौद्ध शिल्प), किं. ६४ नवे पैसे.

**कामाचे तास :** सोमवार व राजपत्रात घोषित होणाऱ्या कांहीं सुट्यांच्या दिवसाखेरीज रोज सकाळीं १० ते सायंकाळीं ५ पर्यंत संग्रहालय उघडें असतें.

**प्रवेश :** केवळ शनिवारी मोठ्या माणसास ५० न. पै. व मुलास २५ न. पै. शुल्क भरावें लागतें. व इतर दिवशीं प्रवेश मोफत दिला जातो. प्रत्यक्ष शिकत असलेल्या विद्यार्थ्यांना मात्र प्रवेश फी माफ असते.

**नियामक मंडळ :** भारत सरकारच्या शास्त्रीय संशोधन व सांस्कृतिक खात्याच्या नियंत्रणाखालीं हें संग्रहालय येतें.

**सेवकवर्ग :** रक्षक श्री. सी. शिवराममूर्ति, एम्. ए., रक्षक श्री. जे. के. रॉय, बी. ए., ए. एम्. ए. (लंडन), रसायनज्ञ-श्री. टी. आर. गैरोला, एम्. एस्सी., उपरक्षक-श्री. ए. के. भट्टाचार्य, एम्. ए., पी. आर. एस., उपरक्षक-श्री. वाय. के. बुखारी, एम्. ए., कनिष्ठ रक्षक श्री. सत्याश्रय, एम्. ए., दोन वरिष्ठ मार्गदर्शक व्याख्याते, मार्गदर्शक, तीन प्रदर्शन विभाग सहाय्यक, ग्रंथसंग्रहालयासाठीं तांत्रिक सहाय्यक, दोन रसायन सहाय्यक, प्रयोगशाळेसाठीं दोन तांत्रिक सहाय्यक, तीन कनिष्ठ रसायन सहाय्यक, प्रमुख मॉडेलर, तीन मॉडेलर, कलाकार, ड्राफ्टस्मन, दोन छाया चित्रकार, चिन्हांकनकर्ता, सुतार, दोन जमादार, १८ प्रदर्शन विभाग परिचारक, पाच झाडूवाले व सात चौकीदार, चिटणीस श्री. बी. एन्. भारद्वाज, बी. ए., कार्यालय अधीक्षक, हिशेबनीस, थोरले कारकून, वरच्या विभागांतील कारकून, तीन लघुलेखक, पाच खालच्या विभागांतील कारकून व भांडाररक्षक.

**आर्थिक तरतूद :** अर्थसंकल्पांत प्रस्तुत संग्रहालयासाठीं दरवर्षी रु. ५,४१,००० एवढ्या रकमेची तरतूद करण्यांत येते.

**अभिप्राय :** जनपथ भागांत संग्रहालयासाठीं बांधण्यात येत असलेल्या इमारतीच्या पहिल्या टप्प्याचें काम पूर्ण होईपर्यंत संग्रहालय राष्ट्रपतिभवनाच्या एका भागांत तात्पुरतें ठेविलेलें आहे. दर महिन्यास सरासरी ६,५७७ प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात. पण पूजामहोत्सव व इतर महत्त्वाच्या सणांच्या दिवशीं राष्ट्रपतिभवनांतील मोंगल बाग लोकांसाठीं खुलें असतें त्या वेळीं भेट देणाऱ्या प्रेक्षकांची बरीच गर्दी असते. संग्रहालयास प्रदर्शन विभागासाठीं व इतर आवश्यक कामासाठीं जास्त जागेची जरूर आहे व अशी जागा बांधण्यात येत असलेल्या इमारतींत उपलब्ध होईल असें वाटतें.

रासायनिक कामासाठीं एक प्रयोगशाळा नुकतीच सुरू केलेली आहे. संग्रहालयाच्या मुख्य दरवाजाजवळ असलेल्या कोपऱ्यांत एक विक्रीकेंद्र ठेवण्यांत आलें असून तेथें निरनिराळ्या कलाकृतींचीं छायाचित्रें, मूर्तीवरून बनवलेल्या मूर्ति व प्रतिकृति विकत मिळू शकतात. इतर संग्रहालयांकडून उसनवारीने वस्तु आणणें, निरनिराळ्या ठिकाणाहून वस्तु मिळविणें, पुराणवस्तु खात्यामार्फत होणाऱ्या उत्खननांत मिळालेल्या वस्तु आणणें, भारत सरकारनें विकत घेतलेल्या वस्तु व त्याचप्रमाणें निरनिराळ्या राज्यांतून मिळालेल्या उसनवार व देणगीदाखल मिळालेल्या वस्तु एकत्र करणें हीं या संग्रहालयाचीं संग्रहाची मुख्य साधनें होत. इतर संग्रहालयांबरोबर संग्रहांची अदलाबदल करून संग्रह वाढविण्याकडेदेखील वस्तुसंग्रहालयाचें लक्ष वेधलें आहे. पुरातन संग्रहित करण्याबाबतच्या अधिकारांत या संग्रहालयाचा क्रम बराच वर लागतो. भारतीय वस्तुसंग्रहालय संघाचें प्रस्तुत संग्रहालय हें एक सदस्य आहे.

## हिमाचल प्रदेश

**चंबा :** लोकसंख्या ६,८५८

### भूरीसिंग संग्रहालय, चंबा.

**स्थापना :** १९०८

**पूर्वेतिहास :** पुराणवस्तुखात्याच्या उत्तर विभागाचे अधीक्षक डॉ. जे. पी. एच्. व्होगेल यांनीं या शतकाच्या आरंभीं चंबा संस्थानांत बरेंच संशोधन कार्य केलें. त्यांना या संशोधनांत अनेक संस्कृत शिलालेख व धातुलेख सापडले व ते जतन करून ठेवण्यासाठीं खास उपाययोजना आवश्यक होती. चंबा संस्थानाचे राजे हिज हायनेस राजे भूरीसिंग यांनीं अशी सूचना केली कीं, अशा प्राचीन अवशेषांच्या रक्षणासाठीं संग्रहालय हेंच अतिशय उत्तम साधन होय. त्याप्रमाणें सन १९०८ सालीं एक संग्रहालय स्थापन करण्यांत आलें. संस्थानाचीं ऐतिहासिक महत्त्वाचीं कागदपत्रें (काबूलच्या दुराणी राजाकडून चंबा संस्थानच्या राजास मिळालेल्या फारशी सनदा धरून) या वस्तुसंग्रहालयांत ठेवण्यांत आलीं. त्याचप्रमाणें महाराजांच्या राजवाड्यांत असलेलीं कित्येक रंगचित्रें या संग्रहालयांत पाठविलीं गेलीं. शिवाय स्थानिक कलाकौशल्याच्या (उद्योगाच्या) वस्तु व जुनीं शस्त्रास्त्रें यांची संग्रहालयाच्या वस्तूंत भर पडली.

**व्याप्ति व संग्रह :** संस्थानचा इतिहास, स्थानिक कलाकुसरीच्या व उद्योगधंद्यांत तयार होणाऱ्या वस्तूंत व राज्यांत सापडलेले सृष्टिविज्ञानविषयक नमुने ठेवण्याच्या उद्देशानें हें वस्तुसंग्रहालय स्थापण्यांत आलें आहे.

चंबा संस्थानाशीं ऐतिहासिक दृष्ट्या निगडित असलेल्या शेजारच्या राज्यांतून व जिल्ह्यांतून वस्तु आणून या संग्रहालयांत ठेवण्यांत आल्या आहेत. त्यांत

पुढील विभाग आहेत :

(अ) शिलालेख व शिल्पशिल्प, (ब) धातुवरील लेख, (क) कागद पत्रं, (ट) चित्रें, (इ) स्मारकें, शिल्पकलाकृति वगैरेंची छायाचित्रें, (फ) लाकडावरील नक्षीकाम व लाकडी वस्तु, (ग) प्राचीन हत्यारें, (ह) भरतकाम व वस्त्रें, (आय) अलंकार, (ज) संकीर्ण वस्तु आणि (के) खनिविज्ञानविषयक नमुने.

**शैक्षणिक कार्य :** स्टाफच्या उपयोगासाठीं सुमारें ५०० पुस्तकें असलेलें छोटेसें ग्रंथालय आहे परंतु तीं पुस्तकें बाहेरील लोकांना क्वचित देण्यात येतात नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व हिंदी भाषांतून आहेत. एका प्रदर्शनविभाग सहाय्यकाची नुकतीच नेमणूक करण्यात आली असून तो प्रेक्षकांना व शाळेतील विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करण्याचें काम करतो

**प्रकाशनें :** चंबा येथील भूरीसिंग संग्रहालयाचें माहितीपुस्तक, लेखक जे. पीएच. व्होगेल, पीएच. डी. (कलकत्ता, १९०९)-रु १ ७५ नये पैसे

**कामाचे तास :** सोमवार व राजपत्रांत जाहीर केलेल्या सुट्या खेरीज रोज उघडें असतें एप्रिल ते सप्टेंबर महिन्यात सकाळीं ८ ते १२ व दुपारीं ३ ते ६ पर्यंत आणि ऑक्टोबर ते मार्च महिन्यात सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ** संग्रहालयाचा कारभार हिमाचल प्रदेश सरकार शिक्षण संचालकाच्या मार्फत चालतें संग्रहालय शिक्षण संचालकाच्या हाताखालीं असून जिल्हा शाळा निरीक्षक, चंबा, पदसिद्ध संग्रहालयाध्यक्ष आहे

**सेवकवर्ग :** अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष श्री दौलतराम गुप्ता, बी एम् सी, बी टी, प्रदर्शनविभाग साहाय्यक, अंशकालिन (पार्ट-टाइम) कारकून, दोन शिपाई व चौकीदार

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकातील वार्षिक तरतूद रु ६,००० इतकी आहे

**अभिप्राय** संग्रहालय गावात मध्यभागीं असून आसपासच्या जिल्ह्या तील लोकांना तेथ सहज जाता येतें प्रेक्षकांची दररोजची सरासरी संख्या ७५ व दरवर्षीची सरासरी संख्या २८,००० इतकी आहे उन्हाळ्यापेक्षा हिंवाळ्यात प्रेक्षकांची संख्या जास्त असते आणि स्थानिक जत्रासारख्या मिंजर जत्रा व मणिमहेशमेळा यासारख्या विशेष प्रसंगीं प्रेक्षकांची संख्या फारच वाढते प्रदर्शन वस्तु मांडण्याच्या दृष्टीनें संग्रहालय योग्य नसून वस्तु साठवून ठेवण्यास जागा अपुरी आहे रात्रीच्या पहाऱ्यासाठीं चौकीदार असतो नाणीं, अलंकार व इतर मौल्यवान वस्तु कांचेच्या कपाटात कडीकुलुपात ठेवलेल्या असतात ऐतिहासिक कागदपत्रें आगप्रतिबंधक तिजोरीत ठेवण्यात येतात संशोधन, खरेदी, उत्खनन व देणगी अशा मार्गांनीं वस्तु संपादन करण्यात येतात अलिकडच्या काळातील संग्रह हे हिमाचल प्रदेशात विलीन झालेल्या संस्थानांकडून खरेदी करण्यात किंवा हस्तांतरित करून घेण्यात आलेले आहेत संग्रहालयातील प्रदर्शनवस्तु काहीं प्रसंगीं बाहेर पाठविण्यात येतात. 'उषा चरित' या नावाच्या हातानें काढलेल्या रंगीत चित्रांचा संग्रह नवी दिल्ली येथील भारतीय राष्ट्रीय संग्रहालयास तात्पुरता देण्यात आला आहे हिमाचल प्रदेशाच्या संबंध भागाचें प्रतिनिधिक स्वरूप त्यास यावें या हेतूनें संग्रहालयाचा विस्तार करण्याचें योजिलें आहे ज्याचा उपयोग आता मागें पडत आहे अशीं जुनीं वाद्यें व अलंकार आणि स्थानिक उद्योगधंद्यात बनलेल्या वस्तु याहि संग्रहालयात ठेवण्याचें योजिलें आहे

## जम्मू व काश्मीर

**जम्मू :** लोकसंख्यामाहीत नाहीं

### डोग्रा कला प्रदर्शनविभाग

**स्थापना :** सन १९५४

**पूर्वेतिहास :** जम्मूतील लोकांच्या मागणीस प्रतिसाद देऊन हें संग्रहालय पहाडी चित्रकलेच्या खास संग्रहाच्या साहाय्यानें सन १९५४ मध्ये सुरू करण्यांत आलें या संग्रहालयात आतापर्यंत ४२२ चित्रें असून त्यात आणखी भर पडत आहे ऐतिहासिक हत्यारें, वस्त्रें व हस्तलिखितें, शिल्पकलाकृति व नाणीं यांचाहि या संग्रहालयात संग्रह आहे हस्तलिखितात शहानामा व सिकंदरनामा यासारखे सुंदर चित्रांच्या साहाय्यानें पार्शियन व मोगल लिपीत लिहिलेले काहीं दुर्मिळ ग्रंथ आहेत शिवालिक डोंगरात सापडलेल्या खडकांचा व अश्मीभूत वस्तूंचा भूस्तरशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाचा संग्रहदेखील या संग्रहालयात ठेवण्यांत आला आहे

**शैक्षणिक कार्य :** कलेतिहासाच्या महत्त्वाच्या पुस्तकांचा संग्रह असलेलें एक लहान ग्रंथालय आहे या संग्रहात नवीन पुस्तकांची भर टाकण्यात येते प्रदर्शनवस्तूंवर नावाच्या चिठ्ठ्या असून त्या इंग्रजीत आहेत व त्यांचा हिन्दींत भाषांतर करण्याचें काम देखील चालू आहे संग्रहालयाध्यक्ष जिज्ञासू प्रेक्षकांना संग्रहालयातील साहित्याविषयींची माहिती देतात त्या प्रदेशातील लोकांना आपल्या सांस्कृतिक परंपरेविषयीं माहिती मिळावी या हेतूनें प्रदर्शनें भरविण्यात येतात पहाडी शैलीच्या रंगीत चित्रांच्या प्रदर्शनाचें उद्घाटन भारताच्या राष्ट्रपतींनीं एप्रिल १९५४ मध्यें केलें त्या प्रदर्शनातूनच खुद्द ह्या संग्रहालयाचा जन्म झाला स्थानिक शाळांतील विद्यार्थ्यांना या संग्रहालयाबद्दल फारच जिज्ञासा आहे

**प्रकाशनें :** काहीं नाहीं

**कामाचे तास :** रविवार व सरकारी सुटीचे दिवस खेरीजकरून संग्रहालय रोज उघडें असतें उन्हाळ्यात सकाळीं ८ ते ११ व हिंवाळ्यात सकाळीं १० ते १ व संध्याकाळीं ४ ते ७

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालय शिक्षण संचालकाच्या अधिकाराखालीं आहे

**सेवकवर्ग** संग्रहालयाध्यक्ष – श्री रमरचंद शर्मा, कारकून व दोन शिपाई

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अंदाजपत्रक रु ६,९७५ इतक्या रकमेचें आहे

**अभिप्राय** 'गांधीभवन'च्या पाठमागील हॉलमध्यें संग्रहालय आहे ही जागा अपुरी पडते प्रेक्षकांची रोजची संख्या सुमार १० व वार्षिक संख्या सुमारें ४,००० इतकी आहे संशोधनाच्या व देणगीच्या द्वारें मुख्यत्वेकरून वस्तु संग्रहित करण्यात येतात

**अभिप्राय :** प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या साधारणपणें ३०० ते ४०० असून वार्षिक सरासरी संख्या साधारणपणें १,४०,००० इतकी आहे. परंतु एप्रिल ते सप्टेंबर या महिन्यांत अनेक प्रवासी काश्मीरला येतात, त्यावेळीं संग्रहालयात प्रेक्षकांची फार गर्दी होते. सध्याची इमारत राजघराण्याकडून वापरण्यात येत होती व ५० वर्षांपूर्वी तिचें रूपांतर संग्रहालयात करण्यात आलें. तिच्यात अलिकडच्या काळात अनेक नवीन दुरुस्त्या करण्यात आल्या असल्या तरी ही इमारत संग्रहालयासाठी वापरण्यालायक इमारत नाहीं. शिवाय ती प्रदर्शनवस्तु ठेवण्यास अपुरी पडते. सोन्याचीं व चांदीचीं नाणीं सुरक्षिततेसाठीं सरकारी तिजोरींत ठेवण्यात येतात. संग्रहालयाला प्रयोगशाळेची सोय नाहीं, तसेंच त्यास योग्य ग्रंथालयहि नाहीं. विभागातील कामासाठीं फक्त शंभर पुस्तकें व कांहीं नियतकालिकें उपलब्ध आहेत. संग्रहालयातील बहुतेक वस्तु तोपसान्यातील व उत्खनन केलेल्या ठिकाणातील आहेत. गुप्तनिधींतून वस्तु शोधून काढण्याच्या बाबतींत या संग्रहालयाला मान्यता देण्यात आलेली नाहीं. संग्रहालयाच्या पुनर्रचनेसाठीं सन १९५९-६० च्या अंदाजपत्रकात रु २,००,००० इतक्या रकमेची खास तरतूद करण्यात आलेली आहे.

### केरळ

**त्रिचूर :** लोकसंख्या ६९,५१५

## (१) पुराणवस्तुशास्त्रविषयक संग्रहालय व चित्रप्रदर्शनालय, त्रिचूर

**स्थापना :** १९३८

**पूर्वेतिहास :** चित्रप्रदर्शनालयाची स्थापना डिसेंबर १९३८ मध्यें झाली. मार्च १९५७ मध्यें पुराणवस्तुविषयक संग्रहालयाची त्यास जोड देण्यात आली. कलेचे उदार आश्रयदाते असलेले कोचीनचे दिवंगत महाराजा यांच्या जन्मनक्षत्राच्या नावावरून चित्रप्रदर्शनालयाचें श्री मूलम् चित्रशाला असे नामाभिधान करण्यात आलें. या प्रदर्शनालयात भारतातील सर्व ठिकाणांहून मिळविलेल्या निरनिराळ्या कालांतील रंगचित्रांव्यतिरिक्त, निरनिराळ्या प्रांतांची परंपरागत कला दर्शविणाऱ्या प्रातिनिधिक रंगचित्रांचा एक विभाग आहे. या चित्रप्रदर्शनालयातील चित्रांचा संग्रह, या राज्यातल्या मंदिरांत व राजवाड्यांत जीं असंख्य पुरातन भित्तिचित्रें आहेत त्यांपैकीं कांहीं निवडक चित्रांच्या हुबेहूब प्रतिकृति बनविण्यासाठीं केलेल्या अनेक वर्षांच्या परिश्रमाचे फळ आहे.

**व्याप्ति व संग्रह :** पुराणवस्तु विभागात व चित्रप्रदर्शनालयात पुराणवस्तुशास्त्राच्या दृष्टीनें उद्बोधक अशा ऐतिहासिक चित्रां, भव्य छायाचित्रें आणि भित्तीचित्रांच्या अस्सल प्रतिकृति आहेत. या सर्व वस्तूंचें वर्गीकरण करून कालक्रमानुसार त्यांची मांडणी करण्यात आलेली आहे. येथील प्रमुख प्रदर्शन वस्तु पुढीलप्रमाणें आहेत—(अ) मोहेंजोदारो व हडप्पा येथील पुरातनवस्तु, (ब) इसवी सनानंतर सुमारें पहिल्या शतकातील गांधार शैलींतील शिल्पशिल्प व गिलाव्याचें काम दर्शविणाऱ्या तक्षशिला येथील पुरातनवस्तु, (क) सुमारें चौथ्या शतकातील, कोचीन व मध्य-केरळ प्रदेशाशीं तक्षशिलेचे संभाव्य सांस्कृतिक संबंध दर्शविणाऱ्या त्याच प्रकारच्या वस्तु, (ड) कोचीन व मध्य केरळ प्रदेशातील भव्य दगडी स्मारकांचे प्रकार, (इ) कोचीन व मध्य-केरळ प्रदेशातील भव्य दगडी अस्थिपात्रांत सापडलेली मातीचीं भांडीं, स्फटिकाचे व कांचेचे मणी इ., (फ) कोचीनमधील उत्खननस्थानीं सापडलेले चकचकित सूक्ष्म स्फटिकावशेष, (ग) तिंदिया व मुझिरिस येथील प्राचीन देवालयांमधून जाणाऱ्या राजमार्गावर असलेल्या इय्याळ या खेडेगावात सप्टेंबर १९४६ मध्यें सापडलेलीं व रोमन संस्कृतीचा कोचीन व इतर मध्य केरळ-प्रदेशावर पडलेला प्रभाव दर्शविणारीं इसवी सनाच्या सुमारें पहिल्या शतकांतील छिद्रांकित चांदीचीं नाणीं व तारखा असलेलीं चांदीचीं व सोन्याचीं नाणीं, (ह) कागणूर (मुझिरिस) येथील उत्खननात मिळालेले मातीच्या नक्षीदार भांड्यांचे तुकडे, मातीच्या वेगवेगळ्या वस्तु, लोखंडाच्या व तांब्याच्या वस्तु, स्फटिकाचे व कांचेचे मणी इ. ह्या वस्तु भारताच्या पूर्वकिनाऱ्यावरील आरिकमेडू या हिंदी-रोमन व्यापारी केंद्रात सापडलेल्या, इसवी सनाच्या सुमार पहिल्या शतकातील वस्तूंशीं आकार व नमुना या बाबतींत तंतोतंत जुळतात. (ई) मध्ययुगीन काळातील चीनचा मध्यकेरळशीं असलेला संबंध दर्शविणारे इसवी सनाच्या सुमारें ११ व १२ व्या शतकातील कागणूर येथील खोदकामात प्रत्येक ३ ऱ्या व ४थ्या थरातच संमिश्रित स्वरूपात सापडलेले साध्या व शोभेच्या चिनीमातीच्या भांड्यांचे तुकडे, (ज) मध्ययुगीन काळातील तामीळ प्रदेश व मध्य केरळ यांची राजकीय व सांस्कृतिक एकरूपता दर्शविणारे इसवी सनाच्या १०–१५ व्या शतकातील तामीळ व वट्टेळुत्तु या भाषांतील शिलांकित अभिलेख, (क) मल्याळी लेखनाचा विकास दर्शविणारे १५ ते १८ व्या शतकातील प्राचीन मल्याळी शिलांकित अभिलेख, (ल) मध्य केरळातील कलापरंपरा दाखविणारें सुमारें ११ व्या शतकातील लाकडावरील कातीव काम व धातूच्या मूर्ति, (म) सुमारें १६ ते १८ व्या शतकातील त्रिचूर येथील वडक्कुन्नाथ मंदिर व कोचीन येथील मट्टनचेरी राजवाडा यांमधील भित्तीचित्रांच्या प्रतिकृतींच शंभरापेक्षा अधिक चित्रफलक.

**शैक्षणिक कार्य :** येथील संचालकाच्या कार्यालयातील ग्रंथालय हे केवळ विभागीय उपयोगासाठींच असलें तरी त्याचा संग्रहालयाकडूनहि वापर केला जातो. देशाच्या प्राचीन इतिहासाच्या अभ्यासासाठीं, विद्यार्थ्यांना व शिक्षकांना संग्रहालयाकडून सवलती दिल्या जातात व तेथें ठेवलेल्या इतर सामग्रीचाहि वापर करूं दिला जातो. अभ्यासानिमित्त संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रशिक्षण विद्यालयाच्या पदव्युत्तर विद्यार्थ्यांना व शालेय विद्यार्थ्यांना प्रदर्शनवस्तुसंबंधी माहिती देण्याची व्यवस्था केलेली आहे. ऐतिहासिक व पुराणवस्तु संशोधन स्थळें व स्मारकें यांच्यासंबंधींच्या दिव्यांच्या साहाय्यानें दाखविण्याच्या कांच चित्रांचा संग्रहहि उपलब्ध आहे. दरवर्षी उन्हाळ्यात (एप्रिल–मे) त्रिचूर नगरपालिकेकडून भरविल्या जाणाऱ्या अखिल भारतीय प्रदर्शनाबरोबरच खास प्रदर्शनेंही भरविलीं जातात. प्रदर्शन वस्तूंच्या नावाच्या चिठ्ठ्या मल्याळींत व इंग्रजींत आहेत. त्यांचीं खास वैशिष्ट्यें नकाशे, तक्ते, चित्रें व छायाचित्रें यांच्या साहाय्यानें स्पष्ट केलीं जातात. शहरातील पहिल्या प्रतीचीं तीन महाविद्यालयें व सुमारें वीस माध्यमिक शाळा यांसारख्या शिक्षणसंस्था या संग्रहालयाचा लाभ घेतात.

**प्रकाशनें :** "चित्र प्रदर्शनालयाचें माहिती पुस्तक"—द्वितीयावृत्ति—किंमत २५ नये पैसे.

**कामाचे तास :** कामाच्या दिवशीं रोज सकाळीं ११ ते दुपारीं ५ पर्यंत संग्रहालय खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** त्रिचूर येथील पुराणवस्तु संग्रहालय व चित्र प्रदर्शनालय ही, संग्रहालयाचे व प्राणीसंग्रहालयाचे संचालक यांच्या अधिकाराखाली आहेत

**सेवकवर्ग :** संग्रहालयाच्या २-भाग रिकामा आहे मानचित्रकार, कम्पकार व दोन शिपाई

**आर्थिक तरतूद :** संग्रहालय व प्रदर्शनालय यांसाठी अर्थसंकल्पात वार्षिक रु. १००० ची तरतूद केली आहे

**अभिप्राय :** संग्रहालय व प्रदर्शनालय नगरसभागृह इमारतीच्या वरच्या मजल्यावर मोठ्या ४ खोल्यांत आहे संग्रहालय पाहावयास येणाऱ्या प्रेक्षकांची वार्षिक संख्या सरासरीने १५,००० असून, ओणम्, नाताळ व पूरम् अशा विशेष प्रसंगी जास्त संख्येने लोक संग्रहालयास भेट देतात नगरसभागृहाची इमारत संग्रहालयास योग्य व पुरेशी असून राखीव संग्रह व समाकृति ठेवण्यास स्थान जागा आहे संग्रहालयास जोडूनच एक छोटीशी पुराणवस्तुशास्त्रविषयक प्रयोगशाळा आहे

## (२) राज्य संग्रहालय व प्राणीशास्त्रविषयक उद्यानें

**स्थापना :** १८८५

**पूर्वेतिहास :** त्रिचूर शहराच्या उत्तर सीमेपासून दीड मैल लांब असलेल्या व त्रिचूर येथील 'राजाच्या उद्यान' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या ठिकाणी ही संस्था १८८५ साली सुरू करण्यात आली तिच्यात संग्रहालय, प्राणीसंग्रहालय व उद्यान यांचा अंतर्भाव होतो संग्रहालयातील सुरुवातीच्या प्रदर्शनवस्तु म्हणजे कांहीं थोड्या कलाकृति व राज्यातील कृषिविषयक व औद्योगिक वस्तूंचे कांहीं नमुने यांचा एक संग्रह होता, तर प्राणीसंग्रहालयात सांबर, ठिपके असलेली हरणें, रानडुक्कर, बिबळ्या वाघ व माकडें, यांचा अंतर्भाव होता सन १९१२ मध्ये हें संग्रहालय अर्नाकुलम् येथील कृष्णविलास राजवाड्यात हलविण्यांत आलें व त्यानंतर दोन वर्षांनी तें सध्या असलेल्या ठिकाणी नेण्यात आलें त्यावेळीं मूळ इमारतीत प्राणीशास्त्रविषयक वनस्पतिशास्त्रविषयक व मानववंशशास्त्रविषयक वस्तुसंग्रह ठेवण्याच्या दृष्टीने योग्य ते बदल, भर व सुधारणा करण्यात आली संग्रहालयाभोंवती उद्यानाची आखणी करण्यात आली व सर्वत्र प्राणी निवासगृहें बांधण्यात आलीं दुर्मिळ व मौल्यवान ग्रंथांचा साठा असलेलें व दानकर्त्याच्या नावाने ओळखलें जाणारें कृष्ण-कल्याणी मोफत वाचनालय व ग्रंथालय त्यानंतर संग्रहालयास जोडण्यात आलें संग्रहालयाच्या व प्राणीसंग्रहालयाच्या विस्तारासाठीं राज्य सरकारनें आता अडीच एकराच्या एका मोठ्या जागेतील इमारत विकत घेतली आहे प्रदर्शित करावयाच्या कलाकृति आता या इमारतींत हलविण्यात येत आहेत वस्तुसंग्रहाचें प्रदर्शन अधिक चांगल्या रीतीनें करतां यावें म्हणून सध्याच्या इमारतीचीहि नवीन तऱ्हेनें बांधणी केली जात आहे

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयात सृष्टिविज्ञान ( प्राणीशास्त्र, वनस्पतिशास्त्र व भूस्तरशास्त्र ), मानववंशशास्त्र, या प्रदेशातील कला व उद्योग, असे विभाग आहेत त्याचप्रमाणें त्यात काहीं पुराणवस्तुशास्त्रविषयक वस्तु व सोन्याच्या नाण्यांचा संग्रह आहे

**शैक्षणिक कार्य -** संग्रहालयात असलेलें संदर्भ ग्रंथालय मुख्यतः विभागीय उपयोगाकरताच आहे, परंतु जिज्ञासूंनाहि त्याचा लाभ घेतां यतो त्याचप्रमाणें तेथें इंग्रजी, मल्याळी व तमिळ पुस्तकें असलेलें एक मोफत वाचनालय व एक ग्रंथालय आहे संदर्भ ग्रंथालयात १,००० पुस्तकें असून संग्रहालयांतील मोफत वाचनालयात सुमारें ५,००० पुस्तकें आहेत सहलीस येणाऱ्या शाळेय विद्यार्थ्यांना संग्रहालय व प्राणीसंग्रहालय पाहण्यासाठीं खास सवलती दिल्या जातात सर्व प्रदर्शन-वस्तूंना नावाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत व जरूर तेव्हां, अधीक्षक व इतर सेवकवर्ग प्रेक्षकांना प्रदर्शन-वस्तूंसंबंधी माहिती देतात स्थानिक व जवळपासच्या प्रदेशांतील शाळांचे विद्यार्थी व शिक्षक खास व्यवस्था करून घेऊन संग्रहालय, प्राणीसंग्रहालय व उद्यान पाहावयास येतात

**प्रकाशनें :** प्रशासनविषयक अहवाल

**कामाचे तास :** शुक्रवाराव्यतिरिक्त इतर सर्व दिवशीं सकाळीं ८ ते ११-३० पर्यंत व दुपारीं ३ ते ६ पर्यंत हें संग्रहालय खुलें असतें

**प्रवेश :** संग्रहालयात प्रवेश विनामूल्य आहे प्राणीसंग्रहालयासाठीं सहा नये पैसे इतकें नाममात्र प्रवेशमूल्य घेतलें जातें परंतु विद्यार्थ्यांना व बालकांना प्रवेश विनामूल्य आहे

**नियामक मंडळ :** संग्रहालय, प्राणीसंग्रहालय व उद्यान यांसाठीं एका अधीक्षकाची नेमणूक केलेली असून ते, संचालक, संग्रहालयें व प्राणीसंग्रहालयें, केरळ राज्य यांच्या अधिकाराखालीं काम पाहतात

**सेवकवर्ग :** अधीक्षक श्री एन्. गोविंदन् कुट्टी मेनन, एम्. ए., हिशेब कारकून, कारकून-ग्रंथपाल, कारकून, पैसा भरणारा, पट्टेवाले, पहारेकरी, माळी व झाडूवाले

**आर्थिक तरतूद :** संग्रहालय, प्राणीसंग्रहालय व उद्यान यांची व्यवस्था ठेवण्यासाठीं वार्षिक रु. ५०,००० इतका खर्च होतो पुस्तकें व नियतकालिकें यांच्या खरेदीसाठीं लागणारा खर्चहि या खर्चात समाविष्ट आहे

**अभिप्राय :** संग्रहालय त्रिचूर गावाच्या मध्यभागीं वसलेलें आहे संग्रहालय पहावयास येणाऱ्या प्रेक्षकांची दैनिक सरासरी संख्या ४०० व वार्षिक १,४०,००० इतकी असते सुटीच्या व सणासुदीच्या दिवसात, विशेषत एप्रिल-मेमधील त्रिचुरपूरम् उत्सव व ऑगस्ट-सप्टेंबरमधील ओणमचे ४ दिवस, संग्रहालय व प्राणीसंग्रहालय पहावयास येणाऱ्यांची गर्दी होते येथील इमारत अपुरी व गैरसोयीची आहे रात्रपाळीसाठीं दोन पहारेकरी नेमलेले आहेत लोखंडी तिजोरींत सुरक्षितरीत्या ठेवलेली नाणीं खास व्यवस्था करून दाखविली जातात राखीव व समाकृतींचा संग्रह ठेवण्यासाठीं फारच थोडी जागा आहे प्रयोगशाळाविषयक सवलती अपुऱ्या आहेत नमुने, संशोधन, खरेदी, देणगी, देवघेव या मार्गांनीं मिळविले जातात गुप्तनिधीतील वस्तु स्वीकारण्यासाठीं या संग्रहालयास मान्यता मिळालेली आहे आवश्यक तेव्हा प्रतिकृतींची देवघेव केली जाते नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व मल्यालम् अशा दोन भाषांत आहेत संग्रहालयाच्या सुधारणेसाठीं एक योजना सरकारला सादर करण्यात आली असून ती लवकरच कार्यान्वित होईल अशी अपेक्षा आहे

त्रिवेंद्रम् . लोकसंख्या १,८६,९३१

## (१) सरकारी कलाप्रदर्शनालय (श्री चित्रालयम्)

**स्थापना :** १९३५

**पूर्वेतिहास :** श्री चित्रालयम्‌ची स्थापना २५ सप्टेंबर १९३५ रोजी झाली व त्याचे उद्घाटन त्रावणकोरचे महाराज यांच्या हस्तें झाले सरकारी संग्रहालयाच्या जवळच, शहरातील प्राणीसंग्रहालय व विस्तृत सार्वजनिक उद्यानाच्या प्रांगणातच ते वसलेले आहे

**व्याप्ति व संग्रह :** श्री चित्रालयम् हें या राज्याचें कलाप्रदर्शनालय असून तेथ आशियायी कलाकारांनी काढलेली रंगचित्रें असून ती पुढीलप्रमाणें आहेत : (अ) आधुनिक भारतीय रंगचित्रें (ब) हिंदी-युरोपीय रंगचित्रें, (क) मोंगल शैलीतील रंगचित्रें, (ड) रजपूत शैलीतील रंगचित्रें, (इ) संक्रमणकालीन रंगचित्रें, (फ) फारसी शैलीतील रंगचित्रें, (ग) चिनी शैलीतील रंगचित्रें, (ह) जपानी शैलीतील रंगचित्रें व (ज) भित्तिचित्रें

**शैक्षणिक कार्य :** कलाप्रदर्शनालयाचा देखरेख करणारा हा मार्गदर्शक व्याख्याता म्हणूनहि काम करतो प्रदर्शनालयात एक लहानसें विभागीय ग्रंथालय असून त्यात २९२ पुस्तकें आहेत रंगचित्रें, कधींकधीं उसनवारीने दिलीं जातात नांवाच्या सर्व चिट्ठ्या इंग्रजींत आहेत स्थानिक व बाहेरच्या शाळा व महाविद्यालयांतील विद्यार्थी वारंवार प्रदर्शनालय पहावयास येतात

**प्रकाशनें :** प्रशासनविषयक अहवाल व सचित्र पोस्टकार्डे

**कामाचे तास :** सोमवार व अयणीपुरप्पु दिन, थिरु ओणम्, भारत, स्वातंत्र्य दिन व प्रजासत्ताक दिन हे सुट्टीचे दिवस सोडून इतर सर्व दिवशी सकाळी ८ ते संध्याकाळी ६ पर्यंत सुरू असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** श्री चित्रालयम् हें सरकारच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखाली असून, संस्थाप्रमुख म्हणून एक अधिकारी नेमला आहे

**सेवकवर्ग :** प्रभारी अधिकारी—श्री ए श्रीधर मेनन, एम् ए, ए एम (हार्वर्ड), दोन कारकून, लघु-टंकलेखक, देखरेख करणारा अधिकारी, दहा शिपाई, दोन माळी, रात्रपाळीचा पहारेकरी व दोन झाडूवाले

**आर्थिक तरतूद :** अर्थसंकल्पांतील एकूण अनुदान रु ४२,४०० इतकें आहे

**अभिप्राय :** रोज येणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या २७५ आहे व वार्षिक संख्या ७२,००० आहे तथापि, श्री पद्मनाभ मंदिराचा आरत दिन, ओणम, नाताळ व ईस्टर अशा विशेष प्रसंगीं प्रेक्षकांची गर्दी अधिक होते संग्रहालयाची इमारत पुरेशी असली तरी राखीव संग्रहाचा साठा करण्यासाठी अथवा प्रयोगशाळेसाठी तीत जागा नाहीं इमारतींत एक रंगचित्रागारहि आहे.

या संग्रहांतील वस्तु मुख्यत्वें खरेदीच्या व देणगीच्या द्वारें तसेंच उसनवार मिळविल्या आहेत या कलाप्रदर्शनालयास गुप्त निधींतील वस्तु स्वीकारण्यास मान्यता मिळालेली नाहीं समकृतींची अदलाबदल करण्याची या प्रदर्शनालयास परवानगी आहे हें कलाप्रदर्शनालय कलागमहाल्यात सामील करून घेण्याच्या प्रकारे सरकार सध्या विचार करीत आहे

## (२) सरकारी संग्रहालय, त्रिवेंद्रम

**स्थापना :** इ स १८५७

**पूर्वेतिहास :** त्रिवेंद्रम संग्रहालयाची स्थापना १८५७ मध्ये झाली १८५९ मध्ये संग्रहालयाभोवतालच्या सुमारें ६० एकर जमिनीचें बगीच्यांत व प्राणीसंग्रहालयांत रूपांतर करण्यात आले सध्याची इमारत १८८० मध्यें बांधली गेली सुरुवातीपासून सन १८९८ पर्यंत संग्रहालयाची व्यवस्था एका समितीमार्फत पाहण्यात येत होती याच वेळीं पहिल्या संचालकाची नेमणूक करण्यात आली राज्यातील सृष्टिविज्ञान, कला व उद्योगधंदे यांच्या नमुन्यांचा संग्रह असलेला हा संग्रह हळूहळू वाढूं लागला व सन १९३० पर्यंत संग्रहालयात वस्तूंची अतिशय दाटी झाली व जागा अपुरी पडूं लागली सन १९४२ मध्यें सृष्टिविज्ञान विभाग समुद्रालगत असलेल्या दुसऱ्या इमारतींत हलविण्यात आला, परंतु सन १९५० मध्यें तो पुन्हा सध्याच्या इमारतींत आणण्यात आला या मुदतींत या इमारतींत फक्त कलाविभाग होता १९०८ सालापासून या विभागाचा कारभार अवैतनिक संचालक व संपूर्ण वेळ काम करणारा एक अधीक्षक यांच्याकडे सोंपविण्यात आला तेव्हापासून निरनिराळ्या विभागाच्या कारभारात निरनिराळ्या पद्धति होत्या परंतु सन १९४९ मध्यें कोचीन व त्रावणकोर हीं संस्थानें एकत्रित झाल्यामुळे हीं संग्रहालयें, प्राणीसंग्रहालयें व उद्यानें हीं संग्रहालय व प्राणीसंग्रहालय संचालक यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालीं आणण्यात आलीं

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहांत त्रावणकोर-कोचीनच्या, कलावस्तु, हस्तव्यवसायवस्तु, पुराणवस्तु, नाणीं व सृष्टिविज्ञानविषयक वस्तु इत्यादि ठेवलेल्या आहेत

**शैक्षणिक कार्य :** विभागाच्या उपयोगासाठीं दुर्मिळ व महत्त्वाचीं पुस्तकें व नियतकालिकें असलेलें एक चांगलें ग्रंथालय आहे परंतु संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांना तसेंच जिज्ञासु लोकांनाहि त्याचा उपयोग करण्याची परवानगी देण्यात येते संग्रहालय दाखविण्यासाठीं संग्रहालयाच्या सेवकवर्गांत दोन मार्गदर्शक आहेत महाविद्यालयांतील व शाळांतील विद्यार्थी व अध्यापकवर्ग संग्रहालयाचा बराच उपयोग करून घेतात आणि आपल्या पुस्तकी ज्ञानात भर घालण्यासाठीं संग्रहालयांतील वस्तूंचा अभ्यास करतात

**प्रकाशनें :** वार्षिक प्रशासकीय अहवाल, सचित्र पोस्टकार्डे व मार्गदर्शिका

**कामाचे तास :** सोमवारखेरीज सर्व दिवशीं सकाळीं ८ ते संध्याकाळीं ६ वाजेपर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** त्रिवेंद्रम येथील संग्रहालय व प्राणीसंग्रहालय व उद्यान आणि त्रिचूर येथील संग्रहालय व प्राणीसंग्रहालय मिळून केरळ राज्याच्या संग्रहालयाचा व प्राणीसंग्रहालयाचा विभाग बनला आहे व तें संग्रहालय व प्राणीसंग्रहालय संचालक यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग, सृष्टिविज्ञानशाखा :** संग्रहालयाध्यक्ष—श्री एन्. जी पिळ्ळे, बी ए, पेंढा भरणारा, गार्डसमन, नमुने गोळा करणारा, प्रयोगशाळा साहाय्यक (वरिष्ठ), प्रयोगशाळा साहाय्यक (कनिष्ठ), एक झाडूवाला धरून नऊ कामगार

**कलाशाखा :** श्री एन्. गोपालकृष्णन् उन्नियन्, बी ए. (ऑनर्स), क्युरेटर, संग्रहालय साहाय्यक, प्रदर्शनविभाग साहाय्यक, मार्गदर्शक, संपूर्ण वेळ काम करणारे दहा कामगार व अर्ध वेळ काम करणारे दोन कामगार

**आर्थिक तरतूद :** कलाशाखेसाठीं अंदाजपत्रकांतील वार्षिक तरतूद २२,००० रु इतकी आहे बागेच्या संग्रहालयासाठीं व प्राणीसंग्रहालयासाठीं दरवर्षी असलेली १,८०,००० रुपयांची रकम त्यांत धरलेली नाहीं

**अभिप्राय :** संग्रहालय शहराच्या मध्यभागी असून तेथें लोकांना सहज जातां येतें. संग्रहालय पहावयास येणाऱ्या प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या १,११० इतकी आहे व वार्षिक सरासरी ३,२५,००० इतकी आहे. देवळांच्या स्थानिक तसेंच राष्ट्रीय उत्सवांच्या वेळीं व रजेच्या दिवसांत प्रेक्षकांची संख्या वाढीव असते. संग्रहालयाची इमारत अपुरी आहे व वस्तूंचा संग्रह ठेवण्यासाठीं जागा व प्रयोगशाळेची सोय नाहीं. मधूनमधून खास प्रदर्शनें भरविली जातात. या संग्रहालयांतील वस्तु संशोधन, खरेदी, उत्खनन, देणगी व अदलाबदल इत्यादि विविध मार्गांनी संपादन केल्या आहेत. गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं या संग्रहालयास मान्यता मिळालेली आहे. गरज लागेल त्याप्रमाणें समकृतींची व प्रकाशनांची अदलाबदल करण्याची व्यवस्था वेळोवेळी करण्यांत येते. वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व मल्याळम् या दोन भाषांत लिहिलेल्या आहेत.

## मध्यप्रदेश

**भिलसा ( विदिशा ) :** लोकसंख्या १५,१८४

### विदिशा संग्रहालय

**स्थापना :** सन १९४०

**पूर्वेतिहास :** सन १९४० मध्यें एक स्थानिक जहागिरदार खाणींतून दगड काढीत असतांना त्यास मिळाला येथें सुंदर प्रतिमा सांपडल्या. कलेच्या दृष्टीनें त्या उत्तम असल्यामुळें व पुरातन विदिशा नगरीचें हुबेहूब चित्र सादर करण्याच्या दृष्टीनें महत्त्वाच्या असल्यामुळें अशा प्राचीन वस्तूंचा संग्रह करून एक संग्रहालय स्थापन करावें अशी कल्पना निघाली. अनेक प्राचीन वस्तु वेळोवेळीं एकत्र करण्यांत आल्या आणि त्यामध्यें इसवी सनापूर्वीच्या काळांतील अखंड दगडाची एक मोठी यक्षाकृति विशेष उल्लेखनीय आहे. नवीन इमारत बांधून होईपर्यंत या सर्व वस्तु डाक बंगल्यांत ठेवण्यांत आल्या आहेत.

**व्याप्ति संग्रह :** या संग्रहांत, विदिशा शहरांमध्यें, किल्ल्याच्या अवशेषांत, नदीच्या पात्रांत व इतर ठिकाणीं सांपडलेल्या पुरातन वस्तु आहेत. त्यांत सुमारें १५० शिल्पाकृति व शिलालेख आहेत.

**शैक्षणिक कार्य :** कांहीं नाहीं.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं.

**कामाचे तास :** सोमवारखेरीज सर्व दिवशीं सकाळीं ७ ते दुपारी १ व दुपारी ३ ते संध्याकाळीं ६ वाजेपर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय पुराणवस्तुविभाग संचालक, मध्यप्रदेश, यांच्या अधिकाराखालीं आहे.

**सेवकवर्ग :** मार्गदर्शक व रक्षक—श्री. राजमल जैन मायवैय्या.

**आर्थिक तरतूद :** माहीत नाहीं.

**अभिप्राय :** हें संग्रहालय सध्यां तयार होत असून संग्रहालयासाठीं मौल्यवान वस्तु संग्रहित करण्यांत येत आहेत व संग्रहालयाची इमारत बांधून पूर्ण होईल तेव्हां त्या तेथें ठेवण्यांत येतील. हें संग्रहालय पुराणवस्तुविभाग संचालक, मध्यप्रदेश, यांच्या नियंत्रणाखालीं असून तें श्री. राजमल जैन यांच्या ताब्यांत आहे. श्री. जैन हे या संग्रहालयासाठीं आसपासच्या ठिकाणाहून शिल्पकृति, नाणीं व इतर पुरातन वस्तु जमवीत असतात. तसेंच संग्रहालयांतील वस्तूंत भर घालून या पुरातन ठिकाणास शोभेल असें स्वरूप प्राप्त करून देण्याचा ते सतत प्रयत्न करीत असतात.

**भोपाळ :** लोकसंख्या १,०२,३३३

### मध्यवर्ति संग्रहालय

**स्थापना :** सन १९४९

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय तारीख २० एप्रिल १९४९ रोजीं स्थापन करण्यांत आलें आणि सरकारी हमिदिया महाविद्यालयाचे अधिकारी त्यास शैक्षणिक संग्रहालयाचें स्वरूप देण्याचा प्रयत्न करीत आहेत.

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयांत रंगचित्रें, नाणीं, चिनी मातीचीं भांडीं, धातूंचीं व हस्तिदंती खेळणीं, लाकडांवरील काम, चिलखत वगैरेंचा संग्रह आहे.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयास जोडून एक मोठें ग्रंथालय आहे व त्यांत २०,००० पुस्तकें आहेत. हें ग्रंथालय जनतेस खुलें आहे. संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांना संग्रहालयांतील वस्तूंची माहिती संग्रहालय साहाय्यक देत असतात. वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठ्या इंग्रजींत लिहिलेल्या आहेत.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं.

**कामाचे तास :** रविवार व सरकारी सुट्या खेरीजकरून सर्व दिवशीं सकाळीं १०–३० ते संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** सध्यां हें संग्रहालय सरकारी हामिदिया महाविद्यालयाच्या प्राचार्यांच्या नियंत्रणाखालीं असून ते या संग्रहालयाचे संग्रहालयाध्यक्ष म्हणूनहि काम पाहतात.

**सेवकवर्ग :** संग्रहालय साहाय्यक, द्वारपाल व दोन शिपाई.

**आर्थिक तरतूद :** केंद्रीय दप्तर कार्यालयाच्या अंदाजपत्रकाच्या रकमेंतून सध्यां या संग्रहालयाचा खर्च भागविण्यांत येतो. संग्रहालयाच्या अंदाजपत्रकाबाबत सरकार विचार करीत आहे.

**अभिप्राय :** संग्रहालय सोयिस्कर ठिकाणीं आहे. संग्रहालय दुसऱ्या इमारतींत नेण्याच्या प्रश्नावर सरकार विचार करीत आहे. हें संग्रहालय नुकतेंच स्थापन झालेलें असल्यानें त्याचा अजून विकास व्हावयाचा आहे. संग्रहालयांत सध्यां असलेल्या वस्तु मुख्यत्वें खरेदी करून जमविलेल्या आहेत.

**धार :** लोकसंख्या २३,६५२

### जिल्हा पुराणवस्तु संग्रहालय

**स्थापना :** सन १९०२

**पूर्वेतिहास :** सुमारें १८७२ सालीं धार शहराचा राजवाडा व त्याच्याजवळ असलेली विहीर यांच्या भग्नावशेषांत सांपडलेल्या प्राचीन वस्तु दिवंगत महाराजा आनंदराव पवार, धारचे ३ रे महाराज, मध्य भारतांतील त्यावेळचे पोलिटिकल एजंट मेजर किनकेड व कॅप्टन बार्नेस यांनीं दाखविलेली आस्था, त्यानंतर भारताचे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांनीं दिलेली भेट आणि या सर्व गोष्टींपेक्षा अधिक महत्त्वाची बाब म्हणजे कै. के. के. लेले यांनीं लावलेला, धार येथील भोजशाळेच्या खांबावर कोरलेले शिलालेख व नागबंध यांचा शोध, या सर्व गोष्टी धार संस्थानांत पुराणवस्तुविभाग व

या संग्रहालयांत प्रदर्शित केलेल्या वस्तु ख्रिस्तपूर्व ३ ऱ्या शतकापासून ख्रिस्ताच्या शकानंतरच्या १७ व्या शतकापर्यंतच्या काळांतील देशाच्या या भागांतील कला व संस्कृतीच्या निदर्शक आहेत पवयाच्या स्तंभावरची तालवृक्ष शीर्षाकृति, उदयगिरीची स्तंभावरची सिंहशीर्षाकृति, मणिभद्र यक्ष आणि इतर प्राचीन यक्षीच कामें, बाघ येथील 'एक आई व तिचें मूल' ही उत्कृष्ट कलाकृति आणि इतर गुप्तकालीन व मध्ययुगीन शिल्पकृति, पवया येथील मातीच्या अनेक सुंदर शीर्षाकृति, तुमेन येथील कुमारगुप्ताचे व इतर शिलालेख, बाघ लेण्यांतील ताम्रपट, नाण्यांचा प्रातिनिधिक संग्रह, भित्तिचित्रांच्या सुंदर प्रतिकृति, रजपूत व मोगलकालीन रंगचित्रें ह्या वस्तु या संग्रहालयांतील वस्तूंमध्यें विशेष उल्लेखनीय आहेत

**शैक्षणिक कार्य :** पुराणवस्तु विभागाचें ग्रंथालय संग्रहालयाच्या उपयोगासाठींहि उपलब्ध असतें प्रसंग पडेल तेव्हां जिज्ञासु वाचकांना संदर्भ ग्रंथ वगैरे दिले जातात कधींकधीं संग्रहालयाध्यक्ष स्वत:, संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या प्रेक्षकांस संग्रहालयांतील वस्तु दाखवितात पुराणवस्तूंच्या दीप चित्रांचा (कँदिलेच्या स्लाईड्सचा) एक संग्रह असून तीं आवश्यक तेव्हां दाखविण्यांत येतात पुराणवस्तु विभागाच्या मदतीनें ह्या वस्तूंचीं छायाचित्रें घेण्याची व्यवस्था संग्रहालयास करतां येते या संग्रहालयाकडून खास व नियतकालिक प्रदर्शनें भरविण्यांत येत नसलीं तरी हें वस्तु उसनवार देऊन या बाबतीत सहकार्य करतें वस्तूंवरील नावाच्या चिठ्ठया इंग्रजी व हिंदी या दोन भाषांत लिहिलेल्या आहेत वस्तूंची माहिती देतांना, उदाहरणार्थ, वास्तु-शास्त्र, शिल्पकला व पोषाख, यांची तत्कालीन विशद करून सांगतांना रेखाचित्रें व मोठ्या आकारांत करवून घेतलेलीं छायाचित्रें यांचा उपयोग करण्यांत येतो

**प्रकाशनें :** (१) ग्वाल्हेर येथील पुराणवस्तु संग्रहालयाची मार्गदर्शिका, (२) पुराणवस्तु संग्रहालयांतील शिल्पकृतींचें माहिती पुस्तक आणि (३) सचित्र पोस्टकार्डें

**कामाचे तास :** सोमवार व इतर सरकारी सुट्या खेरीज सर्व दिवशीं नोव्हेंबर ते मार्च या महिन्यांत सकाळीं ८ ते ११ पर्यंत व दुपारीं २ ते संध्याकाळीं ५ पर्यंत आणि एप्रिल ते ऑक्टोबर या महिन्यांत सकाळीं ७ ते १० वाजेपर्यंत व दुपारीं ३ ते संध्याकाळीं ६ वाजेपर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय पुराणवस्तु व संग्रहालय विभागाचे उपसंचालक, मध्यप्रदेश, यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री एच्. एच्. के कोडेसी, एम्. ए., एक मार्गदर्शक, दोन रखवालदार, एक माळी, एक रात्रीचा पहारेकरी व एक झाडूवाला.

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अंदाजपत्रक १२,९०० रु. चें आहे

**अभिप्राय :** बृहद् ग्वाल्हेर हें लष्कर, ग्वाल्हेर व मोरार या तीन शहरांचें बनलेलें आहे आणि हें संग्रहालय लष्कर व मोरार मिळून यांच्यापासून समान अंतरावर ग्वाल्हेर शहराच्या मध्यभागीं आहे दरसाल सुमारें २५,००० लोक हें संग्रहालय पाहाण्यास येतात आणि रोजची सरासरी संख्या ५० आहे वर्षांतील दोन दिवशीं कार्तिक महिन्याच्या शेवटच्या रविवारीं व आश्विन महिन्यात जैन यात्रेच्या वेळीं प्रेक्षकांची बेसुमार गर्दी होते संग्रहालयाची इमारत सुयोग्य असली तरी ती पुरेशी नाहीं उत्खननांत मातीचीं भांडीं व रंगीत मातीच्या वस्तु व काहीं शिल्पकृति मिळाल्या असल्या तरी या संग्रहालयांतील शिल्पकृति मुख्यत्वें संशोधन करून मिळविलेल्या आहेत रंगचित्रें व धातूच्या मूर्ति या खरेदी केलेल्या आहेत संग्रहालयांतील नाणीं मुख्यत्वेंकरून गुप्त निधींतून मिळालेलीं असलीं तरी कांहीं नाणीं खरेदी केलेलीं आहेत व काहीं खाजगी नाणींसंग्रहांतून काहीं देऊन त्यांच्या बदल्यांत मिळविलेलीं आहेत देणगी म्हणूनहि काहीं नाण्यांचा संग्रह मिळाला आहे प्रदर्शनांत ठेवलेल्या वस्तूंची चांगल्या रीतीनें माहिती देण्यासाठीं उदाहरणार्थ, पुराणवस्तु, शिल्पकृति व पोषाख यांची उत्पत्ति विशद करून सांगण्यासाठीं, छायाचित्रें व रेखाचित्रें यांचा उपयोग करण्यांत येतो. हें संग्रहालय भारतीय संग्रहालय सभेचें सदस्य आहे

## (४) राज्य संग्रहालय, जमना बाग

**स्थापना :** सन १९१०

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय हिज हायनेस लेफ्टनंट जनरल के सर माधवराव शिंदे यांनी २० व्या शतकाच्या प्रारंभीं स्थापन केलें व त्यासाठीं राजवाड्याच्या एका प्रशस्त दालनाचा उपयोग करण्यांत आला प्रथम तें प्राणिसंग्रहालय म्हणून सुरू करण्यात आलें होतें, परंतु नंतर १९२२ साली प्रिन्स ऑफ वेल्स यांनी ग्वाल्हेरास भेट दिली त्या वेळीं तें सध्यांच्या जमना बाग कोठी या इमारतींत हलविण्यात आलें.

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयात पुढील विभाग आहेत (अ) सृष्टि विज्ञान विभाग, (ब) शस्त्रागार विभाग, (क) कला विभाग, (ड) नाणी-विभाग, (इ) हस्तिदंती व लाकडी वस्तूंचा विभाग, (फ) पितळेच्या वस्तूंचा विभाग, (ग) वन्यवस्तु विभाग, (ह) प्राचीनवस्तु विभाग व (आय्) भूस्तर विभाग

**शैक्षणिक कार्य :** शाळांतील मुलांची व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांचीं पथकें आपल्या अध्यापकांसह संग्रहालय पहावयास येतात वस्तूंवरील नावाच्या चिठ्ठया इंग्रजी व हिंदी या दोन भाषांत लिहिलेल्या आहेत

**प्रकाशनें :** कांहीं नाहींत

**कामाचे तास :** सोमवार व इतर सुट्टयांचे दिवस खेरीज करून सर्व दिवशीं उघडें असतें उन्हाळ्यात सकाळीं ७ ते ११ वाजेपर्यंत व हिंवाळ्यांत दुपारीं २ ते संध्याकाळीं ६ वाजेपर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** लष्कर येथील नगरपालिका या संग्रहालयावर एका अधिकाऱ्यामार्फत सर्वसाधारण देखरेख ठेवते

**सेवकवर्ग :** प्रभारी अधिकारी—श्री बी गुर्जर, एक कारकून व एक शिपाई

**आर्थिक तरतूद :** सरकार दरसाल ४,४०० रु. इतकें ठराविक अनुदान देतें आणि बाकीचा खर्च नगरपालिका करते

**अभिप्राय :** हें संग्रहालय एका सुशोभित बगीच्यात असून प्राणीसंग्रहालयहि तेथेंच आहे प्रेक्षकांची संख्या दरदिवशीं १०० ते ३०० पर्यंत असते व १९५२ सालीं संग्रहालय पाहून गेलेल्या व्यक्तींची एकूण संख्या ४०,००० इतकी होती संग्रहालयाच रात्रंदिवस पाळीपाळीनें पहारा करण्यासाठीं दोन पहारेकरी आहेत नाणीं विशेष बंदोबस्तांत ठेवलेलीं आहेत

संग्रहालयात थोडीं पुस्तकें आहेत, परंतु संग्रहालयाला जोडून असें ग्रंथालय नाहीं संग्रहालयातील वस्तु खरेदीच्या व देणगीच्या मार्गानें व अदलाबदल करून जमविल्या आहेत

**इंदूर :** लोकसंख्या ३,१०,८५९

## केन्द्रीय संग्रहालय

**स्थापना :** सन १९२९

**पूर्वेतिहास** हें संग्रहालय १९२९ साली स्थापन करण्यात आलें त्यात मुख्यत्वे पुराणवस्तु संग्रहित केल्या होत्या वेळोवेळीं त्याला इतर विभाग जोडण्यात आले सध्या संग्रहालयात सुमार ७,००० वस्तु आहेत संग्रहालयास जोडून नररत्न मंदिर ( हॉल ऑफ् ग्रेट मेन ) या नावाची एक संस्था आहे ती सन १९२२ मध्यें स्थापन करण्यात आली होती, परंतु सन १९३१ मध्यें स्वतंत्र विभाग म्हणून ती संग्रहालयात सामील करून घेण्यात आली तींत सर्व देशाच्या, जातीच्या व धर्माच्या थोर विभूतींची चित्रें असून त्यांचे जीवन व त्यानीं केलेलें कार्य याविषयीं माहिती दिलेली आहे नररत्न मंदिरास जोडून एक चरित्रात्मक ग्रंथालय असून त्यात ७०० ग्रंथ आहेत.

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयात मुख्यत पुराणवस्तु आहेत यात, मूर्तिशास्त्र, नाणेंशास्त्र, पुराणलेखशास्त्र, इतिहास, प्राचीन भांडीं, शस्त्रें व सरंजाम यासारख्या निरनिराळ्या शाखा आहेत पाषाणलेख व विटावरील लेख, ताम्रपट व मुद्रा, दगडाच्या व धातूच्या ब्राह्मण व जैन पद्धतीच्या मूर्ति आणि वास्तुशिल्पाचे कोरीव नमुने आहेत निरनिराळ्या भारतीय शैलींचीं रंगचित्रें आहेत आणि हस्तलिखितें व प्राचीन अलंकार यांचा दुर्मिळ संग्रहहि आहे या संग्रहालयात भूस्तरशास्त्रविषयक व मानववंशशास्त्रविषयक वस्तूंचा एक विभाग तसेंच व्यापारविषयक वस्तु विभाग आहे

**शैक्षणिक कार्य :** विभागाच्या उपयोगासाठीं संग्रहालयाला जोडून एक ग्रंथालय आहे, परंतु कामाच्या वेळात संग्रहालयात या पुस्तकांचा उपयोग करण्याची विद्यार्थ्यांना कधींकधीं परवानगी देण्यात येते संग्रहालयाध्यक्ष, स्थानिक शाळातील विद्यार्थी व अध्यापक याना स्वत संग्रहालय दाखवितात मुलांसाठीं एक लहान विभागही आहे मुख्यत्वेंकरून ग्वाहेरच्या स्मारकाच्या दीपचित्रांचा ( लँटर्न स्लाईडस्चा ) एक लहानसा संग्रह आहे. वस्तूंवरील नावाच्या चिठ्या इंग्रजी व हिंदी या दोन भाषात आहेत

**प्रकाशनें :** " इंदूर येथील संग्रहालय " या नांवाचें पुस्तक

**कामाचे तास :** बुधवार व इतर सरकारी सुट्या खेरीज करून सर्व दिवशीं सकाळीं ११ ते सध्याकाळीं ५ वाजेपर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय पुराणवस्तु व संग्रहालय विभागाचे उपसंचालक, मध्यप्रदेश, याच्या नियन्त्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री पी जी परांजपे, एम् ए , एक मार्गदर्शक, पांच रखवालदार, एक कारकून व एक चौकीदार

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं अंदाजपत्रकात सालिना ११,८०० रुपयांची तरतूद केलेली आहे

**अभिप्राय :** हें संग्रहालय पाहाण्यास दररोज सरासरी ५१ व दरसाल १४,९१२ इतके लोक येतात तथापि जत्रा, परिषदा वगैरेसारख्या विशेष प्रसंगीं प्रेक्षकाची विशेष गर्दी असते संग्रहालयाचा सध्याची इमारत अपुरी व अयोग्य आहे संग्रहालयावर एक रखवालदार रात्रदिवस पहारा करीत असतो नाणीं व इतर मौल्यवान् वस्तु तिजोरींत ठेवण्यात येतात. वस्तु साठवून ठेवण्यासाठीं जागा अपुरी असल्यामुळें प्रदर्शनवस्तूंच्या समकृति कपाटांत ठेवण्यात येतात या संग्रहातील वस्तु प्राय संशोधन करून मिळविण्यात आलेल्या आहेत काहीं गुप्तनिधींतून मिळालेल्या आहेत, तर काहीं खरेदी केलेल्या आहेत आणि फारच थोड्या देणगी दाखल मिळाल्या आहेत

**खजुराहो :** लोकसंख्या ४,०००

## पुराणवस्तु संग्रहालय

**स्थापना :** सन १९१०

**पूर्वेतिहास :** खजुराहो येथील संग्रहालय १९१० सालीं स्थापन करण्यात आलें व त्यास त्या वेळेचे बुंदेलखंडातील पोलिटिकल एजंट मि जार्डिन यांच्या नावावरून जार्डिन संग्रहालय असें नाव ठेवण्यात आलें हा संग्रहालयातील वस्तु जुन्या खजुराहो येथील मंदिराच्या अवशेषांतून मि जार्डिन यानीं शोधून काढून त्या आपल्या संग्रहीं जपून ठेवल्या होत्या विंध्य प्रदेशाच विलीनीकरण झाल्यानंतर हा संग्रह भारताच्या पुराणवस्तुविभागानें आपल्या ताब्यात घेतला व त्यावर देखरेख ठेवण्यासाठीं एक संग्रहालयाध्यक्ष व सेवकवर्ग नेमण्यात आला आता त्यास ' पुराणवस्तु संग्रहालय, खजुराहो ' असें नाव देण्यात आलें आहे

**व्याप्ति व संग्रह :** हें केवळ पुराणवस्तुविषयक संग्रहालय असून त्यात शिल्पकलेचे व वास्तुकलेचे सुमारे २००० नमुने आहेत हा संग्रह विविध व मौल्यवान असून त्यात हा भागातील इ स. च्या १० तें १२ या शतकातील ब्राह्मण, बौद्ध आणि जैन अशा तिन्ही प्रमुख धर्मपंथांचे जाति प्रतिनिधित्व करणाऱ्या कलाकृति देखील भरपूर आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाध्यक्षाला विनंति केल्यास ते विद्यार्थ्यांना व इतर प्रेक्षकाच्या गटास संग्रहालयातील प्रदर्शन वस्तूंची माहिती सांगतात येथील नावाच्या चिठ्या हिंदी व इंग्रजी अशा दोन्ही भाषांत आहेत

**प्रकाशनें :** चन्द्रा आणि धामा यानीं तयार केलेली खजुराहोची मार्गदर्शिका

**कामाचे तास** संग्रहालय दररोज सकाळीं ९ ते संध्याकाळीं ५ पर्यंत उघडें असते

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय, अधीक्षक, संग्रहालय शाखा, पुराणवस्तुविभाग, भारत सरकार, यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री बी एम् नायर, एम् ए , बी ए ( ऑनर्स ), कारकून, चित्रांकनकर्ता, पाच परिचारक आणि एक झाडूवाला

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाचें वार्षिक अंदाजपत्रक १५,६०० रुपयांचें आहे

**अभिप्राय :** संग्रहालय मंदिराजवळील सोयिस्कर जागेत आहे

**नवगांव :** लोकसंख्या ५०,०००.

## राज्य संग्रहालय, धुबेला राजवाडा

**स्थापना :** १९३७

**पूर्वेतिहास :** हे संग्रहालय रेवाचे हिज हायनस के महाराजासाहेब सर गुलाबसिंग जु देव यांनी १९३७ मध्ये स्थापन केले आणि तेव्हाचे रेव्याचे राजे, महाराजा वेंकट रमणसिंग याच्या नावावरून संग्रहालयाचे नाव 'श्री वेंकट सदन संग्रहालय' असें ठेवण्यात आलें संग्रहालयातील वस्तु विंध्य प्रदेशाचे रेवा येथील तेव्हाचे पुराणवस्तुविभागाचे अधीक्षक याच्या प्रयत्नानें मिळाल्या संग्रहालयाचें उद्घाटन, विंध्य प्रदेशाचे राज्य संग्रहालय म्हणून १२ सप्टेंबर १९५६ रोजी पंडित जवाहरलाल नेहरू याच्या हस्तें करण्यात आलें

**व्याप्ति आणि संग्रह :** संग्रहालयातील प्रदर्शन-वस्तूंचा संग्रह हा मुख्यत पुराणवस्तुविषयक असून त्याचे पुढीलप्रमाणें गट पाडता येतील (क) प्रतिमा आणि शिल्पकृति, (ख) ताम्रपट आणि शिलालेख, (ग) ताम्याची उपकरणें, (घ) नाणीं, (च) भाजलेल्या मातीच्या शोभेच्या वस्तु, (छ) चित्रांचा प्रदर्शनविभाग, (ज) खनिज पदार्थ, (झ) रेवाच्या महाराजांच्या घराण्यातील परंपरागत वस्तु, (ट) लाकडावरील आणि हस्तीदंतावरील कोरीव काम आणि (ठ) इतर संकीर्ण वस्तु

शिल्पकलेचा प्रदर्शनविभाग अत्यंत मौल्यवान व महत्त्वाचा असून त्यात तीर्थंकराच्या व यक्षयक्षिणींच्या जैनधर्मीय सुंदर मूर्ति आहेत येथें असलेल्या ब्राह्मणी मूर्तींत भेडाघाटच्या योगिनींच्या मूर्तींशीं बरेंच साम्य असलेल्या, गोर्गी येथील देवतांच्या मूर्तींचा एक आकर्षक संच असून शिव, विष्णु आणि इतर देवादिकांच्या अनेक मूर्ति तसेंच भागवत, रामायण आणि इतर ग्रंथातील प्रसंगांवरील चित्रें आहेत

पुरालेखविद्याविषयक विभागात कुशाण आणि गुप्त कालांतील शिलालेख, ९ व्या शतकातील ताम्रपटावर लिहिलेलें अनुदान, दस्तऐवज, तसेंच कलचुरींचे कित्येक मध्ययुगीन शिलालेख आणि काहीं चित्तवेधक सतीवृंदावनें आहेत

**शैक्षणिक कार्य :** पूर्वी संग्रहालयाला जोडून असलेलें वाचनालय आता वेगळें काढण्यात आलें असून त्याची देखरेख शिक्षण विभागाद्वारें केली जाते संग्रहालयाकडून कोणत्याहि खास शैक्षणिक सवलती दिल्या जात नसल्या तरी शैक्षणिक संस्थांत संग्रहालयाबद्दल आकर्षण असून अलाहाबाद व बनारस विद्यापीठांतून उच्च शिक्षण घेणारे विद्यार्थी संग्रहालयाला अधूनमधून भेटी देतात

**प्रकाशनें :** राज्य संग्रहालय, धुबेला, नवगांव याची मार्गदर्शिका, लेखक—श्री एस्. के दीक्षित, एम्. ए., किंमत एक रुपया

**कामाचे तास :** रविवार आणि इतर राजपत्रित सुट्ट्यांच्या दिवसांखेरीज रोज संग्रहालय सकाळीं १०–३० ते सायंकाळीं ४–३० पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार मध्यप्रदेश सरकारकडे आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष श्री. एस्. के दीक्षित, एम्. ए., डिप्लोमा, लीग, छायाचित्रकार व मानचित्रकार, दोन कारकून, दफ्तरी, दोन चौकीदार आणि एक माळी

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं केली जाणारी निश्चित अंदाजपत्रकीय तरतूद कळलेली नाहीं

**अभिप्राय :** संग्रहालय नवगाव येथें सोयीच्या ठिकाणीं बांधलेलें असून वर्षातून सरासरी ५६९१ आणि दररोज सरासरी १६ प्रेक्षक भेट देण्यासाठीं येतात नाणीं आणि इतर मौल्यवान् वस्तूंच्या सुरक्षिततेची जबाबदारी पहारेकऱ्यावर आहे संग्रहालयातील वस्तु संशोधन, खरेदी, पुरानिधि-संशोधन आणि उत्खनन या मार्गांनीं मिळविल्या जातात अजूनपर्यंत तरी समकृतींच्या देवाणघेवाणीची व्यवस्था झालेली नाहीं सर्व नावाच्या चिठ्या इंग्रजींतून आहेत.

**रायपूर :** लोकसंख्या ८९,८०४

## महंत घासीदास स्मारक संग्रहालय

**स्थापना :** १८७५

**पूर्वेतिहास :** मध्यप्रदेशाच्या छत्तिसगड जिल्ह्यात ठीं असलेल्या या प्रादेशिक संग्रहालयाची व्यवस्था राज्य सरकारकडे आहे नांदगावच्या राणीसाहेबा ज्योतिदेवी आणि त्यांचे चिरंजीव राजासाहेब दिग्विजयदास यांनीं दिलेल्या १,५०,००० रुपयांच्या उदार देणगींतून संग्रहालयाची इमारत बांधण्यात आली आहे

त्यानींच 'महंत सर्वेश्वरदास वाचनालय' सुरू करण्याकरिता ५०,००० रुपयांची देणगी दिली सध्या हें वाचनालय संग्रहालयाच्या प्रेक्षागृहात आहे नांदगाव येथील के महंत घासीदास यांनीं १८७५ मध्यें स्थापन केलेलें आणि जनपदसभेची उपसमिति म्हणून काम करणाऱ्या संग्रहालय निधि समितीच्या कारभाराखालीं असलेलें जुनें रायपूर संग्रहालय ह्या नव्या संग्रहालयात समाविष्ट करण्यात आलें आहे नव्या इमारतींतील ह्या संग्रहालयाचें व वाचनालयाचे उद्घाटन ता २१ मार्च १९५३ रोजीं राष्ट्रपति डॉ राजेन्द्रप्रसाद याच्या हस्ते झाले दुमजली इमारतींतील या संग्रहालयाला पुढील दर्शनी दिवाणखाना असून दिवाणखान्याच्या पूर्वेला दोन प्रदर्शन-विभाग, दक्षिणेकडे एक प्रेक्षागृह, तळमजल्यावर कार्यालयाकरिता चार खोल्या व भांडार, आणि दर्शनी दिवाणखान्याच्या जवळच दोन प्रदर्शन विभाग आहेत. संग्रहालयाच्या सभोंवतालीं भरपूर हिरवळ राखलेला एक बगीचा असून प्रेक्षकांच्या सोयीच्या दृष्टीनें संग्रहालय या बगीचाची व्यवस्था पाहतें

**व्याप्ति आणि संग्रह :** संग्रहालयातील प्रदर्शन-वस्तु मुख्यत्वेंकरून प्रादेशिक असल्या तरी कांहीं वस्तु राज्याच्या इतर भागांतून व इतर राज्यांमधूनदेखील आणल्या आहेत संग्रहालयाचे पुराणवस्तुशास्त्र, मानवशास्त्र, सृष्टिविज्ञान, कला व हस्तव्यवसाय आणि रंगीत चित्रें असे पांच विभाग पाडले आहेत

दर्शनी दिवाणखान्यात आधुनिक भारतीय रंगीत चित्रांचा संग्रह ठेवला आहे दिवाणखान्याच्या पूर्वेकडील प्रदर्शनविभागांत कला आणि हस्तव्यवसाय शाखा असून त्यात बनारस व जयपूर येथील साच्या व कोरीव काम केलेल्या धातूंच्या वस्तु, आग्र्याच दगडावरील जडावाचे काम आणि उठावदार कोरीव काम, आग्रा, जयपूर आणि बिजनोर येथील लाखकाम केलेलें आणि इतर शोभिवंत लाकडी सामान, जयपूर, मुंबई आणि सुनार येथील मातीची नक्षीदार भांडीं, उत्तर गुजरातेंतील विसनगर येथील एक लाकडी टेबल, मुंबई येथील एनॅमलच्या वस्तु व लखनौचें बिदरीकाम इत्यादि वस्तु आहेत

प्रदर्शनविभागाच्या पूर्वेच्या बाजूस पुराणवस्तुविषयक शाखा असून त्यात गुप्तवंशकालोत्तर व कलचुरींच्या चित्तवेधक शिल्पकृति, सिरपूर येथील इ. स. च्या ७ व्या व ८ व्या शतकातील, बुद्ध व बोधिसत्त्वाच्या सुरेख कोरीव लेख असलेल्या मूर्तींचा समावेश असणाऱ्या ब्रॉंझच्या वस्तूंचा एक छोटासा संग्रह आहे. ह्याच विभागात इ. स. च्या २ ऱ्या शतकामधील, किरारी ह्या ठिकाणचा कोरीव लेख लिहिलेला एक लाकडी खांब, आणि दक्षिण कोसल येथील शरभपूर, सोमवंशी आणि कलचुरींचे ताम्रपट आहेत. व्हरांड्यात शिलालेख आणि शिल्पविषयक वस्तु ठेवलेल्या आहेत. संग्रहालयातील मानवशास्त्रविषयक वस्तूंत मुख्यतः छत्तीसगड विभागांतील आदिवासींकडून वापरली जाणारीं वस्त्रें, शिरोभूषणें, अलंकार, घरगुती वापराच्या वस्तु आणि वाद्यें यांचा समावेश होतो. येथें शस्त्रें आणि शस्त्रागार यांसाठींहि एक शाखा आहे.

**शैक्षणिक कार्य :** प्रेक्षक आणि शाळा-कॉलेजांतील विद्यार्थी यांना प्रदर्शनवस्तु दाखविण्याचें काम प्रदर्शनविभाग साहाय्यक करतात. येथें सार्वजनिक उपयोगाकरितां एक स्वतंत्र वाचनालय असून त्यांत इंग्रजी, संस्कृत, मराठी व इतर भाषांतील दहा हजार पुस्तकें आहेत. विभागाच्या उपयोगासाठीं व संशोधनाकरितां एक वेगळें वाचनालय असून त्यांत सुमारें २००० पुस्तकें व नियतकालिकें आहेत.

**प्रकाशनें :** (१) १९५३ मध्यें संग्रहालयाचें उद्घाटन झालें त्या प्रसंगी प्रकाशित केलेला स्मारकग्रंथ, (२) संग्रहालयांतील शिलालेख आणि देणगीदाखल मिळालेले अनुदानासंबंधींचे ताम्रपट यांसंबंधीची वर्णनात्मक सूचि, (३) नाण्यांची यादी व (४) सचित्र पोस्टकार्डें.

**कामाचे तास :** सोमवार आणि प्रजासत्ताक दिन, दिवाळी, होळी व दसरा यांखेरीज इतर सुट्ट्यांखेरीज रोज सकाळीं ९ ते संध्याकाळीं ५ पर्यंत संग्रहालय खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाची व्यवस्था मध्यप्रदेश सरकारच्या शिक्षणखात्यांतील डायरेक्टर, पुरातत्त्वशास्त्र आणि संग्रहालयें, भोपाळ यांच्याकडे आहे.

**सेवकवर्ग :** सहाय्यक संग्रहाध्यक्ष : श्री बी. सी. जैन, एम्. ए., प्रदर्शन विभाग सहायक, वाचनालय प्रमुख, कारकून, दफ्तरी, नऊ चपराशी, चौकीदार, पहारेकरी व झाडूवाला.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाचें वार्षिक अंदाजपत्रक ३०,००० रुपयांचें आहे.

**अभिप्राय :** नव्या जागी केलेल्या व नव्यानेंच बांधलेल्या इमारतींत संग्रहालयाचें आताचें स्थलांतर झालेलें आहे. नव्या इमारतींत प्रेक्षागृहासह इतर सर्व सुखसोयी असल्यामुळें हें संग्रहालय प्रादेशिक नैपुण्याची गरज भागवू शकेल असें वाटतें. रोज सुमारें ५५० प्रेक्षक संग्रहालयास भेट देण्यासाठीं येतात. महाशिवरात्र मेळ्याचा दिवस आणि दसऱ्याचा दिवस अशा खास प्रसंगी प्रेक्षकांची रोजची संख्या ५००० इतकी वाढते.

**सागर :** लोकसंख्या ६६,४४२

## पुराणवस्तुशास्त्रविषयक संग्रहालय, सागर विद्यापीठ

**स्थापना :** १९५१

**पूर्वेतिहास :** महाकोसल विभागांतील पुराणवस्तुशास्त्रविषयक वस्तु एकत्रित करण्याच्या उद्देशानें हें संग्रहालय सन १९५१ मध्यें स्थापन करण्यात आलें.

**व्याप्ति आणि संग्रह :** संग्रहालयांत इतिहासपूर्वकालीन साधनें, शिल्पकृति, भाजलेल्या मातीच्या शोभेच्या वस्तु, शिलालेख, नाणीं, मणी वगैरेंचा एक प्रातिनिधिक संग्रह आहे. सागर विद्यापीठाच्या पुराणवस्तुशास्त्रविभागानें जबलपूर जिल्ह्यांतील त्रिपुरी आणि रायपूर जिल्ह्यातील सिरपूर या दोन ठिकाणीं उत्खनन करून अनेक पुरातन वस्तु मिळविलेल्या असून त्या आणि सागर जिल्ह्यांत उत्खननाशिवाय सापडलेल्या वस्तु संग्रहालयात ठेवण्यात आल्या आहेत व त्यांची संख्या २००० हून अधिक आहे.

**शैक्षणिक कार्य :** विभागीय उपयोगासाठीं संग्रहालयात सुमारें ५०० पुस्तकें आणि नियतकालिकें असलेलें एक वाचनालय आहे. संग्रहालयांतील प्रदर्शन-वस्तूंची माहिती विभागीय सेवकवर्गाकडून पुरविली जाते. तसेंच अधूनमधून व्याख्यानेंही होतात. विद्यार्थ्यांकरितां दिव्यानें दाखविण्याच्या काचचित्रांचा एक संग्रह केलेला असून वेळोवेळीं प्रदर्शनेंहि भरविलीं जातात. संग्रहालयांतील नावांच्या चिठ्या हिंदी व इंग्रजी अशा दोन्ही भाषांतून आहेत.

**प्रकाशनें :** (१) मध्यप्रदेश के पुरातत्त्व की रूपरेखा, लेखक–डॉ एम् जी दीक्षित, (२) त्रिपुरी येथील उत्खननावरील अहवाल, लेखक–डॉ एम् जी. दीक्षित.

**कामाचे तास :** रविवार आणि राजपत्रांत जाहीर केलेल्या सुट्ट्यांखेरीज रोज संग्रहालय सकाळीं १०–३० ते संध्याकाळीं ५ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** सागर विद्यापीठाच्या पुरातन भारतीय इतिहास, संस्कृति आणि पुराणवस्तुशास्त्र या विषयाच्या प्राध्यापकाच्या देखरेखीखालीं संग्रहालय चालू आहे.

**सेवकवर्ग :** कारकून आणि चपराशी.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाचें वार्षिक अंदाजपत्रक १,५०० रुपयांचें आहे.

**अभिप्राय :** संग्रहासाठीं भरपूर जागा असली तरी संग्रहालयाची इमारत निरुपयोगीची आणि अपुरी आहे. दरवर्षी सरासरी १५ व पर्यंत सुमारें ५००० प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात. संग्रहालयातील वस्तु संशोधन आणि उत्खनन या मार्गांनीं मिळविल्या जातात.

**सांची :** लोकसंख्या ३००

## पुराणवस्तु संग्रहालय

**स्थापना :** १९१९

**पूर्वेतिहास :** या संग्रहालयाची निर्मिति केन्द्रीय भारताच्या पुराणवस्तुसंशोधनविभागाचे महासंचालक सर जॉन मार्शल यांच्या हस्तें झाली. सांची येथील स्तूपांच्या उत्खननात व संरक्षणाचें काम सुरू असतांना सांपडलेल्या लहान-सहान पुरातन वस्तु तेथल्या तेथेंच संग्रहित करण्यात आल्या. [illegible] [illegible] वस्तु ठेवण्याच्या जागी सुरक्षितपणें ठेवणें शक्य [illegible] सर जॉन मार्शल यांनी [illegible] देखरेखीखालीं या संग्रहालयाची [illegible]

र पुढें सन १९१९ मध्यें त्यांनी भोपाळ संस्थानाच्या नव्यानेंच स्थापन झालेल्या पुराणवस्तुशास्त्रविभागाकडे हें संग्रहालय सोंपवून दिलें जुलै १९५३ मध्यें पुराणवस्तुशास्त्रविभागचें मध्यवर्ती मंडळ स्थापन झालें व आतां हें संग्रहालय भारत सरकारच्या पुराणवस्तुशास्त्र विभागाच्या निधनत्वाखालीं आहे

**व्याप्ति व संग्रह :** सांची येथें उत्खनन करीत असतांना सांपडलेल्या शिल्पकृती व जवळपासच्या प्रदेशातील वस्तु ह्या संग्रहालयांत ठेवलेल्या आहेत

या संग्रहात मौर्यकालापासून मध्ययुगीन कालापर्यंतच्या कोरीव कलाकृति, त्याचप्रमाणें अशोक स्तंभ, प्रवेशद्वार व कठड्याचे अवशेष, सांची स्तूपाच्या अवशेषाच्या कोरीव कृति, मातीकाम, शेतीचीं अवजारें, घरगुती उपयोगाचीं व मठात वापरलीं जाणारीं लोखंडाचीं, ब्रॉंझचीं व पितळेचीं भांडीं, लाल मातीच्या शोभेच्या आकृति व नाणीं यांचा समावेश होतो पुढील भाग मोकळा असलेला एक दिवाणखाना, त्यालगतच्या दोन खोल्या व एक मोकळें आंगण यात हें संग्रहालय सामावलेलें असून त्यातच ह्या साऱ्या वस्तु प्रदर्शित केलेल्या आहेत

**शैक्षणिक कार्य :** स्मारक वस्तूंचे अभिरक्षक, संग्रहालय पाहावयास येणाऱ्या जिज्ञासूंना स्मारकासंबंधीं व इतर सामग्रीसंबंधीं माहिती देतात जगाच्या सर्व भागांतील लोक हें संग्रहालय पहावयास येत असल्यामुळें नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजींत आहेत त्यांवर आतां हिंदी नांवेंहि लिहिण्यांत येत आहेत

**प्रकाशनें :** (१) सांची येथील पुराणवस्तुशास्त्रविषयक संग्रहालयाची सूचि, रु १, (२) सचित्र पोस्टकार्डें

**कामाचे तास :** सर्व दिवशीं सकाळीं ९ ते संध्याकाळीं ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय, अधीक्षक, पुराणवस्तुशास्त्र विभाग, मध्य मंडळ यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** अभिरक्षक, स्मारकें व संग्रहालय—जागा भरण्यात आलेली नाहीं दोन कारकून व चार परिचारक

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अर्थसंकल्प रु १२,००० चा आहे

**अभिप्राय :** संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या दैनिक १५ असून वार्षिक ६००० असते हिवाळ्यात संग्रहालयाला भेट देण्यासाठी येणाऱ्या परदेशी पाहुण्यांची गर्दी अधिक असते संग्रहालयाची इमारत भरपूर मोठी असून लहान पुरातन वस्तु काचेंच्या कपाटांतून खोल्याखोल्यांतून ठेवलेल्या आहेत विभागाचा एक चौकीदार संग्रहालयाच्या आवारांत राहतो व संग्रहालयाची देखभाल करतो वस्तूंचा साठा करण्यासाठीं यांत जागा नाहीं रासायनिक संस्करण करण्याची जेव्हां जरूर भासते तेव्हां भारतातील पुराणवस्तु रसायनज्ञाची मदत मिळू शकते वस्तुसंपादनाचे मुख्य मार्ग संशोधन व उत्खनन हे होत संग्रहालयाचा विस्तार करून अधिक पुरातन वस्तु प्रदर्शित करण्याची योजना आखलेली आहे

**सोनगीर :** लोकसंख्या सुमारें ५००

## दिगंबर जैन संग्रहालय

**स्थापना :** १९४८

**पूर्वेतिहास :** या संग्रहालयाची स्थापना सन १९४८ मध्यें झाली सोनगीर टेकडीच्या आसपास आढळून आलेल्या शिल्पकृति व पुरातनवस्तु यांचा संग्रह करून तो या संग्रहालयात ठेवण्यात आला येथील संग्रहाच्या प्रेक्षकांनीं इतर काहीं महत्त्वाच्या संग्रहालयांना भेट दिली व येथील संग्रहात अनेक वस्तूंची भर घातली जैन पुरातन वस्तूंचा एक उत्तम संग्रह करणें हा या संग्रहालयाचा उद्देश आहे या ठिकाणच्या ४० मैल परिघांतील प्रदेश पुराणवस्तुशास्त्रविषयक सामग्रीच्या दृष्टीनें अत्यंत संपन्न असल्यामुळें असा संग्रह योग्य त्या सोयींनिशीं तयार करणें सहज शक्य आहे

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहात पुराणवस्तुशास्त्रीय सामग्री जास्त आहे व तींत बहुतेक जैन शिल्पकृति आहेत

**शैक्षणिक कार्य :** कांहीं नाहीं

**प्रकाशनें :** नाहींत

**कामाचे तास :** रोज सकाळीं ७ ते दुपारीं ४ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** सोनगीर समितीकडून संग्रहालयाचें नियंत्रण केलें जातें

**सेवकवर्ग :** समितीचा सेवकवर्ग संग्रहालयाच्या कामकाजावर देखरेख ठेवतो

**आर्थिक तरतूद :** यासाठीं खास अर्थसंकल्पाची तरतूद केलेली नाहीं; पण सर्वसाधारण अर्थसंकल्पातून खर्च भागविला जातो

**अभिप्राय :** सोनगीर गांवाची लोकसंख्या जरी ५०० च्या आसपासच असली तरी हजारों यात्रेकरू दरवर्षी या ठिकाणास भेट देतात आणि वार्षिक जत्रेच्या वेळेस तर दहा हजार लोक सोनगीरला येतात सोनगीर समितीनें संग्रहालयासाठीं पहारेकरी नेमलेला आहे संग्रहालयासाठीं आसमंतातील प्रदेशांतून वस्तु मिळवूनच त्यात भर घातली जाते इतर संग्रहालयाशीं वस्तूंची देवघेव करण्याचा अद्याप विचारहि केलेला नाहीं प्रदर्शित वस्तूंना फक्त हिंदी भाषेतच नावाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत सर्वत्र दुर्लक्षित म्हणून पडून राहिलेल्या कलाकृति व नमुने गोळा करण्याबाबत जे निर्बंध आहेत ते दूर करून संग्रहालयातील वस्तूंत भर घालून त्याचा विस्तार करण्यावर विचार केला जात आहे

## मद्रास

**मद्रास** . लोकसंख्या १४,१६०,५६

### (१) फोर्ट सेंट जॉर्ज संग्रहालय

**स्थापना :** १९४८

**पूर्वेतिहास** दक्षिण भारतातील ब्रिटिश अमदानीतील अवशेष राखून ठेवण्यासाठीं स्वातंत्र्यप्राप्तीनंतर थोड्याच दिवसांत म्हणजेच १९४८ मध्ये सेंट जॉर्ज किल्ल्यात या संग्रहालयाची स्थापना करण्यांत आली संग्रहालय ज्या पुरातन इमारतींत थाटण्यात आलेलें आहे, ती इमारत १७९२ साली बांधण्यात आलेली किल्ला असल्यामुळें एक ऐतिहासिक स्मारकच आहे ती इमारत 'एक्स्चेंज' या नावानें ओळखली जात असे व तेथें ईस्ट इंडिया कंपनीचे अधिकारी व स्थानिक व्यापारी, व्यापारामार्गी करारमदार करीत असत संग्रहालयाचा आतां बराच विस्तार झाला असल्यामुळें, तेथें भारतातील पहिली

ब्रिटिश वसाहत म्हणून सेंट जॉर्ज किल्ल्याची झालेली वाढ व दक्षिण भारताचा गेल्या तीन शतकांचा इतिहास यांचा अभ्यास करण्याच्या दृष्टीने बरेच क्षेत्र उपलब्ध झाले आहे

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयाच्या कक्षेत शस्त्रें, हस्तलिखितें, रंगचित्रें, मुद्रित चित्रें, नाणीं, पदकें, वस्त्रप्रावरणें, चिनी मातीकाम, इ. चा अंतर्भाव होतो. संग्रहालयांत एकूण पांच प्रदर्शनविभाग आहेत. पैकीं तीन प्रतिमाचित्रें, मुद्रित चित्रें व शस्त्रें यांचे आहेत आणि नाणीं, पदकें, अभिलेख, ख्रिश्चन लोकांच्या विशिष्ट समारंभांत वापरलीं जाणारीं चांदीचीं मदिरापात्रें, इ. सारख्या संकीर्ण पुरातन वस्तूंचा उरलेल्या दोन प्रदर्शनविभागांत समावेश होतो. प्रतिमा प्रदर्शनविभागांत मद्रासच्या पूर्वींच्या राज्यपालांचीं, इंग्लंडच्या जुन्या राजेराण्यांचीं व कर्नाटकच्या नबाबांचीं तैलचित्रें आहेत. मुद्रित चित्रांच्या विभागांत सेंट जॉर्ज किल्ला, सेंट थॉमस माऊंट, तंजावर, तिरुनेलवेली व इतर ऐतिहासिक ठिकाणांचें १८ व्या शतकांतील स्वरूप दाखविणारीं मुद्रित चित्रें आहेत. शस्त्रागारविभागांत सन १७५२ मध्यें उभारलेल्या मद्रासी सैन्याची कल्पना देणारीं हत्यारें आहेत. इतर पुरातन वस्तु आणखी दोन मोठ्या खोल्यांतून प्रदर्शित केल्या आहेत. उजवीकडच्या एका मोठ्या दालनांत मद्रास, मुंबई व बंगाल, त्याचप्रमाणें पोर्तुगीज, फ्रेंच व डॅनिश टांकसाळींतील पदकें व नाणीं आहेत. दुसऱ्या मोठ्या दालनांत इंग्लंडमधील कॅन्टन येथें तयार झालेल्या ईस्ट इंडिया कंपनीच्या व अर्काट पद्धतीच्या चिनी मातीच्या वस्तु ठेवलेल्या आहेत. त्याच्या पुढच्या दालनांत सेंट मेरी चर्चमधील विशिष्ट समारंभांत वापरलीं जाणारीं मदिरापात्रें, सेंट जॉर्ज किल्ल्याचा नमुना, अर्काटच्या नबाबाची पालखी व सेंट जॉर्ज किल्ल्याचीं जुनी कुलपें व किल्ल्या आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयास भेट देण्यासाठीं येणाऱ्या प्रेक्षकांना, विशेषतः शिक्षक व विद्यार्थी प्रेक्षकांना, त्यांनी तशी इच्छा दर्शविल्यास संग्रहालयाध्यक्ष अथवा कनिष्ठ प्रदर्शनविभाग साहाय्यक हे सर्वत्र बरोबर हिंडून माहिती देतात. एक ग्रंथालयहि वाढविण्यांत येत आहे. ग्रंथालय मुख्यतः विभागीय वापरासाठीं असून त्यांत १०९१ पुस्तकें व नियत कालिकें आहेत. प्रदर्शनविभागांतील नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व तामीळ या भाषांतून असून त्या अर्थपूर्ण आहेत. मद्रास विश्वविद्यालय व इतर शैक्षणिक संस्था यांजकडून संग्रहालय पाहावयास जाण्याकरितां कार्यक्रम योजिले जातात. संग्रहालयास भेट देण्यासाठीं येणाऱ्या प्रेक्षकांना प्रदर्शित वस्तूंची खास वैशिष्ट्यें दाखविण्यासाठीं तक्ते, नमुने, चित्रें, छायाचित्रें इ. चें भरपूर साहाय्य घेतलें जातें

**प्रकाशनें :** 'मद्रास इन्फर्मेशन' मालेतर्फे प्रकाशित झालेल्या फोर्ट सेंट जॉर्ज संग्रहालय यावर लिहिण्यांत आलेली सचित्र पुस्तिका. या पुस्तिकेच्या २००० प्रती वार्तासंचालक, मद्रास, यांनी पुनर्मुद्रित केलेल्या असून त्या जिज्ञासू प्रेक्षकांना विनामूल्य दिल्या जातात

**कामाचे तास :** सोमवार व इतर सुटीचे दिवस सोडून रोज सकाळीं ९ ते दुपारीं ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय, अधीक्षक, संग्रहालय शाखा, पुरातत्त्वशास्त्रविभाग, भारत सरकार यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष : श्री के. आर. विजयराघवन्, बी. ए., कनिष्ठ प्रदर्शनविभाग साहाय्यक, कनिष्ठ श्रेणी कारकून, भांडाररक्षक, चिन्हांकनकर्ता, मुख्य परिचारक, चौकीदार, पांच परिचारक

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अर्थसंकल्प रु. ३०,००० चा आहे.

**अभिप्राय :** संग्रहालय सेंट जॉर्ज किल्ल्यांत थाटलेलें आहे. ब्रिटिश अवशेषांचेंच हें संग्रहालय असल्यामुळें तें नमुनेदार पद्धतीनें उभारलेलें आहे. तेथें जाण्यास कोणालाहि मज्जाव नाहीं. संग्रहालय पाहावयास येणाऱ्यांची सरासरी संख्या दैनिक ३२५ असून वार्षिक, १,१५,००० इतकी आहे. नाताळची सुटी, मट्टुपोंगल दिन, वैकुंठ एकादशीच्या नंतरचा दिवस व स्वातंत्र्यदिन यांसारख्या खास प्रसंगीं संग्रहालय पाहावयास येणाऱ्यांची गर्दी फार असते. इमारत संग्रहालयाच्या दृष्टीनें सोईची आहे, परंतु प्रदर्शन-विभागासाठीं व वस्तुसंग्रहासाठीं आणखी जागेची आवश्यकता आहे. पुराणवस्तु विभागाचे रसायनज्ञ, संग्रहालयाची देखभाल करतात. संग्रहालय पाहावयास येणाऱ्यांसाठीं पंखे, खुर्च्या, बाकें, इ. सुखसोयी उपलब्ध आहेत. गुप्त निधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं संग्रहालयास अजून मान्यता मिळालेली नाहीं. त्यामुळें खरेदी, देणगी व उसनवार वस्तु आणणें हींच केवळ वस्तूंचा संग्रह करण्याचीं साधनें आहेत. हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे

## (२) सरकारी संग्रहालय व राष्ट्रीय कलाप्रदर्शन विभाग

**स्थापना : १८५१**

**पूर्वेतिहास :** सन १८२८ च्या सुमारास लंडन येथील एशियाटिक सोसायटीच्या मद्रास येथील मद्रास लिटररी सोसायटी नामक शाखेनें, मद्रास येथें एक व्यावहारिक भूस्तरशास्त्र संग्रहालय सुरू करावें अशी कल्पना काढली आणि तदनुसार भूस्तरशास्त्रविषयक नमुने गोळा करण्याचें काम तेथें सुरू केलें. परंतु द्रव्याचें पुरेसें पाठबळ नसल्यामुळें व योग्य अशा जागेच्या अभावीं संग्रहालय स्थापन करण्याबाबत पुढाकार घेण्याबद्दल सोसायटीनें मद्रास सरकारला विनंति केली. सन १८४३ मध्यें मेजर जनरल डब्ल्यू. कुलेन यांनी सरकारला स्थानिक संग्रहालयें स्थापन करण्याची सूचना केली. अशा संग्रहालयांची केवळ खनिजसंपत्तीबाबत जिज्ञासा निर्माण करण्याच्याच दृष्टीनें नव्हे, तर शेतीस उत्तेजन देण्यासाठीं व वेगवेगळ्या प्रक्रियांच्या संबंधांत सुधारणा घडवून आणण्याच्या दृष्टीनेंहि फार मदत होईल अशी त्यांची कल्पना होती. जनरल कुलेन व मद्रास लिटररी सोसायटीच चिटणीस यांच्या पत्रांच्या अनुरोधानें ईस्ट इंडिया कंपनीच्या संचालक मंडळानें आपल्या तारीख २० मे १८४६ च्या पत्रोत्तरांत सरकारला असें लिहून कळविलें कीं, "प्रांतांत स्थानिक संग्रहालयें स्थापण्यासंबंधींच्या प्रस्तावास अनुसरून, त्यांत सुचविलेल्या कारणासाठीं प्रथम मद्रास येथें एक मध्यवर्ती संग्रहालय स्थापन करण्याचा विचार करावा. हें संग्रहालय विश्वविद्यालयासहि सोयिस्कर रीत्या जोडतां येईल. त्याचप्रमाणें प्रांतांतील निरनिराळ्या स्थानिक संग्रहालयांतील वैचित्र्यपूर्ण वस्तु गोळा करून त्या मध्यवर्ती संग्रहालयाकडे सुपूर्द करण्यासाठीं जो कोणताहि आवश्यक खर्च होईल त्यास स्वेच्छेनें मंजुरी द्यावी. कारण अशी मंजुरी देणें यापुढें फायद्याचेंच होईल." सन १८५० मध्यें मद्रास राज्यपालांच्या शरीररक्षकदलाचे मेडिकल ऑफिसर व वेतन मास्तर असलेले असिस्टंट सर्जन एडवर्ड ग्रीन बेल्फोर यांनी नियोजित संग्रहालयाचे अधिकारी म्हणून काम करण्याची इच्छा

प्रदर्शित केली याप्रमाणें मध्यवर्ती संग्रहालय फोर्ट सेंट जॉर्ज महाविद्यालयात सुरू झालें बेलफोरनें संग्रहालयाची व्याप्ति मर्यादित ठेवली नाही आणि त्यामुळें उदार दात्याकडून अति मौल्यवान् चीजा सहज मिळूं लागल्या तारीख १ ऑगस्ट १८५२ पर्यंत संग्रहालयात एकूण १९,८३० नमुने गोळा झाले होते व संग्रहालयाची सुरुवात होऊन केवळ २० महिनेच लोटले असले तरी तें कलकत्ता येथील बेंगाल एशियाटिक सोसायटीनें कितीतरी आधी स्थापन केलेल्या संग्रहालयाशी तुलना करण्याइतपत त्याची प्रगति झाली होती संग्रहालयासाठी दिलेल्या महाविद्यालयातील खोल्यातून इतकी गर्दी झाली की संग्रहालयासाठी एक स्वतंत्र इमारत देण्याकरिता सरकारला विनंति करण्यात आली "सेंट जॉर्ज किल्ल्यासारख्या स्मारकाल्याचा जास्तीत जास्त भाग या कामासाठी उपयोगांत आणणें सरकारला अत्यंत योग्य व अत्यंत कमी खर्चाचें वाटलें " ही वास्तु फार जुनी म्हणजे लॉर्ड क्लाईव्हच्या वेळेपासून उभी आहे आज त्या किल्ल्याचा चौथरा व जेथें चित्रें प्रदर्शित केली आहेत त्या दोन खोल्यांतील नक्षीकाम केलेल्या जमिनीचा काही भाग याशिवाय कोणतेहि अवशेष शिल्लक नाहीत

डॉ बेलफोर यानीं केवळ मद्रास संग्रहालयाचीच वाढ केली नाही, तर बंगलोर, बेल्लारी, कोईमतूर, कडालोर, उटकमंड, सिकंदराबाद, मंगलोर, तिरुच्चिरापल्ली, इ ठिकाणी स्थानिक संग्रहालयें सुरू करण्यास त्यांनी उत्तेजन दिलें सन १८५५ मध्यें मद्रास प्रांतांत, बेल्लारी, कोईमतूर, कडालोर, मंगलोर, उटकमंड व राजमहेंद्री अशा सहा ठिकाणीं मद्रास संग्रहालयास संलग्न असलेली संग्रहालयें होतीं. अत्यंत मोठ्या आशेनें सुरू केलेल्या या जिल्हा संग्रहालयाना पुरेसा पाठिंबा मिळाला नाही व सन १८६१ पर्यंत पहिलीं पांच संग्रहालयें बंद करण्यात आलीं व सन १८७५ च्या सुमारास शेवटचें उरलेलें संग्रहालय देखील बंद झालें सन १८५४ मध्यें संग्रहालयात ठेवलेल्या चित्त्याच्या व वाघांच्या बच्चांनी बरेंच आकर्षण निर्माण केलें होतें आणि एक प्रयोग म्हणून डॉ बेल्फोर यांनी कर्नाटकाच्या नबाबाला त्यांच्या ताब्यात असलेले सर्व वन्य पशु संग्रहालयात पाठविण्याची विनंती केली सन १८५६ मध्यें मद्रास संग्रहालयातच ३६० जनावरें असलेलें एक प्राणी संग्रहालय तयार करण्यात आलं व हें वस्तुसंग्रहालय-तथा प्राणीसंग्रहालय फारच लोकप्रिय झालें सन १८६२ मध्यें शहर नगरपालिकेनें प्राणीसंग्रहालय आपल्या ताब्यांत घेऊन तें त्याच्या सध्यांच्या ठिकाणी नेलं इ स १८५५ पर्यंत खनिजशास्त्र, अश्मीभूतप्राणीविद्या, तसेंच टणक आवरणाच्या आंत राहणारे गोगलगायीसारखे प्राणी व पाठीचे मणके असलेल्या जनावरांसंबंधीचें प्राणीशास्त्र हे सर्व विषय शिकविता येतील इतकी पुरेशी सामग्री संग्रहालयात जमली होती इ स १८५९ मध्यें संग्रहालयाचे पुढील विभाग होते (क) प्राणीसंग्रहालयासहित सृष्टिविज्ञानविभाग, (ख) भौगोलिक भूस्तरशास्त्र, (ग) अर्थविषयक भूस्तरशास्त्र आणि (घ) सार्वजनिक वाचनालय डॉ बेलफोर याच्या कारकीर्दीत अनेक माहितीपत्रें आणि अहवाल प्रसिद्ध करण्यांत आले

डॉ बिडी यांच्या कारकीर्दीत वनस्पतिशास्त्रविभागांत वाढ करण्यात येऊन संग्रहालयांत मानवशास्त्रालाहि स्थान देण्यांत आलें ह्याच कालावधीत भारतीय प्रागैतिहासिक पुरातत्त्वशास्त्राचे जनक फूट यांनी कार्टेलियर नदीच्या खोऱ्यांत आदिमानवाचा प्रथम शोध लावला आणि ह्या संशोधनापैकीं काहीं वस्तु मद्रास संग्रहालयाला भेट म्हणून मिळाल्या. अमरावतीच्या सुप्रसिद्ध संगमरवरी शिल्पकृति डॉ बेलफोर यांच्या वेळेसच येऊं लागल्या पण डॉ बिडी यांनीं त्याना संग्रहालयात स्थान मिळवून दिलं वाचनालय आणि सभागृह यांचें बांधकाम १८७५ मध्यें पूर्ण झालें आणि संग्रहालयाच्या विद्यमानें सार्वजनिक व्याख्यानें दिलीं जाऊं लागलीं कोनेमरा सार्वजनिक वाचनालय आणि प्रेक्षागृह यांचें बांधकाम १८९६ मध्यें पूर्ण झालें त्याच सुमारास अमरावतीच्या आणखी काहीं शिल्पकृति व भट्टीप्रोलु येथील अवशेष करंडक मिळविण्यात आले संग्रहालयाचे अध्यक्ष डॉ थर्स्टन यांनीं संग्रहालयाच्या व्याप्तीबाबतचे त्याच्या पूर्वाधिकाऱ्याचें धोरण बदलून संग्रहालय मद्रास इलाख्यातील पुराणवस्तुशास्त्र, सृष्टिविज्ञान, कला, हस्तकौशल्य इत्यादिपुरतेंच मर्यादित ठेवलें दुर्दैवानें त्याच्या कालावधीत कित्येक उत्कृष्ट भारतीय वस्तु इतरत्र संग्रहित करण्यांत आल्या किंवा इतर संस्थांना देऊन टाकल्या गेल्या याच कारणास्तव गांधार शिल्पकृतींचा संग्रह लाहोरला पाठविण्यात आला थर्स्टन यांनी संग्रहालयाचें कार्य निःसंशय वाढविलें विशेषत त्यांनीं मानवशास्त्रासाठी घेतलेले परिश्रम उल्लेखनीय आहेत संग्रहालयाच्या प्रकाशन विभागावर त्याचें विशेष लक्ष असे परंतु मद्रास संग्रहालयाला भारतीय संग्रहालयांत प्रतिष्ठेचें स्थान प्राप्त करून देण्याचं श्रेय डॉ ग्रॅव्हली या महान् व्यक्तीलाच द्यावयास हवें डॉ ग्रॅव्हली एक विद्वान गृहस्थ, शास्त्रज्ञ आणि संग्रहालय-विशेषज्ञ होते आणि त्यांनीं आपल्या कारकीर्दीत संग्रहालयाच्या प्रत्येक विभागाची आमूलाग्र पुनर्रचना घडवून आणली सध्या दिसणारे अप्रतिम ब्रॉंझचे पुतळे, तसेंच शिल्पकृतिविभाग, मानववंशशास्त्रविभाग, भूस्तरशास्त्रविभाग, प्राणीशास्त्रविभाग आणि वनस्पतीशास्त्रविभाग या विभागाची या कालावधीत अतिशय सुधारणा करण्यात आली प्रदर्शनवस्तूंचें रसायनांच्या साहाय्यानें रक्षण करण्याचें महत्त्व यांनीच ओळखलें व म्हणून त्यांनीं संग्रहालयातील वस्तूंच्या रक्षणासाठी एक स्वतंत्र विभाग व प्रयोगशाळा स्थापन केली त्यांनीं संशोधन व प्रकाशनें या गोष्टींना मानाचें स्थान प्राप्त करून दिलें त्याच्या कर्तृत्वाची साक्ष संग्रहालयातील एकाहून एक सरस प्रकाशनांवरून सतत मिळत राहील संग्रहालयाच्या विकासाकरितां तयार केलेल्या योजनेंत डॉ ग्रॅव्हली यांनीं कोनेमरा सार्वजनिक वाचनालयालाहि महत्त्वाचें स्थान प्राप्त करून दिलें मद्रासच्या सरकारी संग्रहालयानें सन १९५१ मध्यें आपली शताब्दि अतिशय उत्साहानें साजरी केली

व्याप्ति आणि संग्रह : संग्रहालय कला, पुराणवस्तुशास्त्र, मानवशास्त्र, प्राणीशास्त्र, वनस्पतीशास्त्र, भूस्तरशास्त्र आणि नाणकशास्त्र ह्या विषयांना वाहिलेलें आहे मागील इमारतीच्या पहिल्या खोलींत चित्रांचा एक छोटा संग्रह असून त्यात राजा रविवर्मा आणि रविवर्मा, धुरंधर आणि इतर अनेक आधुनिक चित्रकारांची तैलचित्रें आणि इतर प्रकारचीं चित्रें असून प्रादेशिक रीतिरिवाजांचें दर्शन घडविणारी कुडाप्पा, कर्नूल, तंजावर आणि म्हैसूर येथील जुन्या शैलीतील रंगचित्रें आहेत

मोठ्या दिवाणखान्याच्या बाजूच्या खोल्यांत प्राणीशास्त्रविषयक वस्तु संग्रहित केल्या आहेत डाव्या बाजूच्या तीन मोठ्या खोल्या आणि एक लहान खोली पाठीचा कणा असणाऱ्या प्राण्यांकरितां राखून ठेवला असून त्यापुढील तीन खोल्या तौलनिक प्राणीशास्त्राकरितां ठेवल्या आहेत ज्या साधनाच्या साहाय्यानें वेगवेगळे जीवजंतु ठराविक काम करतात ती साधनें त्याचप्रमाणें सांगाडे, स्नायू, शिरा, दात, शिंगे आणि पाठीचा कणा असलेल्या

प्राण्यांच्या चामडीपासून मिळणारे पानळ स्नायु इत्यादि खास प्रदर्शन-वस्तु आहेत भिनभिन्न प्राण्यांचे हाडांचे सांपळे आणि म्हशी, गुरें व बकरे यांच्या शिंगांची विशिष्ट रचना दाखविणाऱ्या त्या प्राण्यांच्या कवट्या ठेवण्यांत आल्या आहेत पाठीचा कणा असणाऱ्या प्राण्यांच्या गॅलरींत दक्षिण भारतातील विषारी व बिनविषारी साप, सर्पमक्षिका, सरडा आणि इतर प्रकारचे प्राणी त्यांच्या नैसर्गिक पार्श्वभूमीसह मांडण्यांत आले आहेत पहिल्या मजल्यावरील तसल्याच तीन खोल्यांत मासे आणि पाठीचा कणा नसणारे प्राणी ठेवले आहेत त्यापैकी पहिल्या खोलींत प्रवाळकीटक तसेंच कांहीं परोपजीवी प्राण्यांचा जीवनक्रम दर्शविणारी चित्रें यांचाच प्रामुख्यानें समावेश होतो पुढील गॅलरींत शंख, शिंपे, खेकडे, गोम, कोळी आणि कीटकांचा संग्रह असून तिसऱ्या खोलींत विविध प्रकारचे मासे आहेत.

पहिल्या मजल्यावरील राहिलेल्या दोन खोल्यांत वनस्पतीशास्त्रविषयक संग्रह असून त्यांत दक्षिण भारतातील झाडांचा आकार, त्यांचें वर्गीकरण आणि त्यांचें व्यावहारिक महत्त्व यांचें दर्शन घडतें येथें दक्षिण भारतातील इमारती लाकूड, तंतू आणि शुष्कौषधि यांचा संग्रह आहे

तळमजल्यावरील मध्यवर्ति दिवाणखान्याच्या मागील छोट्याशा गॅलरींत हस्तीसंबंधींच्या विविध प्रदर्शन-वस्तु ठेवल्या आहेत

या गॅलरीमागील गॅलरींत भूस्तरशास्त्रविषयक वस्तूंचा संग्रह असून त्यांत दक्षिण भारतातील महत्त्वाचे खडक आणि खनिज पदार्थ, अश्मीभूत वस्तु, सोनें काढण्याच्या पद्धति, नेल्लोर खाणींतील अभ्रक आणि बांधकामाच्या दगडांचे विविध नमुने ठेवण्यांत आले आहेत

मध्यवर्ति खोलीच्या उजव्या बाजूला आणि तळमजल्यावरील प्राणीशास्त्र विषयक विभागाच्या समोर पुराणवस्तुशास्त्रविषयक प्रदर्शनालयें आहेत पहिल्या गॅलरींत दानवुलपाडू येथील सुप्रसिद्ध जैन पुरातन वस्तूंसहित अन्य जैन पुरातन वस्तु असून, त्यापुढें अमरावती आणि कृष्णा नदीच्या खोऱ्यातील इतर बौद्धधर्मीय स्थानें येथील संगमरवरी शिल्पकृतींचा सुंदर संग्रह आहे मागील बाजूच्या दिवाणखान्यातील बौद्धधर्मीय शिल्पकृतींत गोली येथील शिल्पकृति प्रामुख्यानें आढळतात त्याच दिवाणखान्यात तामीळ आणि कानडी भाषिक जिल्ह्यांतील पल्लव व चोलकालीन आणि त्यानंतरच्या शिल्पकृति व वस्तुशास्त्रविषयक नमुने आहेत मधल्या अरुंद दालनांत इमारतीचे दगड आहेत येथून पुराणवस्तुविषयासाठी बांधलेल्या नव्या इमारतींत जातां येतें या इमारतीच्या तळमजल्यावर तामिळ आणि चालुक्य कालखंडातील विविध शैलींचें दर्शन घडतें पहिल्या मजल्यावरील दोन खांबांमधील जागीं प्रमुख उत्तर भारतीय शैलींचा समावेश केला आहे येथें उदाहरणाच्या आणि तक्त्याच्या साहाय्यानें ब्राम्ही, तामिळ ग्रंथ, तेलगु, कानडी आणि नागरी इत्यादि लिप्यांचा विकास दर्शविला आहे याच्या पलीकडे असलेल्या व एका खोलीला जोडलेल्या छोट्या दालनात शाडू मातीच्या वस्तु आणि नाण्यांच्या कोरीव प्रतिकृति ठेवल्या आहेत ह्या वस्तूंना संग्रहालयांत फार महत्त्व दिलें जातें व त्या ताम्रपटांसह वेगळ्या सुरक्षित राखण्यात येतात पुढील मोठ्या खोलींत मोहेंजोदारो येथील इतिहासपूर्वकालीन पुरातन वस्तु ठेवल्या आहेत बांधलेल्या इमारतीच्या प्रवेशद्वाराजवळच मंदिरांबाबतच्या वास्तुशिल्पाच्या विकासाचें दर्शन छायाचित्रांच्या सहाय्यानें घडविलेलें दिसेल

अग्रभागीं असलेल्या इमारतीला स्वतंत्र प्रवेशद्वार असून ही इमारत आणि पाठीमागील इमारत यामध्यें कोनेमरा वाचनालय आहे तळमजल्यावरील खोल्यांत इतिहासपूर्वकालीन पुरातनवस्तूंच्या अप्रतिम अशा संग्रहाबरोबरच एक अत्युत्कृष्ट शस्त्रसंग्रह असून त्यांत मुख्यत तंजावर आणि फोर्ट सेंट जॉर्ज येथील शस्त्रागारांतील शस्त्रें आहेत फोर्ट सेंट जॉर्ज येथील शस्त्रांपैकी बराचसा भाग फोर्ट सेंट जॉर्ज येथेंच असलेल्या फोर्ट संग्रहालयाला देण्यांत आला आहे इतिहासपूर्वकालीन वस्तूंच्या गॅलरींत पुरातनकाळांतील दगडांचीं व धातूंचीं हत्यारें, चिनीमातीचीं भांडीं व मणी वगैरे वस्तु आहेत शेजारच्या गॅलरींत आदिचनल्लूर आणि पेरुम्बेर या लोहयुगीन ठिकाणच्या इतिहासपूर्वकालीन पुरातनवस्तु असून त्यांत कडप्पा येथील अंत्यक्रियेच्या वेळीं वापरावयाचीं भांडीं, चिनीमातीचीं भांडीं, लोखंडी पुरातनवस्तु आणि मेंढ्यासारखी दिसणारी एक मातीची प्रेताची पेटी आहे इतिहासपूर्वकालीन वस्तु ठेवलेल्या गॅलरीच्या प्रवेशद्वाराजवळच एका बाजूस एक भव्य पुरातन यज्ञस्तंभ असून दुसऱ्या बाजूला कातडी बाहुल्यांचा एक सुंदर संग्रह आहे. पहिल्या मजल्यावरील चार खोल्या पुराणवस्तुविषयक संग्रहासाठीं ठेवलेल्या असून, तीन खोल्यांत धातूंच्या मूर्ति आहेत एक खोली लाकूड आणि हस्तीदंत यांवरील नक्षीकामाच्या वस्तूंसाठीं असून एक खोली धातुकाम आणि चिनीमातीच्या भांड्यांसाठी राखून ठेवली आहे येथें दक्षिण भारतातील वाद्यांचा उत्तम संग्रह आहे तसेंच प्राचीन काळांतील ढोलाच्या सोपस्याच्या पद्धतींचे अनेक नमुने ठेवलेले आहेत येथील महत्त्वाच्या मानवशास्त्रविषयक संग्रहांत रेखनाचीं साधनें आणि सामग्री, मल्याळी आदिवासी नर्तकांचीं कांहीं रंगीत छायाचित्रें, प्राचीनकाळीं विस्तव पेटविण्यासाठीं उपयोगांत आणलीं जाणारीं साधनें आणि जादूटोण्याचीं साधनें ह्या वस्तूंचा उल्लेख करावा लागेल संग्रहालयांत नुकताच मिळविलेला आणि प्रदर्शित केलेला कथाकली नर्तकांच्या पुर्णाकृतींचा एक सुंदर संग्रह येथें आहे

ह्या संग्रहालयांतील दक्षिण भारतीय धातूंच्या मूर्तींचा अत्युत्कृष्ट संग्रह केवळ संख्येच्या दृष्टीनेंच नव्हे तर कलात्मकतेच्या आणि वैचित्र्याच्या दृष्टीनेंहि विशेष उल्लेखनीय मानतो निरनिराळे बौद्ध, जैन आणि शिव आणि वैष्णव या हिंदुधर्मीय प्रतिमा येथें प्रदर्शित केलेल्या आहेत पायऱ्या चढून वर गेल्यावर नृत्य करीत असलेल्या शिवाच्या मूर्तींनीं परिपूर्ण असा एक दिवाणखाना लागतो व या दिवाणखान्यात जगातील एक सर्वोत्कृष्ट शिवाची मूर्ति आहे धातूपासून घडविलेल्या इतर कलाकृति असलेल्या गॅलरींत दक्षिण भारतातील सुंदर दिवे, घरगुती वापराच्या मंदिरात पूजेसाठीं वापरावयाच्या वस्तु, कवचें, पेट्या, तबकें वगैरे वस्तु असून तुलनात्मक अभ्यासासाठीं तिबेट व नेपाळ येथील कांहीं मूर्ति ठेवल्या आहेत येथ लाकडी नक्षीकाम केलेल्या वस्तूंचा एक सुंदर संग्रह असून त्यांत जुन्या मंदिरांतील रथावरील हिंदु देवांच्या मूर्ति, प्राचीन काळच्या घरांतील तुळ्या, गणेशपट्ट्या वगैरे, तसेंच हिंदु देवादिकांच्या सुरेख मूर्ति व अप्रतिम कलाकुसरीच्या चंदनी पेट्या आहेत

वरच्या मजल्यावरील एका खोलींत नाण्यांचा एक बराच मोठा संग्रह तिजोरींत ठेवलेला असून संग्रहालयाच्या आवारांतील मंडपांत शिलालेखांचा एक प्रचंड संग्रह आहे

| ड व क्रमांक | वर्णन | पृष्ठसंख्या | चित्रसंख्या | किंमत रु |
|---|---|---|---|---|
| | **सृष्टिविज्ञानविभाग** | | | |
| खंड १, क्र १, १९२७ | मानारच्या आखातातील क्रुसदाय बेटावरील किनाऱ्यालगतचे प्राणी, पाठीचा कणा असलेले प्राणी आणि वनस्पति यावरील परिशिष्टासह विविध लेखक | १९६ | २६ | ८/– |
| खंड १, क्र २ भाग १, १९३० | मानारच्या आखातातील क्रुसदाय बेटावरील किनाऱ्यालगतच्या प्राण्यांसबंधीची पुरवणी पॉगे–छेग चे लेखक–श्री सुंदर राज आणि अल्सीडचे लेखक एफ् एच् ग्रेव्हली | ७९ | १ | ३/– |
| खंड १, क्र २, भाग २, १९३१ | आर्किओनेरियाच्या तीन जाति लेखक-सिडने जे हिक्सन्, एफ् आर् एस, (तीन आकृत्यांसह) | ६ | — | –/४/– |
| खंड १, क्र, २, भाग ४, १९४२ | मानारच्या आखातातील क्रुसदाय बेटावरील किनाऱ्यालगतच्या प्राण्यासबंधीची पुरवणी–शंखप्राण्याचा वर्ग (पोरिफेरा). लेखक–एम् बर्टन, डी एस्सी | ५८ | ६ | १/१४/– |
| खंड १, क्र २, भाग ५, १९४३ | मानारच्या आखातातील क्रुसदाय बेटावरील फोरॅमिनीफेरा लेखक–सी पी ज्ञानमुत्तु, एम् ए, डी एस्सी, एफ् झेड् एस् | ७१ | ४ | १/६/– |
| खंड २, १९२९ | मद्रास शहर आणि त्याच्या आसपासच्या भागातील फुलझाडे लेखक–पी व्ही मथुरनायन्, बी ए, वनस्पतिशास्त्रविषयक साहाय्यक, मद्रास संग्रहालय | ३४५ | ३८ | ८/– |
| खंड ३, क्र १ १९३० | मद्रास आणि त्यालगतच्या किनाऱ्याच्या प्रदेशांतील सायफोमेड्युसे लेखक–एम् जी के मेनन, एम् ए, संशोधक, मद्रास विद्यापीठ, प्राणीशास्त्र विषयक संशोधनशाळा | २८ | ३ | १/२/– |
| खंड ३, क्र २ १९३२ | मद्रास येथील जलचरप्राणिविशेष (हायड्रोमेड्युसे) लेखक–एम् जी के मेनन, एम् ए | ३२ | ३ | १/२/– |
| खंड ३, क्र ३ १९३३ | मद्रास येथील डेकापॉड क्रस्टेशिआंचा (दशपाद कवचधर प्राणीवर्गाचा) जीवन इतिहास लेखक–एम् कृष्ण मेनन, एम् ए | ४५ | १० | २/६/– |
| खंड ३, क्र ४, १९३३ | मद्रास किनाऱ्यावरील सागिटा (शराकृति प्राणीवर्ग) लेखक–सी सी जॉन, एम् ए, डी एस्सी | १० | १ | – |
| खंड ३, क्र ५, १९३७ | मद्रासच्या तरणजीव संघामधील (प्लँक्टनमधील दशपाद कोशातर्गत कीटक–डेकापाड लार्व्हे) लेखक–एम् कृष्ण मेनन, एम् ए, एम् एस्सी | ५५ | ६ | १/१४/– |
| खंड ३, क्र ६ १९४० | मद्रासच्या तरणजीव संघामधील दशपाद कोशातर्गत कीटक (प्लँक्टन मधील डेकापॉड लार्व्हे)–भाग २ लेखक–एम् कृष्ण मेनन, एम् ए, एम् एस्सी | ४७ | ८ | १/८/– |
| खंड ४, क्र १ १९३१ | जीनस कॅरालुमाच्या (फॅ अस्क्लेपिअडेसी), भारतीय जाति लेखक–एफ् एच् ग्रेव्हली, डी एस्सी आणि पी व्ही मथुरनायन बी ए सरकारी संग्रहालय, मद्रास | २८ | ४ | १/८/– |
| खंड ४, क्र २, १९३८ | मद्रास शहर आणि त्याच्या आसपासच्या भागातील फुलझाडांसबंधीची पुरवणी लेखक–ई बार्नेस, डी एस्सी | ४६ | ७ | १/१०/– |
| खंड ५, क्र १ १९४१ | मद्रास किनाऱ्यावर सापडलेले शंख आणि प्राण्याचे इतर अवशेष–१ गोगलगाय वगैरे खेरीज इतर नमाच प्राणी लेखक एफ् एच् ग्रेव्हली डी एस्सी | ११२ | – | ३/२/– |

| खंड व क्रमांक | वर्णन | पृष्ठसंख्या | चित्रसंख्या | किंमत रु. |
|---|---|---|---|---|
| खंड ५, क्र. २, १९४२ | मद्रास किनाऱ्यावर सांपडलेले शंख आणि शंख्यांचे इतर अवशेष — २. गोगलगायी वगैरे. (मोलस्का गॅस्ट्रोपोडा): लेखक: एफ्. एच्. ग्रेव्हली, डी. एस्सी. | ११० | — | २/१२/- |
| खंड ६, क्र. १, १९४५ | मद्रासच्या तरणजीवसंघांतील (प्लँक्टनमधील) थालिआसिया: लेखक — आर्. वेलप्पन नायर, एम्. एस्सी. | ४१ | ६ | १/१२/- |
| खंड ६, क्र. २, भाग ६. | क्रुसदाय बेटांतील ॲम्फीन्यूरा आणि गॅस्ट्रोपोडा: लेखक — थॉमस सत्यमूर्ति, एम्. ए. | — | — | १०/१२/- |
| खंड ६, क्र. ३ | मद्रास येथील सरकारी संग्रहालयांतील सिरिपेडिआ: लेखक — ए डॅनिएल. | ४० | १६ | २/५/- |
| | *सामान्य विभाग (अनुक्रमें मानवशास्त्र व पुराणवस्तुशास्त्र यांवरील स्वतंत्र ग्रंथांसह)* | | | |
| खंड १, क्र. १, १९२९ | गुंटुर जिल्ह्यांतील गोली या खेड्यानजीकच्या स्तूपांतील बौद्धधर्मीय शिल्पकृति: लेखक — टी. एन्. रामचंद्रन्, एम्. ए. | ४४ | ४ | २/१२/- |
| खंड १, क्र. २, १९३२ | मद्रास येथील सरकारी संग्रहालयांतील धातूच्या दक्षिण भारतीय हिंदु मूर्तींची सूचि: लेखक — एफ्. एच्. ग्रेव्हली, डी. एस्सी. आणि टी. एन्. रामचंद्रन्, ए. ए. | १४४ | ३३ | ५/८/- |
| खंड १, क्र. १, १९३० | तिरुप्परुत्तिकुंड्रम आणि तेथील मंदिरें, शिवाय जैनांचीं वस्तुमापनाचीं आणि कालमापनाचीं परिमाणें, कॉस्मॉलॉजी आणि आत्म्यांचें वर्गीकरण: लेखक — टी. एन्. रामचंद्रन्. | २६० | ३७ | ११/४/- |
| खंड २, क्र. १, १९३० | आदिचनाल्लूरच्या डोक्याच्या कवट्या: लेखक — एस्. झुकरमन्, एम्. ए., एम्. आर्. सी. एस्., एल्. आर्. सी. पी. ह्यावरोबरच प्रो. जी. इलियट स्मिथ, एफ्. एच्. एस्. यांचीं टिपणें | २४ | ३ | १/६/- |
| खंड २, क्र. २, १९३१ | श्री वैष्णव ब्राह्मण: लेखक — दिवाणबहादुर के. रंगाचारी, एम्. ए., एल्. टी. | १५८ | १२ | ५/१२/- |
| खंड २, क्र. ३, १९३१ | मद्रासच्या सरकारी संग्रहालयात प्रदर्शित केलेल्या वाद्यांसंबंधीची सूचि: लेखक — पी. सांबमूर्ति, बी. ए. बी. एल्. | २५ | ९ | २/८/- |
| खंड २, क्र. ४, १९३७ | मलबारच्या नयाडींचें सामाजिक आणि शारीरिक मानवशास्त्र: लेखक — ए. अय्यप्पन, एम्. ए. | १४१ | १२ | ३/२/- |
| खंड ३, क्र. १, १९३४ | शिल्पशास्त्रसंमत देवालय: वास्तुशास्त्राचे तीन मुख्य प्रकार, लेखक — एफ्. एच्. ग्रेव्हली, डी. एस्सी. आणि टी. एन्. रामचंद्रन्, एम्. ए. | २६ | २ | १/- |
| खंड ३, क्र. २, १९३६ | भारतीय देवालय: वास्तुशास्त्राची रूपरेखा, लेखक — एफ्. एच्. ग्रेव्हली, डी. एस्सी. | ३३ | १ | -/१४/- |
| खंड ३, क्र. ३, १९३८ | मद्रासच्या सरकारी संग्रहातील व्हेनिसच्या नाण्यांची सूचि: लेखक — टी. जी. अरवमुथन्, एम्. ए., बी. एल्. | ५९ | १ | १/८/- |

| खंड व क्रमांक | वर्णन | पृष्ठ-संख्या | चित्रसंख्या | किंमत रु. |
|---|---|---|---|---|
| १९३९ | पुराणवस्तुप्रदर्शनविभागाचा मार्गदर्शक—दक्षिण भारतीय देवालयविषयक वास्तुशास्त्र आणि शिल्पशास्त्र यांचा परिचय, लेखक—एफ्. एच् ग्रेव्हली, डी. एस्सी. आणि सी. शिवराममूर्ति व इतर संग्रहालयाध्यक्ष | ४८ | ६ | १/- |
| १९३९ | पुराणवस्तुप्रदर्शनविभागाचा मार्गदर्शक या पुस्तकाबरोबर वापरण्याकरिता भारतीय शिल्पशास्त्रविषयक (बहुतांशी दाक्षिणात्य) चित्रें, लेखक—एफ् एच् ग्रेव्हली, डी. एस्सी. आणि सी. शिवराममूर्ति, एम् ए. | | ४५ | १/- |
| खंड ४, १९४२ | मद्रासच्या सरकारी संग्रहालयांतील अमरावतीच्या शिल्पकृति, लेखक—सी. शिवराममूर्ति, एम् ए. | ३७६ | ६५ | १४/८/- |
| खंड ५, क्र १, १९४४ | इरावा आणि सांस्कृतिक स्थित्यंतर, लेखक—ए. अय्यप्पन्, एम् ए., पीएच् डी. (लंडन) | २०४ | १२ | १६/१०/- |
| खंड ६, क्र. १, १९५१ | तोडा जातीच्या धार्मिक रीतिरिवाजांतील संभाव्य अवशिष्ट सुमेरियन रीतिरिवाज, लेखक—एच्. आर्. एच्. ग्रीसचे राजकुमार पिटर, एम्. ए (सन्माननीय) एलएल्. डी. | ३४ | १० | ६/४/- |
| खंड ३, क्र. ४ | भारतीय पुराभिलेखविद्या आणि दक्षिण भारतीय लिप्या, लेखक—सी. शिवराममूर्ति, एम्. ए. | — | — | १०/८/- |
| १९५२ | मद्रासच्या सरकारी संग्रहालयाची शताब्दि— | १५८ | १२ | १६/१०/- |
| १९५२ | बौद्धधर्मीय पुरातनवस्तूंची मार्गदर्शिका, लेखक—ए. अय्यप्पन् आणि पी आर्. श्रीनिवासन् | ५८ | — | १/१०/- |
| १९५३ | भिन्नभिन्न कालांतील भारतीय नाणीं | १७ | ३ | -/८/- |
| खंड ८, क्र. १, १९५४ | नागपट्टनमच्या ब्रॉंझच्या शिल्पकृति, लेखक—टी. एन्. रामचंद्रन्, एम्. ए. | — | — | ६/- |
| खंड ७, क्र. ३, १९५७ | प्रारंभिक पौर्वात्य चालुक्य शिल्पकृति, लेखक—सी. शिवराममूर्ति, एम् ए. | ७१ | ३५ | ६.६० न. पै. |

**कामाचे तास .** संग्रहालय शुक्रवार सोडून सर्व दिवशी सकाळी ७ ते सायंकाळी ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ** संग्रहालय व राष्ट्रीय कला प्रदर्शन विभागाची व्यवस्था अधीक्षक व या दोन्हींसाठीं सरकारनें स्थापन केलेल्या स्वतंत्र कमिटीकडून पाहिली जाते

**सेवकवर्ग :** अधीक्षक–डॉ एम टी सत्यमूर्ति, एम ए डी, एस्सी, संग्रहालयाध्यक्ष मानवशास्त्रविभाग–श्री सी जे जयदेव, एम ए, एल टी, संग्रहालयाध्यक्ष–पुराणवस्तुशास्त्रविभाग–श्री पी आर् श्रीनिवासन एम् ए., संग्रहालयाध्यक्ष–वनस्पतिशास्त्र व भूगर्भशास्त्रविभाग–श्री एम् एस् चन्द्रशेखर, बी एस्सी, संग्रहालयाध्यक्ष–नाणकशास्त्र विभाग–कुमारी आर् वनजा, एम् ए, एम लिट्, संग्रहालयाध्यक्ष–रासायनिक संरक्षणविभाग–श्री एन हरीनारायण, एम्. ए., बी एस्सी (टेक्), सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष–प्राणिविज्ञानविभाग–कुमारी ए विमला, बी. ए, साहाय्यक संग्रहालयाध्यक्ष–कला पुराणवस्तुशास्त्रविभाग–कुमारी पद्मा, बी ए, बी टी, कार्यालय साहाय्यक, तीन उच्च श्रेणींचे कारकून, सहा कनिष्ठ श्रेणींचे कारकून, टंकलेखक, वरिष्ठ पेंढा भरणारा व त्याचा मदतनीस, छायाचित्रकार, साहाय्यक छायाचित्रकार, संग्रहालय व सभागृह यांची देखरेख करणारा, मुद्रक, आठ शिपाई दफ्तरदार, २७ पहेवाले, ११ पहारेकरी, बागेचा मिस्त्री, दोन माळी व सात झाडूवाले राष्ट्रीय कला प्रदर्शन विभागातील सेवकवर्ग कारकून, दोन पहेवाले, दोन पहारेकरी, बागेचा मिस्त्री व चार माळी

**आर्थिक तरतूद :** अर्थसंकल्पातील वार्षिक तरतूद रु २,६१,५०० इतकी आहे

**अभिप्राय :** संग्रहालय शहरात सोयीस्कर ठिकाणी वसलेलें असून तें पाहावयास येणाऱ्यांची सरासरी संख्या दैनिक १२१८ व वार्षिक ४,८१,२४७ इतकी असते कनुपोंगल दिन व वैकुंठद्वादशी अशा महत्त्वाच्या दिवशीं या संख्येंत अधिक भर पडते संग्रहालयाची सध्यांची इमारत प्रदर्शित वस्तूंसाठीं पुरेशी असून, इमारतीत वाढ करण्यास भरपूर वाव आहे व तशी योजनाहि आहे कलाकृतींचा साठा करण्यास मात्र पुरेशी जागा नाहीं संग्रहालयाची राखण करण्यासाठीं दिवसपाळी व रात्रपाळीचे पहारेकरी आहेत व नाणीं एका बंदिस्त खोलीत ठेवलेली आहेत संग्रहालयासाठीं एक स्वतंत्र रासायनिक प्रयोगशाळेची सोय केलेली आहे संग्रहालय पाहावयास येणाऱ्यांसाठीं खुर्च्या, बाक, पडदे, इ० ची तरतूद केलेली आहे या संग्रहालयातील वस्तूंची देवाणघेवाण भारतातील व परदेशांतील संग्रहालयांबरोबर सुरू असते गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्याबाबत या संग्रहालयास मान्यता देण्यात आली असून संग्रह करण्याची साधनें, खरेदी, संशोधन, उत्खनन, देणग्या, गुप्तनिधि व देवघेव ही होत संग्रहालयाची खास वैशिष्ट्यें राखविण्यासाठीं नकाशे, तक्ते, नमुने, ओतीव कृति, चित्रें, पारदर्शक चित्रें, इ० चें सहाय्य घेतलें जातें हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे शालेय संग्रहालयांची आखणी करण्याच्या दृष्टीनें शिक्षकांना संग्रहालय तंत्राचें ज्ञान व्हावें म्हणून लोकशिक्षण संचालक हे दरवर्षी शिक्षकांना संग्रहालयांत पाठवितात त्यांचेंही येथें संग्रहालयशास्त्रासंबंधी काम वर्ग घेतले जातात निरनिराळ्या जिल्ह्यांतील जनतेचें व सरकारी अधिकाऱ्यांचें सहकार्य मिळविण्यासाठीं पाच अवैतनिक प्रतिनिधींची नेमणूक करण्यात आली आहे स्वाभाविक पार्श्वभूमि निर्माण करण्यासाठीं प्रकाशाची व रंगाची सोय असलेली आभासचित्रें मिळविण्याचे प्रयत्न केले जात आहेत भारतीय नाणकशास्त्राचा इतिहास दर्शविणाऱ्या नाण्यांच्या साच्याच संच तयार केले असून ते शाळांना व लोकांना विकत मिळूं शकतात

**मदुराई :** लोकसंख्या ३,६१,७८१

## (१) गांधी स्मारक संग्रहालय

**स्थापना .** १९४९

**पूर्वेतिहास .** महात्मा गांधींची पवित्र स्मृति जागृत ठेवण्याकरितां, सन १९४९ मध्ये गांधी स्मारक निधिसमितीनें भारतातील निरनिराळ्या ठिकाणी चार संग्रहालयें उघडण्याचें ठरविलें त्याप्रमाणें नवी दिल्ली, सेवाग्राम, साबरमती व मदुराई येथें गांधी स्मारक संग्रहालयें उघडण्यात आलीं मदुराई येथील संग्रहालयाचा उद्देश इतर संग्रहालयांप्रमाणेंच गांधीजींच्या संबंधातील वस्तु, कागदपत्रें, त्यांनीं व त्यांना लिहिलेली पत्रें व पुस्तकें, त्यांचीं रंगचित्रें व छायाचित्रें जमविणें व तीं जतन करून ठेवणें हा आहे गेली आठ वर्षे हें संग्रहालय प्रमुख भारतीय व परदेशी भाषांतील गांधींसंबंधींचें वाङ्मय, गांधीजींनी या देशांतील व परदेशांतील व्यक्तींना लिहिलेली पत्रें व त्यांच्या छायामुद्रित प्रती यांचा संग्रह करीत आहे

**व्याप्ति व संग्रह .** येथील संग्रह गांधीजींच्या वैयक्तिक वस्तु, त्यांचीं स्वतःचीं चित्रें व त्यांच्यासंबंधींचें वाङ्मय यांपुरताच मर्यादित आहे या संग्रहालयात अधिक भर घालून तो समृद्ध करण्यात येत आहे

**शैक्षणिक कार्य .** गांधीजींचें जीवन व त्यांचीं ध्येयें यासंबंधींची सर्वांगीण माहिती देशांतील लोकांना व्हावी, हा या संग्रहाचा उद्देश आहे संग्रहालयात एक संदर्भ ग्रंथालय असून त्यात गांधीजींनीं लिहिलेलीं व त्यांच्यावर लिहिलेलीं पुस्तकें व गांधीवादी विचारसरणी, तत्त्वज्ञान व तंत्र विशद करणारें इतर वाङ्मय आहे पुस्तकें निरनिराळ्या भारतीय व परकीय भाषांत आहेत ग्रंथालयास जोडलेल्या वाचनालयात गांधीजींनीं सुरू केलेल्या साप्ताहिकांचे अंकवार बांधून ठेवलेले गट्ठे आहेत गांधीजींचीं पत्रें, टीपा, विनंती अर्ज यांच्या छायामुद्रित प्रती, संदर्भासाठीं मिळूं शकतात

**प्रकाशनें :** नाहीत

**कामाचे तास .** संग्रहालय सर्व दिवशीं सकाळीं १० ते दुपारीं ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मंडळ** गांधी स्मारक निधि

**सेवकवर्ग .** संचालक

**आर्थिक तरतूद** गांधी स्मारक निधि पुरस्कृत कार्यक्रमांपैकी एक म्हणून या संग्रहालयासाठीं त्यांतून आर्थिक तरतूद केली जाते

**अभिप्राय .** गांधीजींचें जीवन व त्यांची शिकवण यांविषयींचें मौलिक संदर्भ ग्रंथालय येथें असल्यामुळें हें संग्रहालय अत्यंत लोकप्रिय झालें असून तें पाहावयास प्रत्येक महिन्यात असंख्य लोक येतात

| क्रमांक | माहितीपुस्तकें ( जुनी ग्रंथमाला ). | किंमत रु. |
|---|---|---|
| १. | कॅटलाग् ऑफ् प्रि-हिस्टॉरिक ॲन्टिक्विटीज्–आर्. ब्रूस फूट–१९०१. | ५/४/– |
| २. | दि फूट कलेक्शन ऑफ् इंडियन प्रि-हिस्टॉरिक ॲण्ड प्रोटो-हिस्टॉरिक ॲन्टिक्विटीज्, कॅटलाग् रेझॉ-आर्. ब्रूस फूट–१९१४. | २/– |
| ३. | कॅटलाग् ऑफ् प्रि हिस्टॉरिक ॲन्टिक्विटीज् फ्रॉम अदिचनल्लूर आणि पेरुम्बियर–ए. री.–१९१५. | १/८/– |
| ४. | दि फूट कलेक्शन ऑफ् इंडियन प्रि-हिस्टॉरिक ॲण्ड प्रोटो हिस्टॉरिक ॲन्टिक्विटीज्–नोटस् ऑन देअर एजेस् ॲण्ड डिस्ट्रिब्यूशन–आर्. ब्रूस फूट–१९१६. | ९/१२/– |
| ५. | कॅटलॉग ऑफ् एक्झिबिटस् इन् द इकॉनॉमिक प्रॉडक्टस् सेक्शन एक्सेप्ट वुड स्पेसिमेन्स्–एम्. एन्. चंद्रशेखर अय्यर–१९२१. | २/०/– |
| ६. | कॅटलॉग ऑफ दि कॉइन्स् ऑफ् हैदरअली ॲण्ड टिपू सुलतान–जे. आर्. हेंडरसन–१९२१. | ४/– |
| ७. | कॅटलॉग ऑफ् कॉपर-प्लेट ग्रँटस्– | –/१४/– |
| ८. | ग्रामोफोन रेकॉर्डस् ऑफ् दि लँग्वेजेस् ॲण्ड डायलेक्टस् ऑफ् दि मद्रास प्रेसिडेन्सी, टेक्स्ट ऑफ् पॅसेजेस्. | १/४/– |
| ९. | कॅटलॉग ऑफ् दि बट्राशिया, सॅलिएन्शिया ॲण्ड ॲपेडा ( फ्रॉग्स्, टोडस् ॲण्ड सीएसिलिअन्स् ऑफ साऊथ इंडिया ) ई. थर्स्टन–१८८८. | २/८/– |
| १०. | गाईड टु नॅचरल हिस्टरी ॲण्ड मिनरल गॅलरीज्–१८९०. | –/२/– |
| ११. | सायन्स सिरीज् नं. १–प्रिलिमिनरी रिपोर्ट ऑन दि मरीन फॉना ऑफ् रामेश्वरम्—१८८७. | –/१०/– |
| १२. | कॉइनस् ऑफ् सुलतानस् ऑफ् देल्ही–ई. थर्स्टन. | –/३/– |

| खंड व क्रमांक | | पुस्तिका ( जुनी ग्रंथमाला ) | किंमत |
|---|---|---|---|
| १. | क. १ | पर्ल ॲण्ड चँक फिशरीज इन दि गल्फ ऑफ मानार—ई. थर्स्टन–१८९५. | १/४/– |
| २ | क ३ | रामेश्वरम् आयलंड ॲण्ड फॉना ऑफ् दि गल्फ ऑफ् दि मानार–ई. थर्स्टन–१८९७. | १/८/– |
| ३ | खण्ड २, क १ | ॲन्थ्रापॉलॉजी–बडागाज् ॲण्ड इरुलाज् ऑफ् दि निलगिरीज्, पणियाज् ऑफ् मलबार, ए चायनीज् तामीळ कॉस, ए चेरुमन स्कल : कुरुबा ऑर कुरुम्बा; समरी ऑफ् दि रिझल्टस्–ई. थर्स्टन–१८९७. | २/–/– |
| ४ | खण्ड २, क २ | ॲन्थ्रापॉलॉजी–युरेशियनस् ऑफ मद्रास ॲण्ड मलबार : नोट ऑन टेअर टॅटूइंग–ई. थर्स्टन–१८९८. | १/–/– |
| ५. | खण्ड ३, क २ | दि सी फिशरीज् ऑफ् मलबार ॲण्ड साऊथ कॅनरा–ई. थर्स्टन–१९००. | १/४/– |
| ६. | खण्ड ३, क ३ | ॲन्थ्रापॉलॉजी, नायर्स ऑफ् मलबार–एफ्. फॉसेट–१९०१. | १/८/– |
| ७ | खण्ड ४, क १ | ॲन्थ्रापॉलॉजी–दि द्रविडियन हेडस् बगदीज ऑफ् नेल्लोर–१९०२ | १/–/– |
| ८. | खण्ड ४, क ३ | ॲन्थ्रापॉलॉजी–सम् मॅरेज कस्टमस् इन साऊथ इंडिया · डिफॉर्मिटी ॲण्ड म्युटिलेशन · डरलीज्, गोल्लाज् ॲण्ड इरुलाज्, फायर-वॉकिंग् इन् रेशम वारॉरल पनिशमेंट इन म्युनिसिपल स्कूल्स–१९०३. | –/१२/– |
| ९. | खण्ड ५, क १ | ॲन्थ्रापॉलॉजी–ब्रिहमन् ऑफ् डरलीज् ॲण्ड सोलगास्, मोअर मॅरेज् कस्टमस् इन् सदर्न इंडिया : इक लिविंग, पायसम्–१९०३ | १/– |

**कामाचे तास** संग्रहालय गुरुवार सोडून सव दिवशी सकाळी ७ ते सध्याकाळी ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मडळ** संग्रहालय व राष्ट्रीय कला प्रदर्शन विभागाची व्यवस्था अधीक्षक व या दोन्हीसाठी सरकारने स्थापन केलेल्या स्वतंत्र कमिटीकडून पाहिली जाते

**सेवकवर्ग** अधीक्षक–डॉ एस टी सत्यमूर्त एम ए टी, एस्सी, संग्रहालयाध्यक्ष-मानवशास्त्रविभाग–श्री मी जे जयन्त, एम ए, एल टी संग्रहालयाध्यक्ष–पुराणवस्तुशास्त्रविभाग–श्री पी आर् श्रीनिवासन एम् ए, संग्रहालयाध्यक्ष–वनस्पतिशास्त्र व भूगर्भशास्त्रविभाग–श्री एम् एन् चन्द्रशेखर, बी एस्सी, संग्रहालयाध्यक्ष–नाणकशास्त्र विभाग–कुमारी आर् वनजा, एम् ए, एम् लिट्, संग्रहालयाध्यक्ष–रासायनिक संरक्षणविभाग–श्री एन हरीनारायण, एम् ए, बी एस्सी (टक्), सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष–प्राणिविज्ञानविभाग–कुमारी ए विमला, बी ए साहाय्यक संग्रहालयाध्यक्ष–कला पुराणवस्तुशास्त्रविभाग–कुमारी पद्मा, बी ए, बी टी, कार्यालय साहाय्यक, तीन उच्च श्रेणीचे कारकून, सहा कनिष्ठ श्रेणीचे कारकून, टंकलेखक, दरिद्र पैसा भरणारा व त्याचा मदतनीस, छायाचित्रकार, साहाय्यक छायाचित्रकार, संग्रहालय व सभागृह यांची दुरुस्ती करणारा सुतार आठ शिपाई हवालदार ३७ पट्टेवाले ११ पहारेकरी, बागेचा मिस्त्री, दोन माळी व सात झाडूवाले राष्ट्रीय कला प्रदर्शन विभागातील सेवकवर्ग-कारकून दोन पट्टेवाले दोन पहारेकरी, बागेचा मिस्त्री व चार माळी

**आर्थिक तरतूद** अर्थसंकल्पातील वार्षिक तरतूद रु २६१,५०० इतकी आहे

**अभिप्राय** संग्रहालय शहरात सोयीस्कर ठिकाणी वसलेले असून ते पाहावयास येणाऱ्यांची सरासरी संख्या दैनिक १२१८ व वार्षिक ४,८१,२४७ इतकी असते कनुपोंगळ दिन व वैकुंठएकादशी अशा महत्त्वाच्या दिवशी या संख्येंत अधिक भर पडते संग्रहालयाची सध्याची इमारत प्रदर्शन वस्तूसाठी पुरेशी असून, इमारतीत वाढ करण्यास भरपूर वाव आहे व तशी योजनाहि आहे कलाकृतींचा संग्रह करण्यास मात्र पुरेशी जागा नाही संग्रहालयाची राखण करण्यासाठी दिवसाळी व रात्रपाळीचे पहारेकरी असून व नाणी एका पेटीत ठेवलेली आहेत संग्रहालयासाठी एका स्वतंत्र रासायनिक प्रयोगशाळेची सोय केलेली आहे संग्रहालय पाहावयास येणाऱ्यांसाठी खुर्च्या वाक पंखे इ० ची तरतूद केलेली आहे या संग्रहालयातील वस्तूंची देवाणघेवाण भारतातील व परदेशातील संग्रहालयांबरोबर होत असते गुप्तनिधीतील वस्तु स्वीकारण्याबाबत या संग्रहालयास मान्यता देण्यात आली असून संग्रह करण्याची साधन खरेदी संशोधन उत्खनन, देणग्या गुप्तनिधि व देवघेव ही होत संग्रहाच्याची खास वैशिष्ट्ये दाखविण्यासाठी नकाशे तक्ते नमुने ओतीव कृति चित्रें पारदर्शक चित्रें इ० च सहाय्य घेतलें जातें हे संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचे सदस्य आहे शालेय संग्रहालयाची आवड निर्माण करण्याच्या दृष्टीने शिक्षकांना संग्रहालय तंत्राचे ज्ञान व्हावें म्हणून लोकशिक्षण संचालक हे केव्हा शिक्षकांना संग्रहालयात पाठवितात त्यावेळी येथे संग्रहालयाभ्यासासंबंधी खास वर्ग घेतले जातात निरनिराळ्या जिल्ह्यातील जनतेच व सरकारी अधिकाऱ्यांच सहकार्य मिळविण्यासाठी पांच अवैतनिक प्रतिनिधींची नेमणूक करण्यात आली आहे स्वाभाविक पार्श्वभूमी निर्माण करण्यासाठी प्रकाशाची व रंगाची सोय असलेली आभासचित्रें मिळविण्याचे प्रयत्न केले जात आहेत भारतीय नाणकशास्त्राचा इतिहास दर्शविणाऱ्या नाण्याच्या साच्यांच संच तयार केले असून ते शाळांना व लोकांना विक्री मिळू शकतात

**मदुराई** लोकसंख्या ३ ६१ ७८१

## (१) गांधी स्मारक संग्रहालय

**स्थापना** १९४९

**पूर्वेतिहास** महात्मा गांधींची पवित्र स्मृति जागृत ठेवण्याकरितां, सन १९४९ मध्य गांधी स्मारक निधिसमितीने भारतातील निरनिराळ्या ठिकाणी चार संग्रहालयें उघडण्याचे ठरविलें त्याप्रमाणें नवी दिल्ली, सेवाग्राम, साबरमती व मदुराई येथे गांधी स्मारक संग्रहालय उघडण्यात आली मदुराई येथील संग्रहालयाचा उद्देश इतर संग्रहालयाप्रमाणेंच गांधीजींच्या सबंधातील वस्तु कागदपत्रें त्यांनी व त्यांना लिहिलेली पत्रें व पुस्तक, त्यांची रंगचित्रें व छायाचित्रे जमविणे व ती जतन करून ठेवणें हा आहे गेली आठ वर्षे हें संग्रहालय प्रमुख भारतीय व परदेशी भाषातील गांधींसंबंधींचें वाङ्मय, गांधीजींनी या देशातील व परदेशातील व्यक्तींना लिहिलेली पत्रें व त्यांच्या छायामुद्रित प्रती यांचा संग्रह करीत आहे

**व्याप्ति व संग्रह** यथील संग्रह गांधीजींच्या वैयक्तिक वस्तु, त्यांची स्वत ची चित्रें व त्यांच्यासंबंधीचे वाङ्मय यापुरताच मर्यादित आहे या संग्रहात अधिक भर घालून तो समृद्ध करण्यात येत आहे

**शैक्षणिक कार्य** गांधीजींचें जीवन व त्यांची ध्येयें यासंबंधीची सर्वांगीण माहिती देशातील लोकांना व्हावी, हा या संग्रहाचा उद्देश आहे संग्रहालयात एक संदर्भ ग्रंथालय असून त्यात गांधीजींनी लिहिलेली व त्यांच्यावर लिहिलेली पुस्तके व गांधीवादी विचारसरणी तत्त्वज्ञान व तंत्र विशद करणारें इतर वाङ्मय आहे पुस्तकें निरनिराळ्या भारतीय व परकीय भाषात आहेत ग्रंथालयास जोडलेल्या वाचनालयात गांधीजींनी सुरू केलेल्या साप्ताहिकांचे क्रमवार बांधून ठेवलेले अंक आहेत गांधीजींची पत्रें, टीपा, विनंती पत्रें यांच्या छायामुद्रित प्रती संदर्भासाठी मिळू शकतात

**प्रकाशनें** नाहीत

**कामाचे तास** संग्रहालय सर्व दिवशी सकाळी १० ते दुपारी ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मडळ** गांधी स्मारक निधि

**सेवकवर्ग** संचालक

**आर्थिक तरतूद** गांधी स्मारक निधि पुरस्कृत कार्यक्रमापैकी एक म्हणून या संग्रहालयासाठी स्वतंत्र आर्थिक तरतूद केली जाते

**अभिप्राय** गांधीजींचे जीवन व त्यांची शिकवण याविषयींचे मौलिक संदर्भ ग्रंथालय येथे असल्यामुळे हें संग्रहालय अत्यंत लोकप्रिय झाले असून तें पाहावयास प्रत्येक महिन्यात असंख्य लोक येतात

## (२) श्री मीनाक्षी सुंदरेश्वर मंदिर संग्रहालय

स्थापना : १९४२

**पूर्वेतिहास :** संग्रहालयाचें उद्घाटन ६ मार्च १९४२ रोजीं सर थॉमस ऑस्टिन्, सी. आय्. ई., आय्. सी. एस्., यांच्या हस्तें झालें. संग्रहालयाची सुरुवात चांगली झालेली असली तरी अलीकडे कांहीं वर्षांत संपूर्णपणें दुर्लक्ष झालेलें आहे व आतां संपूर्ण साहित्य गोदामात सांठविलेलें आहे. संग्रहालयाची योग्य प्रकारें पुनर्रचना केली जाईल अशी आशा आहे.

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयांतील वस्तूंमध्यें दिवेधारी स्त्रियांच्या धातूच्या प्रतिमा, पिंजऱ्याच्या आकाराचा एक अप्रतिम दिवा व राजहंसाच्या आकाराचा लटकता लामण दिवा, देवळांत वाजवावयाचे शंख, सुशोभित केलेल्या चवऱ्या, जडजवाहिराच्या पेट्या आणि इतर किरकोळ वस्तु विशेष उल्लेखनीय आहेत.

**शैक्षणिक कार्य :** मद्रास सरकारच्या हिंदुधर्मीय व धर्मादाय निधि-विभागाकडून जेव्हां जेव्हां आज्ञा करण्यांत येते तेव्हां तेव्हां ह्या संग्रहालयांतील कांहीं वस्तु निरनिराळ्या प्रदर्शनांत ठेवण्यासाठीं पाठविल्या जातात व त्याप्रमाणें अखिल भारतीय खादी स्वदेशी आणि औद्योगिक प्रदर्शनात कोईमतूर व तंजावर येथें भरलेल्या पांचव्या तामिळ महोत्सवाच्या प्रसंगीं अशा वस्तु पाठविण्यात आल्या होत्या.

**प्रकाशनें :** नाहींत

**कामाचे तास :** संग्रहालयाचें सामान एका गोदामांत ठेवण्यात आलेलें असून साधारणतः तें सध्या बंदिस्त स्थितींतच आहे व केवळ कांहीं जिज्ञासू प्रेक्षकांनीं विनंती केली तरच तें उघडून त्यांतील वस्तु त्यांना दाखविल्या जातात.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय श्री मीनाक्षी सुंदरेश्वरम् देवस्थानमचा एक भाग असून त्याची व्यवस्था देवस्थान अधिकाऱ्याकडून केली जाते

**सेवकवर्ग :** नाहीं.

**आर्थिक तरतूद :** स्वतंत्र अशी आर्थिक तरतूद नाहीं.

**अभिप्राय :** वस्तुतः संग्रहालयाची पुनर्मांडणी व मांडणी अजून व्हावयाची आहे कारण त्याचें सामानसुमान एका गोदामात इतस्ततः विखुरलेलें असून त्याची नीट मांडणी करावयास हवी. देवळांतील धार्मिक विधींना लागणाऱ्या जुन्या वस्तु ह्या संग्रहालयासाठीं एकत्र केल्या असून त्या पाहण्यासारख्या आहेत. त्या देवालयाच्या मालकीच्या असल्या तरी वाटेल तेव्हां पाहावयास सिद्ध नसतात

**पद्मनाभपुरम् :** लोकसंख्या १३,३९७

### पुराणवस्तुसंग्रहालय

स्थापना : १९३९

**पूर्वेतिहास :** पद्मनाभपुरम् येथें सन १९३९ सालीं स्थापन केलेलें संग्रहालय हें खरें पाहतां दोन संग्रहालयांचें मिळून बनलेलें आहे. एक पुराणवस्तुसंग्रहालय व पद्मनाभपुरम् राजवाडा हें दुसरें संग्रहालय होय

**व्याप्ति व संग्रह :** पुराणवस्तुसंग्रहालयांत शिलालेख, ताम्रपट, नाणीं, दगडी पुतळे इत्यादि वस्तूंचा संग्रह असून त्यावरून त्रावणकोरचा प्राचीन इतिहास ग्रथित केला आहे. त्रावणकोर ही त्रावणकोर संस्थानाची राजधानी असल्यापासून हा राजवाडा त्रावणकोरच्या राजघराण्याचें प्राचीन निवासस्थान बनला आहे. त्यांतील लाकडी सामान व इतर घरकामासाठीं व धार्मिक विधीसाठीं लागणारें सामान, त्याचप्रमाणें भिंतीवरील रंगचित्रें व इत्यादि यासहित प्रस्तुत राजवाडा जतन करून ठेवण्यांत आला आहे. त्या काळीं घरगुती वस्तु कशा असत याचे उत्तम नमुने या राजवाड्यांत असून त्यांत लाकडावरील कोरीव कामाचे व शिल्पकलेचे इतर उत्तम नमुने देखील आहेत.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाध्यक्ष भेट देणाऱ्या प्रेक्षकांना व विद्यार्थ्यांना फिरवून संग्रहालयांतील वस्तु दाखवितात. प्रदर्शनासाठीं मांडलेल्या वस्तूंवर इंग्रजी व मल्याळी अशा दोन्हीं भाषांत अर्थवाही नावाच्या चिठ्ठ्या लावण्याची सोय केलेली आहे.

**प्रकाशनें :** नाहींत.

**कामाचे तास :** सोमवारखेरीज करून इतर सर्व दिवशीं सकाळीं ९–३० ते दुपारीं १–३० व दुपारीं २–३० ते ५–३० पर्यंत संग्रहालय उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** प्रस्तुत संग्रहालय ही एक सरकारी संस्था आहे. राज्याच्या सीमाविभागणीनुसार संग्रहालय मद्रास राज्यांत आलेलें असलें तरी त्याचा कारभार केरळ सरकारकडून पाहिला जातो.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष – श्री. पद्मनाभ पिल्लई, परिचारक, रात्रीचा पहारेकरी, दोन माळी व १७ अल्पकालीन झाडवाले.

**आर्थिक तरतूद :** वार्षिक खर्चासाठीं रु. १०,००० ची तरतूद आहे. या रकमेंत इमारतीची निगा राखण्यासाठीं येणारा खर्च धरलेला नाहीं.

**अभिप्राय :** रोज सरासरी २०० व दर वर्षी सरासरी ७३,००० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात. स्थानिक महोत्सवाच्या वेळीं प्रेक्षकांची संख्या बरीच वाढते व उन्हाळ्याच्या दिवसांत होणारे प्रवाशांचे आवक वाढल्यामुळें संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रेक्षकांचीहि संख्या खूपच वाढते. संग्रहालयाच्या इमारती सुयोग्य व प्रशस्त आहेत. संग्रहालयाचें रक्षण करणारे पोलीस पहारेकरी असून रात्रीच्या पहाऱ्यासाठींही व्यवस्था केलेली आहे. नाणीं व इतर मौल्यवान वस्तु संग्रहालयाध्यक्षाच्या ताब्यात असतात. संग्रहालयांतील वस्तु संशोधन, खरेदी व प्रभवन या मार्गांनीं गोळा केल्या जातात.

**पुदुक्कोट्टाई :** लोकसंख्या ४४,५२७.

### सरकारी संग्रहालय

स्थापना : १९१०.

**पूर्वेतिहास :** सरकारी संग्रहालयाची स्थापना करण्याचा विचार सन १८९६ सालीं सुरू झाला. जरी प्रथमतः राज्याची सार्वजनिक बाग जेथें आहे त्या स्थळीं म्हणजे 'आनंदबाग' मध्यें हें संग्रहालय उघडावें असें ठरलें होतें तरी तें पुदुक्कोट्टाईचें उपनगर तिरुगोकर्णम् ह्या गांवांतील मुख्य रस्त्यावर असलेल्या सदनात 'राजनिवास' उघडण्याचें सन १९०९ मध्यें ठरविण्यांत आलें. प्रत्यक्ष सन १९१० सालीं हें संग्रहालय स्थापन केलें गेलें. संग्रहालयाचा आर्थिक विभाग १९१२–१३ ह्या सालीं व कला व औद्योगिक विभाग १९१४–१५ ह्या सालीं सुरू केला गेला. पहिल्या विभागांत राज्यांत मिळविलेल्या ८० वनस्पतींची भर पडली व दुसऱ्यांत राज्यांतील लोकांनीं बनविलेल्या

कुटीरोद्योगात तयार करण्यात आलेल्या वस्तूचे नमुने ठेवण्यास मिळाले हे नमुने प्रथमत मद्रास येथें भरलेल्या दक्षिण भारत मद्दिला प्रदर्शनासाठीं मिळविले होते सन १९२३–२४ मध्यें पुराणवस्तु विभागाची पुष्कळच सुधारणा झाली १९४५ सालीं कृषि विभागाची भर पडली सध्या भूगर्भशास्त्र विभाग, वनस्पतिशास्त्र विभाग, प्राणिशास्त्र विभाग, कृषि विभाग, मानवशास्त्र विभाग, कला व उद्योगधंदेविषयक अर्थशास्त्र विभाग व शिलालेख व नाणकशास्त्र वस्तुसहित इतर पुरातन वस्तूंचा पुराणवस्तु विभाग याप्रमाणें प्रस्तुत संग्रहालयाचे विभाग आहेत संशोधन, उत्खनन, गुप्तधन या मार्गांनी मिळालेल्या वस्तु व पुडुकोट्टाई दरबार, मद्रास संग्रहालय, रॉयल एशियाटिक सोसायटीची मुंबई शाखा व इतर दाते यांनी देणगी-दाखल दिलेल्या वस्तु अशा रीतीनें एकूण संग्रह जमविण्यात आला आहे

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयात ठेवलेल्या वस्तु साधारणत पुडुकोट्टाई संस्थानांतील कला, उद्योग, मानववंशशास्त्र, पुराणवस्तुशास्त्र, आर्थिक उत्पादन, भूगर्भशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र व कृषिशास्त्र यासंबंधींच्या आहेत

**शैक्षणिक कार्य .** संग्रहालयाच्या ग्रंथालयांत सुमारें १००० पुस्तकें असून हीं पुस्तकें मुख्यत विभागीय उपयोगासाठीं ठेवलेलीं असली तरी विद्यार्थी व अभ्यासू विद्वानांना त्यांचा अभ्यासासाठीं उपयोग करतां येतो वस्तुसंग्रहालयास भेट देणाऱ्या विद्यार्थ्यांस व सहलीसाठीं आलेल्या मंडळींना संग्रहालयाध्यक्ष व तज्ञ साहाय्यक वस्तूंची माहिती करून देण्याच्या कामात मदत व मार्गदर्शन करतात शाळाकॉलेजांतील विद्यार्थी व पदव्युत्तर अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रदर्शनविभागातील सर्व सोयींचा लाभ होईल अशी व्यवस्था केलेली आहे शैक्षणिक कार्यासाठीं संग्रहालयातील निवडक वस्तु अधूनमधून स्थानिक शाळांना सोयीस्कर पेट्यांतून पाठविण्यात येतात नमुने, आराखडे व प्लॅस्टरचे नमुने यांचा वस्तूंचीं वैशिष्ट्यें विशद करण्यासाठीं उपयोग केला जातो इंग्रजी व तामीळ भाषांतून अर्थवाही नांवाच्या चिठ्ठ्या लावण्यात आलेल्या आहेत /

**प्रकाशनें** (१) वार्षिक कारभाराचा अहवाल, (२) संग्रहालय पत्रिका व (३) संग्रहालयातील महत्त्वाच्या वस्तूविषयी माहिती असलेली मार्गदर्शिका हीं इंग्रजी व तामीळ ह्या दोन्हीं भाषांतून काढलेलीं आहेत

**कामाचे तास :** संग्रहालय रविवार व इतर सार्वजनिक सुटीचे दिवस खेरीजकरून रोज सकाळीं ८ ते ११ व दुपारीं २ ते ५ पर्यंत उघडें राहातें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार संग्रहालयाध्यक्ष पाहातो, व त्याच्यावर मद्रासच्या सरकारी संग्रहालयाच्या अधीक्षकाचें प्रशासकीय नियंत्रण असतें

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–टी एस् सुंदरम्, बी एससी (कृषि), एल टी , तांत्रिक साहाय्यक, पेंटा भरणारा, एक कारकून, नऊ शिपाई व रात्रीचा एक पहारेकरी

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाच्या खर्चासाठीं १६,६१५ रु ची तरतूद केली आहे

**अभिप्राय :** तिरुगोकर्णम् या पुडुकोट्टाई शहराच्या उपनगरातील मुख्य रस्त्यावर हें संग्रहालय असून भेट देऊं इच्छिणाऱ्या प्रेक्षकांना तें विनाप्रयास सापडूं शकतें रोज साधारणत ५२६ प्रेक्षक ह्या संग्रहालयास भेट देतात. परंतु एप्रिल मे व जुलै-ऑगस्ट या महिन्यात तिरुगोकर्णम् या ठिकाणीं भरणारा गोकर्णेश्वराचा रथमहोत्सव व फेब्रुवारी मार्च महिन्यात तिरुवप्पुर येथें साजरा करण्यात येणारा मरिअम्मा हा महोत्सव यासारख्या उत्सवाच्या वेळीं संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रेक्षकांची संख्या मोठी असते सरकारी मालकीच्या दोन संलग्न असलेल्या इमारतींच्या नऊ खोल्यामध्ये संग्रहालयाची मांडणी केलेली आहे. १९३४–३५ मध्ये ह्या इमारतींत सुधारणा केलेली होती तथापि ही जागा सोयीस्कर नाहीं खास संग्रहालया-साठीं योग्य अशी इमारत बांधण्याची योजना पुडुकोट्टाई दरबारापुढें होती परंतु मद्रास सरकारच्या सध्याच्या आर्थिक परिस्थितींत अशा इमारतीची तरतूद करणें शक्य झालें नाहीं सध्याच्या इमारतींत संग्रहासाठीं आवश्यक अशी जागा मुळींच नाहीं, त्याचप्रमाणें तेथें प्रयोगशाळेची सोय देखील नाहीं संग्रहालयातील वस्तु संशोधन, उत्खनन, गुप्तनिधि व देणग्या या मार्गांनी मिळविल्या जातात हें संग्रहालय मद्रास सरकारच्या संग्रहालयाची एक शाखाच असल्यामुळें मद्रास संग्रहालयाबरोबर त्यालाही गुप्तनिधि ठेवण्यास मान्यता मिळालेली आहे. संग्रहतींची अदलाबदल करण्याचें व नमुने भेटीदाखल स्वीकारण्याचें धोरण ह्या संग्रहालयाला मान्य आहे भारतीय संग्रहालय सभाचा हें संग्रहालय सदस्य आहे संग्रहालयाच्या कामाचें प्रशिक्षण घेतलेले स्वयंसेवक मिळविण्यासाठीं संग्रहालयानें प्रयत्न चालविले आहेत. अशा स्वयंसेवकाचा मुख्यत्वेंकरून अशिक्षित प्रेक्षकांसाठीं प्रदर्शन विभाग मार्गदर्शक म्हणून उपयोग होईल.

**श्रीरंगम् :** लोकसंख्या ३६,७०२

## श्रीरंगनाथस्वामी आदिदेवस्थानम् संग्रहालय

**स्थापना :** १९३५

**पूर्वेतिहास :** मौल्यवान पुराणवस्तुशास्त्रविषयक वस्तूंचा अभ्यास लोकांस करता यावा ह्या उद्देशानें अधिकाऱ्यांनी देवस्थानाच्या कार्यालयास जोडून असलेल्या खोलींत हें संग्रहालय व त्याचें ग्रंथालय ९ सप्टेंबर १९३५ रोजी स्थापन केलें

**व्याप्ति व संग्रह :** मदुरा येथील नायकांच्या वेळच्या अत्युत्तम असें कोरीवकाम केलेल्या हस्तिदंताच्या वस्तूंचा साठा ह्या संग्रहालयात आहे त्यात तत्कालीन राजे व सरदारलोक यांचीं जनानखान्यातील निरनिराळ्या वेषातील चित्रें, पौराणिक प्रसंगाचीं चित्रें व मूर्तिशास्त्रदृष्ट्या महत्त्वाच्या आकृत्या व मूर्ती, किंतीच्या साहाय्यानें बनविलेल्या कलाकृति, उत्कृष्ट कोरीवकाम केलेले व आकर्षक वेलबुट्टी काढलेले पट, अतिशय नाजूक व गुंतागुंतीचें नक्षीकाम केलेली एक हस्तीदंती मोठी पेटी, नक्षी व वेलबुट्टी काढलेले पालखीचे भाग, सागाचें टेबल व निरनिराळ्या अनेक वस्तु ह्या संग्रहात आहेत मूर्तिकलेच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा अनेक ब्रॉंझ धातूच्या प्रतिमा असून त्यातील बहुतेक वैष्णव दैवताच्या आहेत त्याचप्रमाणें त्यात एक मोठें धातूचें वाहन, गरुडवाहन, ताम्रपत्रांकित दानें, नाणीं, कांहीं चांदीच्या मूर्ती, कांहीं लोखंडाचीं जुनीं कुलपें, चिलखतें, तरवारी, खंजीर इत्यादि, लाकडी कोरीवकामाच्या कांहीं वस्तु व कांहीं दगडाच्या मूर्ती आहेत. ग्रंथालयात धर्म व तत्त्वज्ञानवरील ग्रंथ व हस्तलिखितें आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयास जोडलेल्या ग्रंथालयात जवळजवळ २,५०० ग्रंथ असून त्यातील बहुतेक दुर्मिळ असे ग्रंथ व अप्रसिद्ध हस्तलिखितें आहेत हे ग्रंथ पाहण्याची प्रेक्षकांना मोकळीक आहे तेथील कारकून भेट देणाऱ्या प्रेक्षकांना संग्रहालयात फिरवून त्यांना तेथील वस्तुविषयीं माहिती देतो इंग्रजी व तामीळ अशा दोन भाषांत नावाच्या चिठ्ठ्या प्रदर्शनीय वस्तूंना लावलेल्या आहेत

**प्रकाशनें** : नाहीत

**कामाचे तास :** संग्रहालय रविवार व सरकारी सुट्यांचे दिवस खेरीज करून रोज सकाळीं १० ते १ व दुपारीं ३ ते ६ पर्यंत उघडें राहातें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** श्रीरंगनाथस्वामी देवस्थानम्, श्रीरंगमच्या विश्वस्त मंडळाच्या देखरेखीखालीं संग्रहालयाचा कारभार चालतो

**सेवकवर्ग** : एक कारकून

**आर्थिक तरतूद :** देवस्थानाच्या अंदाजपत्रकाशिवाय संग्रहालयासाठीं निराळें अंदाजपत्रक ठेविलें जात नाहीं

**अभिप्राय :** संग्रहालय व ग्रंथालय एका लहान खोलीत आहेत ही जागा संग्रहालयास सोईची नाहीं त्यांत मांडलेल्या वस्तूंची योग्य तऱ्हेनें नीट मांडणी केली पाहिजे म्हणजे त्यांचा व्यवस्थित अभ्यास करता येईल देवस्थान कार्यालयाचा रात्रीचा पहारेकरी ह्या संग्रहालयावर सुद्धा देखरेख ठेवतो ह्या संग्रहालयात मांडलेल्या वस्तु कधीं कधीं खास प्रदर्शनासाठीं बाहेर पाठविल्या जातात देवस्थानाच्या मालकीच्या पुराणवस्तूंशिवाय अन्य वस्तु संग्रहालयास मिळत नाहीत साधारणत ५,००० प्रेक्षक दरवर्षी संग्रहालयास भेट देतात तथापि वैकुंठ एकादशीसारख्या खास प्रसंगी प्रेक्षकांची संख्या नेहमीपेक्षा पुष्कळच मोठी असते

**तंजावर :** लोकसंख्या १,००,६८०

### तंजावर कला-प्रदर्शन विभाग, राजवाड्याच्या इमारती

**स्थापना :** १९५१

**पूर्वेतिहास :** तंजावरजवळ असलेल्या चोलकालीन निर्मिलेली ब्रह्माची सुंदर शिल्पमूर्ति पाहून भारतीय संग्रहालयाच्या पुराणवस्तुविभागाचे अधीक्षक अगदीं थक्क झाले व ती मूर्ति भारतीय संग्रहालयासाठीं मिळविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला त्याप्रमाणें कलेक्टर यास विनंती केली गेली परंतु लोकांच्या विरोधामुळें त्याला या कामांत अपयश आलें तथापि, ही मूर्ति तंजावरमध्येंच प्रदर्शनांत ठेवण्यास स्थानिक लोकांनीं मान्यता दिल्यामुळें ह्या मूर्तीसहित इतर अनेक मूर्ती राजवाड्याच्या वापरांत नसलेल्या काहीं दिवाणखान्यात एकत्र ठेवण्यांत आल्या व त्यांची नंतर व्यवस्थित मांडणी करण्यात आली त्यामुळें स्वाभाविकच त्या जागेला उत्तम अशा कला प्रदर्शन विभागाचें स्वरूप प्राप्त झालें ह्या कलाप्रदर्शनविभागामध्ये कलेच्या दृष्टीनें बहुमोल अशा अनेक ब्राँझच्या मूर्ती व चोलकालीन शिल्पकृती ह्या मन आकर्षून घेणाऱ्या मुख्य कलाकृती आहेत आजुबाजूच्या भागातील ब्राँझ धातूच्या व दगडाच्या मूर्ती ह्या संग्रहांत ठेवल्या असून त्याला जिल्हा संग्रहालयाचें स्वरूप प्राप्त झालें आहे तत्कालीन कलेक्टर श्री टी के पळनीअप्पा यांच्या प्रयत्नांमुळें हें संग्रहालय अस्तित्वात आलें

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयात निवडक परंतु बहुमोल असे प्राचीन चोलशिल्पकलेचे व ब्राँझच्या ओतकामाचे नमुने आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाध्यक्ष प्रेक्षकांच्या गरजेनुसार मार्गदर्शकाचें काम करतात नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व तामीळ अशा दोन भाषांत लावलेल्या आहेत संग्रहालयातील वस्तूंचा अभ्यास करण्यासाठीं तंजावर व आजूबाजूच्या भागातील शैक्षणिक संस्थांचे विद्यार्थी ह्या संग्रहालयास भेट देत असतात संग्रहालयास भेट देणाऱ्या देशांतील व परदेशांतील अनेक अभ्यासू विद्वानांस व प्रेक्षकांस येथील ब्राँझच्या मूर्ती व इतर शिल्पकलेच्या उत्कृष्ट नमुन्याविषयीं अतिशय कुतूहल वाटतें

**प्रकाशनें** तंजावर कलाप्रदर्शनाची स्मृतिपुस्तिका, सन १९५३ व १९५५, तंजावर कला प्रदर्शन विभागाची सचित्र मार्गदर्शिका, इंग्रजी, तामीळ व हिंदी ह्या तीन भाषांत

**कामाचे तास :** पोंगल, तामीळ नव्या वर्षाचा पाडवा, आयुधपूजा दिन, आणि दीपावलि ह्या चार सणांखेरीज रोज सकाळीं ८ ३० ते १२ व दुपारीं ३ ते ६ पर्यंत संग्रहालय खुलें असतें

**प्रवेश :** प्रवेशमूल्य एक आणा

**नियामक मंडळ :** जिल्ह्याचा कलेक्टर ह्या पदसिद्ध अध्यक्ष असलेल्या समितीतर्फे संग्रहालयाचा कारभार पाहिला जातो

**सेवकवर्ग** : मुख्याधिकारी — श्री जी कृष्णमूर्ति अय्यर व दोन पहारेकरी

**आर्थिक तरतूद** : संग्रहालयासाठीं वार्षिक अंदाजपत्रकीय तरतूद ७,००० रु ची असून त्यांत संग्रहालयाध्यक्ष व शिपाई यांच्या पगाराचा अंतर्भाव होतो

**अभिप्राय :** तंजावर येथील अलीकडेच दुरुस्त केलेल्या राजवाड्याच्या सोयीस्कर इमारतींत हें संग्रहालय असून तेथें अडचण न पडता प्रेक्षकांना जातां येतें रोज सरासरी १०५ व दरवर्षी सरासरी ५५,००० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात दरवर्षी एप्रिल महिन्यांत एक खास कलाप्रदर्शन भरविण्यात येत, व त्या वेळीं सुमारें २०,००० प्रेक्षक प्रदर्शनास भेट देतात दोन पहारेकरी संग्रहालयावर पहारा करतात प्रदर्शनविभागास जोडलेलें असें निराळें ग्रंथालय नसलें तरी जवळच सरस्वतीमहालमध्यें एक मोठें व महत्त्वाचें ग्रंथालय असून त्यांत अनेक ग्रंथ व हस्तलिखितें आहेत गुप्त धन वस्तु स्वीकारण्यासाठीं ह्या संग्रहालयास मान्यता देण्यांत आली आहे संशोधन, देणग्या, वसूलवारी व गुप्तधन हे संग्रहालयाचें वस्तु गोळा करण्याचे मुख्य मार्ग होत काहीं मौल्यवान ब्राँझचे पुतळे व इतर प्रदर्शित वस्तु निरनिराळ्या देवस्थानांकडून वसूलवारीनें आणलेल्या आहेत ह्या संग्रहालयातील काहीं ब्राँझ धातूचे पुतळे व वस्तु इतर प्रदर्शनासाठीं मधूनमधून पाठविले जातात व त्याप्रमाणें आग्र्याचे येथें १९५४ मध्ये भरलेल्या कॉमन प्रदर्शनांत अशा वस्तु मांडण्यांत आल्या होत्या

## म्हैसूर

**बंगलोर,** लोकसंख्या ७,७८,९७७

### म्हैसूर सरकारी संग्रहालय

**स्थापना :** १८६६

**पूर्वेतिहास :** म्हैसूरचें सरकारी संग्रहालय हें भारतातील अतिशय जुन्या संस्थांपैकीं एक असून तें सन १८६६ सालीं स्थापन करण्यात आलें डॉ एड्वर्ड ग्रीन बाल्फोर हे बंगलोर येथील सरकारी संग्रहालयाचे पहिले मुख्याधिकारी होत मद्रास येथील सरकारी मध्यवर्ती वस्तुसंग्रहालय स्थापन करण्यात त्यांनीच पुढाकार घेतला होता सन १९४३ मध्यें संग्रहालय सल्लागार समिति स्थापन करण्यात आली म्हैसूर राज्य उद्योगधंदे व व्यापार विभागाचे संचालक यांना त्या समितीचे अध्यक्ष नेमण्यात आलें व राज्यातील काहीं सरकारी शास्त्रीय विभागाचे मुख्य व म्हैसूर विश्वविद्यालयातील सृष्टिविज्ञानाचे प्राध्यापक हे त्या समितीवर सभासद म्हणून नेमले गेले संग्रहालयानें अलीकडील काहीं वर्षांत चांगली प्रगति केली असून, राज्यातील एक शैक्षणिक संस्था म्हणून तें फार लोकप्रिय झालें आहे

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय केवळ पुराणवस्तुशास्त्र, सांस्कृतिक इतिहास, नाणकशास्त्र, मानववंशशास्त्र, औद्योगिक कला, भूस्तरशास्त्र, वनस्पति शास्त्र व प्राणिशास्त्र या विषयासंबंधींच्या वस्तु गोळा करण्यास वाहिलेलें आहे

पुराणवस्तुविभागात ब्रह्मगिरी व चंद्रवळी या म्हैसूरमधील प्राचीन स्थळांत सापडलेल्या पुराणवस्तूंचे नमुने ठेविलेले आहेत व शिल्पप्रदर्शन विभागामध्यें भरगच्च कोरकाम केलेल्या व सूक्ष्म अशा नक्षीकामासाठीं प्रसिद्ध असलेल्या होयसाळ शैलीच्या शिल्पकलेच्या नमुन्यांचें प्रमाण जास्त आहे

प्राचीन व आधुनिक शस्त्रास्त्रें व इतर लष्करी सरंजाम यांनीं संग्रहालयाचें मुख्य दालन सजलेलें आहे व श्रीरंगपट्टम् येथील सन १८०० सालच्या उठावदार नक्षीकामाचा नमुना ही ऐतिहासिक विभागातील डोळ्यात भरण्यासारखी आकर्षक वस्तु आहे मानववंश विभागांत अतिपूर्वकडील देशातील व इतर ठिकाणचे मानववंशशास्त्रविषयक नमुने मांडलेले आहेत कलाकौशल्य व औद्योगिक कला या विभागात हस्तिदंती शिल्पें व धातू यांत जडावाचें काम केलेल्या म्हैसुरी वस्तु, हस्तिदंताचें नक्षीकाम व चंदनाच्या प्रसिद्ध म्हैसुरी वस्तु मांडलेल्या आहेत संगीत वाद्यें, जडजवाहीर, हिंदु महाकाव्यातील प्रसंगाचें दिग्दर्शन करणारीं चित्रें व त्याचप्रमाणें कापडाचे निरनिराळे नमुने व निरनिराळ्या धातूंच्या वस्तु ह्या विभागात ठेवलेल्या आहेत राज्याची औद्योगिक प्रगति दाखविण्यासाठीं, चेतराम, म्हैसुरमधील उद्योगधंद्यांत तयार झालेल्या वस्तु व भद्रावती लोखंड कारखाना अशासारख्या योजनांचीं छायाचित्रें व आराखडे मांडलेले आहेत सृष्टिविज्ञानविभागांत भूस्तरशास्त्रविषयक नमुने अशा रीतीनें मांडलेले आहेत कीं त्यापासून अनभिज्ञ व त्या शास्त्राचे विद्यार्थी यांना सहज बोध व्हावा म्हैसूर राज्यातील खनिज संपत्तीचा प्रातिनिधिक संग्रह, म्हैसूरचे उच्चसखल प्रदेश दाखविणारे व भूस्तरशास्त्रविषयक नकाशे, शोभेचे पाषाण, खनिज द्रव्यांचा औद्योगिक क्षेत्रांतील उपयोग व राज्यानें चालविलेल्या उद्योगधंद्यांत तयार होणाऱ्या वस्तूंचे नमुने या विभागातील उल्लेखनीय वस्तु होत

वनस्पतिविभागांत मुख्यत्वेंकरून या प्रदेशांतील फळें व वनस्पती यांचे नमुने, वनस्पतींच्या उत्क्रांतीचें दिग्दर्शन करणारे तक्ते, औषधी वनस्पती व अन्नधान्यें, मळे व बागा यांत पिकणाऱ्या निरनिराळ्या वस्तु व म्हैसूरच्या जंगलांतील इमारती लाकडाचे नमुने यांचा समावेश होतो

सस्तन प्राणी, पक्षी व सरपटणारे प्राणी, व विशेषत सन १९३९–४० सालीं ह्या राज्यात झालेल्या पक्षीसृष्टीच्या पहाणीच्या वेळीं मुंबईच्या सृष्टिविज्ञान मंडळानें संग्रहालयास दिलेला पक्ष्यांचा मोठा संग्रह यांचा प्राणिशास्त्र विभागात समावेश होतो हे सर्व प्राणी व पक्षी पाहाण्यासारखे आहेत म्हैसूरराज्यात सापडणाऱ्या गोड्या पाण्यातील माशांचे नमुने व कावेरी नदींत सापडलेला चित्रविचित्र रंगाच्या महाशीर नावाचा अजस्र मासा हे सुद्धा उल्लेखनीय आहेत एवढ्या अजस्र आकाराचा मासा अद्याप सापडलेला नाहीं

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयास जोडूनच एक लहानसें संदर्भ ग्रंथालय असून त्याचा संग्रहालयाचा सेवकवर्ग, अभ्यासु विद्वान मंडळी, संशोधन करणारे विद्यार्थी व इतर जिज्ञासु प्रेक्षक यांस अतिशय उपयोग होतो ग्रंथालयात ७०० ग्रंथ व नियतकालिकें असून नवीन ग्रंथ विकत घेण्याचीहि तरतूद केलेली आहे अशिक्षित लोकांना समजेल अशा भाषेंत संग्रहालयातील वस्तुविषयीं माहिती पुरविण्याची योजना हा संग्रहालयाच्या शैक्षणिक कार्याचा महत्त्वाचा भाग आहे त्याचप्रमाणें प्राथमिक शाळांतील विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करण्यासाठीं इतिहास, भारताचा सांस्कृतिक वारसा व म्हैसूरराज्यातील प्राणी, वनस्पती व उद्योगधंदे या विषयावर व्याख्यान देण्याची व्यवस्थाही केली जाते शाळा व महाविद्यालयें यांतील विद्यार्थी व संशोधन करणारे अभ्यासु विद्वान यांना शक्यतों सर्व तऱ्हेची मदत दिली जाते विद्यापीठ व इतर शैक्षणिक संस्थांनी आयोजित केलेल्या शैक्षणिक दृष्ट्या महत्त्वाच्या अशा प्रदर्शनांत संग्रहालय भाग घेतें संग्रहालयातील वस्तूंवर इंग्रजी व कानडी या दोन्ही भाषांतून नावाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत आवश्यकतेप्रमाणे नकाशे व तक्ते जागोजागीं मांडलेले आहेत शिक्षक व प्राध्यापक यांच्या बरोबर विश्वविद्यालयातील व इतर शैक्षणिक संस्थांचे विद्यार्थी ह्या संग्रहालयास भेट देतात

**प्रकाशनें :** वार्षिक अहवाल

**कामाच्या वेळा :** बुधवार व इतर सुटीचे दिवस खेरीजकरून रोज सकाळीं ८ ते सायंकाळीं ५ पर्यंत खुलें असतें संग्रहालय शनिवारीं १ नंतर बंद राहातें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** म्हैसूर सरकार

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री के नारायण आयंगार, एम् ए, दोन साहाय्यक संग्रहालयाध्यक्ष–(अ) श्री जे एम् नायरामराजू, बी ए (ऑनर्स), (ब) ही जागा अजून रिकामी आहे, कलाकार, मदतनीस, पांच शिपाई, सायकल शिपाई व एक पहारेकरी

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं वार्षिक अंदाजपत्रकात रु १२,५०० एवढ्या रकमेची तरतूद केलेली आहे

**अभिप्राय :** हें वस्तुसंग्रहालय योग्य व मध्यवर्ती अशा जागेंत आहे रोज सरासरी १,२०० पेक्षां जास्त म्हणजे दर वर्षी सरासरी ४,४८,६०० प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात करण व दसरा यासारख्या प्रादेशिक व राष्ट्रीय महोत्सवांच्या वेळीं व रविवारीं संबंध दिवसभर भेट देणाऱ्या प्रेक्षकांचा संग्रहालयाकडे एकसारखी रीघ लागलेली असते संग्रहालयाची इमारत अयोग्य नसली तरी तेथें जागेची अडचण तीव्रतेनें भासते व त्यामुळें प्रदर्शनार्थ मांडलेल्या वस्तूंना काहींशी गर्दी झाल्यासारखी दिसते इमारत

पाडविण्याच्या प्रश्नाचा विचार चालू आहे तीन नोकर व एक मदतनीस मिळून दिवसा व दोन शिपाई रात्रीच्या वेळीं संग्रहालयावर देखरेख ठेवतात नाणीं व मौल्यवान वस्तु लोखंडी तिजोऱ्या व कपाटें यांत ठेवलेल्या आहेत गाव संग्रह व वस्तूंच्या समकृती ठेवण्यासाठीं जागा अगदीं अपुरी आहे संग्रहालयांत निरनिराळ्या वस्तूंची गर्दी झाल्यामुळे भेट देणाऱ्या प्रेक्षकांसाठीं बसण्याची सोय करता येत नाहीं तथापि इमारतींत दरा लेळती राहाण्याची सोय असून विजेच पंखेही बसविण्यात आले आहेत संशोधन, खरेदी, उत्खनन, देणग्या व अदलाबदल या मार्गांनी संग्रहालयाच्या साठ्यांत भर पडत असते संग्रहालयास गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं दरील मान्यता देण्यात आली आहे व त्यामुळेंसुद्धां त्याच्या संग्रहांत भर पडते इतर वस्तुसंग्रहालयांबरोबर समकृती व प्रकाशनें यांची अदलाबदल करण्याकडेही संग्रहालय आस्थेनें व उत्साहानें लक्ष देते संग्रहालयाचा विस्तार करण्याच्या योजनेचा विचार चालू आहे

**विजापूर : लोकसंख्या ६५,७३४.**

**पुराणवस्तु संग्रहालय**

**स्थापना : १९१२**

**पूर्वेतिहास :** भारताच्या व विशेषतः विजापूर या भागाच्या इतिहासाच्या अभ्यासासाठी ऐतिहासिक पुरातत्त्वशास्त्राच्या दृष्टीनें उपयुक्त असा पुराणवस्तु जमा करणें, जतन करणें-व जरूरीप्रमाणें त्या प्रदर्शनासाठीं मांडणें हीं उद्दिष्टे समोर ठेऊन हें संग्रहालय ता १९ जुलै १९१२ रोजीं स्थापन करण्यांत आले हें नगरखान्यातील विजापूरचा इतिहासप्रसिद्ध गोलघुमट या स्मारकासमोर आहे

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयांत विजापूर व आजूबाजूच्या भागांत सापडलेल्या प्राचीन वस्तूंचा संग्रह केलेला असून त्यांत (अ) शिलालेख, (ब) सनदा व फरमानें, (क) शिल्पकृती, (ड) रंगचित्रें, (ई) नाणीं, (फ) विदीच्या वस्तु, (ग) हत्यारें, (ह) लाकडावर केलेलें कोरीव काम, (इ) चिनीमातीच्या वस्तु, (ज) गालिचे, (ख) नकाशे, (ल) चित्रें व छायाचित्रें आणि (म) हस्तलिखितें यांचा समावेश होतो संग्रहालयांत मांडलेल्या पुराणवस्तूंत जुन्या काळचे गालिचे अत्यंत मौल्यवान असावेत असें वाटतें हे गालिचे विजापूर येथील असार महालांतील आहेत संग्रहालयात अरबी, फारसी, संस्कृत व कानडी भाषेंतील अनेक शिलालेख आहेत त्याचप्रमाणें हिंदु व जैन शिल्पकृती, उत्कृष्ट नक्षीकाम केलेली लाकडी दरवाजाची चौकट, चिनी मातूच्या जुन्या वस्तु, शस्त्र आणि हत्यार, वाङ्मय, इतिहास व धर्मशास्त्र या विषयावरील फारसी, अरबी व उर्दू भाषेंतील हस्तलिखित, मराठी व रजपूत शैलींचा मरणा असलेली रंगचित्रें, व विजापूर येथील आर्किल्ला किंवा बालेकिल्ला येथील जागा सपाट करताना आढळलेल्या विविध वस्तु संग्रहालयात मांडलेल्या आहेत उत्तरभारतात व पंजाबातील प्रसिद्ध काशीकामासारख्या चित्रविचित्र रंगाच्या फरशा सुद्धां तिथें आहेत हे फरशाचे तुकडे विजापूर येथील सात (सवर) मजील नांवाच्या सालमजली इमारतींतून आणलेले आहेत असें म्हणतात

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयास जोडलेलें एक लहानसें ग्रंथालय आहे त्याचा प्रेक्षकांना उपयोग होतो सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष भेट देणाऱ्या प्रेक्षकांना संग्रहालयात मांडलेल्या वस्तु दाखवून त्याविषयींची त्यांना माहिती देतात

**प्रकाशनें :** संग्रहालयांत ठेवण्यांत आलेल्या वस्तूसंबंधीं माहितीपुस्तक

**कामाच्या वेळा :** संग्रहालय रोज सकाळीं ८-३० ते सायंकाळीं ५-३० पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** प्रवेशमूल्य दर प्रेक्षकास ६ न पैसे शाळांतून आलेल्या गेला व्याप हा दर निम्मा असतो दर सोमवारी मात्र सर्वांना प्रवेश मोफत मिळतो

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार सात सदस्याच्या स्थायी समितिमार्फत चालविला जातो या सात सदस्यांपैकीं पांच सभासद सरकारनें नेमलेले असून बाकीच्या दोन सभासदांची नेमणूक संग्रहालयाच्या अध्यक्षांकडून केली जाते.

**सेवकवर्ग :** सन्माननीय मुख्याधिकारी—श्री एम् एस् देशपांडे बी ए. (ऑनर्स), साहाय्यक मुख्याधिकारी—श्री एस् व्ही पर्वतीकर, एम् ए व तीन मदतनीस

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं ५,१५० रु ची तरतूद केलेली आहे म्हैसूर सरकाराकडून ३,८५० रु ची व विजापूर नगरपालिकेकडून ३०० रु ची मदत मिळते व प्रवेशपत्रिकांच्या विक्रीपासून १,००० रु चें उत्पन्न होतें

**अभिप्राय :** साधारणत रोज सुमारें ११० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात, परंतु ही संख्या यात्रेच्या वेळीं बरीच वाढते प्रदर्शनवस्तु ठेवण्यासाठीं संग्रहालयाची इमारत प्रशस्त आहे आणि संग्रहालयाचे शिपाई संग्रहालयावर रात्रंदिवस पहारा करीत असतात संग्रहालयासाठीं वस्तूंचा संग्रह करण्याचे मार्ग म्हणजे खरेदी, उत्खनन, गुप्तनिधि, देणगी व देवाणघेवाण हे होत संग्रहालयांतील समकृतींची इतर संग्रहालयातील समकृतींबरोबर अदलाबदल करण्यांत येते संग्रहालयातील प्रदर्शनवस्तूंवरील नांवाच्या चिठ्या कानडी व इंग्रजी या दोन भाषांत आहेत

**चित्रदुर्ग : लोकसंख्या २५,०८१**

**स्थानिक प्राचीनवस्तु संग्रहालय**

**स्थापना : १९५१**

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय कर्नाटकातील एक संशोधक स्थिरवासी एच् एस् जोशी यांनी स्थापन केलें होतें संग्रहालयाचे पहिले सन्मान्य संग्रहालयाध्यक्ष म्हणून त्यांनी आपल्या प्राचीन वस्तूंच्या संग्रहाच्या साहाय्यानें हें संग्रहालय स्थापन केलें सन १९५१ मध्यें म्हैसूरचे राज्यपाल असलेले श्री जयचामराज वाडियार यांनीं त्याचें उद्घाटन केलें

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयावरून चित्रदुर्ग जिल्ह्याचा इतिहास व त्या जिल्ह्यांतील पुरातनवस्तूंची माहिती मिळते महागिरी व चंद्रवल्ली येथें केलेल्या उत्खननाच्या वेळीं सापडलेल्या पुरातन वस्तु येथें ठवलेल्या आहेत या प्रदर्शनवस्तूंत, सिद्धपुर, ब्रह्मगिरी व जटिंगरामेश्वर येथील नाणीं, मातीचीं, भांडीं, अशोकाचे शिलालेख आणि प्राचीन स्मारकांचीं छायाचित्रें व इतर शिलालेखाच्या प्रतिकृती यांचा समावेश होतो त्यावरून त्या प्रदेशाच्या इतिहासाची कल्पना येते

**शैक्षणिक कार्य .** म्हैसूर राज्यातील शैक्षणिक संस्थांचे विद्यार्थी व शिक्षक हें संग्रहालय पाहावयास येतात व येथील वस्तूंच्या बाबतींत बरीच जिज्ञासा दाखवितात

**प्रकाशनें :** नाहींत

**कामाचे तास :** सोमवारी, शनिवारी दुपारी व इतर सरकारी सुट्टीचे दिवस खेरीजकरून सर्व दिवशी सकाळी ८ ते १०–३० व दुपारी २–३० ते ५ वाजेपर्यंत संग्रहालय उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय, पुराणवस्तुशास्त्र संचालक, म्हैसूर, यांच्या अधिकाराखालीं असून त्यावर अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष देखरेख ठेवतात.

**सेवकवर्ग :** अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष–श्री. जे. एस्. पांडुरंग जॉइस्, एक परिचारक व एक शिपाई.

**आर्थिक तरतूद :** माहीत नाही.

**अभिप्राय :** हें संग्रहालय, चित्रदुर्ग किल्ल्याचें पूर्वदिशेकडील ऐतिहासिक प्रवेशद्वार रंगेदान बागिंदू येथें आहे. संग्रहालय पाहण्यासाठीं दररोज सुमारें ५० व दरसाल सुमारें २०,००० लोक येतात.

**धारवाड :** लोकसंख्या ६६,५७१

## कन्नड संशोधन संस्था संग्रहालय

**स्थापना :** १९४०

**पूर्वेतिहास :** मुंबई सरकारनें, कर्नाटकाचा इतिहास व पुराणवस्तुशास्त्रीयदृष्ट्या महत्त्वाच्या गोष्टी आणि कानडी भाषा व वाङ्मय यांसंबंधींच्या संशोधनासाठीं धारवाड येथें कन्नड संशोधन संस्था सन १९३९ सालीं स्थापन केली. या संबंधांत संग्रहित केलेल्या उद्बोधक साहित्याच्या साहाय्यानें ऐतिहासिक व साहित्याच्या दृष्टीनें महत्त्व असलेलें एक संग्रहालय संस्थेचा एक भाग म्हणून १९४० च्या जानेवारी महिन्यांत सुरू करण्यांत आलें. कन्नड संशोधन संस्थेचे पहिले संचालक श्री. आर्. एस्. पंचमुखी यांनीं दाखविलेल्या उत्साहामुळें व समंध कर्नाटकांतून मौल्यवान् वस्तु संग्रहित केल्यामुळें या संग्रहालयाची लवकर वाढ होण्यास मदत झाली.

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयांत, इतिहासपूर्व व ऐतिहासिक पुराणवस्तुशास्त्रविषयक अशा दोन्ही प्रकारच्या वस्तु आहेत. यांत दगडाच्या धातूच्या बौद्ध, हिंदु व जैन मूर्तींचा मोठा संग्रह आहे. पत्ताडकल येथील सुमारें इ. स. च्या ८ व्या शतकांतील नटराज यांची मूर्ति ही या संग्रहालयांतील उल्लेखनीय शिल्पकृति आहे. याशिवाय सुपार्श्व आणि पार्श्वनाथ यांसारख्या जैन तीर्थंकरांच्या कांहीं मूर्ती आहेत. येथें धातूच्या अनेक मूर्ती असून त्यांची संख्या सुमारें २५० इतकी होईल. त्याशिवाय पांच लाकडाच्या मूर्ती आहेत. त्यांतील किन्नर व वरुण यांच्या मूर्ती उल्लेखनीय आहेत. येथील पुरालेखविद्याविषयक प्रदर्शनविभागांतील कर्नाटकांतील मूळ शिलालेखांवरून इ. स. पूर्वीच्या १ ल्या शतकापासून तों इ. स. च्या १७ व्या शतकापर्यंत कानडी अक्षराक्षरांच्या विकासावावत माहिती मिळते. येथें अनेक वीर-शिला, सती-शिला व इतर ' निसिदी ' दगडी स्मारकें आहेत. येथें ताम्रपट्टी आहेत. उल्लेखनीय साहित्य म्हणजे, वैदिक यज्ञांच्या स्मरणार्थ असलेल्या इ. स. पूर्वीच्या १ ल्या शतकांतील वडगांव–माधवपूर माळी लेख आणि १ ल्या पुलकेशीचें बदामी येथील डोंगरी किल्ल्याचें बांधकाम नमूद करणारे शके ४६५ चें बदामी येथील शिलालेख हे होत.

येथील हस्तलिखितांच्या संग्रहांत प्राचीन व ऐतिहासिक स्वरूपाचा विपुल संग्रह आहे. मराठा व मुसलमान राज्यकर्त्यांनीं काढलेली मोडीतील व पर्शियन लिपींतील अनेक ऐतिहासिक कागदपत्रें देखील येथें आहेत.

येथें विजयनगर व मराठा घराण्यांच्या मालकीच्या तांब्याच्या नाण्यांचा मोठा संग्रह आहे. या प्रदेशांत नंतर आलेल्या चोलांचा प्रभाव कसा पडला याचा अभ्यास करण्यासाठीं " राजाधिराज " हें वचन ज्यांवर आहे अशा चांदीच्या नाण्यांचा एकमेव असा मोठा संग्रह महत्त्वाचा आहे. मुद्दकुलानंद व मुक्तानंद, पमटेक वगैरेंची आंध्र येथील शिक्क्याचीं नाणीं आहेत.

कला व रंगचित्रें यांसाठीं एक प्रदर्शनविभाग आहे.

**शैक्षणिक कार्य :** संस्थेत विभागाच्या व लोकांच्या उपयोगासाठीं ६,१५५ पुस्तकें व ७५ नियतकालिकें असलेलें एक ग्रंथालय आहे. शाळांतील मुलांना व विद्यार्थ्यांना प्रदर्शनविभाग फिरवून दाखविण्यांत येतात व तेथील वस्तूंची माहिती देण्यांत येते. मुलें व विद्यार्थी वारंवार संग्रहालय पाहावयास येतात. कांहीं वेळां खास प्रदर्शनें भरविलीं जातात. नांवांच्या चिठ्ठ्या कानडी व इंग्रजी या दोन भाषांत आहेत. संग्रहालयांतील वस्तूंचा अभ्यास करण्याची इच्छा असलेल्या सर्व लोकांसाठीं आवश्यक त्या सर्व सोयी उपलब्ध करून देण्यांत येतात. संस्था ठराविक मुदतीनें खास व्याख्यानें घडवून आणते व अशीं व्याख्यानें प्रसिद्धहि करण्यांत येतात.

**प्रकाशनें :** कन्नड संशोधन संस्थेच्या संग्रहालयाची मार्गदर्शिका छापण्यांत येत आहे. संग्रहालयाचीं स्वतंत्र अशीं प्रकाशनें नसलीं तरी, संस्थेच्या प्रगतीच्या अहवालांत संग्रहालय व तिचें कार्य यांसंबंधीची तपशीलवार माहिती व टीपा असतात. संस्थेचीं अनेक प्रकाशनें असून त्यांची यादी खालीं दिली आहे :–

(१) कन्नड संशोधन संस्था संग्रहालयाची मार्गदर्शिका
(२) मुंबई राज्यांतील कन्नड संशोधनावरील वार्षिक अहवाल (१९३९-४०)
(३) मुंबई राज्यांतील कन्नड संशोधनावरील वार्षिक अहवालाचा गोषवारा (१९४०–४१)
(४) मुंबई राज्यांतील कन्नड संशोधनाची प्रगति (१९४१–४६)
(५) मुंबई राज्यांतील कन्नड संशोधनाची प्रगति (१९४७–५२)
(६) मुंबई राज्यांतील कन्नड संशोधनाचीं बारा वर्षें (१९३९–५१)

आर्. एस्. पंचमुखी, एम्. ए., माजी संचालक कन्नड संशोधन संस्था, यांचे ग्रंथ :

(७) भारतीय मूर्तिशास्त्रांतील गंधर्व व किन्नर
(८) कर्नाटक पुरालेखविद्याशास्त्र (कानडी भाषेंत)
(९) वरील लेखकानें संपादित केलेला ' कर्नाटकांतील पुराणवस्तुविषयक सामग्रीसंबंधीं लेख ' हा ग्रंथ

(१०–१२) कर्नाटक शिलालेख खंड १, खंड २, खंड ३, भाग १
(१३) कवि जिह्वबंधनम् (कानडी भाषेंत)
(१४) मदनतिलक (कानडी भाषेंत)
(१५) ऐरावत (कानडी भाषेंत)

(१६) विरुपाक्षवसतोत्सवचंपु ( संस्कृत भाषेंत )

(१७) कन्नड संशोधन संस्था, धारवाड, येथील हस्तलिखितांचें वर्णनात्मक माहितीपुस्तक, खंड १, लेखक–आर एस् पंचमुखी व ए एम् अण्णिगेरी

(१८) मुरु उपन्यासगलु ( कानडी भाषेंत ), लेखक—गोविंद पै

(१९) के व्ही सुब्रह्मण्य ऐयर, बी ए, यांचीं तीन व्याख्यानें

(२०) कर्नाटक संगितऊ दसकुटऊ, लेखक स्मिरी विद्वान् टल्युर कृष्णाचार्य

(२१) शब्दमणिदर्पणद पाठ्यतरगलु अनुभवामृतऊ हरिस्वामृतसरऊ, लेखक—प्रो डी के भीमसेनराव

(२२) कर्नाटक द पूर्वचरित्रे (कानडी भाषेंत), लेखक—डॉ एम् एच् कृष्ण

**कामाचे तास :** संग्रहालय मंगळवारखेरीज कामाच्या सर्व दिवशीं दुपारीं १२ ते सध्याकाळीं ५ वाजेपर्यंत उघडें असतें मंगळवारीं मात्र तें सकाळीं ९ ते ११॥ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालय, संस्थेचें संचालक डॉ वी ए सॅलटोर यांच्या अधिकाराखालीं आहे आणि अलीकडे ही संस्था कर्नाटक विद्यापिठानें मुंबई सरकारकडून आपल्या ताब्यात घेतली आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री ए एम् अण्णिगेरी, एम् ए, छायाचित्रकार, कलाकार, ड्राफ्ट्समन् आणि एक शिपाई

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं, कामावर असलेल्या नोकर वर्गाचा पगार वगळून संस्थेच्या निधींतून सालिना सुमारें २००० रुपयांच्या तरतुदीखेरीज वेगळी अशी कोणतीहि आर्थिक तरतूद केलेली नाहीं

**अभिप्राय :** संग्रहालय धारवाडच्या मध्यभागीं एका भाड्याच्या इमारतींत आहे तेथून तें विद्यापिठाच्या जागेंतील इमारतींपैकीं एका इमारतींत लवकरच हलविण्यात यणार आहे सुमारें २०० लोक दरवर्षी संग्रहालय पाहाण्यास येतात संग्रहाल्यांत प्रयोगशाळेची सोय नाहीं, तसेंच तेथें राखीव संग्रह व ममकृति ठेवण्यासाठीं पुरेशी जागा नाहीं संग्रहालयांतील मौल्यवान् वस्तु संचालक किंवा संग्रहालयाध्यक्ष यांच्या वैयक्तिक रखवालीत लोखंडी तिजोरींत ठेवल्या आहेत व त्यावर रात्रीं पहारा असतो संग्रह संशोधन, खरेदी, देणगी व शुमनिधि यांद्वारें करण्यांत येतो संग्रहांतील वस्तूंच्या अदलाबदलीस दखील उत्तेजन देण्यांत येतें

**हंपी :** लोकसंख्या १२,०००

**पुराणवस्तु संग्रहालय**

**स्थापना :** १९५२

**पूर्वेतिहास :** विजयनगरच्या महान् साम्राज्याची राजधानी असलेल्या हंपी शहरात सर्वत्र इतस्त विखुरलेल्या अनेक प्राचीन वस्तु होत्या त्यामुळें येथें एक संग्रहालय स्थापन करावें असें ठरविण्यात आलें त्याप्रमाणें पुराणवस्तुशास्त्र विभागानें हंपी येथें १९५२ मध्यें एक संग्रहालय स्थापन केलें संग्रह अतिशय वाढल्यामुळें संग्रहालयासाठीं हंपी येथें एक नवीन इमारत बांधण्याचें ठरविण्यात आलें सन १९५७–५८ मध्यें यासाठीं ७८,००० रुपयांचें अनुदान देण्यात आलें ही इमारत लवकरच तयार होणार असून त्यानतर तेथें संग्रह योग्य रीतीनें मांडण्यात येणार आहे सध्या ह्या वस्तु मार्स् कार्स व एलिफंटस् स्टेबल्स् या नावानें ओळखल्या जाणाऱ्या दोन सुरक्षित स्मारकांत ठेवण्यात आल्या आहेत

**व्याप्ति व संग्रह :** येथील वस्तूंत शिल्पकृति, सती–शिला, वीर–शिला, स्तंभ व इतर वास्तुकृति, मातीचीं भांडीं व मातीच्या वस्तु, शिलालेखांवरील व दगडांवरील लेख, ताम्रपत्रांकित दानें, ताडपत्रांवरील लेख, नाणीं, मणी, सोन्याचे दागिने व पारदर्शक रंगचित्रें आहेत यांपैकीं बऱ्याचशा वस्तु विजयनगर कालातील–इ स १३३६–१५६५ मधील आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालय पाहावयास येणाऱ्या लोकांकडून जेव्हां जेव्हां विनंती करण्यात येते तेव्हां तेव्हां त्यांना संग्रहालयातील वस्तूंसंबंधीं माहिती देण्यांत येते, परंतु संग्रहालयांतील वस्तु अजून लावण्यात येत असल्यामुळें विशेष अशा शैक्षणिक सोयी करण्यात आलेल्या नाहींत नावाच्या चिठ्या सुद्धां तयार करण्यात आलेल्या नाहींत परंतु त्या कानडी, तेलगू व इंग्रजी भाषेंत तयार करण्याचें योजिलें आहे संग्रहालयाला जोडून एक लहानसें ग्रंथालय आहे त्यात सुमारें २५० पुस्तकें व सद्दा वर्गणी भरून मागविलेलीं नियतकालिकें असून तीं मुख्यत: विभागीय उपयोगासाठीं घेण्यात येतात

**प्रकाशनें :** नाहींत

**कामाचे तास :** रविवारीं दुपारीं, सोमवारीं व सरकारी सुट्टीचे दिवसखेरीज करून इतर सर्व दिवशीं सकाळीं ११॥ ते दुपारीं ५॥ पर्यंत संग्रहालय उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय, भारत सरकारच्या पुराणवस्तुशास्त्र विभागाच्या संग्रहालय शाखेच्या अधिकाराखालीं आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री सी टी एम् कोट्टय्या, एम् ए., एक कारकून, पाच संग्रहालय परिचारक आणि मजूर, गवंडी व सुतार यांसारखे कांहीं अशकालीन कामगार

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अदाजपत्रक ३०,००० रुपयांचें आहे

**अभिप्राय :** संग्रहालय कमलापुरम् गावाच्या अगदीं जवळ आहे आणि तें पाहाण्यास दररोज सुमारें ३०० व दरसाल १,१०,००० लोक येतात उन्हाळ्यांत या भागांत जत्रा व उत्सव भरतात तेव्हां व विशेषत: विरुपाक्ष मंदिराच्या रथोत्सवाच्या वेळीं संग्रहालय पाहाण्यास यणाऱ्या लोकांची गर्दी होते संग्रहालयासाठीं वस्तु संपादन करण्याचें मार्ग म्हणजे मुख्यत संशोधन, उत्खनन, खरेदी व शुमनिधि हे होत प्राचीनवस्तुशास्त्र विभागाची रसायनशाखा संग्रहालयांतील वस्तूंचें जतन करण्याचें काम पाहाते

**भगतूर :** लोकसंख्या १,१७,०८३

**सरकारी संग्रहालय, श्रीमती भवन, विजई**

**स्थापना :** १९५७

**पूर्वेतिहास :** मंगळोरचे कर्नल मिरजकर यांनीं आपल्या पूज्य मातुश्री श्रीमती बाई यांच्या स्मरणार्थ श्रीमती भवन नांवाच्या इमारतींत संग्रहालय व कलाप्रदर्शनालय सुरू करण्याकरितां सरकारला एक मोठी इमारत आणि

**कामाचे तास :** रविवार व सरकारी सुटीचे दिवसाखेरीज सकाळीं १०॥ ते दुपारीं ४॥ पर्यंत संग्रहालय उघडें असतें

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मंडळ :** ओरिसा सरकारचे संशोधन व संग्रहालय अधीक्षक हे या संग्रहालयाचा कारभार पाहातात

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष व रात्रीचा पहारेकरी

**आर्थिक तरतूद :** माहीत नाहीं

**अभिप्राय :** संग्रहालय बारिपाडा या शहरात असून तेथें लोकांना सहज जाता येतें संग्रहालयास भेट देण्यासाठीं येणाऱ्या लोकांची रोजची सरासरी संख्या २५ व वर्षाची ९०० इतकी आहे रथोत्सव, दुर्गापूजा व कालिपूजा या सणांच्या दिवशीं संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या लोकांच्या संख्येंत वाढ झालेली असते सध्याची इमारत संग्रहालयास योग्य व पुरेशी नसून समकृति ठेवण्यासाठीं जागा नाहीं हलविता येण्यासारख्या अश्मयुग पूर्वीच्या व अश्मयुगकालीन वस्तु इतर संग्रहालयांना काहीं प्रसंगीं उसनवारीनें देण्यात येतात संशोधन, खरेदी, गुप्तनिधि व उत्खनन या मार्गांनी संग्रहात भर घालण्यात येते गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं संग्रहालयास मान्यता देण्यात आली आहे

**येलपडी** · लोकसंख्या ( माहीत नाहीं )

## येलपडी संग्रहालय

**स्थापना :** १९४६–४७

**पूर्वेतिहास :** पूर्वीच्या कलहंडी संस्थानांत पुराणवस्तुशास्त्रविभागानं चालविलेल्या उत्खननाच्या वेळीं सापडलेल्या वस्तु तेल व उतकी या नद्यांच्या संगमाजवळ असलेल्या उत्खननाच्या जागीं जतन करून ठेवण्यासाठीं १९४६–४७ मध्यें ओरिसा राज्य संग्रहालयाची शाखा म्हणून हें छोटें संग्रहालय सुरू करण्यात आलें

**व्याप्ति व संग्रह** · उत्खननाच्या वेळीं सांपडलेल्या दगडी शिल्पकृती

**शैक्षणिक कार्य :** काहीं नाहीं

**प्रकाशनें :** काहीं नाहीं

**कामाचे तास** · सबंध वर्षभर सकाळीं १० ते सायंकाळीं ५ वाजेपर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ** · हें संग्रहालय, ओरिसाच्या पुराणवस्तुशास्त्र व संग्रहालय विभागाच्या अधीक्षकाच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग** · पहारेकरी

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकांत सालिना ५७६ रुपयांची तरतूद करण्यात आली आहे

**अभिप्राय :** हें संग्रहालय अतिशय दुरवर लोकवस्ती असलेल्या ठिकाणीं आहे एका पडवींत प्राचीनवस्तु ठेवण्यांत आल्या आहेत माघ, फाल्गुन, चैत्र व वैशाख या महिन्यांत ( जानेवारी ते एप्रिलपर्यंत ) संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांची संख्या जास्त असते आणि विशेषतः शिवरात्रीच्या दिवशीं जवळजवळ २००० लोक यांत येतात

**भुवनेश्वर :** लोकसंख्या १६,५१२

## ओरिसा राज्य संग्रहालय

**स्थापना :** १९३२

**पूर्वेतिहास :** प्रारंभीं हें संग्रहालय रेव्हेनशा कॉलेज, कटक, येथें सन १९३२ मध्यें स्थापन करण्यात आलं होतं या कॉलेजच्या दोन प्राध्यापकांनी तो संग्रह जमविला होता सन १९४५ मध्यें भुवनेश्वरच्या जुन्या शहरात ओरिसाचें राज्यसंग्रहालय म्हणून त्याची स्थापना करण्यात आली आतां तें नवीन राजधानीच्या जागीं हलविण्यात आलें आहे ओरिसा सरकार संग्रहालयासाठीं आता एक स्वतंत्र इमारत बांधीत आहे

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय पुराणवस्तूंचें असून त्यात इतिहासपूर्व कालातील प्राचीन वस्तु, दगडी शिल्पकृति, धातूंच्या प्रतिमा, मातीच्या वस्तु, लाकडावरील कोरीवकाम, हत्यारें, रंगचित्रें, नाणीं, ताडपत्रांवरील हस्तलिखितें व ऐतिहासिक कागदपत्रें आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाचें विभागाच्या उपयोगासाठीं एक ग्रंथालय आहे व त्यांत ४,५०० पुस्तकें व नियतकालिकें आहेत संग्रहालयास भेट देण्यासाठीं येणाऱ्या लोकांना संग्रहालयांतील वस्तूंची माहिती देण्याची सोय आहे संग्रहालयातील वस्तूंवरील नावांच्या चिठ्ठ्या इंग्रजी व उडीया या भाषेंत आहेत उत्कल विद्यापीठ व ओरिसातील महाविद्यालयें संग्रहालयाच्या बाबतींत आस्था दाखवितात

**प्रकाशनें :** ( १ ) ओरिसा ऐतिहासिक संशोधन पत्रिका ( त्रैमासिक ), ( २ ) संस्कृत हस्तलिखितांचं वर्णनात्मक माहितीपुस्तक, खंड १ ( स्मृति हस्तलिखितें ), ( ३ ) ओरिसातील शिलालेख, खंड १ आणि ( ४ ) सचित्र पोस्टकार्डें

**कामाचे तास :** रविवार व सरकारी सुटीचे दिवस खेरीजकरून रोज सकाळीं १० ३० ते दुपारीं ४ ३० पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ** · लोकशिक्षण संचालक व ओरिसा सरकारनें नेमलेलें सल्लागार मंडळ संग्रहालयाचा कारभार पहातात

**सेवकवर्ग** · प्राचीनवस्तुशास्त्र व संग्रहालय अधीक्षक–श्री पी आचार्य, एम् ए बी एल, संग्रहालयाध्यक्ष–श्री के एन् महापात्रा, बी ए ( ऑनर्स ) डी इडी, श्री एम् एन् राजगुरु, श्री ए सी साहू, एम् ए, श्री एस सी डे, बी ए ( ऑनर्स ), डिप्लोमा इन् आर्काइव्हज्, दोन कारकून, रक्षक, ग्रंथालय नोकर, सॉर्टर, दफ्तरी, दोन रात्रीचे पहारेकरी व सहा शिपाई

**आर्थिक तरतूद** रु ६४,६०१

**अभिप्राय** · संग्रहालयाची नवी इमारत बांधून होईपर्यंत, संग्रहालय भुवनेश्वर येथील ओरिसाच्या नव्या राजधानींतील तात्पुरत्या इमारतींत ठेवलें आहे संग्रहालयास भेट देण्यासाठीं येणाऱ्या लोकांची रोजची सरासरी संख्या २० असून दरसाल सुमारें ७,५०० लोक संग्रहालय पाहातात पूजा उत्सवाच्या सुटींत गर्दी जास्त असते रात्रीं पहारा करण्यासाठीं पहारेकरी असून नाणीं व मौल्यवान् वस्तु लोखंडी तिजोरींत ठेवण्यांत येतात लोकांनी नाणीं स्थानिक तिजोरींत ठेवण्यात येतात वस्तूंचा संग्रह करण्याचे मार्ग,

खरेदी, गुप्तनिधि, देणगी, विनिमय व संग्रहालय अधिकाऱ्यांकडून करण्यात येणारा संग्रह हे आहेत. गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं संग्रहालयाला मान्यता देण्यांत आली आहे. कायमची इमारत बांधून होईल तेव्हां या संग्रहालयाला विविधोद्देशी संग्रहालयाचें स्वरूप देण्याचें योजिलें आहे.

**खिचिंग ( मयूरभंज )**, लोकसंख्या १०,०००

**खिचिंग संग्रहालय**

**स्थापना :** १९२२

**पूर्वेतिहास :** कलकत्ता येथील भारतीय संग्रहालयाच्या पुराणवस्तुशास्त्र शाखेचे अधीक्षक श्री. रामप्रसाद चंदा यांनीं १९२२ मध्यें हें संग्रहालय स्थापन केलें. प्रारंभीं तें मयूरभंज संस्थानच्या सरकारच्या ताब्यांत होतें. परंतु संस्थान विलीन झाल्यानंतर हें संग्रहालय प्रांतिक सरकारच्या ताब्यात गेलें. हें ओरिसातील सर्वांत मोठें संग्रहालय असून त्यांत प्राचीन वस्तूंचा मोठा संग्रह आहे.

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय पुराणवस्तुविषयास वाहिलेलें असून तेथें शिलाशिल्पकृती, अश्मयुगीन हत्यारें, मणी, मातीच्या कलाकृती, ताम्रपट व सनदा आहेत.

**शैक्षणिक कार्य :** प्रदर्शित वस्तूंना इंग्रजी व उडीया अशा दोनहि भाषांतून नांवाच्या चिट्ठ्या लावलेल्या असल्या तरी शाळेय व इतर विद्यार्थ्यांना तेथील वस्तूंसंबंधीं माहिती देण्यासाठीं कोणतीहि तरतूद केलेली नाहीं.

**प्रकाशनें :** नाहींत.

**कामाचे तास :** रोज सकाळीं ७ ते ११ पर्यंत व दुपारीं २ ते ५ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय, अधीक्षक, संशोधन व संग्रहालयें, ओरिसा, यांच्या अधिकाराखालीं आहे.

**सेवकवर्ग :** एक रक्षक व एक चौकीदार.

**आर्थिक तरतूद :** अधीक्षक, संशोधन व संग्रहालयें, ओरिसा, यांच्यासाठीं जी तरतूद करण्यात आली आहे त्यांतीलच खास संग्रहालयासाठीं स्वतंत्र अशी तरतूद केलेली नाहीं.

**अभिप्राय :** संग्रहालय योग्य ठिकाणीं वसलेलें असून संग्रहालयास भेट देण्यासाठीं येणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या दैनिक २० व वार्षिक ८५०० पर्यंत असते. शिवरात्र, कोजागिरी पौर्णिमा, मकरसंक्रान्त आणि राजसंक्रान्त अशा विशेष प्रसंगीं प्रेक्षकांची गर्दी अधिक असते. संग्रहालयाची सध्यांची इमारत तेथील असंख्य वस्तूंच्या मानानें अयोग्य व अपुरी आहे व वस्तु संरक्षणासाठीं त्यांत जागा व पुरेशी जागा नाहीं. संग्रहालयाच्या रात्रंदिन रखवालीसाठीं एक चौकीदार आहे. नाणीं नाण्यांच्या पेट्यांत व इतर मौल्यवान चिजा, काचेच्या कपाटांतून ठेवलेल्या आहेत. वस्तुसंग्रह करण्याचे मार्ग उत्खनन, देणग्या व खरेदी हे होत. गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं या संग्रहालयास मान्यता मिळालेली असून तें भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे.

## पंजाब

**अमृतसर :** लोकसंख्या ३,२५,७४७

**मध्यवर्ती शीख संग्रहालय**

**स्थापना :** १९५८

**पूर्वेतिहास :** शिखांच्या इतिहाससंबंधींचे अवशेष ठेवण्याच्या हेतूनें संग्रहालयाची स्थापना ११ जुलै १९५८ रोजीं करण्यात आली. अमृतसरच्या क्लॉक टॉवरमधील भव्य अशा दर्शनदेवडीमध्यें हें संग्रहालय थाटलेलें आहे.

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयातील प्रदर्शित वस्तूंत शस्त्रें व शस्त्रागार, शीख इतिहासाचे दर्शन घडविणारीं रंगचित्रें, गुरूंचीं पवित्र पत्रें, गुरुमुखींतील जुनीं हस्तलिखितें, नाणीं, शिखांनीं वापरलेलीं वाद्यें, तसेंच गुरु गोविंदसिंग, महाराजा रणजितसिंग व इतर थोर शीख पुरुष यांच्या वैयक्तिक वस्तु, इ. चा अन्तर्भाव होतो.

**शैक्षणिक कार्य :** या संग्रहालयाशीं संलग्न अशीं दोन ग्रंथालयें आहेत– एक सार्वजनिक व दुसरें संदर्भ ग्रंथालय. सार्वजनिक ग्रंथालयांत सुमारें १०,००० पुस्तकें असून संदर्भ ग्रंथालयात नियतकालिकें धरून ६,००० पुस्तकें आहेत. संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांना योग्य सवलती देण्यात येतात. संग्रहालय पाहावयास येणाऱ्या विद्यार्थ्यांना व इतरेजनांना संग्रहालयाध्यक्ष प्रदर्शित वस्तूंविषयीं माहिती देतात. प्रदर्शित वस्तूंना पंजाबी, हिंदी व इंग्रजी अशा तीनहि भाषेंत नांवाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत.

**प्रकाशनें :** संग्रहालयानें माहितीपुस्तक, ( पंजाबी भाषेंत )

**कामाचे तास :** सोमवाराव्यतिरिक्त इतर दिवशीं, उन्हाळ्यात– सकाळीं ८ ते ११-३० पर्यंत आणि दुपारीं ४-३० ते ७ पर्यंत. हिवाळ्यात–सकाळीं ९ ते १२ पर्यंत व दुपारीं ३ ते ६ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** श्री दरबारसाहेब, अमृतसर.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री भानसिंग, एम्. ए., एलएल. बी., एक चित्रकार व दोन शिपाई.

**आर्थिक तरतूद :** अर्थसंकल्पातील वार्षिक तरतूद रु. २०,००० ची आहे.

**अभिप्राय :** अमृतसरसारख्या प्रेक्षणीय शहरात हें संग्रहालय एका सोयीस्कर जागीं वसलेलें असून अनेक लोक तें पाहावयास जातात. या संग्रहालयाच्या स्थापनेपासून डिसेंबरच्या मध्यापर्यंत जवळजवळ १,५०,००० लोकांनी त्याला भेट दिलेली असून, रविवार, सप्ताह, अमावास्या व गुरुपुरब या दिवशीं अनेक लोक संग्रहालय पाहावयास येतात. संग्रहालयाची इमारत लहान असल्यामुळें विस्तार वाढ करण्याचें ठरविण्यात आलें आहे. वस्तुसंग्रह, गुप्तधन, खरेदी व देणगी या मार्गांनीं केला जातो.

**पतियाळा :** लोकसंख्या ९७,८६९

**प्रादेशिक संग्रहालय**

**स्थापना :** १९४८

**पूर्वेतिहास :** सन १९४८ मध्यें पेप्सू राज्याची निर्मिति झाल्यानंतर हें संग्रहालय स्थापन करण्यांत आलें. प्रथमतः तें फक्त शस्त्रागार विभागच

होता त्यानंतर सन १९५०-५१ व सन १९५४ मध्यें त्यांत अनुक्रमें सिलेखाना विभाग (राजघराण्याच्या सोन्याचांदीच्या वस्तु) व चित्रप्रदर्शन विभाग या दोन विभागांची भर घालण्यात आली मध्या पूर्वीच्या पंजाब राज्याचें संग्रहालय व हें संग्रहालय एकत्रित करण्याचें ठरलें असून नंतर तें पंजाब सरकारनें या कार्यासाठी खरेदी केलेल्या मोतीबाग राजवाड्यांत हलविण्यांत येणार आहे

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयात शस्त्रागार विभाग, सृष्टिविज्ञान विभाग, सिलेखाना विभाग व चित्रप्रदर्शन विभाग असे निरनिराळे विभाग आहेत शस्त्रागारविभागात मशालजोगिन व मोचलोडिंग, बंदुका व पिस्तुलें, मझल-बॅरेल बंदुका, ब्रीच बंदुका, तलवारी, खंजीर, भाले, चिलखतें, धनुष्य बाण, परशु, योगारगी हत्यारें आहेत त्यापैकीं कांहीं ऐतिहासिक महत्त्वाची असून त्यांना कोरीव काम केलेल्या हस्तिदंती व सोन्याच्या मुठी आहेत

सृष्टिविज्ञानविभागांत पेंढा भरलेली व उभी केलेली जंगली जनावरें, पक्षी, शिंगें व शिरें आहेत

सिलेखाना विभागांत पतियाळा संस्थानांतील वनस्पतींचे नमुने, हस्तिदंती काम, वस्त्रप्रावरणें, भरतकाम, धातुकाम, पूर्वीच्या राजांचे संगमरवरी पुतळे, सोन्याचांदीच्या पत्र्यांनीं मढविलेल्या राजेशाही गाड्या इ वस्तु आहेत

चित्रप्रदर्शन विभागांत जुन्या राजांचीं गाढ्या रंगांतील चित्रें व तैलचित्रें आणि जुन्या राजांचीं छायाचित्रें आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयासाठीं एक मार्गदर्शक नेमलेला असून तो संग्रहालय पाहण्यास येणाऱ्यांना प्रदर्शित वस्तूंची माहिती देतो नोंदीच्या चिठ्ठ्या इंग्रजी व पंजाबी अशा दोन भाषांतून लावलेल्या आहेत

**प्रकाशनें :** नाहींत

**कामाचे तास :** रविवार व राज्यशासन सूचित केलेले इतर सुटीचे दिवस सोडून रोज सुरूं असतें–उन्हाळ्यांत सकाळीं ७ ते दुपारीं १ ३० पर्यंत, हिंवाळ्यांत सकाळीं १० ते दुपारीं ५ पर्यंत

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय संचालक, पुराभिलेख, यांच्या अधिकाराखालीं असून तेच संग्रहालयाध्यक्ष आहेत

**सेवकवर्ग :** अभिलेख अधिकारी, दोन मुनशीम, तहशीलदार, मार्गदर्शक, सहा परिचारक, सात साफसफाई करणारे, पट्टेवाले शिपाई, दरवान, चौकीदार व झाडूवाला

**आर्थिक तरतूद :** अर्थसंकल्पातील वार्षिक तरतूद रु २३,७७४ इतकी आहे

**अभिप्राय :** संग्रहालय योग्य स्थानीं वसलेलें असून संग्रहालयास भेट देण्यासाठीं येणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या दैनिक २३५ व वार्षिक ८५,६७२ आहे वसंतपंचमी व होळी यासारख्या स्थानिक उत्सवाच्या दिवशीं ही संख्या दिवसास १६०० इतकीहि वाढते वस्तुसंपादनाचे मार्ग खरेदी, देणग्या व देवघेव हे होत

**सिमला :** लोकसंख्या ४६,१५०

**पंजाब सरकारी संग्रहालय**

**स्थापना** १९४७

**पूर्वेतिहास :** सन १८६१ मध्यें लाहोर येथें स्थापन करण्यात आलेल्या मध्यवर्ती संग्रहालयांतील सामग्रीपैकीं आपल्या हिश्श्याचा ४० % भाग घेऊन पंजाब सरकारनें या संग्रहालयाची स्थापना केली नव्या राजधानीनें चंदीगड येथें संग्रहालयाची नवीन इमारत बांधून पूर्ण होईपर्यंत ही सामग्री तात्पुरती सिमला या हंगामी राजधानीच्या ठिकाणीं ठेवण्याचें ठरविलें होतें आतां संग्रहालय पतियाळा येथें बांधण्याचें ठरलें आहे

**व्याप्ति व संग्रह :** येथील वस्तुसंग्रहात खालील सर्वसाधारण वर्गांच्या वस्तूंचा समावेश होतो–(अ) गांधार शैलीतील शिल्प, (ब) प्राक्कालीन व अर्वाचीन पुरातन वस्तु, (क) वस्त्रप्रावरणें, (ड) तिबेटी व नेपाळी वस्तु, (इ) औद्योगिक कला व हस्तकला, (फ) नाणीं, (ग) रंगचित्रें, विशेषेंकरून पहाडी (कांगडा) शैलींतील रंगचित्रें, (ह) शस्त्रें व दारूगोळा, (आय्) हस्तलिखितें आणि (जे) जडजवाहीर

**शैक्षणिक कार्य :** लाहोर येथील संग्रहालयाचें ग्रंथ असलेल्या ग्रंथालयांतील पुस्तकांचा भाग अद्यापि मिळालेला नसला तरी एक संदर्भ ग्रंथालय तयार केलें जात आहे संग्रहालयांतील सामग्रीसंबंधीं विशिष्ट विषयांवर विद्यार्थ्यांसाठीं व जिज्ञासूंसाठीं खास भाषणें व व्याख्यानें ठेवलीं जातात यासाठीं दिव्याच्या साहाय्यानें दाखविण्याच्या कांचचित्रांचा विशिष्ट विषय समजावून सांगण्यासाठीं उपयोग केला जातो संग्रहालयांतील वस्तूंसंबंधीं प्रदर्शनविभाग साहाय्यक व संग्रहालयाध्यक्ष लोकांना माहिती देतात दिव्याच्या साहाय्यानें दाखविण्याच्या कांचचित्रांचा एक संग्रह येथें करून ठेवलेला आहे आणि तो शिक्षणसंस्थांना अथवा इतर व्यक्तींना उसनवार मिळू शकतो व्याख्यानाचे कार्यक्रम आखण्याच्या दृष्टीनें संग्रहालयांत कांहींच व्यवस्था नसली तरी चांगलें सभागृह मिळाल्यास व्याख्यानें ठेवण्याची योजना आहे स्थानिक महाविद्यालयें व शाळा सिमला येथील संग्रहालयाचा पुरेपूर फायदा घेतात

**प्रकाशनें :** उल्लेखनीय अशा प्रदर्शित वस्तूंची सचित्र कार्डें छापण्याचें योजिलें आहे

**कामाचे तास :** सुटीचे दिवस सोडून रोज सकाळीं हिंवाळ्यांत १० ते ४-३० पर्यंत व उन्हाळ्यांत सकाळीं ९-३० ते दुपारीं ५ पर्यंत सुरूं असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालयासाठीं एक सल्लागार समिति असून, सचिव, शिक्षणविभाग, पंजाब सरकार यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालीं तें आहे

**सेवकवर्ग** संग्रहालयाध्यक्ष–श्री व्ही एम् सुरी, एम् ए, प्रदर्शन विभाग साहाय्यक, दोन कारकून, चार शिपाई, दोन चौकीदार, झाडूवाला व माळी

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं अर्थसंकल्पात वार्षिक तरतूद रु ३१,७३४ इतक्या रकमेची केलेली आहे

**अभिप्राय :** संग्रहालयास भेट देणाऱ्यांची सरासरी संख्या दैनिक ३० ते ५० च्या दरम्यान असून, उन्हाळ्यात या थंड हवेच्या ठिकाणीं गर्दी वाढली कीं संग्रहालयास भेट देणाऱ्यांची संख्याहि बरीच वाढते संग्रहालयाची सध्याची इमारत तात्पुरती असून संग्रहालयाच्या दृष्टीनें ती अयोग्य व अपुरी आहे ही इमारत प्रदर्शित वस्तूंचा संग्रह साठवून ठेवण्यासाठींच मुख्यत वापरली जाते ज्यावर रात्रंदिवस पहारा ठेवावा

लागेल अशा कायम बसवलेल्या अथवा तात्पुरत्या जोडलेल्या कोणत्याही मौल्यवान वस्तु इमारतींत ठेवलेल्या नाहींत संग्रहालयाचा शहोर संग्रहालयातील नाण्याचा वाटा अजून मिळविण्यात आलेला नाहीं. इतर मौल्यवान चिजा लोखंडी कपाटात ठेवलेल्या आहेत येथील वस्तुसंग्रह खरेदी, देणगी, उसनवारी व गुप्तनिधि इ. विविध मार्गांनीं संपादन करण्यात आला आहे गुप्तनिधींतील वस्तूंचा आपला हिस्सा स्वीकारण्यासाठीं या संग्रहालयास मान्यता मिळालेली आहे समकृतींच्या देवघेवीसंबंधींच्या योजनेचा सरकारकडून विचार केला जात आहे. बहुतेक सर्व प्रदर्शित वस्तूंना इंग्रजी, हिंदी व गुरुमुखी अशा तीनहि भाषांतून नावाच्या चिठ्ठया लावलेल्या आहेत आवश्यक तेथें प्रदर्शित वस्तूंची वैशिष्ट्यें दाखविण्यासाठीं तक्ते, नमुने, कोतीव कृती व चित्रें यांचा उपयोग केला जातो चित्रप्रदर्शन विभाग उभारणें, संशोधन विभाग, व्याख्यानसभागृह बांधणें इ० सारख्या संग्रहालयविस्ताराच्या योजना आखलेल्या असून चंदीगड येथें बांधल्या जावयाच्या नवीन संग्रहालयाच्या योजनेंत त्या समाविष्ट केल्या जातील अशी अपेक्षा आहे

## राजस्थान

**अजमेर :** लोकसंख्या १,९६,६३३

### राजपुताना संग्रहालय

**स्थापना :** १९०८

**पूर्वेतिहास :** पूर्वी राजपुताना म्हणून व आता राजस्थान म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या प्रांतांतील निरनिराळ्या विभागांत दुर्लक्षित राहिलेल्या महत्वाच्या सर्व पुरातन वस्तु व दस्तऐवज यांचे जतन करण्याच्या दृष्टीनें भारत सरकारनें १९०८ सालीं या संग्रहालयाची स्थापना केली लॉर्ड कर्झन व त्यावेळचे भारतातील पुराणवस्तुशास्त्र विभागाचे संरसंचालक सर जॉन मार्शल यांच्या प्रेरणेनें जेव्हां या संग्रहालयाची सुरुवात झाली, तेव्हां राजपुतान्यात दुसरें कोणतेंहि पुराणवस्तु संग्रहालय नव्हतें. राजपुताना हेंच नांव मिळालेलें हें संग्रहालय या प्रदेशाचें राष्ट्रीय संग्रहालय व्हावें, प्रादेशिक संग्रहालयासारखेंच स्थान त्यास लाभावें व मुख्यतः २२ भारतीय संस्थानें व अजमेर-मारवाड अंतर्भूत असलेल्या राजपुतान्याचा त्यायोगें फायदा व्हावा असें पुढें ठरविण्यात आलें या संग्रहालयाच्या प्रदर्शन विभागांत अल्वार ते बन्सवारा व धोल्पूर ते जयसल्मीरपर्यंतच्या सर्व ठिकाणच्या आकर्षक वस्तूंचा समावेश होता भारत सरकारनें, या संग्रहालयाच्या कारभाराची प्राथमिक जबाबदारी अजमेर-मारवाडचे चीफ कमिशनर व राजपुतान्याच्या गव्हर्नर-जनरलचे एजंट (राजपुतान्यातील संस्थानांचे राजकीय प्रमुख) यांजकडे सोंपविली या कामांत त्यांनीं भारताच्या पुराणवस्तुशास्त्र विभागाचे संरसंचालक यांच्या सल्ल्यानें कामकाज पाहावें असेंहि ठरविण्यांत आलें

**व्याप्ति व संग्रह :** राजपुताना संग्रहालयांतील वस्तुसंग्रहाचे राजपुताना व अजमेर – मारवाडमधील पुरातनवस्तु आणि तद्देशीय कला व उद्योग चित्रित करणाऱ्या वस्तु असे गट पाडता येतील यांपैकीं पहिल्या गटाचे पुढील भाग पाडता येतील :

(अ) (१) प्रागैतिहासिक विभाग
(२) शिल्पकला विभाग
(३) शिलालेख, ताम्रपट व शिलालेखांचे ठसे
(४) जुनीं रंगचित्रें व ऐतिहासिक स्मारकांचीं छायाचित्रें
(५) शस्त्रे व शस्त्रागार
(६) जुनीं नाणीं
(७) अढाई दिन का झोपडामधील वस्तु
(८) सखोल अभ्यासासाठीं आवश्यक अशा समकृती वा कमी महत्त्वाच्या प्रदर्शित वस्तु (या सर्व राखीव संग्रहात असून निरनिराळ्या गुदामात ठेवलेल्या आहेत)

(ब) राजपुताना व अजमेर-मारवाडमधील कला व उद्योग चित्रित करणाऱ्या वस्तु. हा विभाग १९१० मध्यें बंद करण्यात आल्यामुळें आतां फार थोड्या वस्तु शिल्लक आहेत.

**शैक्षणिक कार्य :** विभागीय कामकाजासाठीं राजपुताना संग्रहालयाचेंच एक उत्तम ग्रंथालय असून अभ्यास व संशोधनासाठीं इतरेजनांनाहि त्याचा उपयोग करता येतो. ग्रंथालयात नियतकालिकें धरून २५०० पुस्तकें आहेत विद्यार्थी, संशोधन करणारे अभ्यासू विद्वान व इतर लोक संग्रहालयास भेट देतात व काहीं खास प्रसंगीं संग्रहालयाध्यक्ष हे त्यांना बरोबर घेऊन स्वतः संग्रहालय दाखवितात व येथील वस्तूंविषयीं माहिती देतात विद्यार्थ्यांना प्रत्येक मंगळवारी व स्त्रियांना प्रत्येक महिन्यातील पहिल्या मंगळवारी संग्रहालय दाखविण्यासाठीं खास व्यवस्था केलेली आहे प्रदर्शित वस्तूंना सर्वत्र नावाच्या चिठ्ठया लावलेल्या असून त्या इंग्रजी व हिंदी भाषेंत आहेत.

**प्रकाशनें :** (१) राजपुताना संग्रहालयाच्या कार्यकारी समितीचा वार्षिक अहवाल – खर्चकपातीचा एक मार्ग म्हणून हा अहवाल सध्या छापला जात नाहीं, आणि (२) संग्रहालयातील आकर्षक वस्तूंचीं व अजमेरमधील महत्त्वाच्या ऐतिहासिक ठिकाणांचीं १६ सचित्र पोस्टकार्डें – किंमत प्रत्येक संचास १ रुपया.

**कामाचे तास :** स्वातंत्र्य दिन, होळी, दिवाळी, इ० सारखे विशेषदिवस सोडून रोज खुलें असतें – उन्हाळ्यात सकाळीं ७–३० ते १०–३० पर्यंत आणि दुपारीं ३–३० ते ६–३० पर्यंत, हिवाळ्यात सकाळीं १० ते ५ पर्यंत

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय, मुख्य अधीक्षक, पुराणवस्तु विभाग व संग्रहालयें, राजस्थान सरकार यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** श्री. यु. सी. भट्टाचार्य, एम्. ए., संग्रहालय कारकून, दोन प्रदर्शनविभाग साहाय्यक, सेवक व दोन चौकीदार

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अर्थसंकल्प रु. ११,७०० इतक्या रकमेचा आहे

**अभिप्राय :** संग्रहालयास भेट देण्यासाठीं येणाऱ्या प्रेक्षकांची सरासरी संख्या दैनिक १४८ असून वार्षिक ५५,४१६ आहे पुष्कर जत्रा व ख्वाजासाहेबांचा उरूस या दोन विशेष प्रसंगीं संग्रहालय पाहावयास

येणाऱ्याच्या सख्येत वरीच भर पडते राजपुताना सग्रहालय अकबराने इसवी सन १५७२ मध्ये बांधलेल्या एक जुन्या मोंगल किल्ल्यात थाटलेले आहे. हा किल्ला आता एक सरक्षित स्मारक असून त्यात अजमेर सरकारची काहीं इतर कार्यालयेंहि आहेत त्यामुळें सग्रहालयांतील प्रदर्शित वस्तूंच्या माडणीसाठीं ही जागा अपुरी व गैरसोयीची झाली आहे नाणीं, ताम्रपट, इ० सारख्या मौल्यवान चिजा एका बंदिस्त खोलींत ठेवलेल्या असून सग्रहालयाची रात्रंदिन राखण करण्यासाठीं एक चौकीदार नेमलेला आहे वस्तुसग्रह करण्याचे मार्ग सशोधन, उत्खनन, गुप्तनिधींतून व देणगीदाराकडून वस्तु मिळविणें व त्या खरेदी करणें हे होत. इतर सग्रहालयाशीं वस्तूंची देवाणघेवाण केली जाते गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं ह्या सग्रहालयास मान्यता मिळाली आहे हें सग्रहालय भारतीय सग्रहालय सघाचें सदस्य आहे

अलवार : लोकसख्या ५७,८६८

## सरकारी संग्रहालय

**स्थापना :** १९४०

**पूर्वेतिहास :** इसवी सन १८०० पासून या सस्थानच्या अधिपतींच्या ताब्यात असलेला सग्रहालयांतील वस्तुसग्रह, पुस्तकालय, सिलेहखाना, तोशेखाना इ० गोष्टी निरनिराळ्या विभागात माडलेल्या असल्या तरी त्यास व्यवस्थित अशा सग्रहालयाचे स्वरूप नव्हतें व त्यामुळें कांहीं खास दरबारी पाहुण्यासच हा सग्रह पाहावयास मिळे सन १९४० मध्यें महाराजा जयसिंग यांच्या कारकीर्दींत मि० हार्वे यानी सग्रहालयास सध्याचें स्वरूप प्राप्त करून दिलें हा सग्रह होण्यास महाराजा विनयसिंग यांचेच प्रयत्न कारणीभूत झाले कारण त्यानी, सन १८५७ मध्यें निर्माण झालेल्या अशांततेमुळें, लोक दिल्ली सोडून पळून जाऊं लागले तेव्हां त्यांजकडून अनेक मौल्यवान चिजा खरेदी करून ठेवल्या

**व्याप्ति व संग्रह :** सग्रहालयात चार विभाग आहेत-(अ) औद्योगिक विभाग, (ब) रंगचित्र विभाग, (क) शस्त्रागार विभाग, (ड) पुराणवस्तु विभाग. पहिल्या विभागांत औद्योगिक दृष्टीनें महत्त्वाच्या अशा स्थानिक व बाहेरून मिळविलेल्या सुमारें १००० वस्तूंचा सग्रह आहे रंगचित्र विभागात मोंगल व रजपूत शैलींतील सुमारें २००० कलाकृती व ऐतिहासिक व धार्मिक महत्वाचीं हस्तलिखितें आहेत सुमारें १५००० शस्त्रें असलेला शस्त्रागार विभाग अत्यंत भव्य असून त्यातील बरींच शस्त्रें कलात्मक व ऐतिहासिक महत्त्वाचीं आहेत पुराणवस्तु विभागाची रचना अगदीं अलिकडेच केलेली आहे

**शैक्षणिक कार्य :** येथील अभिरक्षक हे शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना, बरोबर येऊन सग्रहालय दाखवितात निरनिराळ्या विभागासंबंधी मार्गदर्शिका उपलब्ध असून प्रदर्शित वस्तूंना इंग्रजी व हिंदी भाषेतून नांवाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत सुरुवातीस सग्रहालयास सलग्न असलेले ग्रंथालय आता एक स्वतंत्र विभाग म्हणून अस्तित्वात असलें तरी पुराणवस्तुशास्त्र व सग्रहालयशास्त्र यांवरील पुस्तकें सग्रहालयासाठीं तेथें राखून ठेवण्यात आलीं आहेत व जिज्ञासू वाचकाना सदर्भासाठीं ती मिळू शकतात सग्रहालयाच्या ग्रंथालयात सुमारें ८००० पुस्तकें, व सस्कृत फारसी, उर्दू, हिंदी व इंग्रजी भाषेंतील हस्तलिखितें आहेत

**प्रकाशनें :** (१) प्रदर्शनविभागाची मार्गदर्शिका, (२) अलवार ॲंड इट्स् आर्ट ट्रेझर, ले० कर्नल हेंडले, जयपूर संग्रहालय, किंमत रुपये ३५, (३) अलवार सग्रहालय का चित्र, ले०, एम् एम् गुप्ता, व (४) सचित्र कार्डे.

**कामाचे तास :** शुक्रवार व वर्षातील राजपत्रित सुट्याचे दिवस सोडून रोज खुलें असतें उन्हाळ्यात सकाळीं ७ ते १०-३० पर्यंत आणि दुपारीं ३-३० ते ६ पर्यंत, हिंवाळ्यात सकाळीं १० ते सध्याकाळीं ५ पर्यंत

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** सग्रहालय अभिरक्षक हे अधीक्षक, सग्रहालयें, राजस्थान, याच्या अधिपत्याखालीं काम पाहातात

**सेवकवर्ग :** सग्रहालयाध्यक्ष - श्री शिवशरणलाल, कारकून, चित्रकार, नऊ चपराशी व एक अशकालिक झाडूवाला

**आर्थिक तरतूद :** वार्षिक रु १६,०५८

**अभिप्राय :** सग्रहालय योग्य ठिकाणीं थाटलेले असून, त्याला भेट देण्यास येणाऱ्या प्रेक्षकाची सख्या दैनिक २०० व वार्षिक ७२००० असते 'तीज' व गणगउत्सव यासारख्या विशेष प्रसगी जास्त सख्येनें लोक सग्रहालय पाहावयास येतात सग्रहालयाची इमारत भरपूर मोठी असून तींत वस्तूंचा साठा करण्यासहि जागा आहे प्रयोगशाळेची सोय मात्र येथें नाहीं सग्रहालयाच्या रखवालीसाठीं व सरक्षणासाठीं काहीं खास व्यवस्था नाहीं, परतु मौल्यवान चिजांवर प्रदर्शन विभागाचे तीन परिचारक लक्ष ठेवतात प्रेक्षकासाठीं पंखे, बसण्याची व्यवस्था इ० सोयी केलेल्या आहेत सग्रहालयांतील प्रमुख वस्तु आणि विशेषेंकरून कलाप्रदर्शनविभागातील सर्व सग्रह, उदेपूरचे महाराणा याच्या उदार देणगीमुळेंच लाभलेला आहे पुराणवस्तु सशोधनानें मिळविलेल्या आहेत गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं या सग्रहालयास अजून मान्यता मिळालेली नाहीं

अंबर : लोकसख्या ५,०००

## पुराणवस्तु सग्रहालय

**स्थापना :** १९३८

**पूर्वेतिहास :** सग्रहालयाची स्थापना सन १९३८ मध्यें झाली असून तें अबर येथील जुन्या राजवाड्यातील दिलाराम बाग नांवाच्या इमारतींत वसलेलें आहे

**व्याप्ति व सग्रह :** उत्खननात सापडलेल्या पुराणवस्तु या सग्रहालयात ठेवलेल्या आहेत

**शैक्षणिक कार्य :** नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व हिंदी अशा दोन भाषातून लावलेल्या आहेत, तथापि, शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना वस्तूंबद्दल माहिती देण्याची कांहींच व्यवस्था नाहीं

**प्रकाशनें :** (१) सचित्र पोस्टकार्डे, (२) पुराणवस्तुशास्त्रविषयक अहवाल व (३) शिलालेख माला ( Stones Speak Series )

**कामाचे तास :** उन्हाळ्यांत सकाळीं ७-३० ते १०-३० पर्यंत, व दुपारीं ३ ते ६ पर्यंत व हिंवाळ्यांत सकाळीं १० ते दुपारीं ४-३० पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें सग्रहालय संचालक, पुराणवस्तुशास्त्र व सग्रहालयें याच्या अधिकाराखालीं आहे

**सेवकवर्ग :** डॉ एस् पी श्रीवास्तव, एम् ए, पीएच् डी, संचालक, पुराणवस्तुशास्त्र व संग्रहालयें, व दोन परिचारक.

**आर्थिक तरतूद :** अर्थसंकल्पांतील तरतूद रु २१,८७७ इतक्या रकमेची आहे

**अभिप्राय :** संग्रहालय एका छोट्याशाच परंतु सुबक इमारतींत थाटलेलें असून, ही इमारत संग्रहालयाच्या दृष्टीनें पुरेशी आहे. छायाचित्रें इ च्या विक्रीची व्यवस्थाहि येथें करण्यात आलेली आहे संशोधन व उत्खनन या मार्गांनीं विविध वस्तु मिळवून संग्रहात भर घातली जाते गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं या संग्रहालयास मान्यता मिळाली असून तें जयपूर येथील मध्यवर्ती संग्रहालयाच्या पुराणवस्तुशास्त्र दालनांतील एक विभाग म्हणून समजले जातें

**भरतपूर :** लोकसंख्या ३७,३३१

**राज्य संग्रहालय**

**स्थापना :** १९४४

**पूर्वेतिहास :** भरतपूर संस्थानात सापडलेल्या पुरातन वस्तु नीट एकत्रित ठेवण्यासाठीं एक संग्रहालय स्थापण्याची कल्पना सन १९४० मध्यें निघाली त्याप्रमाणें कांहीं वस्तु गोळा करण्यात आल्या व त्या सार्वजनिक ग्रंथालयात माहून ग्रंथालयाधिकाऱ्याच्या ताब्यात देण्यात आल्या त्यानंतर तारीख ११ नोव्हेंबर १९४४ रोजी भरतपूरच्या महाराजांनीं राज्यसंग्रहालय म्हणून या संग्रहालयाची स्थापना केली सन १९४८ मध्यें राजस्थान संस्थानाची स्थापना झाल्यानंतर हें संग्रहालय, संचालक, पुराणवस्तुशास्त्र व संग्रहालयें, राजस्थान यांच्या नियंत्रणाखालीं आलें तारीख ११ नोव्हेंबर १९४४ रोजीं सुरु करण्यात आलेलें हें संग्रहालय कचेहरी कालनच्या आवारात थाटलेलें असून ही किल्ल्यातली एक अत्यंत सुंदर इमारत आहे

**व्याप्ति व संग्रह** • संग्रहालयात खालील विभाग आहेत (१) पुराणवस्तुशास्त्र विभाग–(अ) शिल्पकला, (ब) रंगचित्रें, (क) नाणकशास्त्र, (ड) हस्तलिखितें, (इ) पुरालेखविद्या, (२) भरतपूरची कला व हस्तकला; (३) बालविभाग–(अ) सर्वसाधारण कला, (ब) सृष्टिविज्ञान, (क) भूस्तरशास्त्र आणि (४) शस्त्रें व शस्त्रागार

**शैक्षणिक कार्य :** विभागीय उपयोगासाठीं संग्रहालयास संलग्न असें एक ग्रंथालय आहे संग्रहालयाध्यक्ष विद्यार्थ्यांना प्रदर्शित वस्तुविषयी माहिती देतात व स्थानिक शाळा व महाविद्यालयें संग्रहालयासंबंधीं बरीच आस्था दर्शवितात प्रदर्शित वस्तूंना सर्वत्र इंग्रजी व हिंदी भाषेतून नावाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत

**प्रकाशनें :** (१) भरतपूर राज्यसंग्रहालयातील शिल्पकला, (२) भरतपूर राज्यसंग्रहालयाचा परिचय, (३) चित्रिनालय विज्ञान (हिंदी), आणि (४) भरतपूर और अतीत के चिन्ह (हिंदी)

**कामाचे तास** • शुक्रवार आणि दिवाळी व होळी यासारखे महत्त्वाचे सण सोडून रोज खुलें असतें उन्हाळ्यात सकाळीं ७–३० ते १०–३० पर्यंत, दुपारीं ४ ते ६ पर्यंत व हिवाळ्यात सकाळीं १० ते दुपारीं ४–३० पर्यंत खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालय एका अधिकाऱ्याच्या ताब्यात असून त्यावर संचालक, पुराणवस्तुशास्त्र व संग्रहालयें, राजस्थान, यांचें नियंत्रण आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री पी एल चक्रवर्ती, कारकून, मिस्त्री, गिल्लसाज, दरवान, शिपाई, फराश, चार चौकीदार व दोन प्रदर्शनविभाग परिचारक

**आर्थिक तरतूद** • अर्थसंकल्पातील तरतूद रु १४,५४३ इतकी आहे

**अभिप्राय** • संग्रहालय योग्य ठिकाणीं वसलेलें असून तें पाहावयास येणाऱ्यांची सरासरी दैनिक ४०० व वार्षिक १,५०,००० इतकी असते दसरा उत्सवात या संख्येंत बरीच भर पडते संग्रहालयाच्या दृष्टीनं इमारत भरपूर मोठी असली तरी राखीव साठा ठेवण्यासाठीं त्यात जागा नाहीं ह्या संग्रहालयात प्रयोगशाळेची सोय आहे ह्या संग्रहालयातील वस्तु संशोधन, उत्खनन, खरेदी व देणगी या विविध मार्गांनीं मिळविलेल्या आहेत गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं ह्या संग्रहालयास मान्यता मिळालेली नाहीं हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचा सदस्य आहे

**बिकानेर :** लोकसंख्या १,१७,११३

**गंगा सुवर्णमहोत्सव संग्रहालय**

**स्थापना** सन १९३७

**पूर्वेतिहास :** बिकानेरचे हिज हायनेस महाराजा श्रीगंगासिंहजी यांनीं हें संग्रहालय स्थापन केलें ह्या संग्रहालयाचें उद्घाटन महाराजांच्या सुवर्णमहोत्सवप्रसंगीं तारीख ५ नोव्हेंबर १९३७ रोजीं भारताचे तेव्हांचे गव्हर्नर जनरल लॉर्ड लिनलिथगो यांनीं केलें व त्यास महाराजांचें नाव देण्यात आलें हें संग्रहालय मुख्यत्वें बिकानेर दरबारने देणगीदाखल दिलेल्या वस्तूंच्या साहाय्यानें बनविण्यात आलें आहे तें अलिकडेच सन १९५५ मध्यें सध्याच्या इमारतींत हलविण्यात आलें आहे

**व्याप्ति व संग्रह** • ह्या संग्रहालयात पुढील विभाग आहेत (१) स्थानिक विभाग, (२) पुराणवस्तु विभाग, (३) इतिहास विभाग, (४) शस्त्रागार विभाग, (५) महाराजा सर गंगासिंहजी स्मारक विभाग, आणि (६) रंगचित्रें व हस्तलिखितें विभाग

स्थानिक विभागात बिकानेर येथील कला व हस्तव्यवसाय, प्राणी व संस्कृति दर्शविणाऱ्या कलाकृति आहेत यात देशी कलाकृतींचे अप्रतिम नमुने आहेत उदाहरणार्थ, उंटाच्या कातड्याच्या लाखकाम केलेल्या कुपी, तसेंच लाकूड, धातु, काच, शिला, चामडें व शहामृग पक्षाचें अंडें यावरील लाखकामाच्या कलाकृति, लाकडावर व दगडावर कोरीव काम केलेल्या अपूर्व कलाकृती, राजवाड्यातील गालिचे व काचेच्या वस्तु याचे मोठ्या आकाराचे नमुने ह्या संग्रहालयात आहेत

पुराणवस्तु विभागात प्रागैतिहासिक व ऐतिहासिक काळातील मातीच्या वस्तूंचा उद्बोधक व मौल्यवान् संग्रह आहे रंगमहाल, बडोपाल मीर सुल्तानकी थेरी यांसारख्या ठिकाणांतून सन १९१७ मध्ये सापडलेल्या गुप्तकालीन मातीच्या वस्तु अत्यंत उल्लेखनीय आहेत संग्रहालयातील महत्त्वाच्या वस्तूमध्यें नोहार जिल्ह्यातील पल्लू येथील इ स ११ व १२ व्या शतकातील

माधोसिंग यांच्या कारकीर्दीत पूर्ण झालें भारतीय सारासेनिक पद्धतींच्या या अप्रतिम इमारतीचा नकाशा संग्रहालयासाठीं ती उपयुक्त व्हावी या दृष्टीने तींत आवश्यक ते फेरफार करून सिल्वरटर कर्नल जेकब यांनीं तयार केला होता या इमारतीसाठीं एकूण सुमारें सहा लाख रुपये इतकी रक्कम खर्च करण्यात आली राजपुताना, दिल्ली, आग्रा व फत्तेपूर सिक्री येथील राजवाड्यांच्या व घुमटांच्या शोभिवंत व प्रसिद्ध बांधकामाच्या नमुन्यांचें काळजीपूर्वक अनुकरण या इमारतीच्या दगडावरील कोरीव कामात झालेलें दिसून येतें या इमारतींत सन १८८७ मध्यें संग्रहालयाची पूर्ण स्थापना झाली या संग्रहालयात आर्थिक, शैक्षणिक, ऐतिहासिक व औद्योगिक कला हे विभाग असून यात ब्रिगेड सर्जन लेफ्टनंट कर्नल टी एच हेंड्ली, सी आय् ई यांनीं संग्रहित केलेल्या वस्तु आहेत आधुनिक काळातील गरजा भागविण्याच्या दृष्टीने या संग्रहालयाची पुनर्रचना करण्यात येत असून अगदीं अलिकडे बालविभाग सुरू करण्यात आला आहे

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयात पुढील विभाग आहेत : (अ) कलावस्तु व उद्योग विभाग–धातूच्या, लाकडाच्या व मातीच्या वस्तूंचा विभाग, (ब) शस्त्रास्त्र विभाग, (क) वस्त्र विभाग, (ड) गालिचे विभाग, (इ) रंगचित्रे विभाग, (फ) भूस्तर विभाग, (ग) प्राणीशास्त्र विभाग, (ह) वनस्पतिशास्त्र विभाग आणि (आय्) खेळणी व बाहुल्या यांचा विभाग

**शैक्षणिक कार्य :** या संग्रहालयात एक ग्रंथालय असून तें सर्व लोकांसाठीं खुलें आहे संग्रहालयातील निरनिराळ्या विभागांत हस्तव्यवसायाच्या द्वारें शाळांतील विद्यार्थ्यांना व विद्यार्थ्यांच्या पथकांना शिक्षण देण्याची सोय आहे संग्रहालयाध्यक्ष या विद्यार्थ्यांना संग्रहालयातील वस्तूंविषयी माहिती देतात संग्रहालयात एक बालविभागहि सुरू करण्यात आला आहे विशिष्ट वस्तूंची माहिती देण्यासाठीं नकाशे व चित्रें यांचा उपयोग करण्यात येतो

**प्रकाशनें :** (१) संग्रहालयातील वस्तु, (२) भाषणावरील व्याख्यान, (३) जयपूर संग्रहालयातील पितळेच्या वस्तु, (४) पर्शियन उद्यान गालिचे, (५) जयपूर संग्रहालयासंबंधींची माहितीपत्रकें (इंग्रजीत व हिंदीत), आणि (६) संग्रहालयातील वस्तूंची सचित्र पोस्टकार्डे

**कामाचे तास :** शुक्रवारखेरीज सर्व दिवशीं उघडें असतें उन्हाळ्यांत सकाळीं ७-३० तें १०-३० व संध्याकाळीं ४ ते ६, हिवाळ्यांत सकाळीं १० ते संध्याकाळीं ४-३० पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय संग्रहालयाध्यक्षांच्या ताब्यांत असून संचालक, पुराणवस्तु व संग्रहालय विभाग, राजस्थान यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री मोहनलाल गुप्ता, एक कारकून, एक मार्गदर्शक, एक चित्रकार, एक जमादार, एक साफसफाई करणारा (क्लीनर), १२ प्रदर्शन विभाग परिचारक, तीन चौकीदार, दोन रखवाल, एक सायकलस्वार, एक पहारा, एक कचरी कारकून, एक पाणीवाला, एक पत्रोळा व एक माळीवाला अशासकीय सेवकवर्ग–माहितीपुस्तकें तयार करणारे दोन कारकून व एक शिपाई

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकातील वार्षिक तरतूद रु ३६,००० इतकी आहे

**प्रवेश :** विनामूल्य

**अभिप्राय :** हें संग्रहालय रामनिवास बागेतील सुंदर जागेत असून तेथून गांवातील सर्वच दृश्य दिसते प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या १,००० व वार्षिक सरासरी संख्या ३,५०,००० इतकी आहे परंतु तीज व इतर सणांच्या प्रसंगीं व हिवाळ्यात प्रेक्षकांची गर्दी विशेष असते इमारत पुरेशी असून राखीव संग्रह ठेवण्यासाठीं प्रशस्त गुदामें आहेत परंतु संग्रहालयाला प्रयोगशाळेची सोय नाहीं महत्त्वाच्या वस्तूंच्या छायाचित्रांच्या विक्रीची व्यवस्था संग्रहालयात करण्यात आलेली आहे खरेदी, संशोधन, गुप्तनिधि देणगी व अदलाबदल इत्यादि विविध मार्गांनीं या संग्रहालयांत नवीन वस्तूंची भर टाकण्यात येते गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं संग्रहालयास मान्यता मिळालेली आहे हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचा सदस्य आहे

**झालावाड :** लोकसंख्या १,५००

## पुराणवस्तु संग्रहालय

**स्थापना :** सन १९१५

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय सन १९१५ मध्यें झालावाडचे स्व हिज हायनेस महाराजा राणा श्री भवानीसिंगजी यांच्या उदार आश्रयाने स्थापन झालें संग्रहालयाचे पहिले संग्रहालयाध्यक्ष पंडित गोपाललाल व्यास यांनी शोध संस्थानातून अनेक पुरातन वस्तु संग्रहित केल्या त्यात कांहीं सुंदर शिल्पकलाकृती असून त्या कलेच्या तसेच मूर्तिकलेच्या दृष्टीनें लक्ष वेधून घेणाऱ्या आहेत

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयात शिल्पकलाकृती, कोरीव लेख, नाणी, हस्तलिखितें, लाकडावरील व हस्तीदंतावरील कोरीव नक्षीकाम, जुनी रंगचित्रे आणि खनिज वस्तु आहेत शिल्पकलाकृतींचा संग्रह अप्रतिम असून त्यात २०० उत्कृष्ट नमुने आहेत

**शैक्षणिक कार्य :** विद्यार्थी, विद्वान् लोक व इतर प्रेक्षक यांना संग्रहालयातील वस्तूंविषयीं माहिती देण्याची व्यवस्था नाहीं वस्तूंवरील नांवांच्या चिठ्ठ्या हिंदी भाषेंत आहेत महाविद्यालयातील व शाळेतील विद्यार्थी संग्रहालय पाहण्यास येतात

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** राजपत्रात जाहीर केलेल्या सुट्ट्यांखेरीज इतर सर्व दिवशीं उघडें असतें उन्हाळ्यात सकाळीं ७-३० ते १०-३० आणि दुपारी ३ ३० ते संध्याकाळीं ६ ३० आणि हिवाळ्यात सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ पर्यंत

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालय अभिरक्षकाच्या ताब्यांत असून तो संचालक, पुराणवस्तु व संग्रहालय विभाग, राजस्थान, यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** अभिरक्षक–श्री गोवर्धनलाल व्यास, एक प्रदर्शन विभाग परिचारक, एक शिपाई, रात्रीच्या पहाऱ्यासाठीं दोन चौकीदार.

शिवाय त्यांत मूर्तिशिल्पाच्या दृष्टीने मनोरंजक अशा १३१ शिल्पकलाकृती आहेत संवत् २९५ या काळातील ४ यज्ञविषयक यूप, तसेंच नाण्यांचा संग्रह व हाडोती, जयपूर व उदेपूर येथील सुरेख रंगचित्रें आहेत तसेंच कोटाचे पूर्वीचे राजे वापरीत असलेल्या शस्त्रांचा व पोषाखाचा संग्रहहि त्यात आहे हें संग्रहालय हाडोती भागाचें प्रादेशिक संग्रहालय आहे ,

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयास जोडून एक ग्रंथालय असून राजस्थान सरकारच्या परवानगीनें संशोधन अभ्यासकांना त्याचा उपयोग करू दिला जातो संग्रहालयातील वस्तूविषयीं माहिती देण्यासाठीं खास सोय केलेली नाहीं वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठ्या हिंदींत व इंग्रजींत लिहिलेल्या आहेत

**प्रकाशनें :** माहितीपत्रिका व पुस्तिका

**कामाचे तास :** शुक्रवारशिवाय आठवड्यांतील सर्व दिवस उघडें असतें उन्हाळ्यात सकाळीं ७-३० ते १०-३० व सध्याकाळीं ४ ते ६, हिंवाळ्यात सकाळीं १० ते सध्याकाळीं ४ वाजेपर्यंत

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा अभिरक्षक हा राजस्थानच्या पुराणवस्तु व संग्रहालयविभागाच्या संचालकाच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** अभिरक्षक–श्री. पी एल् सोलंकी, बी. ए , एक कारकून, एक ग्रंथपाल–भांडाररक्षक, एक प्रदर्शनविभाग परिचारक व दोन शिपाई

**आर्थिक तरतूद :** संग्रहालय व सरस्वती भांडार यासाठीं अंदाजपत्रकात रु ६,२७१ इतकी वार्षिक तरतूद आहे

**अभिप्राय :** संग्रहालय पाहण्यास येणाऱ्यांची रोजची सरासरी संख्या सुमारें ९० व वार्षिक संख्या ३०,००० इतकी आहे संग्रहालय राजवाड्यात असल्यामुळें त्यावर दिवसा व रात्रीं कायम सशस्त्र पोलिसांचा पहारा असतो संग्रहातील वस्तु मुख्यत्वेंकरून कोटा जिल्ह्यात उत्खनन करून मिळविण्यात आलेल्या आहेत

**संगरिया :** लोकसंख्या ३,८७९

## सर छोटूराम संग्रहालय

**स्थापना :** इ स १९३७

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय स्वामी केशवानंदजी, एम् पी यांनीं निर्माण केलें त्यांनीं तिबेट, चीन, ब्रह्मदेश व सिलोन येथून बऱ्याच वस्तु संग्रहित केल्या व त्या सरस्वती मंदिरांत ठेवल्या हें संग्रहालय ग्रामोत्थान विद्यापीठ या नांवाच्या शिक्षणसंस्थेच्या नियंत्रणाखालीं आहे

**व्याप्ति व संग्रह :** राजघाट येथील शिल्पकलाकृति व मातीच्या वस्तु, तिबेटी ध्वज, राजस्थानी पद्धतीचीं रंगचित्रें, राजस्थान येथील उठावदार नक्षीकाम असलेल्या धातूच्या ताबदानाच्या चौकटी, सिलोन व नेपाळ येथील धातूच्या मूर्ति, चीनमधील लाकडाच्या व चिनीमातीच्या वस्तु, बयाणा निधीतील नाणीं धरून इतर नाण्यांचा संग्रह, व शस्त्रांचा संग्रह

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या विद्यार्थ्यांना व अभ्यासकांना अभ्यासासाठीं आवश्यक त्या सवलती देण्यात येतात वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठ्या हिंदी भाषेंत आहेत संग्रहालयास जोडून एक लहान ग्रंथालय असून त्यांत पुराणवस्तुशास्त्र व कला या विषयांवरील पुस्तकें आहेत तीं फक्त खात्याच्या उपयोगासाठीं आहेत

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** सोमवार व राजपत्रात जाहीर केलेले सुटीचे दिवस खेरीजकरून सर्व दिवशीं उघडें असतें

**नियामक मंडळ :** विद्यापीठाचें नियामक मंडळ

**सेवकवर्ग :** श्री जे सी. चतुर्वेदी व दोन शिपाई

**आर्थिक तरतूद :** विद्यापीठ या संग्रहालयासाठीं दरवर्षी रु ६,००० इतक्या रकमेची तरतूद करतें

**अभिप्राय :** संग्रहालयाची जागा उत्तम असून तें पाहण्यास रोज सुमारें ८० लोक येतात विशेषप्रसंगीं प्रेक्षकांची अतिशय गर्दी होते

**सिकार :** लोकसंख्या ४४,१४०

## सिकार संग्रहालय

**स्थापना :** इ स १९४५

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय पुराणवस्तूंचें असून तें १९४५ सालीं कर्नल वेब यांनीं स्थापन केलें संग्रहात मुख्यत्वेंकरून हर्ष पर्वतावरील देवालयाच्या अवशेषातील शिल्पकलाकृति आणि रावराजा सिकार यांनी संग्रहित केलेल्या वस्तु आहेत हें संग्रहालय खाजगी मालकीचें आहे

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयातील वस्तूंत शेखावती येथील पुरातन वस्तु, कलाकौशल्याच्या वस्तु व पुरातन शस्त्रें आहेत.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयांत एक लहान ग्रंथालय असून लोक त्याचा उपयोग करतात विद्यार्थ्यांसाठीं व प्रेक्षकांसाठीं, संग्रहालयाचा अभ्यास करण्याकरितां आवश्यक त्या सवलती देण्यात येतात संग्रहालयातील वस्तूंविषयीं माहिती देण्याची खास सोय करण्यात आलेली नाहीं वस्तूंवरील नावांच्या चिठ्ठ्या फक्त इंग्रजींत आहेत

**प्रकाशनें :** पुरातन शिल्पकलाकृती ज्या हर्ष पर्वतावरून आणलेल्या आहेत त्या पर्वताची संक्षिप्त माहिती देणारी एक लहान पुस्तिका

**कामाचे तास :** उन्हाळ्यात सकाळीं ७ ते ११ व दुपारीं ४ ते सध्याकाळीं ७, हिंवाळ्यात सकाळीं ८ ते ११ व दुपारीं ४ ते सध्याकाळीं ६ पर्यंत हें संग्रहालय खुलें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय सार्वजनिक बांधकामविभाग, ठिकाणा सिकार, यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** सार्वजनिक बांधकामविभागाचे सिकार येथील इंजिनियर हे अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष आहेत शिवाय ४ पहारेकरी व एक फराश आहे

**आर्थिक तरतूद :** दरवर्षी रु २,६३४

**अभिप्राय :** संग्रहालय सोयीस्कर ठिकाणीं आहे प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या ५० व वर्षातील संख्या २०,००० इतकी आहे संग्रहालयाची इमारत सध्या पुरेशी आहे परंतु राखीव वस्तु साठवून ठेवण्यासाठीं जागा नाहीं संग्रहालयातील वस्तु संशोधनाच्या, देणगीच्या व हर्ष पर्वतावर केलेल्या उत्खननाच्या द्वारें मिळविल्या आहेत

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयात मुख्यत पुराणवस्तु तसेंच, कला आणि हस्तव्यवसाय यांचे नमुने आहेत शिल्पकलाविभागात भारहूत कठड्याचे अनेक तुकडे, भुमरा येथील शिवमंदिराचे कांहीं भग्नावशेष, खोह येथील एक सुंदर एकमुख लिंग, खजुराहो, कौशांबी, मथुरा आणि अलाहाबाद जिल्ह्यांतील इतर ठिकाणाहून गोळा केलेल्या अनेक शैलींच्या कांहीं सुंदर वस्तु, तसेंच गांधार शिल्पकृती आहेत या संग्रहालयातील सुमारें ५,००० मातीच्या वस्तूंचा–विशेषत कौशांबी येथील मातीच्या वस्तूंचा–संग्रह अत्यंत महत्त्वाचा आहे येथें मण्यांचाहि बराच मोठा संग्रह केलेला असून त्यांपैकीं कित्येक मणी प्राणी आणि पक्षी यांच्या आकाराचे आहेत संग्रहालयात पुरातन शिल्पकाराच्या कलेचेंहि कांहीं उत्कृष्ट नमुने आहेत नाण्यांच्या दालनात कौशांबी येथील राजाच्या काळातील कित्येक नमुनेदार नाणीं आहेत

रंगचित्रांच्या संग्रहांत इंडो-पर्शियन, मोंगल आणि राजस्थानी शैलींतील अप्रतिम रंगचित्रें आहेत मोंगल शैलीच्या चित्रांमध्ये जहांगीर आणि अकबर यांच्या काळातील कांहीं निवडक चित्रें असून राजस्थानी चित्रांच्या विभागात सर्व स्थानिक पद्धतींचें दर्शन घडतें गुलेर आणि बसोहली येथील चित्रांसारखीं पहाडी शैलींतील अनेक सुंदर चित्रेंहि या संग्रहांत आहेत नवचित्रकला विभागांत ए एन्, टागोर, जी एन् टागोर, नंदलाल घोस, ए के • हल्दर इत्यादींच्या कलाकृती आहेत. सुप्रसिद्ध रशियन चित्रकार निकोलस रोरिच यांचे नाव दिलेल्या एका विभागांत रोरिच यांचीं २५ रंगचित्रें आहेत मोंगलांच्या तसेंच हस्तिदंती इतर स्फुटोळ वस्तुहि यात आहेत संग्रहालयाच्या ग्रंथालयांत संस्कृत, हिंदी, पर्शियन आणि अरेबिक भाषांतील हस्तलिखित आहेत एका स्वतंत्र खोलींत गांधीजींची पवित्र रक्षा, त्यांनी लिहिलेलीं पत्रें आणि त्यांचे जीवन व कार्य यांवरील वाङ्मय ठेवलेलें आहे

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयात २,३२० पुस्तकें आणि ६ नियतकालिकें असलेलें एक ग्रंथालय असून त्यातली मंडळींनाहि त्याचा उपयोग करता येतो गटागटांनीं येणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रदर्शनविभागातील वस्तूंची माहिती दिली जाते मधूनमधून खास प्रदर्शनेंहि भरविलीं जातात वस्तूंवरील नांवांच्या चिठ्ठ्या हिंदी आणि इंग्रजी या दोन भाषांत लिहिलेल्या असून त्या अर्थबोधक आहेत विद्यापीठ आणि इतर शैक्षणिक संस्था संग्रहालयाच्या कार्यात पारकाईने लक्ष घालतात

**प्रकाशनें :** ( १ ) अलाहाबाद संग्रहालयातील शिल्पकृति • लेखक–एस् सी काला, ( २ ) कौशांबी येथील मातीच्या लहान मूर्ति लेखक–एस् सी काला, ( ३ ) भारहूत वेदिका लेखक एस् सी काला, आणि ( ४ ) अलाहाबाद संग्रहालयाची ( हिंदी व इंग्रजी ) मार्गदर्शिका लेखक–एस् सी काला

**कामाचे तास :** ता. १ एप्रिल ते १४ ऑगस्ट–सकाळीं ७ ते १०-३० आणि दुपारीं ४ ते संध्याकाळीं ६-३० ता १५ ऑगस्ट ते ३१ मार्च सकाळीं ११ ते दुपारीं ५ पर्यंत हें संग्रहालय दर दिवशीं उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय नगरपालिकेच्या अखत्यारीच्या नियंत्रणाखालीं असून त्याचा कारभार एक्जिक्युटिव समिति पाहते

**सेवकवर्ग •** संग्रहालयाध्यक्ष–डॉ एस् सी काला, एम् ए, डी फिल , सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष–श्री आर् आर् त्रिपाठी, एम ए., दोन कारकून, एक संस्कृत पंडित, चार चौकीदार, सहा शिपाई, तीन माळी आणि दोन झाडूवाले

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं सरकारी अनुदान आणि नगरपालिका मंडळाकडून मिळणार अंशदान मिळून ३७,४१० इतक्या रकमेची तरतूद आहे.

**अभिप्राय :** हें संग्रहालय शहरातील योग्य जागीं असून जाण्यायेण्यास अत्यंत सोयीचे आहे दररोज सरासरी २०० आणि वर्षांतून ७५,००० प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात माघ मेळ्यासारख्या विशेष प्रसंगीं आणि सणावाराच्या दिवशीं प्रेक्षकांची विशेष गर्दी होते संग्रहालयाच्या नव्या इमारतींत वस्तु साठवून ठेवण्यासाठीं भरपूर जागा असून प्रयोगशाळेचीहि सोय आहे तीन चौकीदार आळीपाळीनें संग्रहालयावर पहारा करतात व मौल्यवान वस्तु लोखंडी तिजोरींत ठेवण्यात येतात संग्रहालयातील वस्तु खरेदी, गुप्तनिधि आणि देणग्या इत्यादि विविध मार्गांनीं मिळविल्या आहेत सामान्यत इतर संग्रहालयांना आपलीं प्रकाशनें पाठवून त्यांच्या बदल्यात इतर प्रकाशनें मिळविण्यात येतात, मात्र वस्तूंची अदलाबदल करण्यात येत नाहीं हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचा सदस्य आहे

## अलाहाबाद विद्यापीठ, कौशांबी संग्रहालय

" शैक्षणिक आणि वैज्ञानिक संग्रहालयें " याखालीं पहा

कालपी : लोकसंख्या १४,०४२

## महात्मा गांधी हिंदी संग्रहालय, हिंदी भवन, कालपी

स्थापना : इ स १९५०

**पूर्वेतिहास :** हिंदी भवनच्या अध्यक्षांनीं ४००० रुपये किंमतीचा स्वत जवळचा संग्रह संस्थेस देणगीदाखल दिल्यानंतर सन १९५० मध्यें या संग्रहालयाची स्थापना करण्यात आली त्यानंतर उत्तर प्रदेश सरकारनेंहि संग्रहालयास थोडेंसें साहाय्य दिलें संग्रहालयात ठेवण्यासाठीं वस्तु खरेदी करण्यात आल्या

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय मुख्यत्वेंकरून पुराणवस्तुविषयक असून त्यांत इ स च्या आरंभापासून इ स च्या १७ व्या शतकापर्यंतच्या काळातील पुरातन वस्तूंचा संग्रह आहे त्यांत शिल्पकृति, रंगचित्रें, मातीच्या वस्तु, धातूच्या मूर्ति, शिलालेख, नाणीं आणि हस्तलिखितें व तसेंच नाणीं पाडणारा एक जुना सांचा आहे

**शैक्षणिक कार्य :** हिंदी भवन ग्रंथालयात ५००० पुस्तकें व नियतकालिकें आहेत इतर विशेष सोयी मात्र अजून केलेल्या नाहींत अजून नांवांच्या चिठ्ठ्याहि पुरेशा नसून यापुढें संग्रहालयातील वस्तूंना केवळ हिंदींतूनच नांवांच्या चिठ्ठ्या लावण्याचा विचार आहे गावातील माध्यमिक शाळा आणि इंटरमीजिएट कॉलेजमधील विद्यार्थी संग्रहालय पाहण्याच्या बाबतींत विशेष उत्सुकता दाखवितात

**प्रकाशनें •** कांहीं नाहींत

**कामाचे तास •** सर्व दिवशीं सकाळीं ७ ते ११ आणि दुपारीं ४ ते रात्रीं ९ पर्यंत संग्रहालय उघडें असतें

**प्रवेश •** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार हिंदी भवन, काशी या संस्थेतर्फे चालविला जातो.

**सेवकवर्ग :** अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष—श्री मोतीचंद शर्मा, आणि एक अंशकालिक कारकून.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठी अंदाजपत्रकांतील वार्षिक तरतूद ११,००० रुपये इतकी आहे.

**अभिप्राय :** संग्रहालय पाहण्यासाठी येणाऱ्या प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या ५० इतकी असते. संग्रहालयाच्या मालकीची सुंदर इमारत असून पुरेसा निधि जमनांच या इमारतीत वाढ केली जाईल. सध्याचा संग्रह ठेवण्यासाठी मात्र पुरेशी जागा नाही. तसेंच प्रयोगशाळेची सोय नाही. पुराणवस्तूंच्या वस्तु स्वीकारण्यास संग्रहालयाला अद्याप मान्यता मिळालेली नाही.

हरद्वार, लोकसंख्या ५७,३१८

## गुरुकुल संग्रहालय, गुरुकुल कांगडी

**स्थापना :** इ. स. १९०७–०८

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय स्थापन करण्याची कल्पना कै. स्वामी श्रद्धानन्दजी यांना सुचली. विद्यार्थी आणि जनतेला सहाय्य करण्याच्या आणि वेगवेगळ्या विषयांबद्दलचें त्यांचें कुतूहल वाढविण्याच्या उद्देशानें इ. स. १९०७–०८ मध्यें संग्रहालय स्थापन करण्यांत आलें. स्वामीजींचे परदेशांतील दौरे आणि त्यांचे भारतीय तसेंच परदेशीय मित्र यांचेकडून मिळालेल्या देणग्या या द्वारें संग्रहालयांतील वस्तूंत विपुल भर पडली. संग्रहालयांतील प्रारंभीच्या संग्रहांत पहिल्या महायुद्धाच्या वेळीं जर्मनीच्या एमडेन नांवाच्या युद्धनौकेनें मद्रास किनाऱ्यावर डागलेल्या तोफांमुळें उडालेले कांहीं तुकडे, तसेंच एफ्. टी. ब्रूक्स आणि सी. जी. ॲण्ड्र्यूज यांनीं भेट दिलेले काही जलचर-प्राणी व सन १९११ मध्यें प्रा. महेशशरण सिंह यांच्या मार्गदर्शनाखालीं विद्यार्थ्यांनीं तयार केलेला टेलिफोन इत्यादि वस्तु आहेत. सन १९२४ मध्यें आलेल्या गंगेच्या महापुरामुळें या वस्तूंचें अतोनात नुकसान झालें. त्यानंतर हा संग्रहालयांत गुरुकुल विद्यापीठाच्या आयुर्वेदिक मेडिकल कॉलेज नेण्यांत आलें. या कॉलेजांत आयुर्वेदिक आणि वैद्यकशास्त्रविषयक वस्तूंचा संग्रह होता. पुढें यांतच जीवशास्त्रविषयक वस्तूंची भर पडली. इ. स. १९४५ मध्यें संग्रहालयाची पुनर्रचना करण्यांत येऊन वेद मंदिराच्या भव्य दालनांत पुराणवस्तुविषयक विभाग उघडण्यांत आला. गुरुकुल विद्यापीठाचें उपकुलगुरु पंडित इंद्र विद्यावाचस्पति यांच्या मार्गदर्शनामुळें आणि डॉ. शिवनाथ राय आणि संग्रहालयाध्यक्ष हरि दत्त, एम्. ए., यांच्या परिश्रमामुळें संग्रहालयाच्या कार्यास चालना मिळाली.

**व्याप्ति आणि संग्रह :** संग्रहालयांत पुराणवस्तुविज्ञान आणि हस्तकला असे तीन विभाग आहेत.

पुराणवस्तुशास्त्रविभाग : ह्या विभागात, संग्रहालयानें इकडच्या प्रदेशात शोधून काढलेल्या आणि उत्खनन केलेल्या शिल्पकृति आहेत. महत्त्वाच्या प्रदर्शन-वस्तूंत चतुर्मुख शिव, समुद्रमंथनाच्या प्रसंगावरील चित्रमाला, बुद्धाची कोरीव मूर्ति, आणि कुशाणकालापासून मध्ययुगाच्या अखेरपर्यंतच्या कालावधींतील वेगवेगळे नमुने आहेत. मोहेंजोदारो येथील पुरातन वस्तु आणि विभिन्न कालांतील मातीच्या वस्तूंचा एक प्रातिनिधिक संग्रह पण येथें आहे.

येथें इंडो-ग्रीक जमातींच्या, कुशाण, गुप्त, मध्ययुगीन आणि मोगलकालीन विविध नाण्यांचा, तसेंच भारतांतील संस्थानांतील नाण्यांचा आणि विदेशी नाण्यांचा फारच मोठा संग्रह आहे. या विभागांत कांगरा शैलीचीं रंगीत चित्रें, तसेंच १९ व्या शतकाच्या सुरुवातीचीं कनखल येथील भित्तिचित्रें संग्रहित केलीं आहेत.

या विभागांत कांहीं शिलालेख शिलालेखांच्या अनेक ठशांचा उदाहरणार्थ, अशोकाचा कालसी शिलालेख आणि समुद्रगुप्ताचा अलाहाबाद येथील स्तंभावरील शिलालेख तसेंच भारतीय लिपींच्या भिन्नभिन्न स्वरूपांचा त्यांच्या उगमापासून तो आधुनिक काळापर्यंतचा कालक्रमानुसार विकास दर्शविणारे १०० हून जास्त तक्ते मांडले आहेत.

येथें या प्रदेशांतील हस्तलिखितांचा संग्रह असून त्यांत ताडपत्रावर लिहिलेलीं आणि सचित्र हस्तलिखितें आहेत. उदाहरणार्थ, काश्मिरी कागदावरील भागवत पुराण.

एका भागांत डोंगराळ प्रदेशांतील, विशेषतः जौनसार-भावर आणि गढवाल या प्रदेशांतील लोकांच्या जीवनाचें दर्शन घडविणाऱ्या वस्तु आहेत.

विज्ञानविभागांत जीवशास्त्र, भूगर्भशास्त्र, कीटकशास्त्र, अश्मीभूत प्राणीविज्ञान, शरीररचनाशास्त्र, शरीरविज्ञान, औषधीशास्त्र आणि औषधिनिर्माणशास्त्र या विषयांवरील संबद्ध वस्तु, तक्ते आणि नमुने आहेत. सर्पविज्ञान विभागांत १८ फूट लांबीच्या अजगरापासून ७ इंच लांबीच्या अंधसर्पापर्यंत 'भारतीय सापांच्या बहुतेक सर्व जातींचा संग्रह केला आहे. उद्योगधंदे आणि कला व हस्तव्यवसायविभागांत स्थानिक उद्योगधंदे आणि हस्तव्यवसाय यासंबंधींचा एक संग्रह असून त्यांत काश्मिरी व मद्री उद्योगधंद्यांतील नमुनेदेखील आहेत. संग्रहालयांत एक शैक्षणिक विभाग असून त्यांत उपयुक्त तक्ते, चित्रें आणि मुद्दाम तयार करवून घेतलेले नकाशे वगैरेंच्या सहाय्यानें नागरिक हक्क आणि कर्तव्यें यांचें, तसेंच आर्थिक, राजकीय आणि सामाजिक बाबतींत दिग्दर्शन केलें जातें.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालय गुरुकुल विद्यापीठाच्या वाचनालयाचा वापर करीत असलें तरी त्याचें स्वतःचें संग्रहालयशास्त्र व भारतीय तत्त्वदर्शन या विषयांना वाहिलेलें वाचनालय आहे. संग्रहालयाध्यक्ष आसपासच्या शाळा व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांना संग्रहालयांत आमंत्रित करतात व त्यांना सर्व प्रदर्शन-वस्तूंची माहिती देतात. अधूनमधून विशेष प्रदर्शनेंहि भरविलीं जातात. या संग्रहालयाच्या प्रकाशनांची इतर संग्रहालयांच्या प्रकाशनांबरोबर देवाण-घेवाण केली जाते. प्रदर्शनविभागांत ठेवलेल्या प्रदर्शन-वस्तूंना हिंदी भाषेंतील अर्थवाही नांवांच्या चिठ्या लावलेल्या असून दोन विभागांत खास तांत्रिक शब्दांकरितां नांवाच्या चिठ्या इंग्रजी भाषेंतून लिहिलेल्या आहेत. प्रदर्शन-वस्तूंची माहिती देण्याकरितां नकाशे, तक्ते, चित्रें आणि डेलिनिओस्कोप याच्या सहाय्यानें पुरविली जाते. गुरुकुल विद्यापीठाचे तसेंच हरद्वारच्या इतर शैक्षणिक संस्थांचे विद्यार्थी संग्रहालयाचा चांगला उपयोग करून घेतात. उन्हाळ्यांत आणि पूजा सणानिमित्त मिळणाऱ्या सुटींत वेगवेगळ्या विद्यापीठांच्या आणि महाविद्यालयांच्या विद्यार्थ्यांचे मोठमोठे गट संग्रहालयाला भेट देतात.

**प्रकाशनें :** (क) वार्षिक अहवाल, (ख) समुद्रमंथनाचें रंगीत चित्र, लेखक डॉ व्ही एस् आगरवाला आणि (ग) भारतीय पुराणवस्तुशास्त्राच्या काहीं प्रारंभिक समस्या, लेखक डॉ वाय् डी शर्मा

**कामाचे तास .** संग्रहालय दररोज उघडें असतें हिंवाळ्यात सकाळीं ८ ते १२ व दुपारीं १ ते ५ आणि उन्हाळ्यांत सकाळीं ७ ते१२ आणि दुपारीं ४ ते ७ पर्यंत

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मंडळ :** गुरुकुल विद्यापीठ, कांगडी, हें संग्रहालयाचा कारभार एका संग्रहालय समितितर्फे पाहते

**सेवकवर्ग** अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष श्री हरि दत्त वेदालंकार, एम् ए (पुराणवस्तुशास्त्रविभाग) आणि श्री सी एस् गुप्ता, एम एससी, एलएल बी (जीवनशास्त्रविभाग), एक संग्रहालय सहाय्यक, एक प्रदर्शनविभाग सहाय्यक, एक कारकून आणि ७ शिपाई

**आर्थिक तरतूद .** संग्रहालयाचें वार्षिक अंदाजपत्रक रु १०,००० चें आहे

**अभिप्राय** हें संग्रहालय शहरात सोयीस्कर अशा भागात वसलेलें आहे हरिद्वार शहर हें भारतातील एक अत्यंत पवित्र स्थान असल्यामुळें तेथें सणाच्या दिवशीं आणि कुंभमेळ्याना हजारों यात्रेकरू येतात दररोज सरासरी २७६ व वर्षाला सुमारें १,००,००० प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात हिंवाळ्याच्या मानाने उन्हाळ्यात प्रेक्षकांची आवक जास्त असते कुंभमेळ्यात व इतर सणाच्या दिवशीं सर्वांत अधिक लोक संग्रहालय पहावयास येतात संग्रहालयाच्या इमारतींत उजेड आणि हवा भरपूर असल्यामुळें वस्तूंच्या प्रदर्शनाच्या दृष्टीनें इमारत फार सोयीची आहे परंतु नव्या नव्या वस्तूंची सारखी भर पडत असल्यामुळें इमारत आता अपुरी वाटूं लागली आहे राखीव संग्रहासाठीं असलेली जागा अपुरी आहे वनस्पतिशास्त्र आणि प्राणीशास्त्र या विषयांवरील नमुन्याकरितां प्रयोगशाळेची सोय केलेली आहे संग्रहालयातील प्रदर्शन वस्तूंचीं छायाचित्रें विकण्याची व्यवस्था करण्यात आली आहे इतर संग्रहालयांकडून प्रदर्शन वस्तूंची उसनवारीने देवाणघेवाण करण्याची व्यवस्था केली आहे संशोधन, उत्खनन, देवाणघेवाण, देणग्या आणि थोड्याफार प्रमाणात खरेदी या सर्व मार्गांनी संग्रह करण्यात आला आहे गुप्तधन ठेवण्याकरितां संग्रहालयाला मान्यता नसली तरी त्यासाठीं खटपट सुरू आहे संग्रहालयाच्या प्रकाशनाची इतर संग्रहालयाच्या प्रकाशनाबरोबर सहर्ष देवाणघेवाण करण्यात येते काहीं खास बाबतींत नकाशे, तक्ते, चित्रें वगैरेचें सहाय्य घेण्यात येतें हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे तुटपुंज्या साधनांच्या सहाय्यानें संग्रहालयानें कनिंगहॅम आणि विवार हेंडी यांनीं दर्शविलेल्या ब्रह्मपुरी या ठिकाणाचें संशोधन केलें परंतु अजून बरेचसें कार्य शिल्लक आहे सिंधु नदीच्या खोऱ्यातील संस्कृतीचें एक आभासचित्र तयार करण्यात येत आहे चालू वित्तवर्षांत भारतातील सर्व प्रमुख वंशप्रकाराचे मानववंशशास्त्रविषयक नमुने संग्रहालयाला मिळतील संग्रहालयानें कनखलचीं रंगीत भित्तिचित्रें सुरक्षित ठेवण्यासाठीं त्यांचीं मोठालीं छायाचित्रें बनविलीं आहेत छायाचित्रात रंग भरण्यात येणार असून तीं अधिक काळपर्यंत टिकावीत म्हणून त्याची मायक्रोफिल्म तयार करण्यांत येणार आहे

संग्रहालयांत भारतातील आणि भारताबाहेरील भारतीय वास्तुशास्त्र आणि शिल्पशास्त्र यांच्या मुख्य प्रकाराचे नमुने आहेत नुकतेच सृष्टिविज्ञान विभागात हत्ती आणि इतर जनावरांचे सांगाडे ठेवण्यात आले असून आर्थिक तरतूद झाल्यास लवकरच हिमालयातील प्राण्यांचा एक प्रातिनिधिक संग्रह करण्याचा संग्रहालयाचा विचार आहे त्याचप्रमाणें हिमालयातील वनस्पतींचाहि एक संग्रह केला जाण्याची शक्यता आहे सृष्टिविज्ञानविभागाच्या जोडीला एक खास वनस्पतिशास्त्रविषयक बाग आहे

**लवनौ :** ४,९६,८६१

## सरकारी संग्रहालय

**स्थापना .** १८६३

**इतिहास .** पूर्वी प्रांतिक संग्रहालय म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या संग्रहालयाची स्थापना १८६३ च्या सुमारास नगरपालिकेची एक संस्था म्हणून झाली सुरवातीला येथें पुराणवस्तुशास्त्र आणि सृष्टिविज्ञान या विषयांवरील नमुने होते प्रांताच्या विभिन्न भागांनी हळूहळू संग्रहालय समृद्ध केलें आणि सन १८८३ मध्यें तें प्रांतिक संग्रहालय म्हणून समजलें जाऊं लागलें नंतर संग्रहालयाची व्यवस्था व नियंत्रण राज्य सरकारनें आपल्या हातात घेतलें इ स १९११ मध्यें संग्रहालयाची पुनर्रचना करण्यात येऊन संग्रहाचें पुराणवस्तुशास्त्र, सृष्टिविज्ञान, रंगचित्रें आणि मानववंशशास्त्र असे चार प्रमुख विभाग करण्यांत आले ह्या विभागांचा व्याप हळूहळू बराच वाढला आहे

**विस्तार आणि संग्रह** संग्रहालयात पुराणवस्तुशास्त्र, नाणकशास्त्र, रंगचित्रें, मानवशास्त्र, सृष्टिविज्ञान आणि तत्सम विषय असे विभाग आहेत एकमेकापासून सुमारें दोन फर्लांग दूर असलेल्या दोन इमारतींत संग्रहालय स्थापन केलें आहे कैसर बाग येथील एका भव्य इमारतींत पुराणवस्तुशास्त्रविषयक प्रदर्शन वस्तु मांडल्या आहेत प्राचीन आणि मध्ययुगीन अशा दोन्ही काळांतील ब्राह्मणी शिल्पकृति बौद्ध आणि जैन शिल्पकृतींच्या आजुबाजूस मांडल्या आहेत ह्या शिल्पकृतींमधील दांचवलाय प्रवेश मार्गांत मध्ययुगीन जैन शिल्पकृति मांडून ठेवल्या आहेत ब्राह्मणी शिल्पकृतींमध्यें शंकरासनाचें एक प्राचीन दर्शन, अनेक कमलपुष्पामधील लक्ष्मी, भीम-जरासंध युद्ध, विष्णूचीं कित्येक रूपें वगैरेंसारख्या अनेक अप्रतीम शिल्पकृति आहेत बौद्धधर्मीय विभागात बुद्धाच्या प्रचंड मूर्ति आणि दोन्ही बाजूला सुंदर कोरीव काम केलेल्या कुशाणकालीन अशा कित्येक शिल्पकृति आहेत जैनधर्मीय संग्रहात काहीं अत्यंत चित्तवेधक मूर्ति तसेंच काहीं मनोरंजक 'अयागपट' आहेत वरच्या मजल्यावरील प्रदर्शनविभागात एका बाजूला मातीच्या आकर्षक वस्तूंचा संग्रह ठेवला असून दुसऱ्या बाजूला पुरालेखविद्याविषयक वस्तूंचा संग्रह आहे

इतर वस्तु लाल बारादरी येथील अनेक प्रदर्शनविभागांतून प्रदर्शित केल्या आहेत येथें सस्तनप्राणी, पक्षी, पुष्पाखरें, पतंग आणि सरपटणारे प्राणी यांसारख्या सृष्टिविज्ञानविषयक वस्तु असून, रानटी जमातींचे नमुने, त्यांची कला, हस्तकौशल्य आणि उद्योगधंदे यांसारख्या मानववंशशास्त्रविषयक वस्तु, पूजेच्या वस्तु यज्ञकर्म करावयाच्या वेळीं वापरल्या जाणाऱ्या वस्तु, वाद्यें वगैरेसारख्या अनेक वस्तु संग्रहित केल्या आहेत

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री व्ही एन् श्रीवास्तव, एम ए, सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष–श्री एम्. एन्. मिश्र, एम ए, मार्गदर्शक-व्याख्याता, कलाकार, मूर्तिकार, उपसंग्रहालयाध्यक्ष, ग्रंथपाल, चिन्हांकनकर्ता, जमादार, पाच शिपाई, फराश, दोन माळी, भिस्ती, स्थळ मजूर, रात्रीचा पहारेकरी व झाडूवाला

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अंदाजपत्रकात संग्रहालयासाठीं रु ७५,५४६ इतक्या रकमेची तरतूद केलेली आहे

**अभिप्राय :** वस्तुसंग्रहालय शहरात सोयीस्कर अशा जागीं असून तेथें सहज जाता येते साधारणत रोज ४० ते ५० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात श्रावण, भाद्रपद व कार्तिक या महिन्यात (जुलै ते ऑक्टोबर) प्रेक्षकाची संख्या मोठी असते व नोव्हेंबर ते एप्रिल या काळात परदेशी प्रेक्षकांची संख्येंत वाढ होते संग्रहालयाची इमारत अगदीं योग्य अशी आहे परंतु संग्रहालयातील वस्तूंत वाढ होत असल्यानं ती जागा पुरत नाहीं व तींत वाढ करावी लागेल वस्तु साठवून ठेवण्यासाठीं असलेली जागा सुद्धा अपुरीच आहे दिवसा शिपाई व जमादार व रात्रीच्या वेळीं चौकीदार संग्रहालयावर पहारा ठेवतात नाणीं व इतर मौल्यवान वस्तु मजबूत कोठीमध्यें कडीकुलपात सुरक्षित ठेवलेल्या आहेत प्रयोगशालाविषयक सोयी पुरेशा नाहींत संशोधन, खरेदी, गुप्तनिधि, उत्खनन व देणग्या या द्वारें संग्रहालयासाठीं वस्तु मिळविल्या जातात गुप्तनिधींतील वस्तु स्वीकारण्यासाठीं संग्रहालयास मान्यता आहे पुरातन वस्तूंच्या सम कृतींची अदलाबदल क्वचित प्रसंगीं करण्यात येते, परंतु प्रकाशनाची अदला बदल मात्र वरचेवर होत असते हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे

**सारनाथ :** लोकसंख्या ५००

## सारनाथ संग्रहालय

**स्थापना :** सन १९०४

**पूर्वेतिहास :** ज्या पुरातन वस्तूंचे 'स्थलांतर' करता येणार नाहीं अशा नेता येण्याजोग्या पुरातन वस्तु उत्खननाच्या ठिकाणींच ठेवण्याचें भारत सरकारचें धोरण असल्यामुळे त्या धोरणानुसार हें संग्रहालय सन १९०४ मध्यें सुरू करण्यात आलें संग्रहालयाची इमारत १९०८ सालीं तयार झाली परंतु ही इमारत मूळ आखणीच्या अर्धीच आहे मूळ आखणी बुद्ध मठाच्या धर्तीवर असून तींत एक लांबलचक बाजू व दोन पुढे आलेल्या बाजू यांचा अंतर्भाव होतो

**व्याप्ति व संग्रह :** येथील संग्रहात ख्रिस्तपूर्व तिसऱ्या शतकापासून इ सनाच्या १२ व्या शतकापर्यंतच्या काळांतील सुमारें १,७०० पुरातन वस्तु आहेत त्यात मूर्ति, उठावचित्रें वास्तुकामाचे नमुने, शिलालेख, दगडाच्या व धातूच्या वस्तु, राजमुद्रा, मणी, खेळणीं, मातीच्या शोभेच्या वस्तु व मातीचीं भांडीं या वस्तु आहेत

या वस्तु तीन दालनात मांडलेल्या आहेत मध्यभागीं असलेल्या दालनात मौर्य, शुंग, आंध्र, कुशाण व सुरवातीच्या गुप्त काळांतील पुरातन वस्तु असून त्यात सुप्रसिद्ध सिंहमुद्रांकित अशोकस्तंभ, मौर्यकालीन मुखवटे, मथुरा शैलीची बोधिसत्वाची छिल्लछत्रयुक्त अखंड मूर्ति, शुंग काळातील कठडे, गुप्ताच्या कोरलेल्या मूर्ति व मौर्यकालीन मातीचीं भांडीं व मातीच्या शोभेच्या वस्तु इत्यादींचा समावेश होतो सुप्रसिद्ध सिंहस्तंभावर आरशासारखी चकाकी आहे दुसऱ्या दालनात व दक्षिणेकडील प्रदर्शनविभागात बाकावर स्तंभाचे चबूतरे असून इतर गुप्तकालीन व पूर्वमध्ययुगीन पुरातन वस्तु कपाटांत ठेवलेल्या आहेत यात बुद्धाच्या जीवनातील ठळक प्रसंग चित्रित करणारे काहीं स्तंभ आहेत समोरच्या व्हरांड्यात गुप्तकालीन शोभिवंत शिल्पकृतींचे अत्युत्कृष्ट नमुने असून त्यात क्षांतीवादिन् जातकातील प्रसंग चित्रित केलेली एक मोठी दरवाजाची चौकट आहे तिसऱ्या दालनात मध्ययुगीन व त्यानंतरच्या काळातील वस्तु आहेत त्यात कनोजचा राजा गोविंदचंद्र (इ स १११४–११५४) याची राणी कुमारदेवी हिचा धर्मचक्र जिनविहार बांधण्याच्या संबंधींचा शिलालेख, धर्मराजिक व वाराणसीचें धर्मचक्र यांच्या प्रतिष्ठापनेची माहिती देणारा वसन्तपाल याचा शिलालेख व त्रिपुरीचा राजा कर्णदेव (इ स १०५८) याच्या अष्टसाहस्रिक प्रज्ञापारमिता या हस्तलिखित ग्रंथाच्या नकला सद्धर्मचक्रविहारमध्ये केल्याची माहिती देणारा शिलालेख आहे नवीनच उघडलेल्या प्रदर्शनविभागात मातीच्या अनेक वस्तु व शिल्पकृति आहेत त्यात चतुर्भुज, विष्णु, अर्धनारीश्वर, शिवलिंग, सूर्य, कार्तिकेय, अग्नि, ब्रह्मा, गरुडनारायण इत्यादि शिल्पकृति आहेत गुप्तकाळातील शिल्पकृतींनीं प्रदर्शनविभागाच्या शोभेंत भर टाकलेली आहे

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाच्या ग्रंथालयात थोडींच पुस्तकें असून जिज्ञासू प्रेक्षकांना तें ग्रंथ पहावयास मिळतात संग्रहालयाध्यक्ष शाळातील व महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना व इतर जिज्ञासू प्रेक्षकांना, तेथें मांडलेल्या वस्तु स्वत फिरून दाखवितात व त्याविषयींची माहिती देतात त्याचप्रमाणें ते निवडक विषयावर व्याख्यानें देतात वस्तूंना हिंदी व इंग्रजी या दोन भाषेंत नावाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत प्रदर्शन वस्तूंविषयी विशेष प्रकारची माहिती देताना नकाशे, तक्ते व चित्रें यांचा उपयोग केला जातो बनारस हिंदु विद्यापीठ व इतर विद्यापीठें, महाविद्यालयें व शाळा यांतील विद्यार्थी संग्रहालयातील वस्तूंचा प्रत्यक्ष अभ्यास करण्याकरितां संग्रहालयास वारंवार भेट देत असतात

**प्रकाशनें :** भारतातील पुरातत्त्वशास्त्र महासंचालकाच्या वार्षिक अहवालातील सारनाथ येथील उत्खननासंबंधींचे अहवाल, (२) सारनाथ मार्गदर्शिका, (इंग्रजीत), लेखक बी मुजुमदार, आणि (३) सारनाथचा संक्षिप्त परिचय, (हिंदींत), लेखक एम् एस नागर

**कामाचे तास :** संग्रहालय सर्व दिवशीं सकाळीं ९ ते संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** प्रौढास २ आणे, मुलांस आणि विद्यार्थ्यांस १ आणा प्रवेश मूल्य आकारलें जातें

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय संग्रहालय शाखेच्या अधीक्षक, पुरातत्त्वशास्त्रविभाग, भारत सरकार यांच्या सर्वसाधारण प्रशासकीय नियंत्रणाखालीं संग्रहालयाध्यक्षाच्या ताब्यांत आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष–श्री जे पी सक्सेना, एम् ए., दोन कारकून, एक स्टोअरकीपर, चिन्हांकनकर्ता, एक शिपाई, दिवसा पहारा करणारे तीन चौकीदार, दोन परिचारक, झाडूवाला, एक माळी, बागेतील मजूर व रात्री पहारा करणारे दोन रक्षक

**आर्थिक तरतूद :** रुपये ३७,४००

**अभिप्राय :** संग्रहालय योग्य ठिकाणीं असून तें ठिकाण येथून सुमारें पाच मैलांवर असलेल्या बनारस शहराशीं रेल्वेनें व रस्त्यानें जोडलेलें आहे दररोज २४० व दरसाल सुमारें ९०,००० प्रेक्षक संग्रहालय पाहाण्यास येतात ऑगस्ट महिन्यात श्रावण मेळाव्याच्या वेळीं व नोव्हेंबर महिन्यात महाबोधी संस्थेच्या उत्सवाच्या वेळीं संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या लोकांची संख्या मोठी असते दिवसा व रात्रीं पहारा करण्यासाठीं तीन पहारेकरी ठेवलेले आहेत नाणीं व मौल्यवान् वस्तु कडीकुलुपात ठेवलेल्या असतात राखीव संग्रह ठेवण्यासाठीं पुरेशी जागा आहे प्रयोगशाळेची सोय नसली तरी सहाय्यक पुराणवस्तुशास्त्र रसायनज्ञ, संग्रहालय शाखा, पुराणवस्तुशास्त्रविभाग, भारत सरकार हे शिल्पकृतींवर रासायनिक संस्कार करण्याचें काम पहातात प्रत्यक्ष उत्खनन व आजूबाजूच्या प्रदेशात संशोधन करून संग्रहालयात ठेवण्यासाठीं गोळा केल्या जातात

**वाराणसी :** लोकसंख्या ६३,५५,७७७

## भारत कला भवन, कला व पुराणवस्तु संग्रहालय, बनारस हिंदु विद्यापीठ

**स्थापना :** इ स १९२०

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय राय कृष्णदास, आजीव सन्मान्य संग्रहालयाध्यक्ष यांच्या खासगी संग्रहालयातून अस्तित्वात आलें आणि भारत कला परिषद या नावानें तारीख १ जानेवारी १९२० रोजीं सार्वजनिक संस्था म्हणून जाहीर करण्यात आलें कवि रवींद्रनाथ टागोर हे या संस्थेचे अध्यक्ष होते नंतर तें भारत कला भवन या विद्यमान नावानें नागरी प्रचारिणी सभेच्या इमारतींत ठेवण्यात आलें सन १९५० मध्यें नागरी प्रचारिणी सभेनें तें बनारस विद्यापिठाकडे दिलें व तें आता तेथेंच आहे

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालय कला व पुराणवस्तुशास्त्रविषयक असून त्यात भारतीय रंगचित्रें, कापड, जडजवाहीर, नाणीं, शिल्पकृति, मातीच्या वस्तु व इतर पुरातन वस्तु, ऐतिहासिक कागदपत्रें, मध्ययुगीन हस्तलिखितें वगैरे गोष्टी आहेत

**शैक्षणिक कार्य :** हें विभागाच्या उपयोगासाठीं व विद्यापिठाच्या भारतीय तत्त्वदर्शन महाविद्यालयाच्या सदस्यांच्या उपयोगासाठीं संग्रहालयाला जोडून एक छोटें ग्रंथालय आहे संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या लोकांना सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष प्रदर्शनवस्तूंसंबंधीं माहिती देतात आणि संग्रहालयातील वस्तूंचा अभ्यास करण्यासाठीं येणाऱ्या शाळा कॉलेजातील विद्यार्थ्यांना सवलती देण्यात येतात व्याख्यान देण्यासाठीं संग्रहालयाध्यक्षाच्या उपयोगासाठीं लँटर्नच्या काचा आहेत हें संग्रहालय ज्या भारतीय तत्त्वदर्शन महाविद्यालयाला जोडलें आहे त्या महाविद्यालयामार्फतहि व्याख्यानें ठरवीं जातात खास प्रदर्शनें वारंवार भरविलीं जातात नावाच्या चिठ्ठ्या हिंदींत आहेत बनारस हिंदु विद्यापिठाच्या विद्यार्थ्यांखेरीज शहरातील इतर संस्थेंतील विद्यार्थीसुद्धा संग्रहालय पहावयास येतात

**प्रकाशनें :** (१) कलानिधि – हिंदी भाषेंतील कलाविषयक त्रैमासिक पत्रिका, (२) मेघदूत – हिंदी भाषेंतील सचित्र पुस्तक (३) मार्गदर्शिका सचित्र आणि हिंदी भाषेंतील

**कामाचे तास** १५ मार्च ते १४ मे सकाळीं ६·३० ते ११·३० वाजेपर्यंत, १५ मे ते १४ मार्चपर्यंत सकाळीं ११ ते संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** भारत कला भवन समिति संग्रहालयाचा कारभार पाहते

**सेवकवर्ग :** अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष – श्री राय कृष्णदास, सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष – श्री विजय कृष्ण 'कलानिधि' या पत्रिकेचे अवैतनिक संपादक, कलाकार, चित्रकार, कार्यालय सहाय्यक, दोन शिपाई, दफ्तरी व तीन बेलदार

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अंदाजपत्रक ५५,२२० रुपयांचें आहे

**अभिप्राय :** संग्रहालय बनारस हिंदु विद्यापिठाच्या आवारात असून तें येण्याजाण्यास सोयीचें आहे संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या लोकांची रोजची सरासरी संख्या ७५ आहे काहीं ठराविक मोसमात परदेशी पाहुण्यांची संख्या बरीच मोठी असते विद्यापिठाच्या खास कार्यक्रमाच्या वेळीं व बनारस येथें खास उत्सव व मेळे भरतात त्या वेळीं संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या लोकांची संख्या वाढते संग्रहालयासाठीं ३,००,००० रुपये खर्चून एक मोठी इमारत बांधली आहे. पैसा मिळत जाईल तसतशी या इमारतींत वाढ करता येण्यासारखी आहे राखीव संग्रह व प्रदर्शनवस्तूंच्या समकृति ठेवण्यासाठीं पुरेशी जागा आहे; परंतु प्रयोगशाळेची सोय नाहीं चौकीदार रात्रीच्या वेळीं संग्रहालयाची राखण करतो आणि नाणीं व इतर मौल्यवान् वस्तु एका बंदिस्त खोलींत तिजोरींत ठेवलेल्या असतात छायाचित्रांची विक्री करण्याची व प्रतिकृति व सांच्यांत तयार केलेल्या वस्तु लोकांना पुरविण्याची व्यवस्था आहे संग्रहाचीं मुख्य साधनें खरेदी, देणगी, अदलाबदल व भारत सरकारकडून वस्तु उसनवार घेणें हीं आहेत. गुप्तनिधींतील वस्तूंसाठीं संग्रहालयाला अद्याप मान्यता दिलेली नसली तरी अशी मान्यता मिळण्यासाठीं प्रयत्न केले जात आहेत या संग्रहालयाचें धोरण, परस्पर संमतीनें इतर संग्रहालयांबरोबर प्रदर्शन वस्तूंची व प्रकाशनांची अदलाबदल करणें हें आहे हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे

## पश्चिम बंगाल

**कलकत्ता** लोकसंख्या २५,४८,६७७

### (१) भारतीय संग्रहालय

**स्थापना :** १८१४

**पूर्वेतिहास :** भारतीय संग्रहालयाची सुरुवात सर विल्यम जोन्स यांनीं १७८४ मध्यें स्थापन केलेल्या एशियाटिक सोसायटीच्या इतिहासाशीं निगडित आहे सुरुवातीस सोसायटीच्या कार्याचा एक भाग म्हणून संग्रहालय स्थापन करण्याची कल्पना नसली तरी त्याच्या स्थापनेपासूनच निरनिराळ्या ठिकाणाहून अनेक वस्तु संग्रहालयाकडे जमा होत होत्या १७९६ मध्यें सोसायटीच्या प्राचीन वस्तु ठेवण्यासाठीं एक योग्य इमारत बांधणें आवश्यक असल्याचें आढळून आलें परंतु, १८०८ च्या प्रारंभापर्यंत पार्क स्ट्रीट येथील सोसायटीची इमारत बांधता आली नाहीं १८१४ मध्यें कलकत्त्यात संग्रहालय स्थापन करण्याच्या कल्पनेला निश्चित स्वरूप प्राप्त झालें याच वेळीं

देण्यात आला व आता येथील सर्व व्यवस्था त्या विभागाकडून पाहिली जाते

येथील शिल्पकृतींचा समग्र अत्यंत संपन्न व विविध प्रकारच्या असून त्यात ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकापासून मध्ययुगीन काळापर्यंतच्या शिल्पकृति आहेत अशोककालीन शिल्पकलेचे दर्शन घडविणारे रामपूर्व येथील वृषभ व सिंह शीर्षभागी असलेले स्तंभ येथें आहेत पैकी वृषभशीर्षस्तंभ दिल्ली येथील राष्ट्रपति भवनांतून उसनवार आणलेला आहे. त्याचप्रमाणे पाटणा येथील कल्पद्रुम स्तंभ श्रीलक्ष्मी आणि यक्षमूर्ति ह्या प्राचीन कलेचा आविष्कार दाखविणाऱ्या महत्त्वाच्या कलाकृति आहेत

भारहूत कोष्टामध्यें भारहूत येथील स्तूपाच्या अवशेषासह एक भव्य प्रवेशद्वार ठेवलेले आहे त्यावरून पूर्वीच्या तोरणाकृति प्रवेशद्वाराचें ठेवलेले चित्र स्पष्टपणें दृष्टीसमोर उभें राहते. बोधगया इथल्या स्तूपाच्या काही शिल्पकृति, ओरिसातील उदयगिरी व खांडगिरी लेण्यांतील प्रतिमांचे प्लॅस्टरचे साचे व पाटणा येथील चंद्रगुप्ताच्या राजवाड्याचे लाकडी कठडे, इ वस्तु या खोलीत मांडल्या आहेत

लाहोर संग्रहालयानंतरच्या उत्कृष्ट म्हणून समजल्या जाणाऱ्या गांधार प्रदर्शनविभागांत बुद्ध व बोधिसत्त्वाच्या अनेक उत्कृष्ट प्रतिमा, बुद्ध व जातक कथांतील प्रसंग चित्रित करणारी दृश्यें त्याचप्रमाणे हरीति, पंचिक, हार्क्युलस यांच्या शिल्पकृति व गाला-ग्राही भाव दर्शविणाऱ्या कलाकृति आहेत त्याचप्रमाणे या गांधार परगण्यांतील उत्कृष्ट प्रकारचे शिल्प्यांचें काम दर्शविणाऱ्या शिर-प्रतिमाहि येथें आहेत

मथुरा येथील कुशाण शिल्पकलेचे यथायोग्य दर्शन घडविणाऱ्या उत्तम कलाकृति येथें ठेवलेल्या असून त्यामध्यें भिक्षुबाला यानी अर्पण केलेली बोधिसत्त्वाची कोरीव प्रतिमा, भूतेसर येथील यक्षाच्या तीन अत्युत्तम मूर्ति, मदिरापानउत्सवाची दृश्यें अशा अनेक कलाकृति आहेत

छोट्याशाच पण आश्चर्य अशा अमरावती समग्रात बोधिसत्वाचे अवतार दर्शविणाऱ्या कठड्याचा एक लहानसा अवशेष आहे त्याचप्रमाणें गुप्तकालीन कला दिग्दर्शित करणाऱ्या सारनाथ व इतर ठिकाणच्या शिल्पकृति आहेत यातील सर्वोत्कृष्ट कलाकृति म्हणजे मथुरा येथील तेजोवलयांकित बुद्धाची एक भव्य प्रतिमा होय या प्रकारच्या प्रतिमांत ही सर्वोत्तम आहे गंगा व यमुना दाखविणारें प्रवेशद्वार आणि गणेश व कार्तिकेय यांची संयुक्त प्रतिमा या कलाकृति उल्लेखनीय आहेत. एक उपवृहत् भूमर येथील गुप्तकालीन उत्कृष्ट शिल्पकाराकृतिचाहि मोठा समग्र आहे

भारतातील मध्ययुगीन कला, उत्तर प्रदेश, बिहार, बंगाल, ओरिसा, मध्य भारत, दख्खन व दक्षिण भारत येथील शिल्पकृतीद्वारें दाखविली असून या सर्व कलाकृति अत्यंत महत्त्वाच्या व आश्चर्यकारक आहेत

त्याचप्रमाणे जावा व कम्बोडिया येथील शिल्पकलेचें दर्शन घडविणाराहि एक विभाग येथे आहे त्यांत तेथील शिल्पकलेच्या वेगवेगळ्या शैलीचे उत्कृष्ट नमुने आहेत त्यांतील विशेष उल्लेखनीय म्हणजे गुप्तकालातील सूर्य, चतुर्भुज व नागामधील गणेश, शिव व बुद्ध यांच्या मूर्ति होत

येथील पुराणवस्तुसंग्रहात संपन्न उत्तर भारतातील व अन्यत्रांतील शिल्प व धातुकलाकृति, तसेच इसवीसनापूर्वीच्या [illegible] अनेक कोरीव लेख, हस्तलिखित व फर्माने आहेत या कोरीव लेखांपैकी एक ११ व्या शतकातील असून तो सयुक्त लिपीत आहे. बाकीचे अनेक बंगालच्या राजाचे आहेत फर्माने व सनदांचा समग्र महत्त्वाचा असून त्यापैकी अनेकांवर राजमुद्रा आहेत

कालानुक्रमाप्रमाणें व भौगोलिक दृष्टीनें मूर्तिकलेचा विकास दर्शविणाऱ्या प्रदर्शनविभागात हा विकास कसा होत गेला हें गणेश, सूर्य, ब्रह्मा, विष्णु, शिव, नटराज, सप्तमातृका व तीर्थंकर यांच्या मूर्तिवरून दिसून येतें त्याचप्रमाणें भारतातील भारतीय लिपींचा विकास व त्याचा सिलोनमधील व भारताबाहेरील लिपींवर पडलेला प्रभाव दर्शविणारा विभागहि येथें आहे

प्रागैतिहासिक व इतिहासारंभकालीन समग्रात, भारतातील सर्व ठिकाणचे अश्मयुगपूर्वकालीन, मध्यअश्मयुगीन व उत्तर अश्मयुगीन कालातील पाषाणाच्या कलाकृति असून तुलनात्मक अभ्यासासाठी त्या कालातील परदेशीय कलाकृतींचा उत्तम समग्रहि ठेवला आहे. मोहेंजोदारो व हडप्पा, चान्हुदारो, अमरी व नाल येथील पुरातनवस्तु व दक्षिण भारतातील लोखंडी चीजा इतिहासाच्या प्रारंभकाळाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत सन १९३७ मधील येल-केंब्रिज उत्खनन मोहिमेत मिळालेल्या नमुन्यामुळें येथील प्रागैतिहासिक वस्तूंचा समग्र फारच समृद्ध झालेला आहे

उत्खननाच्या ठिकाणी सापडलेल्या वस्तूंचाहि येथें सरस असा समग्र आहे त्यात तक्षशिला, कौशाम्बी, भीता, बसरा, नालंदा व इतर ठिकाणी सापडलेल्या आश्चर्य लाल मातीच्या आकृति, मणी, मातीची भांडी व इतर वस्तु आहेत यापैकी एका भांड्यावरील प्राचीन कोरीव लेखावरून ख्रिस्तपूर्व चौथ्या शतकातील पिपराहवा येथील अस्थिपेटिका फार महत्त्वाच्या आहेत असे दिसून येतें त्याचप्रमाणें येथें दक्षिण भारतीय ब्रॉन्झ कलाकृतींचाहि एक छोटा समग्र आहे. पुरालेख विद्याप्रदर्शनविभागात दुसऱ्या ते बाराव्या शतकांतील अनेक शिलालेख व ताम्रपट आहेत

त्याचप्रमाणें भारतीय नाण्यांचा एक फार मोठा प्रातिनिधिक समग्र येथें आहे पूर्वकालीन नाण्यांत उद्रांकित, आदिवासी, इंडोग्रीक, इंडो-पार्थियन, इंडो सिथीयन, कुशाण, गुप्त, मौखरी, काश्मीर, कांग्रा, आसाम व नेपाळ येथील नाणी आहेत दक्षिणी नाण्यांत आंध्र, चोल, पांड्य, चेरा, पाडुरग इ नाणी आहेत मुसलमानी नाण्यात सुलतान व मोंगल बादशहांची नाणी आहेत निरनिराळ्या भारतीय संस्थानांच्या नाण्यांचाहि प्रातिनिधिक समग्र येथ आहे

येथील मौल्यवान चिजांत, मि. पियर्स यांचकडून खरेदी केलेली काही आश्चर्य रत्नें व मुद्रा यांचा समावेश होतो त्याचप्रमाणें त्यांत मोंगली जडवाहिरापैकी पान कोरलेला एक चषक व एक पन्नाकृति अंगठी असून या कलाकृति विशेष उल्लेखनीय आहेत

**औद्योगिक विभाग :** सुरुवातीस औद्योगिक विभागात कला व उद्योग या सदरातील सर्व वस्तूंचा समावेश करण्यात आला होता आता फक्त वनस्पतिशास्त्र, वैद्यक, वनशास्त्र, कृषि, कुटीरउद्योग इत्यादि विषयांशी संबंधीत असलेल्या महत्त्वाच्या वस्तूच केवळ येथें ठेवल्या जातात

येथील नमुने व अभ्यास वस्तूंचा समग्र फार हजारो वस्तु येथें प्रदर्शित केलेल्या असल्यामुळें या भागाचा व्याप्ति केवळ एक स्वरूपात्मक निर्दिष्ट करणें शक्य आहे या समग्रातील प्रदर्शित वस्तूंत आयुर्वेदीय खाद्य पदार्थ,

गावठी औषधें, वनस्पती रसायनविद्यांसाठी व रंगविण्यासाठी वापरण्यांत येणारी द्रव्यें, तंतु व सूत, डिंक व राळ, तेलें व मसाले इ. वनस्पतीजन्य सर्व कच्चा वस्तूंचा समावेश होतो. त्याचप्रमाणें तेथें अतिमौल्यवान असा एक शुष्कौषधिसंग्रह असून त्यात व्यावहारिक दृष्ट्या फायदेशीर ठरणाऱ्या व वनस्पति जीवनातील वनिष्ट वर्गांतील महत्त्वाच्या वनवस्तूंचा समावेश होतो. तसेंच तेथें कापूस, तांदूळ, ऊंस, नीळ, चहा, काथ्या इत्यादि उद्योगांची उद्बोधक माहिती नमुने व चित्रें यांच्या साहाय्यानें विशद करण्यात आली आहे

**प्राणीशास्त्रविभाग :** या संग्रहालयाच्या प्राणीशास्त्रविभागात असलेला नमुन्यांचा संग्रह भारतातील इतर कोणत्याहि संग्रहालयात असलेल्या नमुन्यांपेक्षां अधिक मोठा आहे सुमारें १८७५ मध्यें बंगालच्या एशियाटिक सोसायटीच्या संग्रहालयातून भारतीय संग्रहालयात आणलेला मूळ वस्तुसंग्रह, भारताच्या सरहद्दीवरील देशांत, निरनिराळ्या स्वाऱ्या, शिष्टमंडळ अथवा सीम-मोहिमांबरोबर असलेल्या सृष्टिशास्त्रज्ञांनीं केलेला संग्रह, ब्रिटिश सरकारच्या भारतीय समुद्र सर्वेक्षण नौकेवरील सर्जन-नॅचरॅलिस्ट यांनी जमविलेल्या सागरी वस्तूंचा संग्रह, खाजगी दात्यांनी भेटी म्हणून दिलेल्या वस्तु, सन १९१६ पर्यंत संग्रहालयाच्या सृष्टिविज्ञानविभाग अधिकाऱ्यांनी खरेदी केलेल्या व जमविलेल्या वस्तूंचा संग्रह आणि त्यानंतर भारतीय प्राणीशास्त्रसंशोधनविभागाच्या अधिकाऱ्यांनी केलेला संग्रह या सर्वांची परिणति प्राणीशास्त्रविभागातील संग्रहाच्या स्वरूपात झालेली आहे येथील सहा प्रदर्शनविभागात पृष्ठवंशीय व अपृष्ठवंशीय प्राण्यांचा संग्रह ठेवलेला आहे तळमजल्यावरील एका विस्तृत प्रदर्शनविभागात अपृष्ठवंशीय प्राणी ठेवलेले आहेत व कीटक व अष्टपाद प्राणिवर्ग जवळच्याच कीटक प्रदर्शनविभाग नामक खोलींत प्रदर्शित केलेले आहेत पहिल्या मजल्यावर पृष्ठवंशीय प्राणि ठेवलेले जे इतर प्रदर्शनविभाग आहेत, त्यात मत्स्य प्रदर्शनविभाग, खग प्रदर्शनविभाग, भूजलचर व सर्पवर्ग प्रदर्शनविभाग, विशाल सस्तन प्राणीवर्ग प्रदर्शनविभाग, व लघु सस्तनप्राणीवर्ग प्रदर्शनविभाग यांचा समावेश होतो प्रदर्शित केलेल्या नमुन्यांपेक्षा राखीव नमुन्यांचे संग्रह अधिक मोठे आहेत ते सार्वजनिक उपयोगाकरिता खुले नसले तरी विद्यार्थी व व्यासंगी अभ्यासक यांना उपलब्ध होऊ शकतात.

**भूगर्भशास्त्र विभाग :** या संग्रहालयातील भूगर्भशास्त्रीय संग्रह हे चार प्रदर्शनविभागांत ठेवलेले आहेत प्रवेशद्वाराशींच असलेल्या दालनाच्या उत्तरेस अथवा पुराणवस्तु-प्रदर्शनविभागाच्या समोरच अश्मीभूत पृष्ठवंशीय प्राण्यांचा प्रदर्शनविभाग असून त्याच्या पुढेंच उल्का पाषाण प्रदर्शनविभाग आहे. त्यापलिकडे खनिज वस्तु व प्रस्तरांचा प्रदर्शनविभाग आहे पहिल्या मजल्यावर त्याच्याच वर अश्मीभूत अपृष्ठवंशीय प्राण्यांचा प्रदर्शनविभाग आहे भारताच्या भूगर्भशास्त्र संशोधन विभागाच्या अधिकाराखाली असलेल्या या विभागातील भूगर्भशास्त्रीय संग्रहात लाखों नमुने असून त्यापैकीं निवडक नमुने प्रदर्शनार्थ मांडलेले आहेत. खनिजवस्तु प्रदर्शनविभागात जगाच्या सर्व भागांतील नमुन्यांचा अंतर्भाव होतो अश्मीभूत पृष्ठवंशीय प्राण्यांचा संग्रह हा हिमालयाच्या पायथ्याशीं असलेल्या शिवालिक स्तरसमुच्चयामधल्या, तृतीययुगीन पृष्ठवंशीय प्राण्यांच्या सघन साठ्यांमधूनच बनविण्यात आला असल्यामुळें या प्रदर्शनविभागास शिवालिक प्रदर्शनविभाग असें नाव देण्यात आलें आहे येथील एक वैशिष्ट्यपूर्ण वस्तु म्हणजे एलेफस अँन्टिक्वस, या अतिपूर्वकालीन प्राण्याची कवटी ही होय. पहिल्या मजल्यावरील अश्मीभूत अपृष्ठवंशीय प्राण्यांच्या प्रदर्शनविभागात गोंडवन प्रस्तरांतील अश्मीभूत वनस्पती, धारवाडातील चुनखडीचे दगड व सीलि येथील संग्रह इ. आहेत

**कलाविभाग :** कलाविभागांतील संग्रह पहिल्या व सर्वांत वरच्या मजल्यावर असलेल्या दोन मोठ्या प्रदर्शनविभागांत मांडलेले आहेत पहिल्या मजल्यावरील प्रदर्शनविभागात मागावर विणलेल्या व हातांनी भरतकाम केलेल्या कपड्यांचे वेगवेगळे नमुने आहेत त्यात किनखाब अथवा जरीचे भरतकाम केलेले रेशमी वस्त्रें, हिमरू, पाटोळा पद्धतीची रेशमी साडी, काश्मिरी शाली, अस्सल जर भरलेली ढाक्याची मलमल, बुखारा, मिर्झापूर व पतियाळा येथील गालिचे व रग, बुखारा येथील सोनेरी कामाच्या पडद्या, आदिवासी लोकांचे कपडे, बांधणीपद्धतीचे, कॅलिको छपाईचे व चमकणारी सोनेरी छपाईचे नमुने, पंजाब येथील फुलकारी, भरतकाम केलेले देवनागरी अक्षरांत काढलेले चंबा येथील रुमाल, बुखारा व पर्शिया येथील भरतकाम केलेल्या सुजन्या, बंगाल येथील भरतकाम केलेल्या कथा व पिछवाया, भरतकाम केलेले हत्तींवरील हौदे व झूली, मध्यदेशांतील लहान आयने बसविलेले व अशिष्ट पद्धतीचे भरतकाम केलेले लेहेंगे व कुडतें इ. प्रदर्शन वस्तु आहेत

त्याचप्रमाणें वेगवेगळ्या धातूंपासून बनविलेल्या कलात्मक वस्तूंचाहि येथें एक विभाग आहे त्यात तिबेट, भूतान, नेपाळ व मद्रास येथील धातूंच्या मूर्ति, दमास्कस येथील धातूंचे मुलामा चढविलेली पात्रें, एनॅमलची व बिद्रीची भांडी, चांदीची भांडी व कृत्रिम सोन्याचे दागिने, दगडाची भांडी, सवेरम, आझमगड, अलाहाबाद, लखनौ, मुलतान, लाहोर, दिल्ली व इतर ठिकाणच्या मातीच्या झिलईदार, बिनझिलईदार व रंगीत वस्तु धरून इतर मातीच्या वस्तु व कांचपात्रें, मद्रास, हैदराबाद व जयपूर येथील लाखेच्या वस्तु, हस्तिदंताच्या, शिंगाच्या व कातड्यापासून बनविलेल्या वस्तु, कोरीव काम केलेल्या लाकडी वस्तु आहेत

कलाकुसरीच्या वस्तु संपादन करण्यासाठीं भारत सरकारकडून दिलें जाणारें रु. १००० चें वार्षिक अनुदान गेली वीस वर्षे बंद करण्यात आल्यामुळें या विभागात कोणत्याहि नव्या वस्तूची भर पडलेली नाही

**शैक्षणिक कार्य :** भारतीय संग्रहालयाच्या या सहा विभागांपैकी प्रत्येक विभागाचें एक उत्तम व विस्तृत ग्रंथालय असून तें मुख्यत संग्रहालयांतील अधिकाऱ्यांच्या उपयोगासाठींच योजलेलें आहे परंतु विद्यार्थी व व्यासंगी अभ्यासक यानाही त्याचा उपयोग करता येतो निरनिराळ्या विभागांतील लॅन्टर्नच्या कांचचित्रांचा एक उत्तम संग्रह येथें केलेला आहे संग्रहालयाच विश्वस्त हे, येथील निरनिराळ्या विषयांच्या वस्तुसंग्रहाबद्दल लोकांना माहिती देण्यासाठीं व प्रदर्शित-वस्तूंबद्दल जिज्ञासा निर्माण करण्यासाठीं, तसेंच त्याचें महत्त्व विशद करून सांगण्यासाठीं वसंत व शिशिर व्याख्यानमाला भरवितात पदव्युत्तर विद्यार्थी व व्यासंगी अभ्यासक महाविद्यालयीन विद्यार्थी व प्राध्यापक संग्रहालयातील निरनिराळ्या विभागांना वारंवार भेट देतात प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृति या विषयाच्या विद्यार्थ्यांकरिता, कांहीं वेळेस भारतीय संग्रहालयातील पुराणवस्तुविभागाच्या प्रदर्शनविभागात वर्गहि भरविले जातात व्याख्यानासाठीं या संग्रहालयात

एक खास रंगभूमि तयार केलं आहे. व्याख्यानासाठी, प्रक्षेपक, फिल्मस् व लॅंटर्न काचचित्रें येथें ठेवलेली आहेत. संग्रहालयांत नाण्यांच्या अर्थवादी चिठ्ठया लावलेल्या आहेत. नाण्यांच्या मोठ्या व लहान चिठ्ठया इंग्रजी, बंगाली व हिंदी अशा तीन भाषांत लिहिलेल्या आहेत.

**प्रकाशनें :** पुराणवस्तुशास्त्र—कलकत्ता येथील भारतीय संग्रहालयाच्या पुराणवस्तुविभागानें अनेक महत्त्वाचीं पुस्तकें प्रसिद्ध केलेलीं आहेत. तीं पुढें दिल्याप्रमाणें—

१ कॅटलॉग ॲण्ड हॅंण्डबुक, आर्किऑलॉजिकल कलेक्शन्स्, इंडियन म्युझियम, भाग १ व २, लेखक ॲण्डरसन

२ भारतीय संग्रहालयातील प्रागैतिहासिक पुरातन वस्तूंचें माहितीपुस्तक, लेखक कॉगिन ब्राऊन

३ भारतीय संग्रहालयातील नाण्यांचें माहितीपुस्तक, लेखक रॉजर्स

४ भारतीय संग्रहालयातील नाण्यांचें माहितीपुस्तक, भाग १, ले० स्मिथ

५ भारतीय संग्रहालयातील नाण्यांचें माहितीपुस्तक, भाग २, ले० नेल्सन राईट

६ भारतीय संग्रहालयातील नाण्यांचें माहितीपुस्तक, भाग ३, ले० नेल्सन राईट

७ भारतीय संग्रहालयातील नाण्यांचें माहितीपुस्तक, भाग ४, ले० ॲलन

८ भारतीय संग्रहालयातील नाण्यांचें पुरवणी माहितीपुस्तक, मुसलमानेतर अमदानींतील नाणीं, भाग १—ले० विद्याविनोद

९ भारतीय संग्रहालयातील नाण्यांचें पुरवणी माहितीपुस्तक मुसलमान अमदानींतील नाणीं, भाग २,—ले० अहमद

१० भारतीय संग्रहालयातील नाण्यांचें पुरवणी माहितीपुस्तक, मुसलमान अमदानींतील नाणीं, भाग ३—ले० अहमद

११ भारतीय संग्रहालयातील शिल्पकलाकृतींचें पुरवणी माहितीपुस्तक, ले० ब्लॉक.

१२ भारतीय संग्रहालयातील शिल्पकलाकृतींची मार्गदर्शिका, भाग १ व २ ले एन् जी मजुमदार, आणि

१३. भारतीय संग्रहालयातील पुरातन वस्तु प्रदर्शनविभागांची मार्गदर्शिका, ले सी शिवराममूर्ति

१४ रॉयल कॉन्क्वेस्ट्स् ॲण्ड कल्चरल मायग्रेशनस् इन् साऊथ इंडिया ॲण्ड डेक्कन, [दक्षिण भारत व दख्खनमधील राजदिग्विजय व सांस्कृतिक स्थलांतरें] ले सी शिवराममूर्ति

**वनस्पतिशास्त्र :** भारतीय संग्रहालयाच्या औद्योगिक विभागाची मार्गदर्शिका, ले के एस् श्रीनिवासन्, औद्योगिक विभागात प्रकाशनें व सचित्र पोस्टकार्डे वगैरे स्वरूपात मार्गदर्शिका व माहितीपुस्तकें तयार करण्याचें योजिलें आहे

**प्राणिशास्त्र :** (१) भारतीय संग्रहालयाचा दसर आणि (२) भारतीय संग्रहालयाची कथा

**मानववंशशास्त्र :** आदिम जाति, वगैरे वगैरे संबंधीं मानवजातिशास्त्र विषयक प्रदर्शनविभागाची मार्गदर्शक पुस्तकें प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे

**कलाविभाग :** अवनींद्रनाथ टागोर यांनीं काढलेल्या रंगचित्रांचा संग्रह आणि कला विभाग मार्गदर्शिका हीं दोन प्रकाशनें प्रसिद्ध करण्यात आलीं आहेत. इतर चित्रसंग्रह व सचित्र पोस्टकार्डे प्रसिद्ध करण्याचें योजिलें आहे

**कामाचे तास :** गुरुवारखेरीज रोज संग्रहालय सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ पर्यंत उघडे असतें. गुरुवारीं संग्रहालय १२ वाजता उघडतें. कांहीं सार्वजनिक सुटीच्या दिवशीं संग्रहालय बंद असतें. हिवाळ्यात संग्रहालय संध्याकाळीं ४-३० वाजता बंद होतें

**प्रवेश :** शुक्रवारखेरीज रोज प्रवेश विनामूल्य असतो. शुक्रवारीं प्रत्येक प्रेक्षकामागें ४ आणे फी घेण्यात येते. प्रत्यक्ष शिक्षण घेत असलेले विद्यार्थी व शाळेंतील मुलें यांना फी माफ आहे

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार विश्वस्तमंडळाकडून चालविण्यांत येतो. निरनिराळ्या निरीक्षण विभागाचे अधिकारी हे त्या त्या विभागाचे अधिकारी आहेत. निरनिराळे विभाग म्हणजे प्राणिशास्त्र निरीक्षणविभाग, वनस्पतिशास्त्र निरीक्षणविभाग, भूस्तरशास्त्र निरीक्षणविभाग, पुराणवस्तुशास्त्र विभाग, मानववंशशास्त्रविभाग, कलाविभाग मात्र विश्वस्त मंडळाच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग—विश्वस्त कार्यालय :** अवेतनिक चिटणीस—कुमार बी सी सिंह, एम् ए, एलएल बी, १ मार्गदर्शक मुख्याध्यापक, कारकून, लघुलिपिलेखक, हिशेबनीस, टंकलेखक कारकून, रक्षक, २ द्वारकारकून, ४ निरीक्षक, जमादार, ४९ दरवान, २ चपरासी, ७ झाडूवाले व ६ माळी

**कलाविभाग :** रक्षक—श्री चिंतामणि कार, उप रक्षक—श्री तिनकोरी मुखर्जी, दोन कारकून, सुतार, अभिरक्षक व दफ्तरी, दरवान, सहा नोकर (बेअरर) व दोन झाडूवाले

**प्राणिशास्त्रविभाग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री बी एस् लया, एम् एससी, चार प्रदर्शनविभाग-साहाय्यक, दोन पेंढा भरून मृत पशूंना पूर्ववत् आकार देणारे व त्यांचे दोन मदतनीस, एक कलेक्शन टंडर, कलाकार, मॉडेलर (प्रतिमाकार), मासेसेवक (चिन्हांकनकर्ता), तीन शिपाई, चांभार व एक झाडूवाला

**मानववंशशास्त्रविभाग :** मानववंशशास्त्रज्ञ—श्री बी सी गोहेन, एम् ए, संग्रहालयाध्यक्ष—श्री नीलिमा रॉय, एम् एस् सी, प्रदर्शनविभाग साहाय्यक, कनिष्ठ साहाय्यक सचिव, दोन मानवजातिशास्त्रविषयक संग्राहक हेड कलेक्शन टंडर, कलेक्शन टेंडर व दोन शिपाई

**औद्योगिक विभाग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री के एस् श्रीनिवासन्, एम् ए, प्रदर्शनविभागसाहाय्यक, प्रदर्शन विभाग कनिष्ठ साहाय्यक, सूक्ष्मछेदनयंत्रज्ञ, (मायक्रोटोमिस्ट), साहाय्यक रसायनज्ञ, मॉडेलर (प्रतिमाकार) व प्रिपरेटर, मुख्य कारकून, दोन प्रदर्शनविभाग परिचारक, प्रदर्शनविभाग मार्गदर्शक, उच्च श्रेणी कारकून, ग्रंथालय साहाय्यक, दोन कलाकार, तीन कनिष्ठ श्रेणी कारकून, लघुलिपिलेखक, प्रिंटर, सुतार, दफ्तरी, तीन पदाधिकारी, पहारेकरी, संग्रहालयातील नमुन्यांचे दोन संग्राहक, सात प्रदर्शनविभागांतील नोकर व दोन झाडूवाले

**पुराणवस्तुशास्त्रविभाग :** अधीक्षक—श्री आर् सी कार, एम् ए, साहाय्यक अधीक्षक—के आर्. विजयराघवन्, बी ए, तीन साहाय्यक संग्रहालयाध्यक्ष, श्री ए घोष, श्रीमती एम् सान्याल, एम् ए, व श्री एस्

यानें काढलेलें आहे. चित्रांचा व कोरीव चित्रांचा त्रियस्वा संग्रह शस्त्रागार दालनात प्रदर्शित करण्यात आला आहे. त्यात प्लासीच्या लढाईचे व पूर्वीच्या सफरीवरील व्यापारी जहाजाचे नमुनेहि ठेवण्यात आले आहेत. त्याशिवाय तेथें शस्त्रांचाहि संग्रह आहे.

पहिल्या मजल्यावरील चित्र प्रदर्शन विभागात वॉरन हेस्टिंग्जच्या वेळच्या चित्रांचा संग्रह आहे. त्यात वॉरन हेस्टिंग्ज व मिसेस वॉरन हेस्टिंग्ज यांच्या प्रतिमा आहेत. मधल्या दालनात सॅम्युअल डेव्हीस याने रंगात काढलेल्या चित्रांचा संग्रह व कोरीव चित्रांचा मोठा संग्रह आहे. शेवटच्या बाजूकडील कलकत्ता दालनात डॅनियलनें काढलेलीं जुन्या कलकत्त्याचीं चित्रें असून फोर्ट विल्यियमची प्रतिकृतीहि आहे. त्याचप्रमाणें तेथें अस्सल ऐतिहासिक कागद पत्रांचा संग्रहहि आहे.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाला जोडून एक ग्रंथालय असून त्यात मुख्यत्वेंकरून खात्याच्या उपयोगासाठीं सुमार ६४४ पुस्तकें आहेत. परंतु तीं अभ्यासू विद्वानांनाच मिळू शकतात. निरनिराळ्या राज्यांतून शाळेंतील विद्यार्थी मोठ्या संख्येनें संग्रहालय पाहण्यास येतात. त्याशिवाय भारतांतील निरनिराळ्या विद्यापीठांमधील पदव्युत्तर शिक्षण घेणारे विद्यार्थी व अभ्यासू विद्वान दरवर्षी संग्रहालय पाहण्यास येतात. संग्रहालयाध्यक्ष विद्यार्थ्यांना प्रदर्शन-वस्तूंचा अभ्यास करण्याच्या बाबतीत मदत करतात. वस्तूंवरील नावाच्या चिठ्ठ्या केवळ इंग्रजींत असून त्या अर्थपूर्ण आहेत.

**प्रकाशनें :** (१) प्रदर्शन वस्तूंचें माहितीपुस्तक, (२) व्हिक्टोरिया मेमोरियल संस्थेची पत्रिका, व (३) भारतीय इतिहासाच्या ब्रिटिश अमदानीतील निवडक कागदपत्र.

**कामाचे तास :** संग्रहालय सोमवार खेरीज उन्हाळ्यात (१ मार्च ते ३१ ऑक्टोबरपर्यंत) रोज सकाळीं १० ते दुपारीं ५ व हिवाळ्यात (१ नोव्हेंबर ते २८ फेब्रुवारीपर्यंत) रोज सकाळीं १० ते दुपारीं ४ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** प्रवेशमूल्य प्रौढांसाठीं २५ नये पैसे व मुलांसाठीं १२ नये पैसे असें आहे. शुक्रवारीं प्रवेशमूल्य दुप्पट असतें.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार विश्वस्त मंडळाकडून १९०३ च्या व्हिक्टोरिया स्मारक अधिनियमास अनुसरून पाहिला जातो.

**सेवकवर्ग :** चिटणीस आणि संग्रहालयाध्यक्ष – डॉ. डी. सी. गांगुली, एम्. ए., पीएच्. डी.

अधीक्षक—एफ्. ए. मूर, चित्रें आणि ठसे दुरुस्त करणारा, हिशेब तपासनीस, नांवाच्या चिठ्ठ्या लावणारा, दोन कारकून, सुतार, दफ्तरी, सहा शिपाई, दालनासाठीं दोन हमाल, ३८ रक्षक आणि उद्यान-रक्षक, २८ माळी, १६ सफाईवाले, दोन भिस्ती, १० झाडूवाले आणि एक ड्रायव्हर.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाचें वार्षिक अंदाजपत्रक रु. २,२४,९६४ चें आहे. या संग्रहालयाला भारत सरकार आणि पश्चिम बंगाल सरकार यांचेकडून आर्थिक मदत मिळते.

**अभिप्राय :** संग्रहालय कलकत्त्यात सोयीस्कर ठिकाणीं वसलेलें असून रोज सरासरी ६७१ आणि वर्षाकाठीं २,८०,००० प्रेक्षक संग्रहालय पाहून जातात. हिवाळ्यांत प्रेक्षकांची संख्या जास्त असते. संग्रहालयाची इमारत प्रदर्शनवस्तूंच्या दृष्टीनें सोयीची व प्रशस्त असून राखीव संग्रहाकरितां तसेंच सभाकक्षाकरितां भरपूर जागा आहे. प्रयोगशाळेची सोय मात्र नाहीं. संग्रहालयातील वस्तु मुख्यतः खरेदी आणि देणग्या ह्या मार्गांनीं मिळविल्या जातात. ज्या भारतीयांनीं राष्ट्रीय जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत महत्त्वाचा भाग घेतला असेल आणि सैनिकी, राजकीय, वाङ्मयीन, सांस्कृतिक, धार्मिक, सामाजिक आणि इतर क्षेत्रांत महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली असेल त्यांचीं तैलचित्रें, वैयक्तिक अवशेष आणि स्मृतिचिन्हें मिळवून संग्रहालय वाढविण्याची योजना आहे. ही योजना कार्यान्वित केली जात असून भारताच्या पुढाऱ्यांचीं तैलचित्रें बनविण्याकरितां विख्यात चित्रकाराची नेमणूक करण्यांत आली आहे.

## २ भारतीय कलाविषयक आशुतोष संग्रहालय, कलकत्ता विद्यापीठ

**स्थापना :** १९३७

**पूर्वेतिहास :** ख्यातनाम शिक्षणतज्ज्ञ सर आशुतोष मुखर्जी यांचें नाव धारण करणारें हें संग्रहालय १९३७ सालीं सिनेट हाउसच्या मागील भागात सुरु करण्यात आलें. सुरुवातीला केवळ दोन डझन देखील प्रदर्शनवस्तु नसलेल्या ह्या संग्रहालयानें आता जवळजवळ १५,००० वस्तूंचा एक मोठा संग्रह जमविला आहे. श्री. विजयसिंग नाहर, राय-बहादुर दिनेशचंद्र सेन आणि श्री. परेशचंद्र दासगुप्ता यांच्यासारख्या कित्येक दानशूर व्यक्तींनीं आपल्याजवळील वस्तु देऊन संग्रहालय समृद्ध केलें आहे. संग्रहालयाला जोडलेला उत्खनन विभाग संशोधन आणि उत्खननाद्वारें संग्रहालयासाठीं वस्तु जमवितो. सध्या ह्या विभागाचें काम तामलुक आणि चंद्रकेतुगड येथें चाललें आहे.

भारत सरकारच्या पुरातवस्तु विभागानें नुकताच या संग्रहालयाला निवडक वस्तूंचा एक प्रचंड संग्रह उदारतेनें दिला आहे. ह्या संग्रहातील वस्तु बंगालमधील पहाडपूर, महास्थानगड, बैग्राम, रंगमति वगैरे पुरातवस्तु शास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाच्या ठिकाणीं उत्खनन करून मिळविल्या असून ह्या देवाणघेवाणीमागें विद्वज्जन आणि विद्यापीठांतील संशोधन करणारे विद्यार्थी यांना पुरातवस्तुशास्त्राचा तौलनिक अभ्यास करता यावा हा उद्देश आहे.

**विस्तार आणि संग्रह :** संग्रहालयात चित्रकृतींचा, विशेषत बंगालमधील पाल शैलीच्या शिल्पकृतींचा बराच मोठा संग्रह असून इतर शैलींच्या शिल्पकृतींचाहि चोखंदळ प्रातिनिधिक संग्रह आहे. यापैकीं कालीपूर येथील सूर्याची सातव्या शतकांतील प्रतिमा आणि विष्णु, उमा महेश्वर, अवलोकितेश्वर, ऋषभदेव इत्यादींच्या काहीं उठाव प्रतिमा, तसेंच भुवनेश्वर येथील ख्रि. पू. पहिल्या व दुसऱ्या शतकांतील प्राचीन शिल्पकृतींचे काहीं भग्नावशेष इत्यादि वस्तु उल्लेखनीय आहेत.

या संग्रहालयात तामलुक, चंद्रकेतुगड, मथुरा, कौशाम्बी, पाटणा, पहाडपूर वगैरे ठिकाणच्या सुंदर नमुन्यांचा समावेश होणाऱ्या मातीच्या वस्तूंचा एक आकर्षक संग्रह आहे.

ब्राँझच्या वस्तूंच्या संग्रहात अवलोकितेश्वराची एक सुरेख प्रतिमा आणि शिवाची शिरावर बुद्धाची आकृति असलेली एक प्रतिमा आहे. तसेंच बंगाल, बिहार आणि ओरिसा येथील इतर बौद्ध आणि जैनधर्मीय मूर्ति आहेत.

के. मुखर्जी, एम्. एस्‌सी., साहाय्यक नाणकशास्त्रज्ञ, साहाय्यक रसायनज्ञ, प्रदर्शनविभाग साहाय्यक, प्रदर्शनविभाग कनिष्ठ साहाय्यक, साहाय्यक ग्रंथपाल, ड्राफ्टस्मन-आर्टिस्ट, ड्राफ्टस्मन, दोन मॉडेलर, दोन छायाचित्रकार, दोन फोटो प्रिंटर्स, तीन सुतार, चार मार्क्समन (निर्देशक वर्ग), बाईंडर, दोन मुख्य कारकून, हिशेबनीस, दोन द्वितीय कारकून, भांडाररक्षक, लघुलिपिलेखक, पाच कनिष्ठ श्रेणी कारकून, दफ्तरी, जमादार, पांच शिपाई, तीन प्रदर्शनविभाग परिचारक, चार फराशी, प्रयोगशाळा साहाय्यक, सुताराचा मदतनीस व दोन झाडूवाले.

**भूस्तरशास्त्रविभाग :** निदानशास्त्र व प्राचीन प्राणिविद्याविभागाचे कांहीं अधिकारी ह्या विभागांतील प्रदर्शनविभागाच्या संग्रहालयाध्यक्षाचे काम पाहतात. ह्या विभागासाठीं परिचारकखेरीज वरून स्वतःचा नोकरवर्ग नाहीं.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयास भारत सरकारकडून आर्थिक मदत मिळते. कलाविभागासाठीं व विश्वस्तांच्या सेवकवर्गासाठीं रकम सरकारकडून परस्पर नेमून देण्यांत येते आणि इतर विभागांना अंदाजपत्रकांतील रकम त्या त्या खात्यांमार्फत देण्यात येते.

**अभिप्राय :** संग्रहालयाची जागा चौरंगी येथें मध्यवर्ती ठिकाणीं असून लोकांना तेथें जाण्यास अगदीं सोयीची अशी आहे. प्रेक्षकांची रोजची संख्या सुमारें १,५०० असून वार्षिक संख्या ५,४०,००० इतकी आहे. कलकत्ता हें फार मोठें शहर असल्यामुळें संग्रहालय पाहण्यास येणाऱ्यांची संख्या नेहमीच जास्त असते. परंतु हिंवाळ्यात संग्रहालय पाहण्यास येणाऱ्यांची गर्दी त्याहूनहि अधिक होते. संग्रहालयांतील प्रत्येक विभागांत विस्तृत प्रदर्शनविभाग आहेत. परंतु संग्रहालयातील प्रत्येक विभागांतील अमाप वस्तूंच्या मानानें जागा अपुरी पडते. वस्तु सांठवून ठेवण्याची जागाहि अपुरी आहे. कला व पुराणवस्तु विभागांसाठीं प्रयोगशाळेची सोय होण्याची जरुरी आहे. पुराणवस्तु विभागानें ह्या प्रश्न हातीं घेतला असून आपल्या विभागासाठीं प्रयोगशाळेची सोय करण्याची योजना तयार करण्यांत येत आहे. निरनिराळ्या निरीक्षण विभागांनीं संग्रहित केलेल्या वस्तूंच्या साहाय्यानें इतर विभागांतील संग्रहात भर घालण्यात येते; परंतु पुराणवस्तु विभागाच्या संग्रहांत घालण्यांत येणारी वस्तूंची भर, संशोधन करून, वस्तु संग्रहित करून, उत्खनन करून किंवा गुप्त निधींतून वस्तु मिळवून घालण्यांत येते. सर्व विभागांनीं नकाशे, प्रतिकृती, छायाचित्रें, आराखडे वगैरे साधनांचा भरपूर उपयोग केला आहे. निरनिराळ्या प्रदर्शन विभागांत प्रेक्षकांसाठीं दिवे, पंखे, बसण्यासाठीं जागा वगैरे सर्व सोयी करण्यांत आल्या आहेत. मौल्यवान वस्तु व नाणीं पुराणवस्तुविभागास सलग्न असलेल्या खोलींत सुरक्षित ठेवण्याची व्यवस्था आहे. प्रदर्शन विभागांची वाढ करणें व ते आधुनिक स्वरूपाचे करणें यासंबंधांत संग्रहालयानें एक 'पंचवार्षिक योजना' आंखली आहे.

## २. व्हिक्टोरिया मेमोरियल हॉल संग्रहालय

**स्थापना :** १९०६

**पूर्वेतिहास :** व्हिक्टोरिया मेमोरियल हॉल संग्रहालयाच्या स्थापनेचें श्रेय भारताचे व्हाईसरॉय व गव्हर्नर जनरल लॉर्ड कर्झन यांजकडे जातें. या संग्रहालयाचा शिलान्यास प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या हस्तें सन १९०६ मध्यें झाला आणि एक कोटि रुपये खर्च करून संग्रहालयाची इमारत बांधण्यात आली. संग्रहालय २८ डिसेंबर १९२१ रोजीं हिज रॉयल हायनेस प्रिन्स ऑफ वेल्स याच्या हस्तें जनतेसाठीं खुलें करण्यांत आलें. संग्रहालयाची इमारत भव्य असून तिला पार्श्वभूमिहि अत्यंत सुंदर लाभली आहे. आणि संपूर्णपणें संगमरवरी दगडांनीं बांधलेली असल्यामुळें ती कलकत्त्यातील आकर्षक इमारतींपैकीं एक अतिशय मनोवेधक इमारत आहे.

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहांत रंगचित्रें, कोरीव नक्षीकाम, शिळाछापाचीं कागदपत्रें, हस्तलिखितें, दस्तरें, हत्यारें, पदकें, नाणीं, नमुने, व्यक्तिविषयक अवशिष्ट वस्तु, विजयचिन्हें, नकाशे, आराखडे, वाद्यें, गणवेश, शिल्पकलाकृती वगैरे ब्रिटिश अमदानींतील भारतीय इतिहासाच्या निरनिराळ्या अवस्था दर्शविणाऱ्या वस्तु आहेत.

उत्तरेकडील दरवाजांतून आपण आंत शिरल्यास आपणास बादशहा ८ वे एडवर्ड व राणी अलेक्झांड्रा यांचे अर्धपुतळे आणि बादशहा पंचम जॉर्ज व राणी मेरी यांचे पुतळे दिसतील. उजवीकडे राजघराण्याचा प्रदर्शनविभाग आहे. यांत राणी व्हिक्टोरियाच्या जीवनातील प्रसंग दर्शविणारी रंगचित्रें व तिचा पियानो व लिहिण्याचें बैठें मेज आहे. व्हर्सेशॅगिन यानें काढलेलें मोठ्या आकाराचें भव्य रंगचित्र त्याच्या उत्कृष्ट कलाकृतीचा नमुना आहे. त्यांत १८६६ सालीं बादशहा ८ वे एडवर्ड यांनीं जयपूरमध्यें प्रिन्स ऑफ वेल्स म्हणून दरबारी थाटात प्रवेश केला तो प्रसंग रेखाटलेला आहे. प्रवेश करावयाच्या दिवाणखान्याच्या समोरील बाजूस प्रसिद्ध चित्रकारांनीं काढलेलीं चित्रें आहेत. त्यांत सर जोशुआ रेनॉल्ड्स्, झॅफनेल, लॉर्ड क्लाईव्ह आणि औंधचा राजा, अर्काटचा नबाब, द्वारकानाथ टागोर, सर हेन्री रॉलिन्सन, लॉर्ड कर्झन इ. व्यक्तींच्या प्रसिद्ध चित्रकारांनीं काढलेल्या चित्रांचा समावेश होतो. तसेंच तेथें लॉर्ड वेलस्ली, लॉर्ड डलहौसी, लॉर्ड हेस्टिंग्ज यांचे पुतळे आहेत. त्यापैकीं शेवटचा पुतळा फ्लॅक्समनच्या छिन्नींतून निर्माण झाला आहे. राणीच्या दिवाणखान्यांत घुमटाखालीं राणी व्हिक्टोरियाचा तरुणपणींचा पुतळा असून तो सर थॉमस ब्रॉक यांनीं तयार केलेला आहे. भिंतीच्या कोनाड्यांत, संगमरवरी चौकटीवर राणीचे जाहीरनामे कोरण्यांत आलेले असून प्रदर्शन विभागाच्या गोलाकार भिंतीमध्यें फ्रॅंक सॅलस्बरी यानीं काढलेलीं चित्रें बसविण्यांत आलेलीं आहेत. ह्या चित्रांत राणीच्या जीवनांतील प्रसंग दाखविण्यात आले आहेत. राणीच्या दिवाणखान्याच्या पलीकडे पुतळ्यांचा समूह असून त्यांत लॉर्ड कॉर्नवॉलिस व वॉरन हेस्टिंग्ज यांचे पुतळे आहेत. राजपुत्रांच्या दिवाणखान्यांत लॉर्ड क्लाईव्हचा पुतळा असून तो जॉन ट्वीड यानें तयार केलेल्या व लंडन येथील इंडिया ऑफिसच्या बाहेर ठेवलेल्या पुतळ्यावरून तयार केलेला आहे. दरबार हॉलमध्यें डाव्या बाजूस, १८५७ सालच्या उठावाचीं मिस् एडन ॲर्चीडेकन हिनें जलरंगांत काढलेलीं चित्रें, लहान आकाराचीं हस्तिदंती चित्रें आणि रंगचित्रांचा अप्रतिम संग्रह आहे. दिवाणखान्याच्या टोकास, बंगालच्या नबाबांचें शिळासिंहासन किंवा मसनद असून तें साधारणपणें सन १६४१ पासूनचें आहे. राजपुत्राच्या दिवाणखान्याच्या पलीकडे चित्रप्रदर्शन विभाग असून त्यांत थॉमस व विल्यम डॅनियेल यांनीं काढलेलीं चित्रें व कोरीव चित्रें आहेत. ह्या चित्रसमूहांत राणी मेरीनें भेट म्हणून दिलेल्या मनोज्ञ चित्रांचा संग्रह आहे. त्याचप्रमाणें रुडयार्ड किपलिंग, बर्क व मेकॉले यांच्या मोठ्या आकारांच्या प्रतिमा आहेत. लॉर्ड कॉर्नवॉलिस टिपू सुलतानाच्या मुलाचें स्वागत करीत आहे या प्रसंगाचें चित्र कोरलेलें

गान काढलेले आहे. चित्राचा व कोरीव चित्राचा लिथलचा संग्रह शस्त्रागार दालनात प्रदर्शित करण्यात आला आहे. त्यात प्लासीच्या लढाईचे व पूर्वेच्या सफरीवरील व्यापारी जहाजाचे नमुनेहि ठेवण्यात आले आहेत. त्याशिवाय तेथें शस्त्रांचाहि संग्रह आहे.

पहिल्या मजल्यावरील चित्र प्रदर्शन विभागात वॉरन हेस्टिंग्जच्या वेळच्या चित्रांचा संग्रह आहे. त्यात वॉरन हेस्टिंग्ज व मिसेस वॉरन हेस्टिंग्ज यांच्या प्रतिमा आहेत. मधल्या दालनात सॅम्युअल डेन्हीस यानें जलरंगात काढलेल्या चित्रांचा संग्रह व कोरीव चित्रांचा मोठा संग्रह आहे. शेजारच्या बाजूकडील कलकत्ता दालनात डॅनियल्स काढलेली जुन्या कलकत्त्याची चित्रें असून फोर्ट विल्यिमची प्रतिकृतीहि आहे. त्याचप्रमाणें तेथ अस्सल ऐतिहासिक कागद पत्रांचा संग्रहहि आहे.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाला जोडून एक ग्रंथालय असून त्यात मुख्यत्वेंकरून खात्याच्या उपयोगासाठी सुमारें ६४४ पुस्तकें आहेत परंतु ती अभ्यासू विद्वानानाच मिळू शकतात. निरनिराळ्या राज्यांतून शाळेंतील विद्यार्थी मोठ्या संख्येंन संग्रहालय पाहाण्यास येतात. त्याशिवाय भारतातील निरनिराळ्या विद्यापीठांमधील पदव्युत्तर शिक्षण घेणारे विद्यार्थी व अभ्यासू विद्वान दरवर्षी संग्रहालय पाहण्यास येतात. संग्रहालयाध्यक्ष विद्यार्थ्यांना प्रदर्शन-वस्तूंचा अभ्यास करण्याच्या बाबतींत मदत करतात. वस्तूंवरील नावाच्या चिठ्या केवळ इंग्रजींत असून त्या अपूर्ण आहेत.

**प्रकाशनें :** (१) प्रदर्शन वस्तूंचे माहितीपुस्तक, (२) नवीन व्हिक्टोरिया मेमोरियल संस्थेची पत्रिका, व (३) भारतीय इतिहासाच्या ब्रिटिश अमदानींतील निवडक कागदपत्र.

**कामाचे तास :** संग्रहालय सोमवार खेरीज उन्हाळ्यात (१ मार्च ते ३१ ऑक्टोबरपर्यंत) रोज सकाळीं १० ते दुपारीं ५ व हिवाळ्यात (१ नोव्हेंबर ते २८ फेब्रुवारीपर्यंत) रोज सकाळीं १० ते दुपारीं ४ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** प्रवेशमूल्य प्रौढासाठीं २५ नये पैसे व मुलांसाठीं १२ नये पैसे असें आहे. शुक्रवारीं प्रवेशमूल्य दुप्पट असतें.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार विश्वस्त मंडळाकडून १९०३ च्या व्हिक्टोरिया स्मारक अधिनियमास अनुसरून पाहिला जातो.

**सेवकवर्ग :** चिटणीस आणि संग्रहालयाध्यक्ष—डॉ डी सी गांगुली, एम् ए, पीएच डी.

अधीक्षक—एर ए मूर, चित्रें आणि ठसे दुरुस्त करणारा, हिशेब तपासनीस, नावाच्या चिठ्या लावणारा, दोन कारकून, सुतार, दफ्तरी, मुद्दा शिपाई, दालनासाठीं दोन हमाल, ३४ रक्षक आणि उद्यान-रक्षक, २८ माळी, १६ भंगी, दोन मिस्त्री, १२ झाडूवाले आणि एक डायव्हर.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाचें वार्षिक अंदाजपत्रक रु. ३,२४,६६४ चें आहे. ह्या संग्रहालयास भारत सरकार आणि पश्चिम बंगाल सरकार यांचेकडून आर्थिक मदत मिळते.

**अभिप्राय :** संग्रहालय कलकत्त्यात सोयीस्कर ठिकाणीं वसलेलें असून रोज सरासरी ६७१ आणि वर्षांतून २,८०,००० प्रेक्षक संग्रहालय पाहून जातात. हिवाळ्यांत प्रेक्षकांची संख्या जास्त असते. संग्रहालयाची इमारत प्रदर्शनवस्तूंच्या दृष्टीनें सोयीची व प्रशस्त असून राखीव संग्रहाकरिता तसेंच संग्रहणीकरिता भरपूर जागा आहे. प्रयोगशाळेची सोय मात्र नाहीं. संग्रहालयांतील वस्तु मुख्यतः खरेदी आणि देणग्या ह्या मार्गांनीं मिळविल्या जातात. ज्या भारतीयांनीं राष्ट्रीय जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत महत्त्वाचा भाग घेतला असेल आणि सैनिकी, राजकीय, वाङ्मयीन, सांस्कृतिक, धार्मिक, सामाजिक आणि इतर क्षेत्रांत महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली असेल त्यांचीं तैलचित्रें, वैयक्तिक अवशेष आणि स्मृतिचिन्हें मिळवून संग्रहालय वाढविण्याची योजना आहे. ही योजना कार्यान्वित केली जात असून भारताच्या सुपुत्रांचीं तैलचित्रें बनविण्याकरिता विख्यात चित्रकाराची नेमणूक करण्यात आली आहे.

## ३ भारतीय कलाविषयक आशुतोष संग्रहालय, कलकत्ता विद्यापीठ

**स्थापना :** १९३७

**पूर्वेतिहास :** ख्यातनाम शिक्षणतज्ज्ञ सर आशुतोष मुखर्जी यांचें नाव धारण करणारें हें संग्रहालय १९३७ सालीं सिनेट हाऊसच्या मागील भागात सुरू करण्यात आलें. सुरुवातीला केवळ दोन डझन देखील प्रदर्शनवस्तु नसलेल्या ह्या संग्रहालयानें आता जवळजवळ १५,००० वस्तूंचा एक मोठा संग्रह जमविला आहे. श्री विजयसिंग नाहर, राय बहादुर दिनेशचंद्र सेन आणि श्री परेशचंद्र दासगुप्ता यांच्यासारख्या विवेकदानशूर व्यक्तींनीं आपल्याजवळील वस्तु देऊन संग्रहालय समृद्ध केलें आहे. संग्रहालयाला जोडलेला उत्खनन विभाग संशोधन आणि उत्खननाद्वारें संग्रहालयासाठीं वस्तु जमवितो. सध्या ह्या विभागाचें काम तामलुक आणि चंद्रकेतुगड येथें चाललें आहे.

भारत सरकारच्या पुराणवस्तु विभागानें नुकताच या संग्रहालयाला निवडक वस्तूंचा एक प्रचंड संग्रह उसनवारीनें दिला आहे. या संग्रहांतील वस्तु बंगालमधील पहाडपूर, महास्थानगड, बैग्राम, रंगमति वगैरे पुराणवस्तुशास्त्राच्या दृष्टीनें महत्त्वाच्या ठिकाणीं उत्खनन करून मिळविल्या असून ह्या देवाणघेवाणीमागें विद्वान आणि विद्यापीठांतील संशोधन करणारे विद्यार्थी यांना पुराणवस्तुशास्त्राचा तौलनिक अभ्यास करता यावा हा उद्देश आहे.

**विस्तार आणि संग्रह :** संग्रहालयात शिल्पकृतींचा, विशेषतः बंगालमधील पाल शैलीच्या शिल्पकृतींचा बराच मोठा संग्रह असून इतर शैलींच्या शिल्पकृतींचाहि चांगला प्रातिनिधिक संग्रह आहे. यापैकीं काशीपूर येथील सूर्याची सातव्या शतकातील प्रतिमा आणि विष्णु, उमा महेश्वर, अवलोकितेश्वर, ऋषभदेव इत्यादींच्या काहीं उत्कृष्ट प्रतिमा, ढनंच मुक्तेश्वर येथील ख्रि पू पहिल्या व दुसऱ्या शतकांतील प्राचीन शिल्पकृतींचे काहीं भग्नावशेष इत्यादि वस्तु उल्लेखनीय आहेत.

या संग्रहालयात तामलुक, चंद्रगड, मथुरा, कौशांबी, पाटणा, पहाडपूर वगैरे ठिकाणच्या सुंदर नमुन्यांचा समावेश होणारा मातीच्या वस्तूंचा एक आकर्षक संग्रह आहे.

ब्राँझच्या वस्तूंच्या संग्रहात अवलोकितेश्वराची एक सुरेख प्रतिमा आणि खिचाली शिवाच्या मुखाची आकृति असलेली एक प्रतिमा आहे. तसेंच बंगाल, बिहार आणि ओरिसा यांतील इतर बौद्ध आणि जैनधर्मीय मूर्ति आहेत.

नाणकविभागांत सुमारें १५०० नाणीं असून त्यांत गुप्तांची सुवर्णमुद्रा आणि प्राचीन ठिकाणीं आणि ओतीव नाण्यांपासून मोंगलकालीन नाण्यांपर्यंतचे नाण्यांचे सर्व प्रकार आहेत. कै. डॉ. विमल सहानी यांनीं देणगीदाखल दिलेले यौधेयांचे नाण्यांचे साचे देखील आहेत

येथें असलेल्या रंगचित्रांत अजिंठा, बाघ, पोलोन्नरुवा, सित्तन्नवासल, सिगिरिया वगैरे ठिकाणच्या भित्तिचित्रांच्या नकला आहेत. सर्वांत सात्त्विक देवदेवतांची आठ अप्रतिम रंगचित्रें इ. स. १०२६ ची नेपाळमधील महत्त्वपूर्ण हस्तलिखितें मानली जातात. पालराजांच्या काळातील हस्तलिखितें व त्यावरील लहान आकाराची रंगचित्रें, रंगविलेलीं लाकडी आवरणें, तसेंच जैन, गुजराथी, मोंगल, राजस्थानी, कांगरा, ओरिसन, दक्षिणी, आणि पाटणा शैलींचे नमुनेहि येथें आहेत. तिबेटी आणि चिनी ध्वज, बाहुरा, बीरभूम, कालीघाट वगैरे ठिकाणची दृश्यचित्रें, चैतन्यलीला वगैरे विषयांवरील रंगचित्रेंहि येथें आहेत. जेमिनी रॉय, नंदलाल बोस, क्षितिन मुजुमदार वगैरे ख्यातनाम आधुनिक चित्रकारांचीं रंगचित्रेंहि येथें ठेवलीं आहेत

कुरुक्षेत्र येथील इ. स. ११९४ मधील एक उत्कृष्ट ताम्रपटावर विष्णु आणि त्याच्या मत्स्याच्या अवतारांच्या आकृति आहेत. येथें काश्मीर येथील १७ व्या शतकातील एका शालीचें एक सचित्र आवरण असून त्यावर चामड्यावर जनावरांच्यातील रेशीम धाग्यांनी तयार केलेली आहेत.

संग्रहालयातील लाकडी वस्तूंमध्ये पुस्तकें ठेवण्याची कोरीवकाम केलेली पुस्तकाची वेष्टणें, गोपालाची एक भव्य मूर्ति आणि त्यातील इतर आकृत्या आहेत. येथील हस्तिदंती वस्तू ओरिसांतील ११ व्या शतकांतील एक विलोभनीय शिकारीचें दृश्य, सिंहासनाचा पाय किंवा पलंगाचा दांडा या-सारख्या दिसणाऱ्या वस्तूंवर बनविलेलें असून एक मिथुनाची आकृतिहि आहे

लोककलेचाहि एक संग्रह येथें असून त्यांत भारताच्या भिन्नभिन्न भागांतील, विशेषत: बंगालमधील, बाहुल्या व खेळणीं आहेत

जुनी वस्त्रमध्ये जेसोर, खुलना, ढाका आणि फरिदपूर या जिल्ह्यांतील कांथा आहेत

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय कलकत्ता विद्यापीठाला जोडलें आहे. विद्यापीठाच्या पुरातन इतिहास व संस्कृति विभागांत पुराणवस्तुशास्त्राचे अध्ययन होतें व हे वर्ग संग्रहालयांत भरविले जातात. संग्रहालयाद्वारें शाळा, महाविद्यालयें यांतील आणि पदव्युत्तर अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांच्या गटांना संग्रहालयाला भेट देण्याची सोय केली जाते व त्यांना सर्व वस्तूंची माहिती दिली जाते. संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांना संग्रहालयातील प्रदर्शनवस्तूंचा अभ्यास करणें शक्य व्हावें म्हणून खास सवलती दिल्या जातात. येथें लॅन्टर्नच्या काचचित्रांचा चांगला संग्रह असून विशेषज्ञ आणि संग्रहालयाचे अधिकारी यांचीं व्याख्यानें केलीं जातात. तीन महिन्यांचा टीचर्स ट्रेनिंग सर्टिफिकेटचा (कला-रसग्रहणाबाबतचा अभ्यासक्रम) अभ्यासक्रम येथें सुरू असून संग्रहालयाध्यक्षांच्या मार्गदर्शनाखालीं व संग्रहालयाच्याच इमारतींत विश्वविद्यालयाच्या वतीनें भारतीय व युरोपीय कला, तसेंच नमुने बनविणें, रंगचित्रण आणि हस्तकला याबाबतचें प्रत्यक्ष शिक्षण दिलें जातें. ग्रामीण हस्तकलेबाबतची माहिती गोळा करण्याकरिता संग्रहालयांत एक संशोधन अधिकारी काम करतो

संग्रहालयाचें एक ग्रंथालय असून त्यांत शिक्षक, विद्यापीठाचे विद्यार्थी आणि संग्रहालयाशीं संबंधित असलेल्या विद्यार्थ्यांकरिता कला आणि पुराणवस्तुशास्त्र, इतिहास, संग्रहालयशास्त्र वगैरे विषयांचीं पुस्तकें व नियतकालिकें आहेत. त्यांचीं विशेष विषयांवरीं कार्यक्रमाच्या वेळीं अधूनमधून प्रदर्शनें भरविलीं जातात. येथील भावाच्या विदया इंग्रजीतून असून वेळप्रसंगीं विशेष भाषणें नकाशे व आराखडे यांचा वापर केला जातो

**प्रकाशनें :** (१) एक्स्कॅव्हेशन्स ॲट बनगड

लेखक : के. जी. गोस्वामी, एम्. ए., कलकत्ता विश्वविद्यालय

(२) म्युझियम मेथड ॲन्ड प्रोसेस ऑफ क्लीनिंग ॲन्ड प्रिसर्व्हेशन

लेखक : डॉ. एम्. एन्. बसू, एम्. एस्सी.

(३) बेंगॉली आल्फाबेट (बंगाली भाषेंत)

लेखक : कल्याण गांगुली, एम्. ए.

(४) आशुतोष संग्रहालय ऑफ इंडियन आर्ट

लेखक : डी. पी. घोष, एम्. ए., पी. आर. एस्.

(५) एक्स्कॅव्हेशन्स ॲट चंडीदास नान्नूर, बीरभूम

लेखक : के. जी. गोस्वामी, एम्. ए.

(६) आर्किऑलॉजिकल एक्स्प्लोरेशन इन् द्वारकेश्वर व्हॅली

लेखक : डी. पी. घोष, एम्. ए., पी. आर. एस्.

(७) टेराकोटाज फ्रॉम तामलुक

लेखक : पी. सी. दासगुप्ता, एम्. ए.

**कामाचे तास :** कामाच्या सर्व दिवशीं संग्रहालय सकाळीं १० ते सायंकाळीं ५-३० पर्यंत व शनिवारीं सकाळीं १०-३० ते २-३० पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** या संग्रहालयावर कलकत्ता विद्यापीठाचें नियंत्रण असून या कामासाठीं विद्यापीठांतील प्राध्यापक, व्याख्याते आणि विशेषज्ञांची एक समिति नेमण्यांत आली आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष—श्री. डी. पी. घोष, एम्. ए., पी. आर. एस्., सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष श्री पी. सी. दासगुप्ता, एम्. ए., संग्रहालय सहाय्यक, छायाचित्रकार व मानचित्रकार, संग्रहालय चित्रकार, रक्षक आणि चार परिचारक. अंशकालीन उत्खनन अधिकारी (अवैतनिक)—श्री के. जी. गोस्वामी, एम्. ए., मुख्य रसायनज्ञ—डॉ. एम्. एन्. बसू, एम्. एस्सी., डी. फिल., आणि शिक्षणाधिकारी (अवैतनिक)—डॉ. के. के. गांगुली, एम्. ए., डी. फिल.

**आर्थिक तरतूद :** वार्षिक तरतूद रु. ४३,६५० इतकी असून पुराणवस्तूंच्या खरेदीकरिता ३००० रुपयांचें आवर्तक अनुदान मिळतें

**अभिप्राय :** संग्रहालय विद्यापीठात मध्यवर्ती अशा जागीं असून तेथें विद्यार्थी, संशोधन करणारे विद्यार्थी आणि सामान्य जनता यांना सहज जाता येऊं शकतें. दररोज सरासरी १४ आणि दरवर्षी सुमारें ३६०० प्रेक्षक

करण्याचा प्रस्ताव मांडण्यात आला व त्याप्रमाणें तारीख १८ एप्रिल १८९५ रोजीं वंगीय साहित्य परिषद् स्थापन करण्यांत आली सन १९०० मध्ये रवींद्रनाथ टागोर, सत्येंद्रनाथ टागोर, ज्योतिरिंद्रनाथ टागोर, गगनेंद्रनाथ टागोर, रजनीकांत गुप्ता व इतर उत्साही लोकांनीं एका सार्वजनिक ठिकाणीं ही परिषद् स्थापन करण्याचें ठरविलें परिषदेच्या सभासदांची संख्या क्रमाक्रमानें वाढतच होती परिषद् स्थापन झाल्यावर सहा वर्षांच्या आतच कोसीमबझारच्या महाराजा मणिंद्रचंद्र नंदी यांजजवळ जागेसाठीं मागणी केली त्याप्रमाणें त्यांनीं अपर सरक्युलर रोडवरील हाउसी बागन या ठिकाणीं परिषदेसाठीं आनंदानं जागा दिली त्या ठिकाणीं रु २७,००० खर्चून बांधलेल्या नव्या इमारतींत परिषद् सन १९१० मध्ये हलविण्यात आली रवींद्रनाथ टागोर, शरत्कुमार रॉय व इतर सभासद असलेलें एक विश्वस्त मंडळ नेमण्यात आलें

अध्यक्ष, उपाध्यक्ष, चिटणीस, साहाय्यक चिटणीस, 'परिषद् पत्रिका' ह्या पत्रिकेचे संपादक, ग्रंथपाल व खजिनदार अशी पदाधिकाऱ्यांची निवड होऊन परिषदेचा कारभार सुरू झाला त्यानंतर सात वर्षांनीं पुराणवस्तुसंग्रहावर देखरेख ठेवण्यासाठीं संग्रहालयाध्यक्षाची जागा निर्माण करण्यात आली व त्या जागेवर नगेंद्रनाथ वसु यांची नेमणूक केली गेली संग्रहालयातील हस्तलिखितांत बरीच वाढ झाल्यामुळे त्यांची काळजी घेण्यासाठीं रक्षकाची आणखी जागा निर्माण करण्यात आली व त्या जागेवर प्रोफेसर दुर्गामोहन भट्टाचार्य यांना नेमण्यात आलें परिषदेचे पहिले अध्यक्ष श्री रमेशचंद्र दत्त यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ परिषदेच्या इमारती नजीकच रमेश भवन या नावाची एक दुमजली इमारत १९२९ सालीं बांधण्यात आली १९३७ सालीं कंथालपारा, नैहाती येथील श्री बंकीमचंद्र चतर्जी यांचा राहता वाडा त्यांच्या नातवांनीं परिषदेस बहाल केला परिषदेच्या संस्थापक-सभासद रजनीकांत गुप्ता यांचें चित्र सन १९१० मध्ये तेथें लावल्यानंतर दुर्मिळ अशा पोर्ट्रेट रंगचित्रांचा संग्रह करण्यास उत्तेजन मिळालं व आज परिषदेकडे अत्यंत दुर्मिळ चित्रांचा मौल्यवान साठा आहे १९०६ सालीं रंगपूर येथें परिषदेची शाखा उघडण्यात आली व त्यानंतर आणखी तीस शाखा उघडण्यात आल्या त्यापैकीं अकरा शाखा धरून अस्तित्वात आहेत पत्रिकेशिवाय परिषदेनं अनेक पुस्तकें प्रकाशित केलेलीं आहेत १९१७ सालीं भारतीय राष्ट्रीय सभेच्या कलकत्ता अधिवेशनाच्या वेळीं परिषदेनं आपल्याकडील पुराणवस्तूंचं प्रदर्शन भरविलें ह्या प्रदर्शनामुळं ज्या ठिकाणीं ह्या वस्तु ठेवण्यात आल्या होत्या त्या रमेश भवनमध्यें कायमचं संग्रहालय स्थापन करण्यास चालना मिळाली संग्रहालयाच्या प्रारंभींच्या अवस्थेंत परिषदेचे तेव्हांचे साहाय्यक चिटणीस श्री आर डी बानर्जी यांनीं प्राचीन नाणीं व मूर्ती मिळविण्याच्या कामीं फार मदत केली हीं नाणीं व मूर्ती यांविषयींचं वर्णनात्मक माहिती पुस्तक त्यांनीं सन १९२२ मध्यें लिहिलं दहा वर्षांनंतर एम् एम् गांगुली यांनीं या माहितीपुस्तकात सुधारणा करून तें अगदीं अद्यावत केलं

**व्याप्ति व संग्रह** वंगीय साहित्य परिषदेकडे अनेक जुनीं हस्तलिखितं व पाल शैलीच्या कित्येक मौल्यवान शिल्पकृती असून त्यामध्यें एक सदाशिव मूर्ती व कांहीं बौद्धांच्या मूर्ती आहेत पाल काळातील धातूंच्या मूर्तींचा अभ्यास करण्यासाठीं इतर पुराणशास्त्रविषयक अवशेषांबरोबर या मूर्तींची विशेषत सागर दिघी येथील हृषीकेशाची बैठी मूर्ति, विष्णूची उभी मूर्ति व गरुडध्वजधारी अनेकभुज विष्णूची मूर्ति, ह्यांची अमोल मदत होते

हस्तलिखितांच्या संग्रहामध्यें जुन्या बंगाली भाषेंतील सुमारें ३,२४६, संस्कृत भाषेंतील २,३९४ व तिबेटी, उडिया, हिंदी, आसामी व फारसी यांसारख्या इतर भाषांतील २६४ हस्तलिखितं आहेत त्याचप्रमाणें जुनीं नाणीं, ताम्रपट, तिबेटी 'टंका' वगैरे सारखीं जुनी रंगचित्रें, बंकीमचंद्र यांच्यासारख्या प्रसिद्ध कवींनीं व लेखकांनीं वापरलेल्या वस्तु, जुने करारनामे व इतर दस्तऐवज, जुनीं पत्रं, प्रसिद्ध लेखकांच्या लेखांचीं हस्तलिखितं, कांहीं वैशिष्ट्यपूर्ण विक्री व विश्वस्त खत, पुस्तकांचा बराच मोठा संग्रह व ख्यातनाम साहित्यिकांचीं तैलचित्रें व पुतळे यांचाही त्या संग्रहात समावेश होतो

**शैक्षणिक कार्य** वंगीय साहित्य परिषदेचं एक बरंच मोठं ग्रंथालय असून तें संग्रहालयाच्या ताब्यात दिलेलं आहे साधारणत व सदस्यांच्या उपयोगासाठीं आहे वेळोवेळीं अभ्यासू विद्वानांचीं व्याख्यानं ठेवण्यात येतात आणि परिषदेकडे एक चित्रदर्शक ( प्रोजेक्टर ) असल्यानं, व्याख्यान देतांना, मिळतील त्या ठिकाणाहून प्रकाशचित्रें मिळवून तीं दाखविण्यात येतात अभ्यासू विद्वान संग्रहालयास भेट देऊन तेथील वस्तूंचा उपयोग करतात परंतु नेहमीं प्रेक्षकांबरोबर फिरून संग्रहालय दाखविण्याची कोणतीहि खास व्यवस्था नाहीं तथापि, संग्रहालयाध्यक्ष व इतर सेवकवर्ग प्रेक्षकांना शक्य ती मदत करण्यास तयार असतात दरवर्षी, प्रतिष्ठादिन महोत्सवाच्या वेळीं प्रदर्शन भरविण्यांत येतं कलकत्ता विद्यापीठाचे पदव्युत्तर शिक्षण घेणारे विद्यार्थी ह्या संग्रहालयास वारंवार भेट देतात

**प्रकाशनें** ( १ ) वंगीय साहित्य परिषदेच्या संग्रहालयातील शिल्पकृतीसंबंधीं पुस्तिका व ( २ ) परिषद् परिचय

**कामाचे तास** गुरुवार व सार्वजनिक सुटीचे दिवस खेरीजकरून रोज दुपारीं १ तें सायंकाळीं ७ पर्यंत उघडें असतें

**प्रवेश** विनामूल्य

**नियामक मंडळ** हें संग्रहालय वंगीय साहित्य परिषदेच्या कार्यकारी समितीच्या नियंत्रणासाठीं आहे

**सेवकवर्ग** संग्रहालयाचा कारभार परिषदेकडून चालविला जात असल्यामुळें ह्या संग्रहालयासाठीं निराळा सेवकवर्ग नाहीं परिषदेच्या वार्षिक सभेच्या वेळीं एका विद्वान सदस्याची संग्रहालयाचा अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष म्हणून निवड केली जाते सध्या श्री सोमेंद्रचंद्र नंदी, एम् ए हे संग्रहालयाध्यक्ष आहेत

**आर्थिक तरतूद** हें संग्रहालय परिषदेचा एक भाग असल्यामुळं संग्रहालयासाठीं अंदाजपत्रकात निराळी तरतूद नाहीं

**अभिप्राय** हें संग्रहालय शहराच्या मध्यभागीं सोयीस्कर अशा ठिकाणीं असून सरासरी रोज दहा व दर वर्षी ३५०० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात तथापि वार्षिक प्रतिष्ठादिनाच्या दिवशीं प्रेक्षकांची संख्या विशेष असते संग्रहालयांतील वस्तु योग्य रीतीनें ठेवण्यासाठीं संग्रहालयाची इमारत सोयीस्कर व पुरेशी नाहीं संग्रहालयाच्या वाढीसाठीं व वस्तूंची योग्य मांडणी करण्यासाठीं भरपूर जागेची आवश्यकता आहे नाणीं, व इतर मौल्यवान वस्तु सुरक्षित अशा ठिकाणीं बंदोबस्तानं ठेवलेल्या आहेत संमतकृती साठवून ठेवण्यासाठीं जागा नाहीं या संग्रहालयातील वस्तु संशोधन खरेदी, उत्खनन

विषयांवरील अतिशय उपयुक्त माहिती असल्यामुळे हा संग्रह म्हणजे भारताने जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत व विज्ञानाच्या अंगांत केलेल्या प्रगतीचें दर्शक होय. ह्या अद्वितीय संग्रहांत भारतातील प्रत्येक भाषा व प्रत्येक लिपी यांचा अंतर्भाव झालेला असून भारतीय तत्त्वज्ञानविषयक अभ्यासपूर्ण माहिती त्यांत मिळते. त्याचप्रमाणें सुंदर आकृती असलेलीं हस्तलिखितें सुद्धा तितकींच उल्लेखनीय असून तीं इ. स. च्या १० व्या शतकाइतक्या जुन्या काळचीं आहेत.

( २ ) इस्लामी विभाग : या विभागांत अरबी, फारसी, तुर्की, पुश्तू इत्यादि मुसलमानी भाषांतील छापील पुस्तकें व हस्तलिखितें आहेत. या विभागांतील हस्तलिखितांची संख्या ६,००० वर असून तीं इ. स. १२ व्या शतकाच्या सुरवातीच्या काळापासूनचीं आहेत. ह्या हस्तलिखितांत निरनिराळ्या विषयांवरील उद्बोधक माहिती असून त्यांमध्ये इतिहासाच्या व विद्येच्या प्रत्येक शाखेची माहिती आहे. त्यांपैकीं कित्येक हस्तलिखितें अत्यंत दुर्मिळ व अद्वितीय अशीं आहेत. सुंदर व वळणदार हस्ताक्षरांचे नमुने हें ह्या विभागाचें खास वैशिष्ट्य आहे. त्यांपैकीं काहीं हस्तलिखितांवर उत्तम प्रतीच्या व मोलाच्या रंगचित्रांच्या आकृती आहेत. ह्या विभागांतील काहीं वस्तू मोंगल बादशाही ग्रंथालयामधील आहेत.

( ३ ) चिनी तिबेटी विभाग : यांत चिनी व तिबेटी भाषांतील हस्तलिखितें व भूर्जपत्रें आहेत. चिनी भाषेंतील हस्तलिखितें हीं भारतातील बुद्ध यात्रेकरूंचीं चिनी भाषांतरें आहेत व सोसायटीकडे असलेल्या तिबेटी हस्तलिखितांच्या संग्रहांत कंग्यूर व बस्तंगयूर या ग्रंथांचा संपूर्ण संच असून शिवाय काहीं निरनिराळ्या लेखकांनीं लिहिलेलीं भूर्जपत्रें व हस्तलिखितें आहेत.

सोसायटीच्या ग्रंथालयांत, मराठी, हिंदी, आसामी, इत्यादि भाषांतील ग्रंथांचीं हस्तलिखितेंहि असून तीं ह्या देशाचा इतिहास व संस्कृती यांच्या अभ्यासासाठीं फारच उद्बोधक आहेत.

**शैक्षणिक कार्य** : एशिआटिक सोसायटी तिच्या सदस्यांना सुरी असून तिच्या भव्य ग्रंथालयाचा उपयोग अभ्यासू विद्वान्, विद्यार्थी व सोसायटीचे सदस्य मोकळेपणानें करतात. ग्रंथालयांत सुमार दहा लक्ष ग्रंथ व २६,००० हस्तलिखितें असून त्यांचा हा संग्रह अत्यंत दुर्मिळ आहे. ग्रंथपालाकडून प्रेक्षकांना व अभ्यासू विद्वानांना ग्रंथालयांतील दुर्मिळ व अमोल अशा संग्रहाविषयीं पाहिजे असल्यास माहिती मिळू शकते. हें ग्रंथालय म्हणजे दुर्मिळ साहित्याचा ठेवाच असल्यानें उच्च शिक्षण व संशोधनकार्य यासाठीं विश्वविद्यालयाकडून ह्या संस्थेचा सर्रास उपयोग केला जातो

**प्रकाशनें** : आशिआई संशोधनकार्य. सन १७८८–१८३९ या प्रकाशनाचे २० भाग असून एक सूचि आहे. बंगालच्या एशियाटिक सोसायटीची पत्रिका : प्रथम माला सन १८३२–१९०४ या प्रकाशनाचे प्रत्येकी दोन भाग असलेले ७५ ग्रंथ, शिवाय काहीं जादा व पुरवणी अंक आहेत.

१८६५–१९०४ या प्रकाशनाचे ४० भाग आहेत. १९०५-१९३४. याचे ३० भाग आहेत ( एकत्र केलेली पत्रिका व समकक्ष द्वितीय माला तृतीयमाला पत्रें, विज्ञान व वार्षिक पुस्तक

बंगालच्या रॉयल एशियाटिक सोसायटीची पत्रिका :–( १९३५–५० १६ एशियाटिक सोसायटीची पत्रिका ग्रंथ १७ पासून, ( १९५१ ).

२. बंगालच्या एशिआटिक सोसायटीला १०० वर्षें पूर्ण झाल्याच्या प्रसंगी प्रसिद्ध केलेल्या शताब्दीस्मारक ग्रंथात, संशोधनकार्य, पत्रिका व स्मरणग्रंथ यांची सूचि प्रसिद्ध केलेली होती. प्रकाशन मालेच्या सर्व पुस्तकांची एक सविस्तर व एकत्रित केलेली सूचि सध्या छापली जात आहे.

४. भारतीय ग्रंथसार सोसायटीच्या कामगिरीमध्यें सर्वांत महत्त्वाचें कार्य म्हणजे ' भारतीय ग्रंथसार ' ह्या ग्रंथाचें प्रकाशन होय. या ग्रंथांत संस्कृत, अरबी, फारसी व इतर पौर्वात्य भाषांतील पौर्वात्य साहित्यनाट्य असून त्या मालेंत शेंकडों दुर्मिळ साहित्य आलेलें असून त्यांत आजपर्यंत जवळजवळ २,५०० प्रतिकृती प्रसिद्ध करण्यांत आलेल्या आहेत. तिबेटी भाषा व संस्कृति यांच्या अभ्यासाला प्रथमतः चालना देण्यांत या सोसायटीनेंच पुढाकार घेतला हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

५. संकीर्ण प्रकाशनें : वर सांगितलेल्या ग्रंथांशिवाय सुमारें ८० इतर पौर्वात्य लेख ह्या संस्थेच्या मदतीनें अगर तिच्या देखरेखीखालीं प्रसिद्ध करण्यांत आले. त्याचप्रमाणें हस्तलिखितांसाठीं केलेल्या शोधांवरील कित्येक अहवाल ह्या सोसायटीच्या नियमानें प्रसिद्ध केले गेले त्या अहवालामुळें विस्मृतीमध्यें दडलेल्या अनेक विषयांवरील भारतीय साहित्याचा पुनर्जन्म झाला.

६. ' मोनोग्राफ ' या नावानें साहित्य व विज्ञान या शाखांतील महत्त्वाच्या संशोधनकार्याच्या माहितीस वाहिलेली नवीन प्रकाशनमाला अलीकडेच सुरू केलेली आहे. नऊ ग्रंथ यापूर्वीच प्रसिद्ध झालेले आहेत.

**कामाचे तास** : रविवार व सुट्टीचे दिवस सोडून दररोज हें संग्रहालय रोज दुपारीं १२ ते संध्याकाळीं ७ पर्यंत उघडें रहातें.

**प्रवेश** : विनामूल्य.

**नियामक मंडळ** : एशिआटिक सोसायटीच्या संग्रहालयाचा कारभार विद्वान् मंडळाकडून पाहिला जातो.

**सेवकवर्ग** : सोसायटीच्या सेवकवर्गाव्यतिरिक्त इतर खास सेवकवर्ग नाहीं.

**आर्थिक तरतूद** : माहीत नाहीं.

**अभिप्राय** : एशियाटिक सोसायटीचें संग्रहालय कलकत्ता शहरांत मध्यवर्ती अशा ठिकाणीं असून तेथें सहज जातां येतें. प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या १२५ असून वार्षिक सरासरी संख्या ३,६९४ इतकी आहे. संग्रहालयांतील अनेक वस्तूंच्या मानानें संग्रहालयाची सध्याची इमारत अपुरी वाटते व मौल्यवान् व दुर्मिळ हस्तलिखितें खराब होऊं नयेत म्हणून त्यांना धुरी देणें व त्यांच्यावर संरक्षक आच्छादनें चढविणें याव्यतिरिक्त इतर कोणतीहि प्रयोगशाळेची सोय तेथें नाहीं. संग्रहालयांतील वस्तु बाहेर पाठविल्या जात नाहींत. सोसायटीच्या आवारांत खास व ठराविक वेळीं प्रदर्शनें भरविलीं जातात. खरेदी करून, उत्खननांतील वस्तु मिळवून व देणग्यांच्याद्वारें वस्तु संग्रहित केल्या जातात.

## ६. वंगीय साहित्य परिषदेचें संग्रहालय

**स्थापना** : १९१०

**पूर्वेतिहास** : तारीख २३ जुलै १८९३ रोजीं भरलेल्या बंगाली अकादमीच्या सभेंत बंगाली भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्धीसाठीं एक संस्था स्थापन

करण्याचा प्रस्ताव मांडण्यात आला व त्याप्रमाणें तारीख १८ एप्रिल १८९५ रोजीं वंगीय साहित्य परिषद् स्थापन करण्यात आली सन १९०० मध्यें रविंद्रनाथ टागोर, सत्यंद्रनाथ टागोर, ज्योतिरिंद्रनाथ टागोर, गगनंद्रनाथ टागोर, रजनीकांत गुप्ता व इतर उत्साही लोकांनीं एका सार्वजनिक ठिकाणीं ही परिषद् स्थापन करण्याचें ठरविले परिषदेच्या सभासदांची संख्या क्रमाक्रमानें वाढतच होती परिषद् स्थापन झाल्यावर सहा वर्षांच्या आतच कोसीमबझारचे महाराजा मणिंद्रचंद्र नंदी यांजजवळ जागेसाठीं मागणी केली त्याप्रमाणें त्यांनीं अपर सर्क्युलर रोडवरील हाऊसी वागन या ठिकाणीं परिषदेसाठीं आनदान जागा दिली. त्या ठिकाणीं रु २७,००० खर्चून बांधलेल्या नव्या इमारतींत परिषद् सन १९१० मध्य हलविण्यात आली रविंद्रनाथ टागोर, शरत्कुमार रॉय व इतर सभासद असलेलें एक विश्वस्त मंडळ नेमण्यात आलं.

अध्यक्ष, उपाध्यक्ष, चिटणीस, साहाय्यक चिटणीस, 'परिषद् पत्रिका' ह्या पत्रिकेचे संपादक, ग्रंथपाल व खजिनदार अशी पदाधिकाऱ्यांची निवड होऊन परिषदेचा कारभार सुरू झाला त्यानंतर सात वर्षांनीं पुराणवस्तुसंग्रहावर देखरेख ठेवण्यासाठीं संग्रहालयाध्यक्षाची जागा निर्माण करण्यात आली व त्या जागेवर नरेंद्रनाथ वसु यांची नेमणूक केली गेली संग्रहालयातील हस्तलिखितात बरीच वाढ झाल्यामुळें त्यांची काळजी घेण्यासाठीं रक्षकाची जादा जागा निर्माण करण्यात आली व त्या जागेवर प्रोफेसर दुर्गामोहन भट्टाचार्य यांना नेमण्यात आलें परिषदेचे पहिले अध्यक्ष श्री रमेशचंद्र दत्त यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ परिषदेच्या इमारती नजीकच रमेश भवन या नावाची एक दुमजली इमारत १९२९ सालीं बांधण्यात आली १९३७ सालीं कथालपारा, नैहाती येथील श्री बंकीमचंद्र चतर्जी यांचा राहता वाडा त्यांच्या नातवांनीं परिषदेस बहाल केला. परिषदेचे संस्थापक-सभासद रजनीकांत गुप्ता यांच चित्र सन १९१२ मध्य तेथें लावल्यानंतर दुर्मिळ अशा पोर्ट्रेट रंगचित्रांचा संग्रह करण्यास उत्तेजन मिळालें व आज परिषदेकडे अत्यंत दुर्मिळ चित्रांचा मौल्यवान साठा आहे १९०६ सालीं रंगपूर येथें परिषदेची शाखा उघडण्यात आली व त्यानंतर आणखी तीस शाखा उघडण्यात आल्या त्यापैकीं अकरा शाखा अजून अस्तित्वात आहेत पत्रिकेशिवाय परिषदेनें अनेक पुस्तकं प्रकाशित केलेलीं आहेत. १९१७ सालीं भारतीय राष्ट्रीय सभेच्या कलकत्ता अधिवेशनाच्या वेळीं परिषदेनें आपल्याकडील पुराणवस्तूंचें प्रदर्शन भरविलें ह्या प्रदर्शनामुळं ज्या ठिकाणीं ह्या वस्तु ठेवण्यात आल्या होत्या त्या रमेश भवनमध्यें कायमचें संग्रहालय स्थापन करण्यास चालना मिळाली संग्रहालयाच्या प्रारंभीच्या अवस्थेंत परिषदेचे तेव्हांचे साहाय्यक चिटणीस श्री. आर डी बानर्जी यांनीं प्राचीन नाणीं व मूर्ती मिळविण्याच्या कामीं फार मदत केली ही नाणीं व मूर्ती याविषयींचें वर्णनात्मक माहिती पुस्तक त्यांनीं सन १९२२ मध्यें लिहिलं दहा वर्षांनंतर एम् एम् गांगूली यांनीं या माहितीपुस्तकात सुधारणा करून तें अगदीं अद्यावत केलं.

**व्याप्ति व संग्रह :** वंगीय साहित्य परिषदेकडे अनेक जुनीं हस्तलिखितें व पाल शैलीच्या कित्येक मौल्यवान शिल्पकृती असून त्यामध्यें एक सदाशिव मूर्ती व कांहीं मौर्यांच्या मूर्ती आहेत पाल काळांतील धातूच्या मूर्तींचा अभ्यास करण्यासाठीं इतर पुराणशास्त्रविषयक अवशेषांबरोबर या मूर्तींची विशेषत सागर दिघी येथील हृषीकेशाची बैठी मूर्ति, विष्णूची उभी मूर्ति व गरुडध्वजधारी अनेकभुज विष्णूची मूर्ति, ह्यांची अमोल मदत होते

हस्तलिखिताच्या संग्रहामध्यें जुन्या बंगाली भाषेंतील सुमारें ३,२४६, संस्कृत भाषेंतील २,३९४ व तिबेटी, उडिया, हिंदी, आसामी व फारसी यासारख्या इतर भाषांतील २६४ हस्तलिखितें आहेत त्याचप्रमाणें जुनीं नाणीं, ताम्रपट, तिबेटी 'टंका' वगैरे सारखीं जुनीं रंगचित्रे, बंकीमचंद्र यांच्यासारख्या प्रसिद्ध कवींनीं व लेखकांनीं वापरलेल्या वस्तु, जुने करारनामे व इतर दस्तऐवज, जुनीं शस्त्रें, प्रसिद्ध लेखकाच्या लेखांचीं हस्तलिखितें, कांहीं वैशिष्ट्यपूर्ण विक्री व बक्षिसपत्रें, पुस्तकांचा बराच मोठा संग्रह व ख्यातनाम साहित्यिकांचीं तैलचित्रे व पुतळे यांचाही त्या संग्रहात समावेश होतो

**शैक्षणिक कार्य :** वंगीय साहित्य परिषदेचं एक स्वतंत्र मोठं ग्रंथालय असून तें संग्रहालयाच्या ताब्यात दिलेलं आहे. साधारणत तें सदस्यांच्या उपयोगासाठीं आहे वेळोवेळीं अभ्यासू विद्वानांचीं व्याख्यानं ठेवण्यात येतात आणि परिषदेकडे एक चित्रक्षेपक ( प्रॉजेक्टर ) असल्यानं, व्याख्यान देताना, मिळतील त्या ठिकाणाहून प्रकाशचित्रें मिळवून तीं दाखविण्यात येतात अभ्यासू विद्वान संग्रहालयास भेट देऊन तेथील वस्तूंचा उपयोग करतात. परंतु नेहमीं प्रेक्षकांबरोबर फिरून संग्रहालय दाखविण्याची कोणतीहि खास व्यवस्था नाहीं तथापि, संग्रहालयाध्यक्ष व इतर सेवकवर्ग प्रेक्षकांना शक्य ती मदत करण्यास तयार असतात दरवर्षी, प्रतिष्ठादिन महोत्सवाच्या वेळीं प्रदर्शन भरविण्यात येतं. कलकत्ता विद्यापीठाचे पदव्युत्तर शिक्षण घेणारे विद्यार्थी ह्या संग्रहालयास वारंवार भेट देतात.

**प्रकाशनें :** ( १ ) वंगीय साहित्य परिषदेच्या संग्रहालयातील शिल्पकृतीसंबंधीं पुस्तिका व ( २ ) परिषद् परिचय

**कामाचे तास :** गुरुवार व सार्वजनिक सुटीचे दिवस खेरीजकरून रोज दुपारीं १ ते सायंकाळीं ७ पर्यंत उघडं असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हे संग्रहालय वंगीय साहित्य परिषदेच्या कार्यकारी समितीच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** संग्रहालयाचा कारभार परिषदेकडून चालविला जात असल्यामुळें ह्या संग्रहालयासाठीं निराळा सेवकवर्ग नाहीं परिषदेच्या वार्षिक सभेच्या वेळीं एका विद्वान सदस्याची संग्रहालयाचा अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष म्हणून निवड करीं जाते सध्या श्री सोमेंद्रचंद्र नंदी, एम् ए हे संग्रहालयाध्यक्ष आहेत.

**आर्थिक तरतूद :** हें संग्रहालय परिषदेचा एक भाग असल्यामुळं संग्रहालयासाठीं अंदाजपत्रकात निराळी तरतूद नाहीं.

**अभिप्राय :** हें संग्रहालय शहराच्या मध्यभागीं सोयीस्कर अशा ठिकाणीं असून सरासरी रोज दहा व दर वर्षी ३५०० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात तथापि वार्षिक प्रतिष्ठादिनाच्या दिवशीं प्रेक्षकांची संख्या विशेष असते. संग्रहालयातील वस्तु योग्य रीतीनें ठेवण्यासाठीं संग्रहालयाची इमारत सोयीस्कर व पुरेशी नाहीं संग्रहालयाच्या वाढीसाठीं व वस्तूंची योग्य मांडणी करण्यासाठीं भरपूर जागेची आवश्यकता आहे नाणीं, व इतर मौल्यवान वस्तु सुरक्षित अशा ठिकाणीं बंदोबस्तानं ठेवलेल्या आहेत संपत्ती सांठवून ठेवण्यासाठीं जागा नाहीं या संग्रहालयातील वस्तु संशोधन, खरेदी, उत्खनन

व देणगी इत्यादि विविध मार्गांनी मिळविल्या आहेत. गुप्तनिधींतील वस्तु संग्रहालयास स्वीकारण्यासाठीं मान्यता मिळालेली आहे. संग्रहालयातील पुरातन वस्तु खास प्रदर्शनांत मांडण्यासाठीं मधून मधून पाठविण्यात येतात. संग्रहालय आपलीं प्रकाशनें इतर संग्रहालयांना पाठवितें व त्याच्या मोबदल्यात इतर संग्रहालयांचीं प्रकाशनें मिळवितें.

**७. गुरुसदय संग्रहालय, ब्रतचारी ग्राम** (ठाकूरपूर, पो. ऑ. जोका, २४ *परगणा*)

**स्थापना :** इ. सन १९३२

**पूर्वेतिहास :** बंगाल ब्रतचारी मंडळाचे संस्थापक कै. श्री. गुरुसदय दत्त, आय. सी. एस. यांनी बंगाली लोककलावस्तूंचा बराच मोठा संग्रह केला होता. त्यांनी ग्रामीण विद्यापीठ (जनशिक्षा प्रतिष्ठान) योजनेंतील आवश्यक भाग म्हणून लोककला व हस्तकला वस्तूंचें एक संग्रहालय स्थापण्याचें योजिलें होतें व त्यासाठीं त्यांनी बंगालच्या सरकारमार्फत डायमंड हार्बर रोडवर ठाकूरपुकूर येथें (कलकत्त्यापासून आठ मैलांवर) सुमारें १०० बिघे जमीन मिळविली होती. आता ही जागा ब्रतचारीग्राम म्हणून ओळखिली जाते.

**व्याप्ति व संग्रह :** येथील संग्रहांत निरनिराळ्या तऱ्हेचे मौल्यवान प्राचीन लेख, *रंगचित्रें* (पटवा चित्र), लाल मातीच्या वस्तु, शिल्पकृती, कठे, प्राचीन मृत्पात्रें, प्रतिमा, खेळणीं, दगडाच्या मूर्ती आणि वास्तुशास्त्र कलेचे उत्कृष्ट नमुने, जुन्या काळच्या पणत्या इत्यादि वस्तु आहेत.

श्री. दत्त यांनी आपल्या जवळचा २,५०० पेक्षा अधिक वस्तूंचा संग्रह बंगाल ब्रतचारी संस्थेला मृत्युपत्राद्वारें देणगी म्हणून दिला होता. श्री. दत्त यांच्या मृत्यूनंतर डॉ. एस. राधाकृष्णन्, डॉ. मेघनाद सहा, श्री. बी. पी. सिंघ रॉय, श्री. तुषारकांति घोष, श्री. बद्रीदास गोएंका, श्री. हुमायून कबीर, श्री. सी. जी. विश्वास (न्यायमूर्ती), श्री. रामदेव चोखानी, श्री. के. सजीव कामथ व इतर प्रसिद्ध व्यक्तींनीं श्री. गुरुसदय दत्त यांच्या ह्यातींत सुरू केलेलें राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या बाबतींत अत्यंत परिणामकारक ठरलेलें हें काम पुढें चालू ठेवून त्यात वाढ करण्याच्या कामीं साह्य देण्याविषयीं लोकांस आवाहन केलें होतें. संग्रहालयाच्या एकमजली इमारतीसाठीं सुमारें रु. ३७,००० खर्च आला. सध्यां पहिल्या मजल्याचें काम पूर्ण झालें असून आवश्यक तो पैसा जमा झाल्यावरोबर दुसऱ्या मजल्याचें बांधकाम सुरू करता येईल

**शैक्षणिक कार्य :** या संग्रहालयात पुढील प्रकारचें विविध सामाजिक व शैक्षणिक कार्य चालतें :—

(१) ब्रतचारी शिक्षणाची मध्यवर्ती संस्था (यात लोकांना शीलसंवर्धनाचें व परंपरागत लोकविद्येच्या माध्यमाद्वारें नागरिकत्वाचें शिक्षण देण्यांत येतें.)

(२) शिल्पायतन

(३) चित्रशाळा

(४) प्राथमिक मूलोद्योग शाळा

(५) 'ब्रतचारी विद्याश्रम' नावाचें वसतिगृहयुक्त विद्यालय

(६) आरोग्यकेंद्र

(७) सामाजिक शिक्षण केंद्र (प्रौढांसाठीं)

(८) विविधोद्देशी सहकारी संस्था

(९) कृषि व मत्स्यसंवर्धन

(१०) लोककला व हस्तकला संग्रहालय, इ.

**प्रकाशनें :** श्री. गुरुसदय दत्त यांनी लिहिलेलें *'बंगालचीं लोकशिल्पें'* हें पुस्तक प्रकाशित करण्यात आलेलें असून १९५।१, विपिन बिहारी गांगुली रस्ता (जुना पत्ता—१९१, बोबझार रस्ता), कलकत्ता–१२ येथील बंगाल ब्रतचारी संस्थेमार्फत त्याची विक्री करण्यात येते.

**कामाचे तास :** गुरुवारखेरीज रोज दुपारीं १२ ते ४ पर्यंत उघडें असते.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय बंगाल ब्रतचारी संस्थेच्या सदस्यांच्या (म्हणजे कार्यकारी समितीच्या) नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग :** सध्या संस्थेच्या एका शिक्षकाकडे संग्रहालयाचें काम सोंपविलेलें असून अद्याप संग्रहालयाध्यक्ष नेमण्यात आलेला नाही.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं निराळी आर्थिक तरतूद नाही.

**अभिप्राय :** कांही नाही.

**कंथलपारा (नईहाटी), लोकसंख्या ७५,५९६**

**ऋषि बंकीम ग्रंथालय व संग्रहालय**

**स्थापना :** इ. सन १९५४

**पूर्वेतिहास :** बंगालात सन १९३८ मध्यें सर्वत्र बंकीमचंद्र–शताब्दि महोत्सव साजरा करण्यात आला. त्यावेळीं, बंकीमचंद्रांनी आपलें वंदे मातरम् हें अमर गीत बंकिमप्रेरित घराच्या ज्या भागात रचलें व आपल्या कादंबऱ्या व इतर लेख लिहिले तो भाग बंगीय साहित्य परिषदेनें खरेदी केला व सन १९५० पर्यंत तो सुस्थितींत ठेवला. १९५४ सालीं हें घर एक ग्रंथालय व बंकीमचंद्रांशीं संबंध असलेल्या वस्तूंचें संग्रहालय सुरू करण्यासाठीं पश्चिम बंगाल सरकारच्या स्वाधीन करण्यात आलें. या ग्रंथालयात बंकीमचंद्रांनी लिहिलेले ग्रंथ तसेंच त्यांच्या जीवनावर इतरांनीं लिहिलेले ग्रंथ आहेत.

या इमारतींत तीन लहान खोल्या व एक दिवाणखाना असून इमारतीला लागूनच एक बागही आहे. येथें ठेवलेल्या बंकीमचंद्राविषयींच्या वस्तूंतील बहुतेक वस्तु त्यांच्या बंधूचे नातू श्री शतजीव चतर्जी यांनी देणगी म्हणून दिलेल्या आहेत.

**व्याप्ति व संग्रह :** बंकीमचंद्र वापरीत असलेलें पागोटें, शाल, दिवा, पेटी इत्यादि वस्तु, त्यांनी निरनिराळ्या व्यक्तींस लिहिलेलीं १५० पत्रें, कांहीं हस्तलिखितें, त्यांच्या कुटुंबातील माणसांचीं १६ छायाचित्रें व त्यांच्याशीं संबंध असलेले व निरनिराळ्या व्यक्तींकडून मिळविलेले इतर अनेक कागदपत्र या संग्रहात ठेवलेले आहेत.

**शैक्षणिक कार्य :** विद्यार्थी व अभ्यासू विद्वान या संग्रहालयास नेहमीं भेट देत असतात. सामान्यपणें साहित्यविषयक पुस्तकांचें व विशेषतः बंकीमचंद्रांनीं लिहिलेल्या साहित्यविषयक पुस्तकांचें एक ग्रंथालय येथें आहे. संग्रहालयास भेट देणारीं शाळेंतील मुलें, महाविद्यालयातील विद्यार्थी व पदव्युत्तर अभ्यास करणारे विद्यार्थी यांना संग्रहालयांतील वस्तूंविषयीं

माहिती देण्यांत येते. संग्रहालयाध्यक्ष माहिती देण्याचें काम व ग्रंथपालाचेंहि काम करतात. बाहेरील विद्वान व तज्ज्ञ इसमांची व्याख्यानें अधूनमधून ठेवण्यात येतात. वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठ्या बंगाली भाषेंतील असून त्या अर्थबोधक आहेत. अगदीं जवळच असलेलें ऋषी बंकिमचंद्र महाविद्यालय ह्या संग्रहालयाविषयीं विशेष औत्सुक्य दाखवितें.

**प्रकाशनें :** काहीं नाहीं.

**कामाचे तास :** गुरुवार व सरकारी सुटीचे दिवस खेरीज करून रोज दुपारीं १२ ते सायंकाळीं ६ पर्यंत उघडें राहतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय पश्चिम बंगाल सरकारनें नेमलेल्या समितीच्या नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष व चौकीदार.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं वार्षिक अंदाजपत्रकांत रु. १,००० इतक्या रकमेची तरतूद आहे.

**अभिप्राय :** ग्रंथालय व संग्रहालय हीं सोईस्कर अशा जागी असून रोज सरासरी ५० व वर्षातून सुमारें १८२५० लोक संग्रहालयास भेट देतात. या संग्रहालयातील वस्तु देणग्या व खरेदी यांच्या द्वारें मिळविण्यात आल्या आहेत.

**मालदा :** लोकसंख्या ३७,४२०

### बी. आर. सेन संग्रहालय

**स्थापना :** इ. स. १९३७.

**पूर्वेतिहास :** गौर व पाडुआ काळांतील पुरातन वस्तु जमिनीच्या ज्या पट्ट्यांत सापडल्या तो मालदाचा प्रदेश संग्रहालयात ठेवण्यास योग्य अशा प्राचीन व मध्ययुगीन अवशेष गोळा करण्याच्या दृष्टीनें अतिशय उत्कृष्ट आहे. आणि याच गोष्टीमुळें मालदाचे त्यावेळचे जिल्हा मॅजिस्ट्रेट श्री. बी. आर. सेन, आय. सी. एस. आदि संग्रहालयाचे प्रवर्तक व त्यांना मदत करणारे बंगाल सिव्हिल सर्व्हिसचे श्री. के. सी. बर्मन यांना स्फूर्ति मिळून त्यांनीं हें संग्रहालय स्थापन करण्याचा प्रश्न हातीं घेतला. कै. प्रमथनाथ मिश्र, एम्. आर. ए. एस., यांनीं हें संग्रहालय सन १९३७ मध्यें स्थापन केलें तेव्हापासून त्यांनी त्याची उत्तम व्यवस्था ठेवण्याच्या कामीं मदत केली. ढाका विद्यापीठाचे तत्कालीन उपकुलगुरु डॉ. आर. सी. मजुमदार यांच्या हस्तें ह्या संग्रहालयाचें उद्घाटन १९३७ मध्यें करण्यात आलें. ह्या संग्रहालयाचा कारभार एक विश्वस्त मंडळ पाहतें. महामहोपाध्याय पंडित विधुशेखर शास्त्री हे ह्या विश्वस्तमंडळाचे एक सदस्य आहेत. मालदा येथील बी. आर. सेन सार्वजनिक ग्रंथालयाजवळ एका दालनात हें संग्रहालय आहे. राज्य सरकारनें ह्या संग्रहालयासाठीं इमारत बांधण्यास मंजुरी दिली असून त्याचें बांधकाम सुरू करण्यासाठीं चालू वर्षी रु. ३०,००० इतक्या रकमेची तरतूद केलेली आहे. भारतसरकारचा संस्था नोंदणी अधिनियम, १९६० (सन १९६० चा अधिनियम २१ वा) या अन्वयें ह्या संग्रहालयाची नोंदणी केलेली आहे.

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयांत ब्राह्मणकालीन देवदेवतांच्या कित्येक मूर्ति आहेत. त्यात सूर्य, विष्णु, देवी यांच्या अनेक प्रकारच्या मूर्ति, काहीं बौद्ध मूर्ति तसेंच इतरहि अनेक मूर्ति आहेत. दुसरा गोपाळदेव याचा ताम्रपटावरील लेखहि येथें आहे. नाण्यांच्या संग्रहांत बंगालचे प्रारंभीचे स्वतंत्र सुलतान, दिल्लीचे सुलतान, पठाण व मोंगल बादशहा यांचीं नाणीं व नेपाळ व त्रिपुरा येथील नाणीं आहेत. पुराणवस्तुशास्त्रदृष्ट्या महत्त्वाचे ग्रंथ व काहीं दुर्मिळ हस्तलिखितेंहि यात आहेत.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयात एक ग्रंथालय असून त्यात ३०० पुस्तकें व नियतकालिकें आहेत. हें ग्रंथालय खात्याच्या उपयोगासाठीं असून खाजगी व्यक्तींना सुद्धा त्याचा उपयोग करता येतो. संग्रहातील वस्तूंचा अभ्यास व निरीक्षण करण्यासाठीं सोय केलेली असून जिज्ञासू प्रेक्षकांना त्या वस्तूंविषयीं अधिक माहिती पुरविली जाते. मधूनमधून खास प्रदर्शनें भरविण्यात येतात. वस्तूंवरील नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी व बंगाली भाषांत आहेत. विद्यापीठाला संग्रहालयाबद्दल विशेष आस्था नसली तरी जिल्ह्यातील स्थानिक महाविद्यालयांना व शाळांना संग्रहालयाबद्दल विशेष कुतूहल वाटतें.

**प्रकाशनें :** (१) दुसरा गोपाळदेव याचे ताम्रपटावरील लेख, संपादक कै. प्रमथनाथ मिश्र, एम. आर. ए. एस. व डॉ. आर. सी. मजुमदार, श्री. के. सी. सुर एम. ए. यांना सापडलेल्या वस्तूसंबंधींचें पहिलें प्रकाशन; (२) गौर येथील भग्नावशेषाची मार्गदर्शिका. ही मार्गदर्शिका कै. प्रमथनाथ मिश्र यांनीं संकलित केली असून ती त्यावेळचे प. बंगालचे गव्हर्नर डॉ. एच. सी. मुकर्जी यांना अर्पण केली आहे. (३) सचित्र पोस्टकार्डाचा आल्बम. पश्चिम बंगाल सरकारचे विकास कमिशनर व मालदाचे पूर्वीचे जिल्हा मॅजिस्ट्रेट श्री. अशोक मित्र, आय. सी. एस. यांनीं त्या चित्रांचीं छायाचित्रें घेऊन तीं छापलीं आहेत.

**कामाचे तास :** रोज सकाळीं ७ ते ९ व संध्याकाळीं ६ ते रात्रीं ९ पर्यंत उघडें असतें. शनिवारीं फक्त स्त्रियासाठीं उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार एक विश्वस्तमंडळ व कार्यकारी समिति यांच्या मार्फत पाहिला जातो. सार्वजनिक ग्रंथालयाचे वर्गणीदार व आश्रयदाते यांच्यामधून दर वर्षी निवडणूक होऊन विश्वस्तमंडळ व कार्यकारी समिति निवडली जाते.

**सेवकवर्ग :** अवैतनिक चिटणीस व अवैतनिक सहाय्यक चिटणीस. पहारेकरी हाच एक पूर्णवेळ काम करणारा नोकर आहे.

**आर्थिक तरतूद :** रु. ८३० इतक्या रकमेची वार्षिक तरतूद असून तीपैकीं रु. ६०० इतक्या रकमेचें पश्चिम बंगाल सरकारकडून अनुदान मिळतें. रु. १२०/- इतक्या रकमेचें जिल्हा मंडळाकडून अनुदान मिळतें रु. ६० इतक्या रकमेचें नगरपालिकेकडून अनुदान मिळतें व रु. ५०/- सार्वजनिक ग्रंथालयाकडून अनुदान मिळतें.

**अभिप्राय :** मुसलमानांच्या अमदानींत बंगालची राजधानी असलेल्या प्राचीन गौर व पाडुआ पट्टयात सापडलेले मालदा जिल्ह्यातील व त्याच्या उपनगरातील अवशेष ठेवण्यासाठीं हें प्रादेशिक संग्रहालय स्थापन करण्यात आलें होतें. संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांची रोजची सरासरी संख्या ५० इतकी असते व खास प्रसंगीं ही संख्या मोठी असते. संग्रहालयाची इमारत अपुरी पडत असून ती सोयिस्कर नाहीं आणि संग्रहालयासाठीं योग्य अशी इमारत असावी अशी संग्रहालयाच्या अधिकाऱ्यांची इच्छा आहे. नाणीं व मौल्यवान् वस्तु चिटणीस व साहाय्यक चिटणीस यांच्या ताब्यात पोलादी

पेट्यात ठेवलेल्या असतात. संग्रहाची साधनें, संशोधन, रक्षण व देणगी ही आहेत. गुप्तलिपीत सापडलेल्या वस्तु ठेवण्यास संग्रहालयाला मान्यता मिळालेली आहे. देवाण घेवाण करण्याच्या तत्त्वावर वस्तूंची अदलाबदल करण्याचे धोरण संग्रहालयानें पत्करलें आहे. आपला पुराभिलेखविषयक, पुरावस्तुशास्त्रविषयक व नाणकशास्त्रविषयक संग्रह वाढवावा असेंच केवळ संग्रहालय अधिकाऱ्यांची इच्छा नसून ॲक्वेरिया व व्हिवेरियम या क्षेत्राच्या विकासाच्या एका प्रदर्शनालयाची भर घालावी असेंहि त्यांची इच्छा आहे. संग्रहालयांतील वस्तूंत, आठ मैलावर असलेल्या 'गुमति' प्रवेशद्वार संग्रहाची भर घालण्याचा प्रश्न देखील जागेच्या अभावी लांबणीवर टाकण्यात आला आहे.

शांतिनिकेतन : ( बोलपूर ), लोकसंख्या ७७,४८०.

## रवींद्र-सदन ( टागोर संग्रहालय )

स्थापना : १९४२.

पूर्वेतिहास : कविवर्य रविंद्रनाथ टागोर यांची स्मृति कायम ठेवण्यासाठी तारीख १ जुलै १९४२ रोजीं शांतिनिकेतन येथें संशोधन भवनाचें व स्मारक संग्रहालय म्हणून रवींद्र-सदन बांधण्यात आलें. उदयनच्या दक्षिण दालनांतील ज्या खोल्यांत कविवर्यांनी आपले अखेरचे दिवस घालविले त्या खोल्या श्री. रथिंद्रनाथ टागोर यांनी या कारणासाठीं उपलब्ध करून दिल्या. ग्रंथालय व पुराणवस्तुशाला जोडलेलें व रथिंद्रनाथ टागोर यांच्या अतिशय मौल्यवान असा संग्रहानें सुसज्ज असलेलें आणि विद्यापीठास देणगी म्हणून दिलेलें विश्वभारतीचे संस्थापक-अध्यक्ष यांचें पूर्वीचें कार्यालय संग्रहालयाचें केंद्रस्थान बनलेलें असून त्यास भारतातील व परदेशातील मित्रांनी व चाहत्यांनी संग्रह व देणग्या देऊन त्याची शोभा वाढविली आहे. केवळ जुने अवशेष असलेल्या गोष्टी वस्तुप्रदर्शित करणें एवढाच रविंद्रसदनामागील उद्देश नव्हता कविवर्यांच्या कामाचा अभ्यास, संग्रहण, अर्थविवरण व प्रसार करण्याची एक अभ्यासी अकादमी, त्यांनी निर्माण केलेल्या साहित्याचा व कलेचा संग्रह, त्यांच्या जीवनाशीं व कृतींशीं निगडीत असलेल्या वस्तूंची स्मृति राहावी तसेंच त्यांच्या स्मृतीशीं संबद्ध असलेलें साहित्य जतन करून ठेवण्यासाठी संग्रहालयाला जिवंत गुरुदेवच स्वरूप प्राप्त व्हावें हे रवींद्र-सदनाचे उद्देश स्पष्टपणें नमूद करण्यात आले होते.

व्याप्ति व संग्रह : रविंद्र-सदनात पुढील शाखा आहेत.

१. टागोरांच्या व टागोरांसंबंधीच्या पुस्तकांचें ग्रंथालय
२. पुस्तकांतील अभ्यासलेखांच्या स्वरूपांतील ऐतिहासिक ध्वनमुद्रण.
३. पत्रें व हस्तलिखितें.
४. रविंद्रनाथ टागोरांची रंगचित्रें
५. छायाचित्रें व चलच्चित्रें
६. टागोरांच्या भाषणांच्या ध्वनिमुद्रिका.
७. स्मृतिदाखल दिलेल्या भेटी व देणग्या आणि वैयक्तिक मालमत्ता.

शैक्षणिक कार्य : टागोर यांच्या जीवनाशीं व कृतींशीं संबंधित असलेलीं सुमारें ६,८०० पुस्तकें व ४,६०० नियतकालिकें असलेलें ग्रंथालय विद्यार्थ्यांसाठी व संशोधकांसाठी संग्रहालयाकडून वापरण्यास देण्यात येतें हस्तलिखितांच्या मायक्रो फिल्मसुद्धा विद्यार्थ्यांना अभ्यास करण्यासाठी दिल्या जातात. मित्रांनी प्रसिद्ध केलेल्या टागोरांच्या चित्रपटाच्या मालिका संग्रहालयानेंच साहित्य पुरविलें आहे. महत्त्वाच्या प्रसंगीं खास प्रदर्शनें भरविलीं जातात. प्रदर्शनवस्तूंना इंग्रजींतील वर्णनात्मक नांवाच्या चिठ्ठ्या लावल्या आहेत. संग्रहालय पाहण्यासाठीं सर्व जगांतून मोठ्या संख्येनें येणाऱ्या लोकांना समजणारी आणि राष्ट्रीय भाषा म्हणून इंग्रजीची निवड करण्यात आली आहे.

प्रकाशनें : रविंद्रसदन, शांतिनिकेतन ही वर्णनात्मक पुस्तिका; मधून मधून प्रसिद्ध करण्यात येणाऱ्या व विनामूल्य वाटण्यात येणाऱ्या टागोरांच्या लेखांच्या नकला.

कामाचे तास : बुधवार व मंगळवार दुपार खेरीज सर्व दिवशीं उघडें असतें–हिवाळ्यांत सकाळीं ७ तें ११–३० व दुपारीं २ तें ४–३० वाजेपर्यंत. उन्हाळ्यात सकाळीं ७ तें ११–३० व दुपारीं ३ तें ५–३० पर्यंत. संग्रहालय पाहण्यासाठीं लोकांना दुपारीच प्रवेश देण्यांत येतो.

प्रवेश . विनामूल्य.

नियामक मंडळ : संग्रहालयाचा कारभार विद्यापीठाकडून पाहण्यात येतो.

सेवकवर्ग : संग्रहालयाध्यक्ष श्री. के. सी. रॉय, सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष, ग्रंथालय सहाय्यक, लघुलेखक–कार्यालय सहाय्यक, शास्त्री, दोन शिपाई व दरवान

आर्थिक तरतूद : अंदाजपत्रकात दरसाल २८,६३९ रुपयांची तरतूद करण्यांत येते.

अभिप्राय : कविवर्यांनी जेथें आपल्या आयुष्याची अखेरची वर्षें घालविलीं त्या उत्तरायण प्रदेशात हें संग्रहालय आहे. संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांची दररोजची सरासरी संख्या ५० इतकी असली तरी विशेष प्रसंगीं म्हणजे रविवर्यांच्या जीवनाशीं संबंध असलेल्या दिवशीं ही संख्या मोठी असते. संग्रहालय जेथें आहे तें कविवर्यांचें राहण्याचें ठिकाण उदयन हीच एक प्रदर्शन-वास्तु आहे. तरीसुद्धा त्याच्या रचनेच्या विशिष्ट प्रकारच्या प्रदर्शन वस्तुंसाठीं ही जागा अपुरी व अयोग्य आहे. संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांसाठीं बसण्याच्या जागीं पंखे लावले असून इतर सोयी करण्यात आल्या आहेत. येथें संग्रहाचीं मुख्य साधन ( १ ) संस्थापक-अध्यक्षांच्या कार्यालयास जोडलेलें ग्रंथालय, ( २ ) कविवर्यांचे सुपुत्र श्री रथिंद्रनाथ टागोर व स्नुषा श्रीमती प्रतिमा टागोर यांचा वैयक्तिक संग्रह. ( ३ ) भारतातील व परदेशातील मित्र व चाहते यांच्याकडून मिळालेल्या भेटी व देणग्या आणि अधून मधून केलेली खरेदी. रवींद्र सदनाचा, भारतातील व परदेशातील विद्यापीठें, संस्था व सोसायट्या यांशीं निकटचा संबंध आला आहे. हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे उत्तरायण या नावाने ओळखल्या जाणाऱ्या मालमत्तेच संग्रहालय-संस्थेत रूपांतर करण्याची योजना आहे यात, ग्रंथालय, पुराण वस्तु शाखा, एक ग्रंथालय एक चित्रांचें प्रदर्शनालय, एक व्याख्यानाचा हॉल, एक प्रेक्षागृह वगैरे गोष्टी आहेत. तसेंच संग्रहालयाची व्यवस्था उत्तमप्रकारें विश्वस्त मंडळ स्थापन करण्याची व एक निधि जमविण्याची ( याकरितां विश्वभारतीचे कुलगुरु श्री. जवाहरलाल नेहरू यांनीं विनंतिपत्रक काढलेले आहे ) योजनाहि आहे.

**सेरामपूर** : लोकसंख्या, ८०,०००

## सेरामपूर महाविद्यालयाचें संग्रहालय

**स्थापना** : १८१८

**पूर्वेतिहास** : एक आद्यधर्मप्रसारक विल्यम कॅरी यांनी जे. मार्शमन् व डब्ल्यू. वॉर्ड या आपल्या दोन सहकाऱ्यांच्या मदतीनें १८१८ मध्यें हें संग्रहालय स्थापन केलें. त्यांच्या वारसदारांनीं त्याचा आणखी विकास केला.

**व्याप्ति व संग्रह** : संग्रहालयांत कांहीं अत्यंत दुर्मिळ अशीं पुस्तकें आहेत. विशेषत. कॅरी यांनीं ३४ भारतीय भाषांत भाषांतरित केलेल्या बायबलच्या पहिल्या आवृत्त्या त्यांत आहेत. उल्लेखनीय असलेलीं इतर पुस्तकें "फ्रेंड ऑफ इंडिया", "समाचार दर्पण" व "दिग् दर्पण" या बंगालमध्यें अगदीं पहिल्यानें प्रसिद्ध होणाऱ्या वर्तमानपत्रांचे पहिले अंक आणि वेद व उपनिषदें वगैरेसारख्या पवित्र हिंदु ग्रंथांचीं हस्तलिखितें. १९ व्या शतकाच्या सुरुवातीस ख्रिस्ती धर्मप्रसारकांनी वापरलेल्या खुर्च्या, टेबलें वगैरेसारखें फर्निचरचें सामानदेखील जतन करून ठेवण्यात आलें आहे. त्यावेळच्या चालू स्थितींत असलेल्या वाफेच्या इंजिनाची एक अल्पाकृतीही तेथें आहे.

**शैक्षणिक कार्य** : सेरामपूर महाविद्यालय हें कलकत्ता विद्यापीठास जोडलेलें वाङ्मय व विज्ञान यांचें पहिल्या प्रतीचें महाविद्यालय असून तें ख्रिश्चन धर्मशास्त्राचें विद्यापीठही आहे. हा दर्जा त्यास रॉयल डॅनिश चॅर्टरनें १८२७ मध्यें दिला. अशा रीतीनें त्यात महाविद्यालयाच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचीं असलेलीं विशेषत. बायबलच्या सुरुवातीच्या प्रतींसारखीं कांहीं दुर्मिळ पुस्तकें आणि सेरामपूर येथील आद्य ख्रिस्ती धर्मप्रसारकांच्या वस्तूंचे अवशेष आहेत. विशेष अशा दिवशीं व उत्सवाच्या दिवसांत स्थानिक शाळांतील विद्यार्थ्यांना तसेंच इतर लोकांना संग्रहालय दाखविण्यांत येतें आणि वंगीय साहित्य परिषद, कलकत्ता विद्यापीठ व इतर संस्था यांतील संशोधन करणाऱ्या विद्यार्थ्यांना संशोधनासाठीं संग्रहालयांतील वस्तूंचा उपयोग करण्याकरितां सवलती देण्यांत येतात.

**प्रकाशनें** : सचित्र पोस्टकार्डें.

**कामाचे तास** : रविवार व राजपत्रित सुट्यांखेरीज सर्व दिवशीं सकाळीं १० ते दुपारीं ४-३० पर्यंत व शनिवारीं सकाळीं १० ते दुपारीं १ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश** : विनामूल्य.

**नियामक मंडळ** : महाविद्यालय नियामक मंडळाकडून संग्रहालयाचा कारभार पाहिला जातो आणि महाविद्यालयाचा ग्रंथपाल त्यावर देखरेख ठेवतो.

**सेवकवर्ग** : महाविद्यालयाचा ग्रंथपाल व ग्रंथालयांतील नोकरवर्ग संग्रहालयावर देखरेख ठेवतात.

**आर्थिक तरतूद** : संग्रहालय सेरामपूर महाविद्यालयाचा भाग असल्यामुळें संग्रहालयासाठीं वेगळी आर्थिक तरतूद करण्यांत आलेली नाहीं.

**अभिप्राय** : संग्रहालयाचा उद्देश साध्य होण्यासाठींच तें महाविद्यालयांत ठेवलें आहे. १७ ऑगस्टला कॉलेज दिनाच्या वेळीं, कॅरीजयंतीस व पदवीदान समारंभाच्या दिवशीं संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांची गर्दी असते. संग्रहालय महाविद्यालयाच्या ग्रंथालयास जोडून आहे व तें सर्वसाधारणपणें सेवकवर्गास व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांना खुलें असतें परंतु, महाविद्यालय दिनाच्या वेळीं व पदवीदान समारंभाच्या दिवशीं खास प्रदर्शन भरविण्यांत येतात. संग्रहालयासाठीं अधिक चांगल्या इमारतीची व आणखी जागेची आवश्यकता आहे, आणि स्वतंत्र इमारत व योग्य सरंजाम यांची व्यवस्था होण्याचें घाटत आहे. येथील प्रदर्शन-वस्तु ह्या वर्षांपूर्वीच्या ख्रिस्ती धर्मप्रसारकांनीं संग्रहित केलेल्या व देणगी म्हणून मिळालेल्या आहेत.

**तामलुक** : लोकसंख्या ११,५९९

## हॅमिल्टन हायस्कूलचें संग्रहालय

**स्थापना** : १९३४

**पूर्वेतिहास** : तामलुक हें अतिशय प्राचीन स्थळ असून येथें पूर्वी ताम्रलिप्त नगर वसलें होतें. या ठिकाणीं मौल्यवान् पुरातन वस्तु मिळण्याची बरीच शक्यता असते. स्थानिक हायस्कूलमधील विद्यार्थ्यांनीं अनेक प्रदर्शन-वस्तु जमा केलेल्या असून त्या कांचेच्या पेट्यांत ठेवल्या आहेत. योग्य वेळीं त्या लोकांना दाखविण्यांत येतील.

**व्याप्ति आणि संग्रह** : संग्रहालयांत, स्थानिकरीत्या संग्रहित केलेल्या मातीच्या वस्तु व इ. स. पूर्वीच्या २ ऱ्या शतकांतील न कोरलेली ओतीव नाणीं, शिल्पाकृति व कोरीवकाम केलेले दगड, फार पूर्वीच्या काळांतील मातीचे घडे व भांडीं यांचे उत्कृष्ट नमुने धरून अनेक पुरातन वस्तु आहेत. अश्मीभूत वस्तु, शिला व खनिज द्रव्यें, कांहीं प्राणीशास्त्रविषयक नमुने आणि पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या शाल व हातांतील काठी वगैरेसारख्या कांहीं वैयक्तिक वस्तु देखील त्यांत आहेत.

**शैक्षणिक कार्य** : विद्यार्थ्यांनीं दाखविलेल्या आस्थेमुळेंच या संग्रहालयाची निर्मिति झाली आहे. येथील प्राचीन वस्तूंमुळें शाळेंतील मुलांना मागील काळाची स्पष्ट कल्पना करतां येते व प्राचीन भारतीय इतिहासाच्या अध्ययनांत त्यामुळें मदत होते.

**प्रकाशनें** : कांहीं नाहीं.

**कामाचे तास** : शाळा चालू असलेल्या सर्व दिवशीं संग्रहालय शाळेच्या वेळांत उघडें असतें.

**प्रवेश** : विनामूल्य, परंतु, मुख्यत. शाळेंतील मुलांसाठींच आहे.

**नियामक मंडळ** : संग्रहालयाची व्यवस्था शाळेमार्फत पाहिली जाते.

**सेवकवर्ग** : शाळेंतील सेवकवर्ग संग्रहालयावर देखरेख ठेवतो.

**आर्थिक तरतूद** : शाळेच्या अंदाजपत्रकांत या तरतुदीचा समावेश करण्यांत आला आहे.

**अभिप्राय** : कांहीं नाहीं.

## आंध्र प्रदेश

**गुंटूर :** लोकसंख्या १२,५०,२५५.

### गुंटूर वैद्यकीय महाविद्यालयाचीं संग्रहालयें

(अ) शरीरशास्त्र (Anatomy), (ब) रोगनिदानशास्त्र, (क) सामाजिक व प्रतिबंधक वैद्यकशास्त्र, (ड) औषधशास्त्र (Pharmacology) व (इ) न्याय-वैद्यक संग्रहालय.

**स्थापना :** माहित नाही.

**पूर्वेतिहास :** गुंटूर वैद्यकीय महाविद्यालयांतील अध्यापनास मदत म्हणून रोगचिकित्सा, सामाजिक आणि प्रतिबंधक वैद्यक, न्याय वैद्यक, औषध विधान व शरीरशास्त्र या शाखांसाठीं वैद्यकीय व सार्वजनिक आरोग्यविषयक संग्रहालयाची तरतूद करण्यांत आली होती. त्यांत एम. बी. बी. एस्. च्या व पदव्युत्तर वैद्यकीय विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची तसेंच स्वास्थ्य निरीक्षकाचा अभ्यासक्रम शिकविण्याची सोय होती.

**व्याप्ति व संग्रह :** शरीरशास्त्र संग्रहालयांत हाडें, निरनिराळ्या अवयवांतील भागांचे आणि हृदय, फुप्फुसें, डोक्याची कवटी, पोट, यकृत, अवयव वगैरेंचे विकृत रचनेचे भाग आहेत. गर्भावस्थित नमुनेदेखील प्रदर्शित केले आहेत. अभिसरण व मानवी शरीरातील इतर व्यापार या गोष्टीसुद्धा आकृत्यांद्वारा दाखविल्या आहेत.

रोगनिदानशास्त्र संग्रहालयांत विकृत व रचनात्मक नमुने आहेत. तसेंच त्यांत रोगांच्या कारणांची माहिती देणारे नमुने आहेत.

सामाजिक व प्रतिबंधक वैद्यकशास्त्र संग्रहालयांत, सार्वजनिक आरोग्य, सांसर्गिक रोग व त्यांचा प्रतिबंध यासंबंधींच्या माहितीवरील नकाशे व नमुने आहेत.

औषधशास्त्र संग्रहालयांत, अशुद्ध औषधांचे निरनिराळे प्रकार आणि ज्यापासून औषधें तयार करण्यांत येतात त्या औषधी व पानें आहेत.

न्यायवैद्यकशास्त्र संग्रहालयांत, सर्पदंश, भोसकल्यामुळें झालेली जखम, अग्निविषबाधा, बंदुकीच्या गोळीची जखम, व इतर जखम वगैरे विशिष्ट बाबतींत येणाऱ्या मृत्यूची कारणें दर्शविणारे विकृत आणि रचनात्मक नमुने आहेत.

**शैक्षणिक कार्य :** विद्यार्थ्यांना दिव्याच्या साहाय्यानें दाखवावयाचीं छायाचित्रें व चलचित्रें दाखविण्यांत येतात. गेल्या तीन वर्षांत, या महाविद्यालयाच्या समाज सेवा सभाच्या विद्यमानें ऑक्टोबर महिन्यांतील तीनचार दिवस वैद्यकीय व आरोग्य प्रदर्शन भरविण्यांत आलें होतें. हीं प्रदर्शनें सर्वसामान्य लोकांसाठीं शैक्षणिक दृष्ट्या अतिशय उपयुक्त असल्याचें सिद्ध झालें आहे

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** हें संग्रहालय सामान्यतः सर्व दिवशीं महाविद्यालयाच्या वेळांत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य, परंतु मुख्यतः वैद्यकीय महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांसाठीं आहे.

**नियामक मंडळ :** हीं संग्रहालयें गुंटूर वैद्यकीय महाविद्यालयाच्या व्यवस्थेखालीं आहेत.

**सेवकवर्ग :** हीं संग्रहालयें निरनिराळ्या विभागांना जोडलेलीं आहेत आणि त्या त्या विभागाच्या प्रमुखाकडून व सेवकवर्गाकडून त्यावर देखरेख ठेवली जाते.

**आर्थिक तरतूद :** महाविद्यालयाच्या सर्वसाधारण अंदाजपत्रकांत समाविष्ट केली आहे.

**अभिप्राय :** कांहीं नाहीं.

**हैदराबाद :** लोकसंख्या १०,८५,७२२.

### हैदराबाद आरोग्य संग्रहालय

**स्थापना :** १९५०

**पूर्वेतिहास :** आपल्या देशांतील अत्यंत समृद्ध असलेल्या संग्रहालयांपैकीं एक समजलें जाणारें हें संग्रहालय प्रथम हैदराबाद शहरांतील एका बाजूच्या भागांत ठिकाणीं होतें. त्यानंतर हैदराबाद सरकारचे आरोग्य मंत्री श्री पूलचंद गांधी यांच्या अविरत प्रयत्नामुळें तें १९५२ च्या अखेरीस सार्वजनिक बगीच्यांतील मध्यभागीं सुंदर इमारतींत हलविण्यांत आलें. आरोग्य व स्वच्छता यांचें तत्त्वें संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांच्या मनावर बिंबविण्यासाठीं आकर्षक रीतीनें प्रदर्शित केलेलें विपुल साहित्य या संग्रहालयांत आहे.

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयांत, आरोग्य, रोगांचा प्रतिबंध व आरोग्यवर्धन यांच्या नियमांबाबत आरोग्यविषयक माहिती दृक् साधनांच्या द्वारें देण्यांत येते. संग्रहालयांत, सभोंवारची स्वच्छता, प्लेग, कॉलरा, क्षयरोग व देवी यासारखे साथीचे रोग व इतर जंतुसंसर्गयुक्त ताप, पटकी, मलेरिया व नारू यासारखे आतड्यांविषयक व परोपजीवी रोग, शरीरविज्ञानशास्त्र व शरीरशास्त्र, शालेय आरोग्य, माता व शिशु कल्याण, पौष्टिक आहार, सामाजिक आरोग्य, कुटुंब नियोजन, कीटक, किडे, साप व विंचू, ग्रामीण वैद्यकीय मदत, महत्त्वाची आकडेवारी, आरोग्याचे नियम, औद्योगिक आरोग्य विज्ञान व औषधांचा इतिहास यासंबंधींच्या शाखा आहेत. शेवटच्या शाखेंत "आरोग्य वीर" म्हणजे वैद्यकीय शास्त्रांतील शोध व अगदीं पूर्वीच्या काळापासून आतापर्यंतच्या वैद्यकीय शास्त्रांतील प्रसिद्ध व्यक्तींचीं चित्रें आहेत.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयांत, विभागाच्या उपयोगासाठीं १५० पुस्तकें व नियतकालिकें असलेलें एक छोटें ग्रंथालय आहे. संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांना व शाळांतील मुलांना संग्रहालयांतील नमुने व प्रदर्शन वस्तु दाखविण्यांत येतात. शाळेंतील मुलांसाठीं व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांसाठीं चित्रपट दाखविण्यांत येतात. दरवर्षी जानेवारी तसेंच जानेवारी व फेब्रुवारी महिन्यांत भरणाऱ्या अखिल भारतीय औद्योगिक प्रदर्शनांत

संग्रहालय भाग घेतें त्यावेळीं खास प्रदर्शनें भरविली जातात. नांवाच्या चिठ्या इंग्रजी, उर्दू, हिंदी व तेलगू भाषांत आहेत. आरोग्य पुस्तिकाहि वाटण्यात येतात.

**प्रकाशनें :** हैद्राबाद आरोग्य संग्रहालय. संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या लोकांना निरनिराळे रोग व शाळांतील आरोग्य यावरील निरनिराळीं भित्ति-पत्रकें, पत्रकें व पुस्तिका विनामूल्य वाटण्यात येतात.

**कामाचे तास :** गुरुवार व इतर सार्वजनिक सुट्टयाखेरीज करून सर्व दिवशीं सकाळीं ९ ते दुपारीं १२ व दुपारीं ३–३० ते सध्याकाळीं ६-३० पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय, सार्वजनिक आरोग्य संचालक, आंध्र प्रदेश यांच्या नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग :** वरिष्ठ आरोग्य निरीक्षक, दोन कनिष्ठ आरोग्य निरीक्षक, पाच शिपाई व चौकीदार.

**आर्थिक तरतूद :** हें संग्रहालय आंध्र प्रदेश आरोग्य शिक्षण मंडळाच्या नियंत्रणाखालीं असल्यामुळें त्यासाठीं कोणतीहि खास अंदाजपत्रकीय तरतूद करण्यात आलेली नाहीं.

**अभिप्राय :** हें संग्रहालय सार्वजनिक उद्यानांतील सुंदर इमारतींत सोयिस्कर ठिकाणीं असून तें पाहाण्यासाठीं बरेच लोक येतात. परिषदांच्या वेळीं ही संख्या वाढते. ही इमारत प्रदर्शनासाठीं पुरेशी आहे, परंतु तींत वस्तूंचा साठा करण्यासाठीं जागा नाहीं.

## मदनपल्ली महाविद्यालयाचें संग्रहालय

**पुराणवस्तुशास्त्रविषयक व सांस्कृतिक संग्रहालयें या सदराखालीं पहा.**

**विशाखापट्टनम् :** लोकसंख्या १,०८,०४२.

**आंध्र वैद्यकीय महाविद्यालयाचीं संग्रहालयें :** (अ) शरीरशास्त्र, (ब) रोगनिदानशास्त्र व (क) सामाजिक व प्रतिबंधक वैद्यशास्त्र.

**स्थापना :** शरीरशास्त्र संग्रहालय–१९२३ (ब) रोगनिदानशास्त्र संग्रहालय–१९२५ आणि (क) सामाजिक व प्रतिबंधक वैद्यकशास्त्र संग्रहालय–१९५५-५६.

**पूर्वेतिहास :** शरीरशास्त्र संग्रहालय १९२३ मध्यें वैद्यकीय महाविद्यालयाच्या बरोबरच अस्तित्वांत आलें आणि विभागाच्या सेवकवर्गांतील त्यानंतरच्या लोकांनी खास विच्छेदनें करून व नमुने, गर्भगत सांगाडे, मेंदूचे तुकडे वगैरे खरेदी करून हळूहळू त्याची वाढ केली. संग्रहालयांत सध्या मानवी शरीराचें वर्णनात्मक तसेंच व्यावहारिक असे ८३१ नमुने आहेत. त्यांत दोन अनन्यसाधारण प्रदर्शन-वस्तु आहेत. त्या वस्तु म्हणजे हस्तिदंताचा एक सांगाडा व दुसरा लाकडी सांगाडा. या दोन्ही प्रदर्शनवस्तु पूर्वीचे एक शरीर-शास्त्राचे प्राध्यापक डॉ. आर. कृष्णराव यांनी संपादन करून देणगी म्हणून दिल्या होत्या. त्यांच्या सांगण्याप्रमाणें हे सांगाडे १७०५–१० मध्यें तंजावर येथें राजे सरफोजी यांच्यासाठीं स्थानिक कारागिरांनीं तयार केले होते. कनिष्ठ जातीच्या जनावरांसंबंधीं १०० नमुने आहेत.

दोन वर्षांनंतर १९२५ मध्यें रोगनिदानशास्त्र संग्रहालय सुरू करण्यांत आलें होतें. आता तेथें रोगनिदान शास्त्रविषयक सुमारें ३००० नमुने प्रदर्शित करण्यात आले असून त्याचा पूर्वेतिहास दिला आहे.

सामाजिक व प्रतिबंधक वैद्यकशास्त्र संग्रहालय अगदीं अलीकडेच म्हणजे १९५५–५६ मध्यें सुरू करण्यात आलें आहे. त्यात अनेक नमुने आहेत व ते सर्व खरेदी केलेले आहेत.

**व्याप्ति व संग्रह :** शरीरशास्त्र संग्रहालयात मानवी शरीररचना, भ्रूण-विज्ञान, मानवशास्त्र, तुलनात्मक शरीरशास्त्र व किरणशास्त्रविषयक शरीर-रचनेचे नमुने आहेत.

रोगनिदानशास्त्र संग्रहालयात, रोगानें पीडलेल्या अवयवाचे सर्व नमुने व त्यास योग्य अशीं इतर चित्रें दाखविलीं आहेत.

सामाजिक व प्रतिबंधक वैद्यकशास्त्र संग्रहालयात पुष्कळ नमुने, तक्ते, आकृत्या वगैरे आहेत.

**शैक्षणिक कार्य :** महाविद्यालयातील पदवीपूर्व आणि पदव्युत्तर वर्गांतील विद्यार्थी संग्रहालयातील साहित्याचा अभ्यास करतात. याशिवाय, आजुबाजूच्या जिल्ह्यातील शाळांमधील विद्यार्थी संग्रहालय पाहाण्यास येतात. दिव्याच्या सहाय्यानें दाखवावयाच्या कांचचित्रांचा एक संग्रह असून त्यांचा उपयोग महाविद्यालयांतील व्याख्यानांसाठीं करतात. संग्रहालयांतील वस्तु कधीकधी आरोग्य व इतर प्रदर्शनांसाठीं उसनवारीनें दिल्या जातात. नांवाच्या चिठ्या इंग्रजींत आहेत. रोगनिदानशास्त्र संग्रहालयात नमुने सजविण्याचें प्रशिक्षण देण्याची तरतूद आहे.

**प्रकाशनें :** कांहीं नाहींत.

**कामाचे तास :** संग्रहालयें कामाच्या सर्व दिवशीं सकाळीं ८ ते दुपारी ४ वाजेपर्यंत आणि रविवारी व सार्वजनिक सुट्टयाच्या दिवशीं सकाळीं ८ ते दुपारीं १२ वाजेपर्यंत उघडीं असतात.

**प्रवेश :** विनामूल्य, परंतु मुख्यतः वैद्यकाच्या विद्यार्थ्यांसाठीं आहे.

**नियामक मंडळ :** हीं संग्रहालयें महाविद्यालयाच्या प्राचार्यांच्या व्यवस्थेखालीं आहेत.

**सेवकवर्ग :** त्याची व्यवस्था, संबंधित विभागांकडून पाहाण्यात येते, आणि त्यातील एक सहाय्यक संग्रहालयाध्यक्षाचें काम पहातो.

**आर्थिक तरतूद :** महाविद्यालयाच्या अंदाजपत्रकांत याची तरतूद करण्यात आली आहे.

**अभिप्राय :** विद्यार्थ्यांना वैद्यकीय विज्ञानाच्या निरनिराळ्या शाखांची माहिती होण्यासाठीं मदत करण्याचा विशिष्ट हेतु या संग्रहालयामुळें साध्य होतो. संग्रहालय पाहण्यासाठीं दररोज सरासरी पांच व दरवर्षी २००० वर लोक येतात. शरीरशास्त्र संग्रहालयाच्या बाबतींत, वस्तु मुख्यतः संशोधन, खरेदी व देणगीद्वारें, रोगनिदानशास्त्र संग्रहालयाच्या बाबतींत शस्त्रक्रियेच्या वेळीं व मरणोत्तर तपासणींत शरीरांतून काढलेले भाग आणि प्रतिबंधक व सामाजिक वैद्यकाच्या बाबतींत, खरेदी करून जमा करण्यांत येतात.

## आसाम

गौहत्ती : लोकसंख्या ४३,६१५

### आसाम वन संग्रहालय

स्थापना : १९४८

**पूर्वेतिहास :** वर्षानुवर्षांनी आसाम प्रांताच्या येथील गौल्य फॉरेस्ट युटिलायझेशन ऑफिसरच्या मार्गदर्शनाने आसाम वन संग्रहालय १९४८ मध्ये सुरू करण्यात आले. या वस्तु पूर्वी वेगवेगळ्या प्रदर्शन मंडपातून प्रदर्शनांत ठेवल्या होत्या आणि या संग्रहाच्या बाबतीत अधिक जिज्ञासा उत्पन्न झाल्यामुळे हे संग्रहालय त्या वस्तूसाठी कायमचे स्थान म्हणून नियोजित करण्यात आले.

**व्याप्ति व संग्रह :** इमारती लाकडे, बांबू, वेत व जंगलातील विविध वस्तु, हस्तिदंतावरील कामे, लाकडावरील कामे, वेतावरील व बांबूवरील कोरीव कामे, राळ, टॅनिन्स, आगर लाकूड, औषधी वनस्पति वगैरेंचे नमुने.

जंगलातील देखाव्यांची, गेंडा व हत्ती यांना पकडण्याच्या प्रसंगाची प्रतिचित्रे आणि जंगलातील त्या सर्व दर्शविणारे आराखडे व नकाशे, जंगल व जंगल उद्योगधंदे, प्लायवूड, काँपोझिट वूड, पुतळ्यांच्या प्रतिकृती, गरिम्ब इंजिनिअरिंग दर्शविणाऱ्या इमारती, सर्वोत्कृष्ट हस्तिदंत (रेकॉर्ड टस्क), गेंड्याची शिंगे (रिकॉर्ड हॉर्न्स), पेंढा भरलेली जनावरे, वगैरे.

**शैक्षणिक कार्य :** जंगल उद्योगधंदे, इमारती लाकडासंबंधीची कामे, गेंडे व हत्ती यासारखी वन्य श्वापदे पकडणे आणि जंगल उत्पादनाचा उपयोग यांविषयींची माहिती देण्यासाठी हे संग्रहालय आहे. गौहत्ती विद्यापीठातील, महाविद्यालयातील व शाळेतील विद्यार्थी हे संग्रहालय पाहण्यास नेहमी येतात. नावांच्या चिठ्ठ्या इंग्रजी व आसामी भाषेत आहेत. आणि संग्रहालयाचा प्रमुख अधिकारी जिज्ञासू प्रेक्षकांना संग्रहालयातील वस्तूंविषयी माहिती देतो

**प्रकाशनें :** काही नाहीत.

**कामाचे तास :** शनिवारची दुपार, रविवार व सरकारी सुट्यांचे दिवस खेरीज करून इतर सर्व दिवशी संग्रहालय सकाळी १० ते संध्याकाळी ४-३० पर्यंत उघडे असतें.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय आसाम सरकारच्या अधिकाराखाली असून फॉरेस्ट युटिलायझेशन ऑफिसर, शिलाँग यांजकडून त्यावर नियंत्रण ठेवण्यात येतें.

**सेवकवर्ग :** एक साहाय्यक व संरक्षक.

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकातील वार्षिक तरतूद रु. ६,२०० इतकी आहे.

**अभिप्राय :** संग्रहालय गौहत्ती येथें मोकोहर जागी असून तेथें सहज जाता येतें वस्तु ठेवण्यासाठी इमारत अपुरी पडते आणि संग्रहालयात प्रयोगशाळेची खास सोय नाही. संशोधन, खरेदी व देणगी यांच्या द्वारें वस्तु संग्रहित करण्यात येतात.

### गौहत्ती विद्यापीठ वाणिज्य संग्रहालय

औद्योगिक व वाणिज्य संग्रहालयें या सदराखाली पहा.

## मुंबई

अहमदाबाद, लोकसंख्या ७,८८,३३३.

### बी. जे. मेडिकल कॉलेज, शरीररचना शास्त्र, रोगनिदान शास्त्र, औषधि विज्ञान, आरोग्यशास्त्र व न्यायवैद्यक यांविषयींचे संग्रहालय.

स्थापना : सन १९४६.

**पूर्वेतिहास :** ही संग्रहालयें जानेवारी १९४६ साली सुरू करण्यात आली आणि तेव्हांपासून त्यांत उत्तरोत्तर वाढ होत आहे. कॉलेजमधील प्रत्येक प्रमुख विभागासाठी, म्हणजे शरीररचनाशास्त्र, रोगनिदानशास्त्र, औषधि-विज्ञान, आरोग्यशास्त्र व न्यायवैद्यक यासाठी एक स्वतंत्र संग्रहालय असून त्यात त्या त्या विषयासंबंधीचे नमुने आहेत संग्रहालयाची जागा अपुरी आहे, परंतु नवीन इमारत लवकरच तयार होणार असून तीत पुरेशा जागेची व्यवस्था होईल.

**व्याप्ति व संग्रह :** वर निर्दिष्ट केलेल्या प्रत्येक विभागासाठी, पदवीपूर्व व पदव्युत्तर विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठी एक स्वतंत्र संग्रहालय आहे.

**शैक्षणिक कार्य :** वैद्यक विषयाचा अभ्यास करणारे पदवीपूर्व वर्गातील २४६ विद्यार्थी व पदव्युत्तर वर्गातील ३५ विद्यार्थी या संग्रहालयाचा उपयोग करतात. शिक्षक वर्गांपैकी ७५ जण व तेथेंच राहणार २६ शिक्षक संग्रहालयांत उपलब्ध असलेल्या सवलतींचा फायदा घेतात. काही वेळां शैक्षणिक संस्था विद्यार्थ्यांना संग्रहालय पाहण्यास गटागटानें पाठवितात. संग्रहालयात ग्रंथालय असून तें विद्यार्थी व शिक्षक यांना यांना खुलें असतें. ग्रंथालयात १,०९० पुस्तकें असून तेथें ८९ नियतकालिकें येतात. विद्यार्थ्यांना कॉलेजच्या प्रोफेसरच्या साहाय्यानें वैद्यक विषयावरील चलचित्रें आणि स्थिरचित्रें दाखविण्यात येतात व ती त्यांच्या शिक्षणक्रमांत उपयोगी पडतात. वैद्यकीय विद्यार्थ्यांच्या शिक्षणाचा एक भाग म्हणून त्यांना संग्रहालयातून फिरवून आणण्याची व्यवस्था केली जाते. खास तक्ते तयार करण्यात येऊन त्यांचा उपयोग केला जातो. विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठी दवाखान्यातील रोग्यासंबंधीच्या चिकित्सेची छायाचित्रें घेण्यात येतात. संग्रहालयाचा उपयोग केवळ महाविद्यालयातील विद्यार्थीच करतात असें नव्हे, तर इतर शिक्षण-संस्थांतील विद्यार्थी देखील त्याचा लाभ घेतात.

**प्रकाशनें :** काही नाही.

**कामाचे तास :** महाविद्यालयाच्या वेळात उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार प्रत्येक विभागाच्या प्रमुखा-कडून पाहिला जातो.

**सेवकवर्ग :** संग्रहालयासाठी खास सेवकवर्ग नाही प्रत्येक विभाग आपापल्या संग्रहित वस्तूंची काळजी घेतो.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठी कोणतेंहि खास अनुदान नेमून देण्यात आलेले नाही सरकारकडून मिळत असलेल्या पैशाच्या प्रमाणात प्रत्येक विभागासाठी आर्थिक तरतूद करण्यात येते

पुस्तकें व नियतकालिकें विकत घेण्याकरिता दर वर्षी रु ५,६०० इतकी रक्कम मंजूर करण्यात येते.

**अभिप्राय :** संग्रहालयाला महाविद्यालयाच्या नवीन इमारतीत भरपूर जागा मिळेल व वस्तू ठेवण्यासाठी देखील त्यात पुरेशी जागा असेल अशी अपेक्षा आहे. त्यानंतरच प्रयोगशाळेसाठी योग्य सोयी उपलब्ध होतील नमुन्याच्या वस्तु संग्रहित करण्याचा एक मार्ग म्हणजे विक्टिल हॉस्पिटल मध्ये उपलब्ध असलेले वैद्यकीय चिकित्साविषयक साहित्य होय प्रतिकृती तयार करण्यात येतात किंवा खरेदी करण्यात येतात. नमुन्याना अजून नावाच्या चिठ्ठ्या लावण्यात आलेल्या नाहीत. नक्से व प्रतिकृती याचा उपयोग प्रात्यक्षिके करून दाखविण्यासाठी केला जातो.

## अमरेली - गिरधरभाई बाल संग्रहालय

"पुराणवस्तु व संस्कृतिविषयक संग्रहालय" या सदराखाली पहा.

**बडोदे :** लोकसंख्या २,११,४०७

## (१) बडोदे नगरपालिका स्वास्थ्य संग्रहालय

**स्थापना :** १९५२

**पूर्वेतिहास :** या संग्रहालयाचे सध्याचे अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष श्री. जी एम् जाधव हे असून त्याना देशात स्वास्थ्य संग्रहालये प्रस्थापित करण्याविषयी फार आस्था होती. त्यानी अशा प्रकारचे संग्रहालय सरकारवाड्यात सुरु करण्याबद्दल बडोद्याच्या महाराजाना विनंति केली सन १९५२ मध्ये सदर स्वास्थ्य संग्रहालय सयाजी उद्यानातील व्हाईट पॅव्हिलियनमध्ये नेण्याविषयी त्यांनी बडोदे नगरपालिकेच्या अध्यक्षाचे व सदस्याचे मन वळविले

**व्याप्ति व संग्रह :** हे संग्रहालय मुख्यत्वकरून स्वास्थ्य व आरोग्यशास्त्र या विषयाना वाहिलेले आहे आरोग्यदृष्ट्या सोयी असलेले गाव व या उलट अशा सोयी नसलेले गाव याच नमुने व आरोग्याच्या दृष्टीने चांगली विहीर, तलाव, तबेला, व कचऱ्याची गाडी व संडास हे त्यात दाखविण्यात आले आहेत. याशिवाय मलमूत्र निस्सारणाच्या आधुनिक बांधकामाचा नमुना, पाण्याचा तलाव, फिल्टर बेड व टँक याच्यासह बडोदे शहरास पाणीपुरवठा कसा होतो हे दर्शविणारा नमुना, सूतिकाशास्त्र, प्रसूतिशास्त्र मानवी शरीर रचनाशास्त्र, हृदय व कान याची कार्ये दाखविणारे, त्याचप्रमाणे प्लेग, पटकी, क्षय व त्वचा-रोग यावरील प्रतिबंधक व नियंत्रक उपाय यांचे सचित्र नमुने व तक्ते या संग्रहालयात आहेत यापैकी पुष्कळसे नमुने व तक्ते इत्यादि डब्ल्यू एच ओ. (हू) यु. एन्, इ एस, सी ओ (युनेस्को), यु एस् आय् एस् (युसीस) या व इतर संघटनाकडून मिळालेले आहेत. प्रसिद्ध व्यक्तींच्या चित्राचा दिवाणखाना म्हणजे संग्रहालयातील स्वतंत्र विभाग असून त्यात प्रसिद्ध बायो-केमिस्ट, फिजिशियन्स, सर्जन्स व बॅक्टिरिऑलॉजिस्ट याची छायाचित्रे आहेत.

**शैक्षणिक कार्ये :** संग्रहालयात लहान ग्रंथालय असून त्याचा उपयोग संग्रहालयास भेट देणाऱ्या प्रेक्षकानासुद्धा करता येतो. संग्रहालयात 'स्वास्थ्य' या विषयावर भाषणे होतात आणि यु एस् आय् एस् (युसीस) या संस्थेकडून आणलेले चित्रपट दर आठवड्यास दाखविण्यात येतात. संग्रहालयातील नमुने व तक्ते शाळा व महाविद्यालये याना तात्पुरते वापरण्यासाठी देण्यात येतात. प्रदर्शन वस्तूंना लावलेल्या नावाच्या चिठ्ठ्या मुख्यत्वेकरून गुजराथीत आहेत, परंतु काही इंग्रजी व उर्दू या भाषांतही आहेत बडोदे विद्यापीठाचे विद्यार्थी संग्रहालयाविषयी रुचीने जिज्ञासा दाखवितात फॅकल्टी ऑफ सोशल वर्क ही संस्था देखील जवळच्या गावात प्रदर्शन भरविण्यासाठी येथील तक्ते, नकाशे व नमुने वगैरे वेळोवेळी नेते

**प्रकाशने :** "नगरपालिका स्वास्थ्य संग्रहालय" नावाची पुस्तिका.

**कामाचे तास :** रोज सकाळी ११ ते सध्याकाळी ६ व शनिवारी दुपारी २ ते सध्याकाळी ६ वाजेपर्यंत उघडे असते

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार बडोदे नगरपालिका 'स्वास्थ्य संग्रहालय समितीच्या' साहाय्याने पाहते.

**सेवकवर्ग :** अवैतनिक संग्रहालयाध्यक्ष श्री. जी. एम्. जाधव, चार साहाय्यक व एक ड्राइव्हर.

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकातील वार्षिक तरतूद रु. ६,००० इतकी आहे.

**अभिप्राय** संग्रहालयाची जागा बडोदे येथ सोईस्कर ठिकाणी असून आसपासच्या खेड्यातील लोकाच्या गरजाहि ते भागवू शकते. प्रेक्षकाची रोजची संख्या १०० पेक्षा अधिक असते. परंतु सुट्टीच्या दिवशी ही संख्या १,६०० पर्यंत जाते फ्रान्स, जर्मनी व इटली यातील वैद्यकव्यवसायातील मित्रमंडळींच्या साहाय्याने संग्रहालयाच्या कार्यात वाढ करण्याचे योजिले आहे हे संग्रहालय भारताच्या संग्रहालय संघाचे सदस्य आहे.

## (२) वैद्यक महाविद्यालयीन संग्रहालये

(१) शरीररचना शास्त्र, (२) औषधिविज्ञान – विषचिकित्सा, (३) रोगनिदानशास्त्र आणि (४) प्रतिबंधक औषधिविज्ञान

**स्थापना :** सन १९४९.

**पूर्वेतिहास :** ही संग्रहालये सन १९४९ मध्ये महाविद्यालयाबरोबरच स्थापन करण्यात आली. महाविद्यालयाच्या विद्यार्थ्यांची व पदव्युत्तर वर्गातील विद्यार्थ्यांची गरज भागविणे हा त्याचा उद्देश आहे.

**व्याप्ति व संग्रह :** शरीररचना शास्त्र, औषधि विज्ञान, विषचिकित्सा रोगनिदानशास्त्र आणि प्रतिबंधक औषधिविज्ञान या विभागासाठी महाविद्यालयात चार संग्रहालये आहेत त्यात योग्य ते नमुने व प्रदर्शन-वस्तु आहेत.

**शैक्षणिक कार्ये :** विभागाच्या उपयोगासाठी एक उत्तम ग्रंथालय आहे. त्यात ३,००० वर पुस्तके असून ४२ नियतकालिके तेथे येतात एम् बी बी एस च्या अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांना व इतर वर्गांच्या विद्यार्थ्यांना सर्व सवलती देण्यात येतात विभागाचे कनिष्ठ व्याख्याते जिज्ञासू प्रेक्षकाना संग्रहालयातील वस्तूविषयी माहिती देतात. विद्यापीठ सप्ताहात खास प्रदर्शन भरविले जातात वस्तूवरील नावाच्या सर्व चिठ्ठ्या इंग्रजीत आहेत

**प्रकाशने :** काही नाहीत

**कामाचे तास :** शनिवार दुपार (१ वाजल्यानंतर), रविवार व सार्वजनिक सुट्टीचे दिवस खेरीज करून रोज सकाळी ९ ते सध्याकाळी ५ पर्यंत खुली असतात

**प्रवेश :** विनामूल्य, परंतु ही संग्रहालये मुख्यत्वेकरून महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी आहेत

**नियामक मंडळ :** महाविद्यालयाच्या सर्वसाधारण कारभारात या संग्रहालयाच्या नियंत्रणाचा देखील अंतर्भाव होतो.

**सेवकवर्ग :** ही संग्रहालये त्या त्या विभागाच्या सेवकवर्गाच्या स्वाधीन आहेत

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठी खास अशी अंदाजपत्रकीय तरतूद नसली तरी ग्रंथालयासाठी पुस्तके खरेदी करण्याकरिता खास अनुदान मिळते

**अभिरक्षण :** नमुने विभागातर्फे तयार केले जातात व प्रतिकृती व रसायन विकत घेतली जातात आवश्यक असेल तेथे तेथे नकाशे, तक्ते वगैरेंचे साहाय्य देण्यात येते

**( ३ ) बडोदे, म. स. विद्यापीठ :**

**पुराणवस्तु विभाग संग्रहालय :**

' पुराणवस्तु व संस्कृतिविषयक संग्रहालये ' या सदराखाली पहा

मुंबई शीर्षसंख्या २८, ३९, २७०

**( १ ) ग्रँट मेडिकल कॉलेज संग्रहालये**

( अ ) रोगनिदानशास्त्र संग्रहालय ( ब ) शरीररचनाशास्त्र संग्रहालय आणि ( क ) प्रतिबंधक व सामाजिक औषधिविज्ञान

**स्थापना :** सन १८४५

**पूर्वेतिहास :** ग्रँट मेडिकल कॉलेजचे रोगनिदानशास्त्र संग्रहालय हे सन १८४५ मध्ये कॉलेज सुरू झाल्यानंतर लगेच सुरू झाले, आणि सर्वांत जुनी माहिती पुस्तक सन १८५० मधील आहे सन १९२५ मध्ये त्याची पुनर्रचना करण्यात आली मुंबईतील शाळेतील वरच्या वर्गातील विद्यार्थी संग्रहालय पाहण्यास नियमितपणे येत सामाजिक कार्यकर्ते, प्रौढ शिक्षणसंस्थेचे सदस्य, परिचारिका, आरोग्य-अधिक्षिका ( हेल्थ व्हिजिटर्स ) अभ्यासाकरिता संग्रहालयास नेहमी भेट देतात संग्रहालयात प्रात्यक्षिकासाठी एक खोली असून तीत सुमारे १०० लोक बसू शकतात

शरीररचनाशास्त्र संग्रहालय हे सन १८४५ मध्ये ग्रँट मेडिकल कॉलेजचा भाग म्हणून सुरू करण्यात आले आणि सध्येच्या विद्यार्थ्यांसाठी व प्राध्यापक वर्गासाठी हे उपयुक्त असून त्यांच्या गरजा त भागवीत आहे

सन १९३२ नंतर ( या साली संग्रहालयात फक्त ११६ नमुने होते ) संग्रहालयाची फार झपाट्याने प्रगति झाली सन १९४१ च्या सुमारास त्यात १२७४ नमुने होते आणि शरीररचनाशास्त्र संग्रहालयाला पुरेशी जागा मिळावी म्हणून त्याचा विस्तार करणे इष्ट आहे असे मुंबई सरकारला वाटले हे विस्तार कार्य सन १९५० मध्ये पूर्ण झाले आता हे देशातील सर्वांत उत्तम असे शरीररचनाशास्त्र संग्रहालय आहे

**व्याप्ति व संग्रह :** ग्रँट मेडिकल कॉलेजमधील रोगनिदानशास्त्र संग्रहालयात रोगनिदानशास्त्र, न्यायवैद्यक, आरोग्यशास्त्र व सार्वजनिक आरोग्य या विषयावरील विभाग आहेत या संग्रहालयाने १२००० चौरस फूट जमीन व्यापलेली असून हे संग्रहालय पॅथॉलॉजिकल ब्लॉकच्या रोगनिदान मजल्याच्या हॉलमध्ये आहे व उत्तर, पूर्व व पश्चिम बाजूंना तळमजला व पहिला मजला यांच्यामधील पोटमाळ्यात आहे संग्रहालयात साधारणपणे ३,००० प्रदर्शन वस्तु किंवा नमुने आणि काही हजार आकृत्या, आलेख व छायाचित्रे आहेत प्रत्येक नमुन्याची वर्गीकरणाद्वारे छायाचित्रे असून त्यासाठी त्याविषयीची टंकलिखित माहिती आहे आणि आवश्यक असेल तेथे रोग्याचे छायाचित्र दिले आहे शिवाय संग्रहालयात मेणाचे नमुने, वर्णनात्मक चित्रे, आकृत्या व त्वचा रोगासंबंधीची छायाचित्रे आहेत प्रत्येक नमुन्याचे सूक्ष्मदर्शक यंत्रातून दिसणारे भागहि ठेवण्यात आले आहेत संग्रहालयात रोग्यांच्या छायामुद्रितावरून घेतलेल्या छायाचित्रांचा मोठा संग्रह आहे अनेक पेट्यांमध्ये रोगाच्या निरनिराळ्या अवस्थांचे क्षकिरणलेख ( रेडिओग्राफ ) असून क्षकिरणचित्रे ( स्कियाग्राम्स ) पाहता यावी म्हणून या पेट्यांवर प्रकाशाची व्यवस्था करण्यात आली आहे.

शरीररचनाशास्त्र संग्रहालयातील संग्रह हा मानवी शरीररचनासंबंधी असून त्याद्वारे मानवी शरीररचनेची विविध अंगे दाखविण्यात आली आहेत ( अ ) सर्वसाधारण मानवी शरीररचना ( ब ) असाधारण मानवी शरीररचना ( क ) मानवी गर्भविज्ञान शास्त्र आणि ( ड ) तौलनिक शरीररचनाशास्त्र यांची सोदाहरण माहिती देण्याच्या दृष्टीने हाडे व मृदुभाग यांचे नमुने या संग्रहालयात ठेवलेले आहेत सध्या शरीररचनाशास्त्र संग्रहालयात २००० वर नमुने असून, त्यांपैकी परदेशातून आणलेले काही नमुने सोडल्यास बाकीचे सर्व नमुने शरीररचनाशास्त्र विभागात काम करणाऱ्या लोकांनीच तयार केलेले आहेत

**शैक्षणिक कार्य :** रोगनिदानशास्त्र संग्रहालयासही प्रात्यक्षिकासाठी खोली असून तीत साधारणपणे १०० लोकांना बसण्याची सोय आहे संग्रहालयातील साहित्याचे संपूर्ण वर्णन देण्यात आले असून त्यावरील नावाच्या चिठ्ठ्याही वर्णनात्मक आहेत बहुतेक बाबतीत वर्णनाबरोबर आकृत्याहि काढलेल्या आहेत या संग्रहालयातील आकृत्या, चित्रे, छायाचित्रे नमुने, तक्ते, शीर्षक ठळक व मनात ठसणारी असून ती वर्गवार लावलेली आहेत आणि येथील प्रत्यक्ष नमुने अशा रीतीने प्रदर्शित करण्यात आलेले आहेत की ते पाहिले असता उत्तम रीतीने ग्रथित केलेला संपूर्ण विषय दृष्टीपुढे उभा राहतो आणि त्यांच्याकडे परीक्षक दृष्टीने पहाणाराला ते स्वविषयासंबंधी संपूर्ण माहिती देऊ शकतात वैद्यकशास्त्र संग्रहालय हे मुख्यतः करून वैद्यकशास्त्राच्या अभ्यासू विद्यार्थ्यांसाठी व संशोधकांसाठी आहे सार्वजनिक प्रदर्शनात शिक्षणात्मक विभाग ठेवण्याची व्यवस्था संग्रहालयाकडून केली जाते आणि मुंबई शहरात व मुंबई शहराबाहेरील ठिकाणी तशाच प्रकारची जी प्रदर्शने भरविण्यात येतात त्या प्रदर्शनासाठी शक्य तेव्हा येथील साहित्य उसनवार देण्यात येते

शरीररचनाशास्त्र संग्रहालयात वैद्यकशास्त्राच्या विद्यार्थ्यांना उपयोगी पडतील अशा वर्णनात्मक टिपणांचा संग्रह आहे कॉलेजचे ग्रंथालय सार्वजनिक उपयोगासाठी नसून ते मेडिकल कॉलेजच्या विद्यार्थ्यांसाठी आहे

**प्रकाशने :** रोगनिदानशास्त्र संग्रहालयाने काही सर्वांत जुनी माहिती पुस्तके प्रसिद्ध केली आहेत व अशा एका माहितीपुस्तकाची पहिली आवृत्ति १८५० साली प्रसिद्ध करण्यात आली होती नंतरच्या आवृत्त्या १९०४, १९१६, १९२५ व १९३० साली प्रसिद्ध करण्यात आल्या. संग्रहालयातील साहित्यावर आधारलेले माहितीपर लेख शास्त्रीय नियतकालिकांत ( जर्नल्स ) आलेले आहेत

**कामाचे तास :** रोगनिदानशास्त्र संग्रहालय व शरीररचनाशास्त्र संग्रहालय शनिवार खेरीज कामाच्या इतर सर्व दिवशी सकाळी ९ ते संध्याकाळी

५ पर्यंत खुलें असतें. शनिवारीं तें सकाळीं ९ ते दुपारीं १ पर्यंत खुलें असतें. प्रतिबंधक व सामाजिक वैद्यकशास्त्र संग्रहालय सकाळीं १०–३० ते सध्याकाळीं ५–३० पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य. हीं संग्रहालयें ग्रँट मेडिकल कॉलेजच्या विद्यार्थ्यांसाठीं मुख्यत्वेंकरून पदवीपूर्व व पदव्युत्तर विद्यार्थ्यांसाठीं आहेत.

**नियामक मंडळ :** हीं संग्रहालयें ग्रँट मेडिकल कॉलेजच्या संबंधित विभाग प्रमुखाच्या नियंत्रणाखालीं आहेत.

**सेवकवर्ग :** संग्रहालयासाठीं खास सेवकवर्ग नाहीं. रोगनिदानशास्त्र, शरीररचनाशास्त्र व प्रतिबंधक व सामाजिक वैद्यकशास्त्र या विषयांचे प्राध्यापक हे अनुक्रमें रोगनिदानशास्त्र, शरीररचनाशास्त्र व प्रतिबंधक व सामाजिक वैद्यकशास्त्र संग्रहालयांचे संग्रहालयाध्यक्ष आहेत. त्यांच्या हाताखालील सेवकवर्गाची त्यास मदत मिळते.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं स्वतंत्र अंदाजपत्रकी तरतूद नाहीं. विभागाच्या सामान्य अंदाजपत्रकी तरतुदींमध्यें त्याचा समावेश करण्यांत आलेला आहे.

**अभिप्राय :** हीं संग्रहालयें फक्त वैद्यक शास्त्राच्या विद्यार्थ्यांसाठीं आहेत. रोगनिदानशास्त्र संग्रहालय पाहण्यासाठीं रोज सरासरी ६० लोक येतात. ह्या संग्रहालयात संग्रहित रासायनिक वस्तु व एकाच प्रकारच्या जादा वस्तु ठेवण्यास पुरेशी जागा असून प्रयोगशाळेची सोयहि उपलब्ध आहे. मरणोत्तर तपासणी व शस्त्रक्रियाविषयक साहित्य व नमुने या मार्गांनीं संग्रहालयासाठीं वस्तु मिळविल्या जातात. भारतातील व परदेशातील अनेक वैद्यक शास्त्राच्या महाविद्यालयांना संग्रहालयाचा उपयोग होतो. वस्तूंवरील नावांच्या चिठ्ठ्या इंग्रजी व हिंदुस्थानी भाषांत आहेत. हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे.

शरीररचनाशास्त्र संग्रहालय पाहण्यास रोज सरासरी १५० लोक येतात. इमारत योग्य व संख्या पुरेशी असून तींत प्रयोगशाळेसाठीं आवश्यक ती सोयहि आहे. अध्यापक मृत शरीरापासून नमुने तयार करतात. नमुन्यांना नावांच्या चिठ्ठ्या लावलेल्या नाहींत परंतु त्यांना क्रमांक दिलेले असून त्या क्रमांकाची माहिती देणाऱ्या सूचिपत्रिका ठेवलेल्या आहेत. हें संग्रहालय वैद्यकशास्त्राच्या विद्यार्थ्यांसाठीं उपयुक्त असून ते त्याचा योग्य उपयोग करून घेतात.

## (२) सेंट झेव्हियर्स कॉलेज संग्रहालयें

(अ) सृष्टिविज्ञान संग्रहालय आणि (ब) भारतीय ऐतिहासिक संशोधन संस्थेचें संग्रहालय

**स्थापना :** (अ) सृष्टिविज्ञान संग्रहालय सन १९१८ (ब) भारतीय ऐतिहासिक संशोधन संस्थेचें संग्रहालय सन १९२८.

**पूर्वेतिहास :** सृष्टिविज्ञान संग्रहालयाची स्थापना सन १९१८ मध्यें झाली. सुरुवातीस ब्लॅटरचा शुष्कौषधि संग्रह होता व त्यात नंतर हॅलबर्ग व मॅकॅन यांनीं व इतरांनीं भर घातली. प्राणिसंग्रहात अॅस्टमथ, पॅलेडिअन व इतरांनी केलेला संग्रह आहे.

भारतीय ऐतिहासिक संशोधन संस्थेच्या संग्रहालयाची स्थापना संस्थेचे संचालक रेव्ह. फादर एच. हेरास यांनीं संशोधन करून व खरेदी करून संग्रहित केलेल्या पुरातन वस्तूंच्या साहाय्यानें करण्यांत आली. रेव्ह० फादर एच. हेरास यांनीं विद्यार्थ्यांना प्रदर्शन वस्तूंचा फायदा व्हावा यासाठीं त्या ठेवण्याची योग्य ती व्यवस्थाहि केली. कालानुक्रमें हें संग्रहालय विकास पावून भारतीय ऐतिहासिक संशोधन संस्थेचा आवश्यक व महत्त्वाचा भाग बनलं आहे. परंतु पैशाच्या व जागेच्या अभावीं त्यात वाढ झालेली नाहीं व सध्या असलेले संग्रह देखील ठेवण्याची योग्य व्यवस्था करणें शक्य होत नाहीं.

**व्याप्ति व संग्रह :** प्राणिसंग्रह विभागात मुंबई, साष्टी बेट येथील व भारतातील इतर ठिकाणच्या जवळ जवळ सर्व पक्ष्यांचा संपूर्ण संग्रह आहे. वनस्पतिविषयक विभागात मुंबई राज्यातील अनेक ठिकाणांहून मिळविलेले शुष्कौषधिसंग्रह व शुष्क रोपटीं आहेत.

भारतीय ऐतिहासिक संशोधन संस्थेच्या संग्रहालयात भारतीय शिल्पकृतींचे नमुने असून त्यांत ब्राह्मण, बुद्ध व जैन कालीन धातूंच्या मूर्ति, नाण्यांची मोठी पेटी, हस्तलिखितें व इतर पुरातन वस्तु यांचा समावेश होतो.

**शैक्षणिक कार्य :** (अ) सृष्टिविज्ञान संग्रहालयास जोडून एक ग्रंथालय असून तें फक्त विभागाच्या उपयोगासाठीं आहे. तेथील एकूण पुस्तकांची व नियतकालिकांची संख्या ५,००० पेक्षा अधिक आहे. संग्रहालयांतील नमुने प्रदर्शन विभागातील व्याख्यानांच्या खोलींत पाहण्यासाठीं ठेवण्यात आले आहेत व तेथें कांचचित्रें व चलचित्रपट देखील दाखविण्यात येतात. विद्यापीठाच्या निरनिराळ्या महाविद्यालयांतील संशोधन पथकें अभ्यासास मदत होण्यासाठीं वनस्पति विभागास वारंवार भेटी देतात.

(ब) भारतीय ऐतिहासिक संशोधन संस्थेंत भारततत्त्वविचार या विषयातील सुमारें २६,००० ग्रंथ आहेत. ह्या ग्रंथांचा उपयोग संशोधनाचें काम करणारे विद्यार्थी व शिक्षक वर्ग आणि संग्रहालय पाहण्यास येणारे अभ्यासू संशोधक यांजकडून केला जातो. संग्रहालयात 'एपिडियास्कोप' (पारदर्शक व अपारदर्शक वस्तूंचे छायाचित्र दर्शविणारें यंत्र) असून पुराणवस्तुशास्त्रीय विषयावर व्याख्यान देण्यासाठीं तो उपयोगात आणला जातो. सुप्रसिद्ध विद्वान् मंडळींना संशोधन विद्यार्थ्यांपुढें व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांपुढें व्याख्यान देण्यासाठीं वेळोवेळीं आमंत्रण देण्यात येतें. प्रदर्शनवस्तूंवरील नावांच्या चिठ्ठ्या इंग्रजींत आहेत. ह्या प्रदेशातील इतर विद्यापीठें व महाविद्यालयें यांतील अभ्यासू संशोधक ही संस्था व हें संग्रहालय पाहण्यास नेहमीं येतात. विशेष गोष्टी समजावून सांगण्याकरिता नकाशे, तक्ते, नमुने, साचे, चित्रें, वगैरेंची मदत घेण्यात येते.

**प्रकाशनें :** (अ) सृष्टिविज्ञान संग्रहालय–संग्रहालयाच्या वनस्पति विभागाकडून पुढील पुस्तकें व प्रबंध प्रसिद्ध करण्यात आले आहेत :– (१) एडन येथील वनस्पती, (२) सिंधूच्या खोऱ्यातील वनस्पती, (३) सिंधप्रांतातील वनस्पती, (४) कच्छ मधील वनस्पती, (५) खंडाळ्यातील वनस्पती, (६) मुंबई विभागातील वनस्पतीपुनर्विचार, (७) पुरंदर येथील वनस्पती, (८) सौराष्ट्रातील वनस्पती आणि (९) बॉंबे गवत, वगैरे.

(ब) भारतीय ऐतिहासिक संशोधन संस्थेची प्रकाशनमाला असून तींत 'इंडॉलॉजी', भारततत्त्वविचार या विषयासंबंधीचे १८ खंड ह्यापूर्वीच प्रसिद्ध करण्यात आले आहेत.

**कामाचे तास :** कामाच्या सर्व दिवशीं सकाळी ८ ते सायंकाळी ५ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** सृष्टि-विज्ञान संग्रहालय हें वनस्पतिशास्त्र व प्राणिशास्त्र विभागाच्या नियंत्रणाखाली असून त्याचा कारभार महाविद्यालयांतील त्या त्या प्राध्यापकाच्या हातीं सोंपविण्यात आलेला आहे भारतीय ऐतिहासिक संशोधन संस्थेच्या संग्रहालयाचा कारभार संस्थेकडून पाहिला जातो.

**सेवकवर्ग :** खास सेवकवर्ग नाहीं.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं खास अंदाजपत्रकी तरतूद नाहीं. ऐतिहासिक संग्रहालयाचें अंदाजपत्रक इतिहास विभागाच्या अंदाजपत्रकात समाविष्ट केलेलें आहे. तसेंच, सृष्टिविज्ञान संग्रहालयाचें अंदाजपत्रक हें वनस्पतिशास्त्र व प्राणिशास्त्र विभागाच्या अंदाजपत्रकाचाच एक भाग आहे.

**अभिप्राय :** सृष्टिविज्ञान संग्रहालय हें सामान्यपणें सर्व लोकांसाठीं नाहीं. फक्त कांहीं ठराविक दिवशीं तें सर्व लोकांना खुलें असतें. ज्या विद्यार्थ्यांसाठीं हें मुख्यतः स्थापन करण्यांत आलें आहे त्या विद्यार्थ्यांना सोईस्कर होईल अशा ठिकाणीं हें वसलेलें आहे. खुद्द संग्रहालयात प्रयोगशाळेची सोय उपलब्ध नसली तरीहि लगतच्या प्रयोगशाळांचा उपयोग करण्यात येतो. रोपट्यावर नावाच्या चिठ्ठ्या लावण्याच्या कामीं शास्त्रीय नियमाचा अवलंब करण्यांत आलेला असून त्यानुसार या चिठ्ठ्या लॅटिन व इंग्रजी भाषांत आहेत. वनस्पतिशास्त्र विभागातील वनस्पति सांभाळून ठेवण्यासाठीं असलेल्या जागेंत अलीकडेच वाढ करण्यात आलेली असून ती दुप्पट करण्यात आलेली आहे आणि एक मोठा प्रदर्शनविभाग बांधण्याची योजना आहे

भारतीय ऐतिहासिक संशोधन संस्थेचें संग्रहालय मुंबई येथील सेंट झेवियर्स कॉलेजमध्यें असून तेथें पायीं अथवा भाड्याच्या वाहनानें सहज जाता येतें. हें संग्रहालय सामान्यपणें सर्व लोकांसाठीं नाहीं, परंतु महाविद्यालयातील दोन हजाराहून अधिक विद्यार्थी याचा लाभ घेतात. विद्वान् व प्रतिष्ठित पाहुण्यांना ही संस्था व संग्रहालय पहाण्यासाठीं निमंत्रण देण्यांत येतें. येथील मौल्यवान् प्रदर्शनवस्तु स्वत संचालकाच्या रखवालींत असतात. हें संग्रहालय म्हणजे संचालकानें संशोधन, खरेदी व देणगी याद्वारा केलेला वैयक्तिक संग्रह आहे. इतर संग्रहालयांनीं मागणी केली असतां येथील प्रदर्शनवस्तु त्यांना उसनवार देण्यात येतात व त्याचप्रमाणें अभ्यासासाठीं इतर संग्रहालयाकडून तेथील प्रदर्शनवस्तु मिळविण्यात येतात निधि व जागा यांची पुरेशी तरतूद असल्यास, या संग्रहालयाचा विकास करून तें त्या प्रदेशातील एक महत्त्वाची शैक्षणिक व सांस्कृतिक संस्था बनविण्याची योजना आहे.

## (३) सेठ गोर्धनदास सुंदरदास मेडिकल कॉलेज संग्रहालय

(१) शरीररचनाशास्त्र व गर्भविकासशास्त्र संग्रहालय, आणि (२) सेठ जम्नादास लल्लुभाई रोगनिदानशास्त्र संग्रहालय.

**स्थापना :** (१) शरीररचनाशास्त्र व गर्भविकासशास्त्र संग्रहालय सन १९२५ आणि (२) सेठ जम्नादास लल्लुभाई रोगनिदानशास्त्र संग्रहालय सन १९२६.

**पूर्वेतिहास :** शरीररचनाशास्त्र व गर्भविकासशास्त्र संग्रहालय, १९२५ पासून सुरू करण्यात आलें व तेव्हांपासून नमुने संग्रहित करण्यात व तयार करण्यात आले. शरीररचनाशास्त्रविषयक खास वस्तूंची संख्या सुमारें ४,००० असून त्या दोन विभागांत ठेवण्यांत आल्या आहेत. कॉलेजच्या मुख्य इमारतींत दोन वेगवेगळ्या दालनांत हे दोन विभाग आहेत. एक विभाग वैद्यकशास्त्राच्या परीक्षेस बसणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं आहे व दुसऱ्या विभागात मुख्यत्वेंकरून जीवशास्त्रविषयक नमुने आहेत व तें विज्ञान पदवीसाठीं अभ्यास करणाऱ्या शरीररचनाशास्त्र विषयाच्या विद्यार्थ्यांसाठीं असून त्यापासून शरीररचनाशास्त्र व गर्भविकासशास्त्र यासंबंधीं तौलनिक माहिती मिळते.

सेठ जम्नादास लल्लुभाई रोगनिदानशास्त्र संग्रहालय १९२६ सालीं सुरू करण्यांत आलें. तें १९३४ सालीं नवीन इमारतींत नेण्यांत आलें. ही नवीन इमारत के. सी. सेठ जम्नादास लल्लुभाई चॅरिटीज यांजकडून मिळालेल्या रु. १,१०,००० इतक्या रकमेच्या देणगीमधून कॉलेजच्या पूर्वेस बांधण्यात आली. या इमारतीला एक तळमजला असून वर दोन प्रदर्शनविभाग आहेत. येथें १७८२ च्या वर रोगनिदानशास्त्रविषयक नमुने पाहण्यासाठीं ठेवलेले आहेत. संग्रहालयाचा एक भाग लोकस्वास्थ्य व न्यायवैद्यक व विष चिकित्सा या विषयाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना उद्बोधक असे नमुने ठेवण्यासाठीं राखून ठेवण्यात आला आहे. तळमजल्यावर मोठी व सुसज्ज अशी डार्क-रूम आणि वरच्या मजल्यावर छिद्र कक्ष (?) रूम आहे. त्याशिवाय नमुने व संग्रहालयांतील इतर सामान चौकटींत बसविण्यासाठीं दोन खोल्या आहेत.

**व्याप्ति व संग्रह :** शरीररचनाशास्त्र व गर्भविकासशास्त्रविषयक संग्रहालयात मेडिकल कॉलेजच्या पदवीपूर्व व पदव्युत्तर विद्यार्थ्यांना उपयोगी पडतील असे शरीररचनाशास्त्र दृष्ट्या उद्बोधक नमुने आहेत. तसेच रोगनिदानशास्त्र संग्रहालयात मुख्यतः पदव्युत्तर विद्यार्थ्यांना उपयोगी पडतील असे रोगनिदानशास्त्रदृष्ट्या उद्बोधक नमुने आहेत.

शरीरशास्त्र व गर्भशास्त्रीय संग्रहालयात, पदवीपूर्व व पदव्युत्तर विद्यार्थ्यांकरितां शरीरशास्त्रोपयोगी नमुने ठेवलेले असून रोगनिदानशास्त्रविषयक संग्रहालयांत वैद्यकीय महाविद्यालयातील मुख्यतः पदव्युत्तर विद्यार्थ्यांसाठीं रोगनिदानशास्त्रोपयोगी नमुने ठेवलेले आहेत

**शैक्षणिक कार्य :** वैद्यकीय महाविद्यालयातील पदवीपूर्व व पदव्युत्तर विद्यार्थी आणि आपापल्या परीक्षांना बसण्यापूर्वी या संग्रहालयाचा फायदा करून घेणारे निरनिराळ्या शाखांतील विद्यार्थी व इतर रुग्णालयीन परिचारिका यांच्या प्रशिक्षणासाठीं शक्य तेवढ्या सर्व सवलती दिल्या जातात. इतर शालेय व महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना येथील प्रदर्शनवस्तूंची, तपशीलवार माहिती करून दिली जाते सर्व ठिकाणीं नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजींत लावलेल्या आहेत शरीरशास्त्र संग्रहालयात वस्तु ठेवलेल्या पात्रावरच त्याच्या चिकित्साविषयक तपशीलवार वर्णन दिलेलें आहे रोगनिदानशास्त्र संग्रहालयात प्रदर्शित नमुन्यांची माहिती त्यांच्या चिकित्साविषयक तपशीलवार माहितीच्या कागदपत्रांसह त्या नमुन्याबरोबरच ठेवलेली आहे महाविद्यालयीन ग्रंथालयाचा उपयोग संग्रहालयासाठीं देखील करता येतो. ग्रंथालयात सुमारें १७,००० पुस्तकें व नियतकालिकें आहेत.

**प्रकाशनें :** कांहीं नाहींत

**कामाचे तास :** कामाच्या सर्व दिवशीं सकाळीं ८ ते सायंकाळीं ५ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य. पण हीं संग्रहालयें वैद्यकीय विद्यार्थ्यांसाठीं आहेत.

**नियामक मंडळ :** हीं संग्रहालयें त्या त्या विभाग प्रमुखाच्या नियंत्रणाखालीं आहेत.

**सेवकवर्ग** . शरीरशास्त्र संग्रहालय, गर्भशास्त्रीय संग्रहालय व रोगनिदान शास्त्र संग्रहालय यावर अनुक्रमे शरीरशास्त्राचे प्राध्यापक आणि रोगनिदानशास्त्र व सूक्ष्मजंतुशास्त्र या विषयाच्या प्राध्यापकाची देखरेख असते संग्रहालयांना सर्वांत मदत करणाऱ्या संबंधित विभागाच्या सेवकवर्गाच्या जोडीलाच संग्रहालयाचा स्वतःचाहि सेवकवर्ग असून त्यामध्ये प्रयोगशाळा-तंत्रज्ञ, प्रयोगशाळा-सहाय्यक व परिचारक आणि तीन नोकर यांचा समावेश होतो

**आर्थिक तरतूद** . या संग्रहालयाकरिता अर्थसंकल्पात वेगळी तरतूद केलेली नाही

**अभिप्राय** . शरीरशास्त्र संग्रहालयात वस्तुसंग्रह करण्यापुरती जागा असली तरी ती, वस्तू प्रदर्शित करण्यास पुरेशी नाही प्रयोगशाळाविषयक सोयी येथे उपलब्ध आहेत पोलिसांकडून तसेच के इ एम् रुग्णालय व वाडिया प्रसूति रुग्णालय मधून मिळालेल्या मृतशरीरांपासून येथील नमुने गोळा करण्यात आले आहेत मागणी केल्यास इतर वैद्यकीय संस्थांकरिता आवश्यक असलेले नमुनेहि जमविण्यात येतात जरूर पडल्यास नकाशे, तक्ते, इत्यादींचीहि मदत घेतली जाते

रोगनिदान संग्रहालय हे ज्या उद्देशाने स्थापन करण्यात आले त्यादृष्टीने पर्याप्त आहे संग्रह करण्यास पुरेशी जागा व प्रयोगशाळा विषयक सोयीहि येथे आहेत येथील नमुने शवपरीक्षा व शस्त्रक्रियांद्वारा गोळा करण्यात आले आहेत मागणी केल्यास इतर वैद्यकीय संस्थांकरिता आवश्यक असलेले नमुनेहि जमविण्यात येतात हे संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचे सदस्य आहे.

## मुंबई सृष्टिविज्ञान संस्थेचे संग्रहालय

**स्थापना** . १८८३

**पूर्वेतिहास** . ही संस्था १८८३ मध्ये मुंबईच्या आठ नागरिकांनी त्यांच्या स्वरूपात स्थापन केली त्यानंतर लगेच या संस्थेची एक पत्रिका प्रकाशित होऊ लागली व ती तेव्हापासून चालू आहे सन १९२३ मध्ये प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयाच्या मदतीने एक सृष्टिविज्ञान विभाग उघडण्यात आला व त्याचा कारभार संयुक्तपणे पाहिला जात असे मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयातील सृष्टिविज्ञान विभाग हा आज त्याप्रकारचा आशियातील अत्युत्कृष्ट विभाग आहे सध्या या संस्थेचे जवळजवळ ९०० सदस्य असून ते भारत, ब्रह्मदेश, सिलोन त्याचप्रमाणे इंग्लंड, युरोप, अमेरिका आणि इतर देशांत विखुरलेले आहेत ही संस्था जगातील तत्सम कोणत्याहि संस्थांशी, संग्रहालयांशी व शास्त्रीय संस्थांशी संबंध प्रस्थापित करून त्यांच्याशी पत्रव्यवहार करते

**व्याप्ति व संग्रह** सुरवातीपासूनच ही संस्था मोठ्या जोमाने कार्य करीत आलेली आहे सृष्टिविज्ञानविषयक माहिती व नमुने गोळा करणे, एतद्देशीय वनस्पतिजीवन व प्राणीजीवनविषयक माहिती प्रसृत करणे, आणि या देशातील सपन्न व वैचित्र्यपूर्ण अशा वन्यपशुजीवनाचा अभ्यास, संरक्षण व विकास होणे किती आवश्यक आहे या प्रश्नाकडे सरकारचे व जनतेचे लक्ष केंद्रित करणे ही या संस्थेची उल्लेखनीय कार्ये होत

या संग्रहालयातील सृष्टिविज्ञान विषयक नमुन्यांचे वाढते संग्रह हे सदर्भाच्या दृष्टीने, भारतातील अशा प्रकारच्या संग्रहांपैकी अत्यंत मौल्यवान व प्रातिनिधिक स्वरूपाचे समजले जातात या संग्रहामध्ये, २१,५०० सस्तन प्राणी, २०,००० पक्षी, ३५०० मासे, ४,००० सरपटणारे प्राणी, १००० भू-जलचर प्राणी, ८०,००० कीटक व इतर पाठीचा कणा नसलेले प्राणी यांचा समावेश होतो

या संस्थेचे एक मोठे ग्रंथालय असून त्यात ६००० पुस्तके, नियतकालिके व इतर प्रकाशने आहेत विद्यार्थ्यांना, संशोधन करणाऱ्यांना व संस्थेच्या सदस्यांना येथील संग्रहाचा व ग्रंथालयाचा वापर करता येतो प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयात सादरीकरण वसवून उभारलेल्या अनेक प्रदर्शनां पैकी सस्तन प्राणी, पक्षी व सरपटणारे प्राणी यांचे त्यांच्या नैसर्गिक निवासस्थानासह नमुने ठेवण्यात आलेले आहेत येथील नमुने संपूर्णपणे या संस्थेने आपल्या सदस्यांच्या सहकार्याने मिळविले आहेत

**शैक्षणिक कार्य** : मुंबई सरकारचे आर्थिक सहाय्य घेऊन ही संस्था गेल्या दहा वर्षांपासून एक सृष्टिज्ञान योजना चालवीत आहे संस्थेने एक पूर्णकालिक संघटक नेमलेला असून तो शाळांना भेट देऊन शिक्षकांना, विद्यार्थ्यांना तसेच सर्वसाधारण जनतेला या योजनेनुसार माहिती देतो त्याचबरोबर, शिक्षकांना व विद्यार्थ्यांना तारापोरवाला मत्स्यालय व मुंबईच्या राणीच्या बागेतील प्राणीसंग्रहालय या संस्थेतर्फे दाखविण्यात येतात. मुंबईतील शाळांतून बालकांसाठी बरीच सृष्टिज्ञान मंडळे स्थापन करण्यात आली असून गेल्या सहा वर्षांपासून ती चांगल्या रीतीने चालविण्यात येत आहेत शिक्षकांच्या सृष्टिविज्ञान मंडळ हे १९५३ मध्ये सुरू करण्यात आले बालवीर, गर्ल गाइड्स, शालेय विद्यार्थी व सृष्टिविज्ञानाची आवड असणाऱ्या व्यक्तींकरिता विशेषतः मुंबई शहराबाहेरील निरनिराळ्या स्थळी सहलींचे अनेक कार्यक्रम आखले जातात

शक्य असेल तेव्हा अशा ठिकाणी संशोधन योजनांची अंमलबजावणी करण्यात येते या संस्थेने आजपर्यंत भारतातील सस्तन प्राण्यांचा व भारताच्या वेगवेगळ्या भागातील पक्ष्यांचा काळजीपूर्वक अभ्यास केलेला आहे प्रिन्स ऑफ वेल्स संग्रहालयातील सृष्टिविज्ञान विभागात, मुंबई सृष्टिविज्ञान संस्थेच्या संग्रहाचा अंतर्भाव होतो त्यामुळे ते त्या संस्थेचेहि संग्रहालय आहे संस्थेच्या विनंतीवरून ही माहिती स्वतंत्र स्थान देऊन देण्यात आलेली आहे या संस्थेने अलिकडेच केलेल्या कामगिरीमध्ये पुढील कामाचा उल्लेख करता येईल मध्यप्रदेशातील पक्षी व सस्तन प्राणी यांचे नमुने गोळा करण्यासाठी निघालेल्या अमेरिकन मोहिमेत सहभागी होणे रससंशोधन केंद्राबरोबर काश्मीरमध्ये काम करणे, काही विशेष योजनांच्या निमित्ताने काही व्यक्तींना आवश्यक ते साह्य देणे जसे १८६९ पासून अज्ञात असलेला परंतु पुन्हा शोधून काढण्यात आलेला फिन्स बाया परत मिळविण्यासाठी प्रवास करणे, ही ती कार्ये होत कच्छमार्गे भारतात ये-जा करणाऱ्या भटक्या पक्ष्यांना पकडण्याची अद्याप प्रकारची एक मोठी योजना जागतिक आरोग्यसंघटनेच्या मदतीने सध्या कार्यवाहीत येत आहे या बाह्यपरोपजीवी जंतूमुळे क्यासानूर जंगलातील रोग व इतर सांसर्गिक रोग उद्भवण्याची शक्यता असते असे जंतू या पक्ष्यांच्या अंगावर असतात किंवा कसे या दृष्टीने त्यांची पाहणी करावयाची असते

**प्रकाशने** या संग्रहालयाची एक पत्रिका वर्षातून तीन वेळा प्रकाशित होत असते या पत्रिकेचे सध्या ५६ खंड प्रकाशित झाले असून ती प्राणीशास्त्र विषयक पौर्वात्य प्रकाशनामध्ये महत्त्वाची गणली जाते या संस्थेने शिकारीचे पक्षी, बदक व इतर पक्षी, सस्तन प्राणी, मासे पकडणे, फुलझाड, फुलपाखरे व इतर सृष्टिविज्ञानविषयक विषयावर देखील पुस्तके प्रकाशित

केलीं आहेत. तसेंच लहान मुलांकरिता पक्षी, वनस्पति व प्राणी यासंबंधीच्या पुस्तिका प्रसिद्ध केल्या आहेत. या पुस्तिकांत रंगचित्रें दिलेलीं असून त्यांची किंमत त्यामानानें फारच कमी ठेवली आहे.

**कामाचे तास :** कार्यालय, ग्रंथालय व संदर्भसंग्रह शनिवार खेरीज करून इतर सर्व दिवशीं सकाळीं १०-३० ते सायंकाळीं ५-३० पर्यंत आणि शनिवारीं सकाळीं १०-३० ते १-३० पर्यंत खुलीं असतात.

**प्रवेश :** संशोधनकार्य करणाऱ्या सर्व व्यक्तींना संदर्भ-संग्रहाचा वापर करता येतो.

**नियामक मंडळ :** या संस्थेचा सर्व व्यवहार निवडून दिलेल्या दहा सदस्यांच्या कार्यकारी समितीच्या निर्देशनानुसार एका अवैतनिक चिटणिसा-कडून पाहिला जातो. हे सर्व सदस्य मुंबईपासून २०० मैलांच्या आत राहाणारे असतात. या समितीच्या मदतीस एक दहा सदस्यांची सल्लागार समिति असते. हे सदस्य वेगवेगळ्या विषयांचे तज्ज्ञ व भारताचे रहिवासी असतात.

**सेवकवर्ग :** अवैतनिक चिटणीस हे, संग्रहालयाध्यक्ष, एक वरिष्ठ व दोन कनिष्ठ संशोधन सहाय्यक आणि कारकूनवर्ग यांच्या सहाय्यानें येथील कामकाज पाहतात.

**आर्थिक तरतूद :** पत्रिका प्रकाशनाचा खर्च धरून परंतु संदर्भ-संग्रहाच्या व्यवस्थापनाचा खर्च खेरीज करून संस्थेचा एकूण वार्षिक व्यवहार ६०,००० रुपयांचा आहे. सदस्यांकडून येणारी वर्गणी, अनेक प्रकाशनांपासून मिळणारा नफा आणि केंद्र व राज्य सरकारांनीं दिलेलीं अनुदानें यांमधून हा खर्च भागविला जातो. चालू वर्षी या संस्थेस रॉकफेलर फाऊंडेशनकडून दहा हजार डॉलर्सचें अनुदान मिळालें असून त्यायोगें आपल्या कार्यक्षेत्रांत अधिक वाढ करता येईल अशी संस्थेला आशा आहे. प्राणिविज्ञानाच्या अनेक विषयांच्या बाबतींत विशिष्ट स्वरूपाचें प्रत्यक्ष कार्य करूं इच्छिणाऱ्या सदस्यांमध्यें व इतर व्यक्तींमध्यें ही रकम वाटून दिली जात आहे.

**अभिप्राय :** मुंबई राज्य उद्यान व बागा आणि मुंबई राज्य वन्य प्राणी संरक्षण सल्लागार मंडळावर तसेंच वन्यप्राणी संरक्षण भारतीय मंडळावर या संस्थेस वैधानिक प्रतिनिधित्व देण्यात आलेलें आहे. मुंबई वन्य पशु व वन्यपक्षी संरक्षण अधिनियम, १९५१ या कायद्याचा मसुदा या संस्थेच्या मदतीनें तयार करण्यांत आला. भारतांतील अशा प्रकारचा हा पहिलाच कायदा असून तो आता आदर्श म्हणून सर्वमान्य झाला आहे.

**पुणें :** लोकसंख्या ४,८०,९८२

## बी. जे. वैद्यकीय महाविद्यालय संग्रहालय

(अ) रोगनिदानशास्त्र संग्रहालय (ब) शरीरशास्त्र संग्रहालय आणि (क) औषधिविज्ञान, विषविज्ञान व आरोग्यशास्त्र संग्रहालय.

**स्थापना :** रोगनिदान व शरीरशास्त्रविषयक संग्रहालय–१९४६; औषधिविज्ञान, विषविज्ञान व आरोग्यशास्त्रविषयक संग्रहालय–१९५१.

**पूर्वेतिहास :** रोगनिदानशास्त्र संग्रहालय हें, वैद्यकीय महाविद्यालय उघडण्यापूर्वी वैद्यकीय शाळेंत स्थापन झालेलें होतें. तेथील काहीं नमुने ४० वर्षांपूर्वींचे आहेत. सध्याच्या स्वरूपांत तें १९४६ सालीं अस्तित्वांत आलें असें म्हणावें लागेल.

त्याचप्रमाणें शरीरशास्त्र संग्रहालय १९४६ पासून म्हणजे महाविद्यालय उघडल्यापासून स्थापन झालेलें असलें तरी तेथील संग्रहांत वैद्यकीय शाळेंतील काहीं नमुनेहि ठेवलेले आहेत.

औषधिविज्ञान, विषविज्ञान व आरोग्यशास्त्रविषयक संग्रहालय हें, सध्याची महाविद्यालयाची इमारत १९५१ सालीं बांधून पूर्ण झाल्यानंतर उघडण्यांत आलें. तथापि तेथील काहीं नमुने वैद्यकीय शाळेच्या संग्रहालयाच्या वेळे-पासूनचे आहेत.

**व्याप्ति व संग्रह :** रोगनिदानशास्त्र, परोपजीविशास्त्र, सूक्ष्मजंतुशास्त्र व मानवी रोग. (अ) शरीररचना व गर्भविकासशास्त्र–स्वाभाविक व अस्वाभाविक (ब) आरोग्यशास्त्र व सार्वजनिक आरोग्य, न्यायवैद्यक आणि औषधिविज्ञान.

**शैक्षणिक कार्य :** महाविद्यालयीन व विभागीय प्रयोगालयें हीं सार्वज-निक स्वरूपाचीं नाहींत. येथें रोगनिदानशास्त्र, शरीरशास्त्र व औषधिविज्ञान या विषयांचे वर्ग घेतले जातात तसेंच प्रात्यक्षिकेंहि दाखविलीं जातात. संग्रहालयास भेट देणाऱ्या व्यक्तींना, येथील सामग्रीसंबंधीची माहिती प्रादेशिक भाषेंत समजावून देण्यासाठीं एक मार्गदर्शक नेमलेला आहे. प्रसंगविशेषीं खास प्रदर्शनेंहि भरविलीं जातात. फक्त शैक्षणिक संस्थाच आपल्या विद्यार्थ्यांना संग्रहालय पहाण्यास पाठवितात. रोगनिदान, शल्यचिकित्सा, औषधिविज्ञान, स्त्री रोगचिकित्सा यासारख्या निरनिराळ्या वैद्यकीय विभागांकडून त्या त्या विषयाच्या संग्रहालयांतच व्याख्यानें व प्रात्यक्षिकें घडवून आणलीं जातात. नमुन्यांच्या नावाच्या सर्व चिठ्ठ्या इंग्रजींत लिहिलेल्या आहेत. दर महिन्यास भरणाऱ्या रुग्णालयीन-रोगनिदानशास्त्रीय परिषदेसमोर पेशीविज्ञानाचीं विविध लक्षणें विशद करण्यासाठीं रोगनिदान संग्रहालयांत दिव्यांच्या सहाय्यानें दाखवावयाच्या काचचित्रांचा एक संग्रह ठेवलेला आहे.

**प्रकाशनें :** काहीं नाहींत.

**कामाचे तास :** कामाच्या सर्व दिवशीं सकाळीं ९ ते सायंकाळीं ५ पर्यंत व शनिवारीं सकाळीं ९ ते दुपारीं १ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य; परंतु हीं संग्रहालयें मुख्यत: वैद्यकीय विद्यार्थी व शिक्षकवर्ग यांना उपयुक्त व्हावीं या उद्देशानेंच उघडलेलीं आहेत.

**नियामक मंडळ :** महाविद्यालयाचे प्राचार्य हे रोगनिदानशास्त्र, शरीरशास्त्र व औषधिविज्ञान या विषयांच्या प्राध्यापकांमार्फत या संग्रहालयांचा कारभार पाहतात.

**सेवकवर्ग :** संबंधित विभागांच्या सेवकवर्गाकडून या संग्रहालयांची व्यवस्था पाहिली जाते.

याशिवाय शरीररचनाशास्त्र संग्रहालयांत व रोगनिदानशास्त्र संग्रहालयांत प्रत्येकीं दोन नोकर असून औषधिविज्ञान संग्रहालयांत एक प्रयोगशाळा सहाय्यक आहे.

**आर्थिक तरतूद :** या संग्रहालयासाठीं वेगळा अर्थसंकल्प अथवा खास खरेदी निधि नाहीं.

**अभिप्राय :** हीं संग्रहालयें केवळ वैद्यकीय महाविद्यालयीन विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठींच आहेत. रोगनिदानशास्त्र संग्रहालयासाठीं शवच्छेदन करून व शस्त्रक्रिया करतेवेळीं काढलेल्या वस्तु गोळा केल्या जातात. शरीररचना शास्त्र विभागासाठीं वस्तु तयार करण्याचीं साधनें, मृतशरीरें व भारतांतील निर्मात्याकडून योग्य त्या नमुन्यांची खरेदी ही होय. औषधिविज्ञान विभागा-साठीं औषधशास्त्रीय नमुने गोळा करून संग्रह केला जातो.

## डेक्कन कॉलेज संग्रहालय

"पुराणवस्तु व सांस्कृतिक संग्रहालयें" या सदराखालीं पहा

## दिल्ली

**दिल्ली** लोकसंख्या, ९,१४,७९०

### मानवशास्त्र संग्रहालय, दिल्ली विद्यापीठ

**स्थापना** १९४७

**पूर्वेतिहास** : दिल्ली विद्यापीठातील मानवशास्त्र विभागाची जेव्हा सुरुवात झाली तेंव्हाच म्हणजे १९४७ मध्ये या संग्रहालयाची स्थापना झाली पूर्व आफ्रिकेंतून मिळविलेले कांहीं नमुने, भारतीय संग्रहालयाच्या मानवशास्त्र विभागातून मिळालेला अंदमान बेटांतील ओंजेसचा संग्रह, मद्रास सरकारी संग्रहालय व मयूरभंज संस्थानी संग्रहालय येथून मिळालेल्या कांहीं प्रागैतिहासिक प्रदर्शनवस्तु एवढ्या सामुग्रीवर संग्रहालयाची सुरुवात झाली या संग्रहांत भेट म्हणून मिळालेल्या ज्या इतर अनेक वस्तूंची भर पडली त्यात पंतप्रधान श्री जवाहरलाल नेहरू यांनी दिलेल्या मानववंशशास्त्र नमुन्यांचाहि समावेश होतो कलाशिक्षण विभाग असलेल्या इमारतीच्या पहिल्या मजल्यावर ६८'×३७' इतक्या क्षेत्रफळाचा एक लांब दिवाणखाना विद्यापीठानें संग्रहालयास दिलेला आहे प्राध्यापक पी सी बिस्वास हे अति उत्साहानें हें संग्रहालय समृद्ध करण्याकरिता कार्य करीत असतात दिल्ली येथील भारतीय आदिमजाति सेवक संघाचा संग्रहहि उसनवारीच्या तत्त्वावर या संग्रहालयास मिळालेला आहे

**व्याप्ति व संग्रह** आदिमजाति लोकांच्या वस्तु, प्रागैतिहासिककालीन वस्तु, कवट्या, सांगाडे इ विविध संग्रह असून ते वेगवेगळ्या विभागात मांडलेले आहेत

मानववंशसंशोधन विभाग हा सर्वांत मोठा असून तो विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचा आहे त्यात भारतांतील व इतर ठिकाणच्या आदिवासींनीं वापरलेल्या अनेक वस्तु मांडलेल्या आहेत जादु जमातीकडून उपयोगात आणल्या जाणाऱ्या टाइल इ जारण-मारणाच्या वस्तु, स्त्री-पुरुषपूर्वजाच्या आकृत्या व प्रजनन संप्रदाय दर्शविणारें लाकडावरील कोरीवकाम, कुलु लोक ज्यांना मृतात्म्याचा दूत म्हणून मानतात अशा सरड्यासारखें सांप्रदायिक प्रतीक, देवरूप्याच जादुगोष्याचें साहित्य, हत्तीमृगाच्या अस्थ्यांच कवच, भोपळ्याचे सुरे इ या आणिक-संग्रहात समावेश होतो त्याचप्रमाणें या विभागात अरबस्तानांतील धातूंच्या बनविलेल्या सुरया, तिबेटमधील ग्रामीण वस्तु चिनी व तिबेटी पद्धतीचीं पादत्राणें, ऑस्ट्रेलियन बूमरँग, फिजी बेटांत उत्सवप्रसंगीं वापरल्या जाणाऱ्या गदा, चीन, व निकोबार बेटांतील आडवी दांडी असलेली मोठीं धनुष्यें इ वस्तूंचाहि समावेश होतो

भारतीय विभागात आदिवासी जमातींतील कारागिरीचे नमुने आहेत तसेंच बिहारमधील ओरान, हो, मुंडा, व संथाल, मध्य प्रदेशातील गोंड, मुरिया व कारवा, आसाममधील आबोर, नागा, गारो व खासी, उत्तर प्रदेशांतील गडवाली व जौनसारी इत्यादि जमातींच्या प्रातिनिधिक वस्तूंच संग्रह आहे या वस्तूंत शेतीचीं अवजारें, वाद्यें शस्त्र, वाद्युद्धीचीं साधनें व धार्मिक विधींना लागणाऱ्या वस्तु इ चा समावेश होतो

त्याचप्रमाणें त्यात मुरिया, नागा, संथाल, ओरान व तोडा जमातींची वस्त्रप्रावरणें व अलंकार यांचा संग्रहहि मांडलेला आहे

वेतकामाच्या (टोपल्या विणणें) प्रदर्शनवस्तूंत, वेत, ह्वील, कॉइल व इतर टोपल्या विणण्याचे तंत्रविषयक नमुने आहेत वाळलेले भोपळे, लाकूड, व बांबू यापासून बनविलेल्या गृहोपयोगी वस्तु, निरनिराळ्या आकाराचे व बनावटीचे चमचे, पळ्या, प्यालें इ, तंबाखूच्या डब्या, हुक्के, व शेगड्या इ० वस्तुहि त्यात आहेत

प्रागैतिहासिक विभागात प्रागैतिहासिक कालीन व इतिहासाच्या अगदीं सुरुवातीच्या काळांतील वस्तूंचे प्रातिनिधिक नमुने आहेत त्यात अश्मयुग पूर्वकाळांत वापरल्या जाणाऱ्या कुऱ्हाडी, फरशा, सुरे, विळे, कोयते, खुरपीं व यांचीचा विकास दाखविणारीं निरनिराळीं हत्यारें ठेवलेलीं आहेत त्याचप्रमाणें या विभागात मद्रास व मयूरभंज येथील मॅनाइट, ट्रॅप, व वाळूच्या पूर्व उत्तर अश्मयुग कालीन ठिकरीसारखीं हत्यारें व गुजरात व मुंबई येथील सूक्ष्म पाषाणहि मांडलेले आहेत येथील कांहीं मुद्रा, तांबड्या मातीच्या पुतळ्या, व मातीच्या भांड्यांचे अवशेष इ नमुने यावरून हरप्पा संस्कृतीचा बोध होतो अदिचनल्लूर येथील महापाषाण युगीन संस्कृतीच्या प्रातिनिधिक अशा कांहीं लोखंडी वस्तुहि येथें आहेत

तुलनात्मक शरीररचनाविभागात भारतातील स्त्रीपुरुषांची शरीररचना दर्शविणाऱ्या नमुन्यांचा एक सामान्य संग्रह असून त्यात मानवी शरीराचे सांधलेले व न सांधलेले सांगाडे, तसेंच प्रौढ व बालक यांच्या व गर्भाच्या कवट्या, हाताचीं लहान, मोठीं हाडें, अधःहस्थि व स्कंधास्थि, सांधलेलीं हाताचीं व पायाचीं हाड, चिंपाझी, गिबन, ओरँगउटन, यासारख्या प्राण्यांच्या कवट्या व गिबन व माकडें यांच्या हाडांचे सांगाडे आहेत

**शैक्षणिक कार्य** : मानवशास्त्र विभागाच्या विद्यार्थ्यांसाठीं या संग्रहालयात पदव्युत्तर वर्ग चालविले जातात प्रदर्शनवस्तूंच्या नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजीतून आहेत

**प्रकाशनें** : मानवशास्त्रविभाग स्वत च ॲन्थ्रॉपॉलॉजिस्ट नांवाचें नियत कालिक प्रसिद्ध करतें

**कामाचे तास** : संग्रहालय विद्यापीठाच्या कामाच्या दिवशीं सकाळीं १०-३० पासून सायंकाळीं ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश** : विनामूल्य तथापि, संग्रहालय मुख्यत विद्यार्थ्यांसाठीं आहे

**नियामक मंडळ** : संग्रहालय मानवशास्त्र विभाग प्रमुखाच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग** : संग्रहालयाध्यक्ष व चौकीदार

**आर्थिक तरतूद** द्वितीय पंचवार्षिक योजनेसाठीं संग्रहालय व विभागासाठीं रु ९०००/- इतक आवर्तक अनुदान व संग्रहालयासाठीं रु १५०००/-चं अनुदान

**अभिप्राय** संग्रहालयात वस्तूंचा साठा करण्याकरितां जादा सोयींची तरतूद करण्याची आवश्यकता आहे रासायनिक संरक्षण व वस्तूंना डागडुजी देण्यासाठीं या संग्रहालयात एका छोट्या प्रयोगशाळेची तरतूद केलेली आहे वस्तु संपादन करण्याचे मार्ग, संशोधन, देणग्या, खरेदी व देवाणघेवाण हे होत संग्रहालय पहाण्यास येणाऱ्यांची दैनिक संख्या बाराच्या आसपास असून पदवीदान समारंभासारख्या विशेष प्रसंगीं ही संख्या अधिक असते या संग्रहालयात प्राकृतिक व सांस्कृतिक मानवशास्त्र असे दोन मोठे विभाग उघडण्यासंबंधीं विचार चालू आहे

नाहीत. वैद्यकशास्त्राशी संबंधित अशा प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या २०० आहे. संस्थापन दिनाच्या दिवशी म्हणजे १७ मार्च रोजी संग्रहालय विद्यार्थी, अध्यापक वर्ग आणि निमंत्रित पाहुणे यांचेसाठी खुलें असतें आणि त्या दिवशी ही संख्या सुमारें १००० इतकी असते. संग्रहालयाची इमारत सोयीस्कर असून तेथें प्रयोगशाळेची देखील योग्य ती सोय आहे. संग्रहालयांतील नमुने हे रुग्णालयातून व शव विच्छेदनानंतर मिळविण्यात येतात.

## केरळ

**एर्नाकुलम् :** लोकसंख्या ६२,२८३

### प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र संग्रहालय, महाराजा महाविद्यालय

**स्थापना :** इ. स. १८७४ च्या सुमारास.

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय सुमारें ८० वर्षांपूर्वी सुरु करण्यात आलें असून तेव्हांपासून त्याचा महाविद्यालयाचें संग्रहालय म्हणून उपयोग होत आहे.

**व्याप्ति व संग्रह :** महाविद्यालयाच्या इंटर व बी. एस्सी. च्या विद्यार्थ्यांना प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र हे विषय शिकविण्याच्या कामतींव सहाय्यभूत ठरेल असें साहित्य या संग्रहालयात आहे.

**शैक्षणिक कार्य :** प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र हे संग्रहालयाचें स्वरुप केवळ शैक्षणिक आहे व त्यात ठेवलेल्या नमुन्यांचा उपयोग इंटरमीजिएट व बी. एस्सी. या वर्गांतील विद्यार्थ्यांना हे विषय शिकविण्याकरिता करण्यात येतो. सर्वसाधारण जनतेंत संग्रहालय पाहण्याची विशेष जिज्ञासा दिसून येत नाहीं. त्या त्या विषयांचें विशेष ज्ञान संपादन करणारे विद्यार्थीच संबंधित प्राध्यापकाच्या परवानगीनें संग्रहालयाला भेट देतात. अधुनमधून शाळेय विद्यार्थी संग्रहालय पहावयास येतात. वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठ्या इंग्रजीत आहेत.

**प्रकाशनें :** कांही नाहीं

**कामाचे तास :** महाविद्यालयाच्या कामाच्या वेळांत सकाळीं १० ते दुपारीं ४ पर्यंत, हें संग्रहालय उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य, परंतु हें संग्रहालय मुख्यतः महाविद्यालयातील विद्यार्थ्यांकरिता आहे.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय प्राचार्यांच्या नियंत्रणाखालीं असून त्याचा कारभार प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र या विषयांचे प्राध्यापक पाहतात.

**सेवकवर्ग :** संग्रहालयासाठीं खास सेवकवर्ग नाहीं

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं खास अंदाजपत्रकी तरतूद नाहीं.

**अभिप्राय :** ज्या कारणासाठीं संग्रहालय स्थापन करण्यांत आलें आहे तें कारण लक्षात घेतां संग्रहालय सुयोग्य असें आहे. राखीव वस्तु ठेवण्यासाठीं भरपूर जागा असून प्रयोगशाळेचीहि सोय आहे.

## मध्यप्रदेश

**छिंदवाडा :** लोकसंख्या २७, ६५२

### आदिमजाति संशोधन संस्था संग्रहालय

**स्थापना :** इ. स. १९५४

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय मध्यप्रदेश सरकारच्या आदिमजातिकल्याण विभागाच्या आदिमजाति संशोधन संस्थेचा एक भाग असून तें इ. स. १९५४ मध्यें संस्था स्थापन झाली त्याच वेळीं स्थापन करण्यात आलें.

**व्याप्ति आणि संग्रह :** हें संग्रहालय मानववंशशास्त्रविषयक असून त्याच्या संग्रहीं सुमारें २००० वस्तु आहेत. त्यात मुख्यत: मध्यप्रदेशातील आदिमजातींच्या मनुष्याकृतींचे नमुने आहेत. त्याशिवाय वन्य जमातींचें जीवन चित्रित करणारीं रंगचित्रें, नमुने वगैरे आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयांतील शाळा व महाविद्यालयातील विद्यार्थी आणि सागर व जबलपूर विश्वविद्यालयाचे विद्यार्थी भेट देतात व त्यांना संग्रहालयातील वस्तूंची संपूर्ण माहिती देण्याचें काम संग्रहालयाध्यक्ष स्वत: करतात. संग्रहालयानें विद्यार्थ्यांकरिता एक प्रदर्शनविभाग उघडला असून संग्रहित वस्तु निरनिराळ्या शाळांमधून फिरविण्याची योजना आहे. वस्तूंवरील नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजी किंवा हिंदी भाषेंत असतात

**प्रकाशनें :** 'संग्रहालय वार्ता' या नावाचें नियतकालिक.

**कामाचे तास :** मध्यप्रदेश सरकारच्या कामाच्या सर्व दिवशीं सकाळीं ११ ते संध्याकाळीं ५ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय आदिम जाति संशोधन संस्थेच्या संचालकाच्या नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष श्री. ए. एम्. कुरेशी, एम्. ए., एक संग्रहालय-लेखक, एक शिपाई आणि एक रात्रीचा चौकीदार.

**आर्थिक तरतूद :** सुमारें रु. १५००

**अभिप्राय :** संग्रहालय सोयीस्कर अशा ठिकाणीं असून दररोज सरासरी १५ व दरवर्षी सुमारें ५००० प्रेक्षक संग्रहालय पहावयास येतात. गणेश मेळाव्याच्या प्रसंगीं प्रेक्षकांची अलोट गर्दी असते. प्रदर्शनविभागात नकाशे, तक्ते, नमुने, छायाचित्रें इत्यादि वस्तु मोठ्या प्रमाणात मांडण्यात आल्या आहेत एक स्वतंत्र आंकडेवार माहितीचा प्रदर्शनविभाग उघडण्याचें ठरविलें आहे. संग्रहालयाकरिता नवी इमारत बांधण्याच्या योजनेचा विचार चालू आहे संग्रहालयातील प्रदर्शनवस्तु खरेदी, देणगी आणि अदलाबदल या विविध मार्गांनीं मिळविण्यांत येतात. कांहीं खास प्रसंगीं प्रदर्शनेंहि भरविलीं जातात. हें संग्रहालय दिल्लीच्या संग्रहालय संघाचें सदस्य आहे.

**शिवपुरी :** लोकसंख्या ५०,०००.

### प्रादेशिक वन प्रशिक्षण शाळा संग्रहालय

**स्थापना :** इ. स. १९४७

**पूर्वेतिहास :** इ. स. १९४७ शिवपुरी येथील प्रादेशिक वन प्रशिक्षण शाळेंत वनपालांना प्रशिक्षण देण्याचे सुरुवात करण्यात आली त्याच वेळी हें संग्रहालय स्थापन करण्यात आलें वन प्रशिक्षण व पदव्युत्तर प्रशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांनीं संग्रहालयाकरीतां बऱ्याच वस्तु जमविल्या आहेत

**व्याप्ति आणि संग्रह :** संग्रहालयात पुढील विभाग आहेत :–

(१) कीटकशास्त्र विभाग

(२) इमारती लाकूड विभाग

(३) जंगलात उत्पन्न होणाऱ्या किरकोळ वस्तूंचा विभाग

(४) मृत्तिकाशास्त्रविषयक विभाग

कीटकशास्त्र विभागांत लाखेच्या किड्याचा जीवनेतिहास, हुरडी, भोकें पाडणारे कीटक आणि नरम करणारे किडे यांमुळें इमारती लाकडास पोहोंचणारे

दानें या गोष्टी दाखविल्या आहेत जंगलांत उत्पन्न होणाऱ्या किरकोळ वस्तूंच्या विभागात तंतु, कच्च्या रेशमाचे धागे, गळिताची धान्यें, प्राण्यांची हाड, कातडी आणि शिंगें इत्यादि वस्तु आहेत.

भूस्तरशास्त्रविषयक विभागांत खडकाचे नमुने मांडण्यांत आले आहेत

इमारती लाकूड रापविण्याची भट्टी, मजी रचणें, लाकूड रापविणें, घरें, विहिरी, पूल इत्यादि सर्व गोष्टींचे नमुने एका विभागात ठेवण्यांत आले आहेत वनस्पतिशास्त्रविषयक नमुने, जंगली जनावरें आणि पक्षी आणि त्यांची उपयुक्तता यासारखेच सचित्र तक्ते येथें आहेत खजूर, गूळ वगैरे वस्तु कशा बनवाव्या हें दाखविणारी छायाचित्रें येथें आहेत.

**शैक्षणिक कार्य** • हें संग्रहालय भिन्नभिन्न वनविभागांतील प्रशिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां आहे संग्रहालयामुळें त्यांना जंगलांतील वेगवेगळ्या वस्तूंचा परिचय घडतो संग्रहालयातील वस्तूंची माहिती देण्याचें काम त्यासाठीं नियुक्त केलेले दुय्यम वनक्षेत्रपाल करतात वस्तूंवरील नावांच्या चिठ्ठ्या इंग्रजी व हिंदी भाषांत लावण्यात आल्या आहेत

**प्रकाशनें** : काहीं नाहीं

**कामाचे तास** • हें संग्रहालय सर्व दिवशीं कचेरीच्या कामकाजाच्या वेळात उघडें असतें

**प्रवेश** : विनामूल्य

**नियामक मंडळ** हें संग्रहालय संचालक, प्रादेशिक वनशाळा, शिवपुरी, मध्यप्रदेश, यांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग** : दुय्यम वनक्षेत्रपाल यांच्या अधिकाराखालीं हें संग्रहालय आहे त्याच्या खेरीज अन्य कोणताहि सेवकवर्ग नियुक्त केलेला नाहीं

**आर्थिक तरतूद** : संग्रहालयासाठीं वेगळी आर्थिक तरतूद नाहीं शाळेच्या अर्थसंकल्पातच संग्रहालयाचा समावेश होतो

**अभिप्राय** • काहीं नाहीं

### सागर

## सागर विद्यापीठ पुराणवस्तु संग्रहालयें

' पुराणवस्तु आणि सांस्कृतिक संग्रहालयें ' या खालीं पहा

### मद्रास

## अन्नमलाईनगर लोकसंख्या ४०१५

## प्राणीशास्त्र संग्रहालय, अन्नमलाई विद्यापीठ

**स्थापना** • इ स १९२९

**पूर्वेतिहास** • हें संग्रहालय इ स १९२९ च्या सुमारास स्थापन करण्यांत आलं संग्रहालयातील बहुतेक वस्तु प्राध्यापक आर् व्ही शेषय्या, प्राणीशास्त्र विभागाचे माजी प्रमुख, एल. के सौरीराजुलु आणि इतर प्राध्यापक व विद्यार्थी यांनीं अनेक शैक्षणिक दौरे करून जमविलेल्या आहेत

**व्याप्ति आणि संग्रह** • संग्रहालयात अरियालूर आणि वृद्धाचलम् या नद्यांच्या पात्रात सांपडलेल्या दुर्मिळ अशा अश्मीभूत वस्तु, दक्षिण भारतांतील गोड्या व खाऱ्या पाण्यांतील मासे, भू-जलचर प्राण्यांचे आणि सरपटणाऱ्या प्राण्यांचे दुर्मिळ नमुने असून त्याशिवाय अपृष्ठवंशीय प्राण्यांचा व अस्थिविज्ञानविषयक नमुन्यांचा एक फार मोठा संग्रह येथें आहे तौलनिक शरीररचना शास्त्राच्या दृष्टीनें विच्छेदित नमुन्यांचा मोठा संग्रह असलेलें हें एकमेव संग्रहालय आहे दक्षिण भारतांतील कीटक, तसेंच पोर्टोनोव्हो येथील समुद्राच्या पाण्यातील व नदीच्या मुखप्रदेशातील विविध प्राण्यांचा संग्रह करण्याबाबतच्या योजना तयार करण्याचे काम सध्या चालू आहे

**शैक्षणिक कार्य** विभागाच्या विद्यार्थ्यांकरितांच हें संग्रहालय असून तौलनिक शरीररचनाशास्त्र, गर्भविज्ञानशास्त्र आणि दक्षिण भारतांतील प्राणी यांच्या अभ्यासासाठीं त्यांना सर्व प्रकारच्या सवलती दिल्या जातात विनंती केल्यास विभागीय सेवकवर्ग संग्रहालयाची माहिती देतो. कधीं कधीं खास प्रदर्शनेंहि भरविलीं जातात वस्तूंवरील नावांच्या चिठ्ठ्या इंग्रजींत लिहिलेल्या असून त्या अर्थबोधक आहेत अनेक प्राणिशास्त्रज्ञ आणि या विषयाची आवड असलेले अनेक विद्यार्थी संग्रहालयास भेट देतात

**प्रकाशनें** : काहीं नाहीं.

**कामाचे तास** : रविवार खेरीज करून सर्व दिवशीं सकाळीं १० ते सायंकाळीं ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश** • विनामूल्य.

**नियामक मंडळ** हें संग्रहालय अन्नमलाई विद्यापीठाच्या प्राणीशास्त्र विभागाच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग** संग्रहालयासाठीं वेगळा सेवकवर्ग नेमलेला नाहीं

**आर्थिक तरतूद** संग्रहालयाचा खर्च विभागाच्या सर्वसाधारण अंदाज पत्रकातून भागविला जातो

**अभिप्राय** : विद्यापीठाच्या आवारांत सोईस्कर ठिकाणीं हें संग्रहालय असून विद्यार्थ्यांना जाण्यायेण्यास सोईचें आहे वर्षांतून सरासरी २,००० प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात चिदंबरम् येथील उत्सवांच्या वेळीं आणि विभागीय प्रदर्शनांच्या वेळीं प्रेक्षकांची संख्या वरील असते संग्रहालयाची इमारत अपुरी असून राखीव संग्रह ठेवण्यासाठीं पुरेशी जागा नाहीं या संग्रहालयांतील वस्तु, संशोधन आणि उत्खनन या मार्गांनीं मिळविलेल्या आहेत

## कोइमतूर : लोकसंख्या १,९७,७५५

## (१) कृषि महाविद्यालय संग्रहालय

**स्थापना** इ स १९०९

**पूर्वेतिहास** • इ स १९०९ मध्यें स्थापन झालेलें हें संग्रहालय कोइमतूरच्या कृषि महाविद्यालयाशीं आणि संशोधन संस्थेशीं संलग्न आहे

**व्याप्ति आणि संग्रह** • संग्रहालय कृषि व तत्सम शास्त्रांना वाहिलेलं आहे येथील संग्रहांत पुढील गोष्टी आहेत (अ) बीं बियाणें, द्विदल धान्य, डाळी, गळिताचीं धान्यें, तंतुमय पिकें वगैरे, (ब) खनिज द्रव्यें, खडक वगैरे, (क) कीटक रोग आणि बुरशीचे रोग, (ड) अवजारें आणि हत्यारें यांचे नमुने आणि (इ) पेंढा भरलेले पक्षी, साप, कोंबड्या, बदकें आणि इतर रक्षक प्राणी

**शैक्षणिक कार्य** विभागाच्या उपयोगाकरितां कृषि महाविद्यालय आणि संशोधन संस्था यांना जोडून एक ग्रंथालय असून त्यात कृषि व तत्सम

नवी दिल्ली : लोकसंख्या २,०६,११८.

## १. स्थापत्य संग्रहालय

**स्थापना :** १९५१.

**पूर्वेतिहास :** दिल्ली येथे भरलेल्या आंतर्राष्ट्रीय स्थापत्य प्रदर्शनात मांडलेल्या धरणयोजनांच्या प्रतिकृती व राष्ट्रीय महत्त्वाच्या अशा इतर प्रदर्शनवस्तु, नवी दिल्ली येथे एक स्थापत्य संग्रहालय स्थापन करण्यासाठी संगृहित करण्यात याव्यात असे पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांना वाटले. त्यांनी जाणीवपूर्वक केलेल्या सूचनेनुसार या संग्रहालयाची कल्पना मूर्त स्वरूपास आली. मध्यवर्ती जल-विद्युत मंडळाने हे काम हाती घेतले व प्रदर्शनाच्या दैनंदिन व यांत्रिक विभागातील प्रदर्शकांना अशा प्रदर्शनवस्तु संग्रहालयात मांडण्याविषयी विनंती केली. त्याप्रमाणे सर्व प्रदर्शकांनी उत्साहपूर्वक व तत्परतेने या कामी सहकार्य दिले आणि मध्य व राज्य सरकारे, युगोस्लाव्हिया, इटाली, स्विझर्लंड, फ्रान्स या देशांच्या राष्ट्रप्रतिनिधी व इतर अनेक व्यापारी संघटना यांनी ही संस्था स्थापण्याच्या कामी यथाशक्ति मदत केली, आणि त्याचेच फळ म्हणजे आकर्षक अशा लहान प्रतिकृतींचा अंतर्भाव असलेले प्रस्तुत संग्रहालय होय. यांपैकी काही त्यांचे प्रत्यक्ष काम करून दाखविणाऱ्या प्रतिकृति आहेत व त्यामुळे भारतीय संघराज्याच्या निरनिराळ्या राज्यातील निरनिराळ्या धरण-योजनांचे यथार्थ दर्शन घडते. सर्व देशभर वाया जाणाऱ्या पुराच्या पाण्यामुळे वेळोवेळी ओढवणारी संकटे आणि मानवी-जीवन, मालमत्ता व पिके यांचा होणारे अपरिमित नुकसान टाळण्याचा प्रश्न अत्यंत बिकट होऊन बसला आहे. संग्रहालयात प्रदर्शित केलेले धरणयोजनांचे नमुने म्हणजे अशा बहुतेक प्रश्नांचे व्यवहार्य उत्तरच होय.

**व्याप्ति व संग्रह :** संग्रहालयातील प्रतिकृती, नमुने, तक्ते व नकाशे यांच्या सहाय्याने आपल्या देशातील जल-विद्युत विकास क्षेत्रात जी राष्ट्रीय प्रगति घडून आली तिची व त्याप्रमाणेच इतर देशातील स्थापत्य विषयक महान् कामगिरीची सर्वसाधारण कल्पना देणे हा या संग्रहालयाचा हेतु आहे.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयातील अधिकारी प्रेक्षकांना प्रदर्शन-वस्तुविषयी माहिती देतात. संग्रहालयात निरनिराळ्या योजनासंबंधीची चलचित्रे आहेत. वेळोवेळी व्याख्यानादि ठेवली जातात. महत्त्वाच्या व्यक्ती तसेच आगाऊ कळविल्यास तांत्रिक विषयांचा अभ्यास करणारे विद्यार्थी व शिक्षक यांना येथील वरिष्ठ अधिकारी संग्रहालय स्वतः बरोबर हिंडून दाखवितात. संग्रहालयात असलेल्या नमुन्यांसारखीच प्रतिकृति बनविण्याची इच्छा असलेल्या जिज्ञासूंना योग्य ते मार्गदर्शन केले जाते. नमुन्याविषयीची माहिती देणारे वर्णनात्मक फलक, तसेच तक्ते नावाच्या चिठ्ठ्या सर्वत्र लावलेल्या आहेत. नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजीत आहेत. स्थापत्य व तंत्रकलाविषयक शिक्षण संस्थातील विद्यार्थ्यांचे गट जेव्हा शैक्षणिक सहलीसाठी दिल्लीला येतात तेव्हा संग्रहालयास भेट देतात.

**प्रकाशने :** (१) स्थापत्य संग्रहालय (इंग्रजी पुस्तिका) (२) सचित्र पोस्टकार्डे.

**कामाचे तास :** संग्रहालय सोमवार व इतर सुटीचे दिवस सोडून सर्व दिवशी सकाळी १० वाजल्यापासून दुपारी ५ वाजेपर्यंत खुले असते.

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** कालवे-संचालनालयाच्या अधिकाराखालील केंद्रीय जल विद्युत मंडळाच्या नियंत्रणाखाली हे संग्रहालय असून एक उपसंचालकाच्या अधिकाराखाली या संग्रहालयाच्या आरेखन व प्रकल्प विभागास संलग्न केले आहे.

**सेवक वर्ग :** सहाय्यक संचालक, पर्यवेक्षक, मानचित्रकार, मार्गदर्शक, फराश व चौकीदार.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाच्या केवळ व्यवस्थेसाठी म्हणून वार्षिक अर्थसंकल्प रु. ८,००० चा आहे.

**अभिप्राय :** येथील सेवकवर्ग केंद्रीय जल विद्युत मंडळामधीलच आहे. संग्रहालय मध्यवर्ती ठिकाणी वसलेले असून लोकांच्या येण्याजाण्याच्या दृष्टीने सोयीचे आहे. संग्रहालय पहाण्यास येणाऱ्यांची दैनिक संख्या १५ असून वार्षिक ६००० इतकी आहे. "भारत १९५८" या प्रदर्शनातील या संग्रहालयाच्या विभागात येथील अनेक प्रदर्शन-वस्तु मांडल्या होत्या. त्यास सुमारे २५ लाख लोकांनी भेट दिली. मथुरा रोडवरील स्थायी प्रदर्शनाच्या ठिकाणी हे संग्रहालय हलवावे असे ठरविण्यात आले आहे. तेथील संग्रह ठेवण्यासाठी पुरेशी जागा आहे. या संग्रहालयाची मूळ सुरुवात परदेशाहून भेट म्हणून मिळालेल्या वस्तु तसेच घटक राज्ये व केंद्रीय जल-विद्युत मंडळ यांजकडून मिळालेले जल विद्युत योजनांचे नमुने यांमधून झाली. इतर नमुन्यांपैकी काही विकत घेतलेले आहेत व काही स्थानिकरीत्या बनविलेले आहेत.

## २ विज्ञान संग्रहालय, राष्ट्रीय पदार्थ-विज्ञान प्रयोगशाळा

**स्थापना :** १९५६

**पूर्वेतिहास :** विज्ञान संग्रहालयाच्या बाबतीत तज्ज्ञ असलेले युनेस्कोचे धी ओ'डो यांच्या मदतीने जून १९५६ मध्ये राष्ट्रीय पदार्थ विज्ञान प्रयोगशाळेच्या एका दालनात या विज्ञान संग्रहालयाची लहान प्रमाणात सुरुवात झाली. युनेस्कोचे कार्यक्रमानुसार युनायटेड किंगडम् व युरोपमधील विज्ञान, तंत्रकलाविषयक व औद्योगिक संग्रहालयांचा तपशीलवार अभ्यास करण्यासाठी धी आर सुब्रह्मण्यन्, प्रभारी अधिकारी यांची नेमणूक करण्यात आली. संग्रहालयात सध्या वस्तुप्रदर्शनासाठी ५००० चौरस फूट जागा असून संग्रह ठेवण्यासाठी ९०० चौरस फूट जागा आहे.

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयाचा उद्देश भौतिक शास्त्राचा विकास दर्शविणे व विज्ञानाच्या कामगिरीवर व निरनिराळ्या राष्ट्रीय प्रयोगशाळांनी चालविलेल्या कार्यावर भर देऊन, विज्ञानाची मूलतत्त्वे दिग्दर्शित करणाऱ्या व शैक्षणिक महत्त्वाच्या प्रत्यक्ष कार्य करून दाखविणाऱ्या नमुन्यांची प्रयोगाच्या दृष्टीने उभारणी करणे हा होय. या संग्रहालयात पुढील विषयांचा अंतर्भाव होतो. युगानुयुगे चालत आलेल्या कालमापन पद्धति, इलेक्ट्रॉनिक्सचा विकास, काच तंत्रकला, प्रदीप्तविद्युद्दीपाचा विकास, दृष्टिवैद्याविषयक प्रयोग, सूक्ष्मदर्शक यंत्रे व दुर्बिणी यांचा विकास, व्यावहारिक महत्त्वाची खनिजद्रव्ये व खनिजधातु, स्फटिकविद्या, हवा व हवामान, शास्त्रीय व औद्योगिक संशोधन संस्थेने चालविलेल्या राष्ट्रीय प्रयोगशाळातील संशोधनाचा विकास, विद्युत् व निर्वात पंप.

प्रत्यक्ष कार्य करून दाखविणाऱ्या खालील प्रदर्शन-वस्तु विशेष आकर्षक व मनोरंजक आहेत — वाल्वघटिकायंत्र, टेलिफोन पद्धतीतील स्वयंचलित रेखा संयोजनकार्य प्रत्यक्ष दर्शविणारा नमुना, भूगर्भातील धातु शोधून काढणारे धातुशोधन यंत्र, सर्वसाधारण दृष्टिदोष व त्यांची सुधारणा दर्शविणारा नमुना, वाणी व संगीतामुळे निर्माण होणाऱ्या ध्वनिलहरींचे व दूरचित्रवाणीचे प्रात्यक्षिक

संग्रहालयाच्या कार्याची प्रत्यक्ष ओळख करून देणारा एक अपूर्व नमुना संग्रहालयाच्या प्रवेशद्वारापाशीं ठेवलेला आहे. हा नमुना म्हणजे एक बोलकी प्रदर्शन वस्तु असून ती प्रेक्षकांना सोप्या भाषेत भारतातील विज्ञान, तंत्रकला व उद्योग यांची प्रगति याविषयीं माहिती देते.

हें वर्णन इंग्रजी किंवा हिंदींतून सांगितलें जातें. प्रेक्षकाला ज्या भाषेंतून वर्णन ऐकावयाचें असेल त्याप्रमाणें त्यानें दोनपैकीं एक बटन दाबावें म्हणजे भाषण सुरू होतें. एक ग्रहमालागृह (प्लॅनेटेरियम) देखील उभारण्यात यावयाचें आहे. खगोलशास्त्राचा प्राथमिक परिचय घडविणाऱ्या वस्तूहि तयार करण्यात येत आहेत. अठरा फूट व्यासाचा घुमट असलेली ग्रहमालागृहाची इमारत तयार होतांच प्रमुख ग्रहताऱ्यांची स्थिति व भ्रमण दर्शविणारे चित्रपट नियमितपणें सुरू करण्यात येतील

**शैक्षणिक कार्य :** भौतिक विज्ञानाचा विकास कसकसा होत गेला हें दाखविणें व तसेंच विज्ञानाचीं मूलभूत तत्त्वें विशद करणारे शैक्षणिक महत्त्वाचे नमुने तयार करणें हें संग्रहालयाचें ध्येय आहे. राष्ट्रीय भौतिक प्रयोग शाळेंत एक प्रेक्षागृह असून त्याच्या बाजूस असलेल्या खोल्याचा उपयोग शास्त्रीय विषयावरील चित्रपट दाखविण्याकरितां केला जातो. भौतिक विज्ञानाच्या सर्व शाखासंबंधीच्या संदर्भ ग्रंथांचा खूप मोठा संग्रह ग्रंथालयांत आहे. हें संग्रहालय पाहण्यास शाळेंतील मुलें आणि महाविद्यालयांतील विद्यार्थी फार मोठ्या संख्येनें येतात व गटांत सहाहून जास्त लोक असतील तर त्यांना माहिती सांगण्याची व्यवस्था केली जाते. शनिवारखेरीज इतर सर्व कामाच्या दिवशीं ४५ मिनिटांच्या अंतरानें दररोज संग्रहालयाविषयीं माहिती देणारीं आठ व्याख्यानें होतात. शनिवारीं हीं व्याख्यानें ३० मिनिटांच्या अंतरानें होतात.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं.

**कामाचे तास :** शनिवारीं दुपारीं, रविवारीं आणि सुटीच्या इतर दिवशीं संग्रहालय बन्द असतें. इतर सर्व दिवशीं तें सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय राष्ट्रीय भौतिक प्रयोगशाळेच्या संचालकांच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** प्रभारी अधिकारी—श्री. बी. सुब्रम्हण्यन्, एम्. ए., एफ. आय. आय. सी. (लंडन), एक विज्ञान सहाय्यक, दोन प्रयोगशाळा-सहाय्यक, एक यंत्रज्ञ, एक शिपाई आणि एक खलाशी

**आर्थिक तरतूद :** वार्षिक वेतनाकरितां अर्थसंकल्पात १८,१०० रुपयांची तरतूद केली आहे. यांत साधनसामग्री व संग्रहालयातील वस्तु वगैरेंचा खर्च अंतर्भूत नाहीं. त्यासाठीं सुमारें ७५,००० रुपयांची वेगळी तरतूद केली आहे

**अभिप्राय :** हें संग्रहालय राष्ट्रीय भौतिक प्रयोगशाळेमध्यें योग्य जागीं असून दरवर्षी सुमारें १०,००० प्रेक्षक संग्रहालय पहाण्यास येतात. त्यांपैकीं सुमारें २० टक्के शाळेंतील मुलें व महाविद्यालयीन विद्यार्थी असतात

सुस्थितीत वस्तु मांडून ठेवण्यासाठीं निदान २०,००० चौरस फूट जागा राहील इतक्या मोठ्या इमारती बांधण्यासाठीं नकाशे तयार होत असून इमारती बांधून पूर्ण झाल्यानंतर संग्रहालयाचा आणखी विस्तार करणें शक्य होईल. या संग्रहालयात राष्ट्रीय भौतिक प्रयोगशाळेचा कारखाना, ग्रंथालय, प्रेक्षागृह, उपहारगृह ह्या सोयी उपलब्ध आहेत. संग्रहालयाला युनेस्कोकडून कांहीं शास्त्रीय सामग्री भेट म्हणून मिळाली असून इतर वस्तू तयार करण्यात व मांडून ठेवण्यात येत आहेत.

## (२) लेडी हार्डिंज वैद्यकीय महाविद्यालय संग्रहालयें

### (अ) रोगनिदानशास्त्र संग्रहालय आणि (ब) शरीररचनाशास्त्र संग्रहालय

**स्थापना :** इ. स. १९१७.

**पूर्वेतिहास :** लेडी हार्डिंज वैद्यकीय महाविद्यालय ता. १७ मार्च १९१७ रोजीं स्थापन करण्यात आलें. वरील संग्रहालयांचीहि स्थापना त्याच वेळीं झाली.

**व्याप्ति व संग्रह :** रोगनिदानशास्त्र संग्रहालयात शस्त्रक्रिया व रोगनिदान या संबंधीचे नमुने आहेत. शरीररचनाशास्त्र संग्रहालयांत, मानवी व तौलनिक शरीररचनाशास्त्र आणि गर्भविकासशास्त्रविषयक नमुने व आकृत्या आहेत. या संग्रहालयात काचपात्रात सुमारें १५० नमुने, ८३ प्रतिकृती, ४०० मानवी हाडें आणि शरीररचनाशास्त्राचे १५ तुलनात्मक नमुने ठेवलेले आहेत.

**शैक्षणिक कार्य :** वैद्यकशास्त्राचे विद्यार्थी व पदव्युत्तर विद्यार्थी यांना रोगनिदानशास्त्र व शरीररचनाशास्त्र यांचा अभ्यास करतां यावा म्हणून हीं संग्रहालयें स्थापन करण्यात आलीं असून अशा विद्यार्थ्यांना सर्व सवलती दिल्या जातात. वस्तूवरील नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजींत असून त्या अर्थपूर्ण आहेत. प्रतिकृती, साचे व तक्ते यांचा संग्रहालयात भरपूर उपयोग करण्यात येतो. येथें रोगनिदानशास्त्र विभागाचें एक ग्रंथालय असून शिवाय महाविद्यालयाच्या सार्वजनिक ग्रंथालयाचा संग्रहालयासाठीं उपयोग करतां येतो. रोगनिदानशास्त्र संग्रहालयाच्या प्रत्येक नमुन्याचें वर्णन व पूर्वेतिहास आणि पिंडरचनाशास्त्रविषयक माहिती यांचें पुस्तक प्रत्येक कपाटांत ठेवलें असून त्यायोगें विद्यार्थ्यांना अशा नमुन्यांचा अभ्यास करणें शक्य होईल

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** हीं संग्रहालयें कामाच्या सर्व दिवशीं सकाळीं ९ ते दुपारीं ४ पर्यंत खुलीं असतात.

**प्रवेश :** विनामूल्य. परंतु हीं संग्रहालयें वैद्यक शास्त्राचा अभ्यास करणारे विद्यार्थी व पदवीधर यांच्यासाठींच आहेत.

**नियामक मंडळ :** हीं संग्रहालयें प्राचार्यांच्या नियंत्रणाखालीं असून प्रत्येक संग्रहालयाचा कारभार विभाग प्रमुख पहातो.

**सेवकवर्ग :** रोगनिदानशास्त्र संग्रहालयासाठीं एक संग्रहालयाध्यक्ष आहे. परंतु शरीररचनाशास्त्र संग्रहालयासाठीं पूर्ण वेळ काम करणारा सेवकवर्ग नाहीं. शरीररचनाशास्त्र विभागाचा सेवक वर्गच शरीररचनाशास्त्र संग्रहालयाचें कामकाज पहातो

**आर्थिक तरतूद :** या संग्रहालयांचें अंदाजपत्रक महाविद्यालयाच्या सर्वसाधारण अंदाजपत्रकांत समाविष्ट केलेलें आहे.

**अभिप्राय :** हीं संग्रहालयें वैद्यकशास्त्राचा अभ्यास करणारे विद्यार्थी, डॉक्टर आणि पदव्युत्तर विद्यार्थी यांचेसाठीं असून सार्वजनिक जनतेसाठीं ती

विषयावरील ६७,००० पुस्तकें आहेत. महाविद्यालयाचा अध्यापकवर्ग आपल्या पाठांकरितां संग्रहालयातून नमुने घेऊन जातात. प्रेक्षकांना संग्रहालय दाखविण्याचें काम संग्रहालयाध्यक्षाकडे आहे. संग्रहालयातील वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठया इंग्रजी आणि तामिळ या भाषांत आहेत.

**प्रकाशनें** : काही नाही.

**कामाचे तास** : रविवारखेरीज इतर सर्व दिवशी संग्रहालय सकाळी ८ ते ११ व दुपारी २ ते संध्याकाळी ५ पर्यंत उघडें असते.

**प्रवेश** : विनामूल्य

**नियामक मंडळ** : हें संग्रहालय प्राचार्य, कृषि महाविद्यालय, कोईमतूर, यांच्या नियंत्रणाखाली आहे.

**सेवकवर्ग** : संग्रहालयाध्यक्ष, व एक पट्टेवाला.

**आर्थिक तरतूद** : संग्रहालयाचा खर्च कृषि महाविद्यालयाच्या अंदाजपत्रकांतून भागविला जातो.

**अभिप्राय** : संग्रहालय सोयीस्कर ठिकाणी आहे. कृषि महाविद्यालयाच्या वसाहतीतील सुमारें २,००० रहिवाशांना आणि महाविद्यालयाच्या आसपास राहणाऱ्या सुमारें ५,००० लोकांना संग्रहालय पहाण्याच्या दृष्टीनें सोयीचें आहे. दररोज सरासरी ८० व वर्षाला जवळजवळ २५,००० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात. येथील उत्सवाच्या आणि महाविद्यालयीन परिषदांचे वेळीं प्रेक्षकांची संख्या खूपच असते. प्रदर्शनवस्तूंसाठी संग्रहालयाची इमारत पुरेशी असली तरी राखीव संग्रह ठेवण्यासाठी तसेंच प्रयोगशाळेसाठी चांगली जागा नाहीं. मुख्य इमारतीचा पहारेकरीच संग्रहालयावर रात्रीं पहारा करतो. या संग्रहालयांतील वस्तू खाजगी रीत्या आणि कृषि महाविद्यालय व संशोधन संस्थेच्या विभागप्रमुखाकडून मिळविल्या आहेत.

## (२) गास वन संग्रहालय

**स्थापना** : इ. स. १९०२

**पूर्वेतिहास** : १९ व्या शतकाच्या अखेरीस श्री जी. एस्. मॅन्सन यांनी मद्रास येथें एक वन संग्रहालय स्थापन केलें परंतु पुरेशा जागेच्या अभावी त्यांनी तो प्रयत्न सोडून दिला त्यानंतर मात्र असें संग्रहालय सुरू करण्याची आवश्यकता भासू लागली पुढें इ स १९०२ मध्ये वन संरक्षक श्री एच् ए गास यांनी जिल्हा वन अधिकाऱ्याच्या कार्यालयात एक वन संग्रहालय स्थापन केलें सुरुवातीला संग्रहालयांत फक्त वनविषयक वस्तूच ठेवण्यात आल्या असल्या तरी पुढे त्याचा विकास होऊन तें संबंध मद्रास राज्याचें प्रातिनिधिक संग्रहालय बनलें संग्रहालयाचें उद्घाटन तारीख १५ एप्रिल १९०२ रोजी हिज् एक्सलन्सी लॉर्ड ॲम्पथिल यांनी केलें

हळूहळू संग्रहालयांतील वस्तूंची संख्या झपाट्यानें वाढू लागली व जागेची कमतरता भासू लागली त्यामुळें इमारत वाढविण्यात आली व ह्या वेळेस संग्रहालयाचें उद्घाटन २५ सप्टेंबर १९०६ रोजी हिज् एक्सलन्सी सर ऑर्थर लॅली याच्या हस्तें झालें सतत वाढत असलेल्या प्रदर्शनवस्तु मांडण्याकरितां एका पूर्णपणें स्वतंत्र इमारतीची गरज भासू लागल्यामुळें सध्याची इमारत बांधण्यात आली. ही इमारत महाविद्यालयाशी संलग्न असल्यामुळे प्रशिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांना ती सोयीची पडते. महाविद्यालयाच्या इमारतीबरोबरच सध्याच्या इमारतीचें उद्घाटन मद्रासचे राज्यपाल हिज् एक्सलन्सी लॉर्ड पेटलंड यांनी १८ ऑक्टोबर १९१५ रोजी केलें.

श्री गास हे वनसंरक्षक असतांना त्यांनीं आपल्या कारकीर्दीत पुढाकार घेऊन व लक्ष घालून या वन संग्रहालयाची स्थापना केली व त्याचा विकास घडवून आणला, हें लक्षात घेऊन मद्रासच्या राज्यपालांनीं या संग्रहालयास त्यांच्या कर्तबगारीच्या स्मरणार्थ 'गास वन संग्रहालय' हें नाव देण्यांत यावें असा आदेश दिला. १९४२ मध्यें दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं महाविद्यालय व संग्रहालय यांच्या इमारतींची लष्कराला राहण्यासाठीं मागणी करण्यांत आली. मद्रासचे प्रमुख वनसंरक्षक श्री जे. ए. मास्टर यांनीं लक्ष घातल्यामुळें संग्रहालयातील वस्तूंचा जाहीर लिलांव झाला नाहीं. मात्र जागेच्या अभावीं बन्याच वस्तु विकून टाकाव्या लागल्या.

महाविद्यालय इ स १९४५ मध्यें पुन्हां उघडण्यांत आलें व महाविद्यालयाचे केन्द्रांत प्राचार्य श्री. सी. आर. रंगनाथन् यांच्या प्रयत्नांमुळें संग्रहालय पुन्हां सुरु करून त्याची पुर्नरचना करण्याच्या हेतूनें संग्रहालयाची इमारत परत मिळविण्यासाठीं कसून खटपट करण्यात आली. इ. स. १९४८ मध्यें भारत सरकारनें महाविद्यालय व संग्रहालय ह्या दोन्ही संस्था आपल्या ताब्यांत घेतल्या.

**व्याप्ति व संग्रह** : वनशास्त्र आणि तत्सम विषय. संग्रहालयांतील वस्तु विविध प्रकारच्या असून त्यांचें वर्गीकरण पुढीलप्रमाणें आहे :— (१) उपयोगी वस्तु : इमारती लाकूड, जंगलांत उत्पन्न होणाऱ्या किरकोळ वस्तु, (२) वनस्पतिशास्त्रविषयक वस्तु : आकारविज्ञानविषयक नमुने, पुष्पौषधिसंग्रह, (३) सूक्ष्मजीवविद्याविषयक नमुने, (४) प्राणीशास्त्र विषयक नमुने आणि कीटकशास्त्रविषयक संग्रह, (५) भूस्तरशास्त्रविषयक संग्रह, (६) गोधुरादि वनस्पति संग्रह, (७) मानववंशशास्त्रविषयक संग्रह, (८) शिकारीचे नमुने आणि (९) संकीर्ण संग्रह.

**शैक्षणिक कार्य** : संग्रहालय पहावयास येणाऱ्या शालेय, महाविद्यालयीन व पदव्युत्तर विद्यार्थ्यांना वस्तूंची माहिती देण्याकरितां जवळच असलेल्या महाविद्यालयात व विश्वविद्यालयात सोयी उपलब्ध असून वन महाविद्यालयातील वनस्पतिशास्त्राचा अंशकालिक प्राध्यापक हे संग्रहालयाध्यक्षाला याबाबत मदत करतात दीपचित्रें आणि शैक्षणिक चित्रपट यांचा वेगळा संग्रह केलेला नसला तरी असा संग्रह महाविद्यालयात असून त्याचा उपयोग विद्यार्थ्यांना वनशास्त्राचें शिक्षण देण्याच्या बाबतींत करण्यांत येतो. संग्रहालयातील सर्व वस्तूंवर इंग्रजींत नांवाच्या चिठ्ठया लावलेल्या असून शक्य असेल तेथें तामीळ भाषेंत देखील नांवाच्या चिठ्ठया लावलेल्या आहेत. वनशास्त्र व तत्सम विषयाचा अभ्यास करणें सोयीचें व्हावें म्हणून संग्रहालयात नकाशे, तक्ते, नमुने वगैरे ठेवण्यांत आले आहेत.

**प्रकाशनें** : काही नाहीं

**कामाचे तास** : हें संग्रहालय आठवड्याच्या सर्व दिवशीं सकाळीं ८ ते ११ व दुपारीं ३ ते ५ आणि सार्वजनिक सुट्टयाच्या दिवशीं फक्त दुपारीं ३ ते ५ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश** : विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय भारत सरकारच्या मद्रास फॉरेस्ट रेंजर्स कॉलेजशी संलग्न असून तें उक्त महाविद्यालयाच्या प्राचार्यांच्या नियंत्रणाखाली आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष : श्री. टी. आर्. सोमसुंदरम्, बी. एस्सी, आणि एक शिपाई.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालय महाविद्यालयाचाच एक भाग असून त्याच्या देखरेखीकरितां व सुधारणेकरितां रु. ११५८ ची वार्षिक तरतूद केलेली आहे.

**अभिप्राय :** संग्रहालय योग्य ठिकाणी आहे. संग्रहालयाची इमारत अत्यंत भव्य असून ती सुयोग्य व प्रशस्त आहे. दररोज सरासरी २५ व दरवर्षी सुमारें १०,००० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात. विशेष प्रसंगी प्रेक्षकांची संख्या वाढते. संग्रहालयाला कॉलेजच्या ग्रंथालयाखेरीज स्वतंत्र ग्रंथालय नाहीं. महाविद्यालयाचें ग्रंथालय हें खास्त्याच्या उपयोगासाठींच आहे. एक शिपाई आणि एक रात्रपाळीचा पहारेकरी संग्रहालयाची रात्रंदिवस राखण करतात. संग्रहालयात राखीव संग्रहासाठीं भरपूर जागा असून त्याला एक छोटीशी प्रयोगशाळा जोडलेली आहे. या वनअधिकारी, विद्यार्थी व वनस्पतिशास्त्रज्ञ यांनी प्रत्यक्ष जमविलेल्या वस्तु संग्रहालयास देणगी दाखल मिळाल्या आहेत. काहीं वस्तु संशोधनाच्या द्वारें व देणगीच्या द्वारें मिळाल्या आहेत.

**मद्रास :** लोकसंख्या १४,१६,०५६

## (१) मद्रास वैद्यक महाविद्यालय संग्रहालयें

(अ) रोगनिदानशास्त्र संग्रहालय,

(ब) आरोग्यशास्त्र संग्रहालय, आणि

(क) शरीररचनाशास्त्र संग्रहालय.

**स्थापना :** (अ) रोगनिदानशास्त्र संग्रहालय–इ. स. १८६८.

(ब) आरोग्यशास्त्र संग्रहालय–इ. स. १९२८, आणि

(क) शरीररचनाशास्त्र संग्रहालय–इ. स. १९३२.

**पूर्वेतिहास :** मद्रासच्या वैद्यक महाविद्यालयाची स्थापना इ. स. १८३५ मध्ये वैद्यकीय शाळेच्या स्वरूपात झाली. पुढें इ. स. १८५० मध्यें या शाळेस महाविद्यालयाचा दर्जा देण्यात आला. रोगनिदानशास्त्र संग्रहालयात सुमारें १,००० नमुने असून सुरुवातीला इ. स. १८६८ मध्यें तें महाविद्यालयाच्या व्हरांड्यातील दालनात उघडण्यात आलें. इ. स. १८७० मध्यें लेफ्ट. कर्नल ई. एफ्. ड्रेक ब्रॉकमन हे रोगनिदानशास्त्राचे पहिले प्राध्यापक होते. इ. स. १८९४ मध्यें हस्तलिखित व शास्त्रीयदृष्ट्या वर्गीकरण केलेला एक सुंदर सूचिग्रंथ तयार करण्यात आला व आता तो संग्रहालयात जपून ठेवण्यात आला आहे. कालान्तरानें निरनिराळ्या प्राध्यापकांच्या मार्गदर्शनाखालीं या संग्रहालयातील वस्तुसंग्रह व त्याची उपयुक्तता वाढत गेली. इ. स. १९२७ मध्यें ११९० नमुने असलेल्या या संग्रहालयाची पुनर्रचना करण्यात येऊन दोन खंडात एक सूचिग्रंथ तयार करून छापण्यात आला. त्यानंतर डॉ. ए. वासुदेवन् हे संग्रहालयाचा कारभार पहात व त्यांनीच सुरुवातीचें बरेंच कार्य केलें. पुढें इ. स. १९३५ मध्यें संग्रहालय सध्याच्या रोगनिदानशास्त्र विभागात (गोशेन ब्लॉक) नेण्यात आलें.

आज येथें सुमारें ५,००० उपयुक्त नमुने असून त्यापैकी जवळजवळ सर्व नमुने या संस्थेमध्यें गोळा करण्यात आलेले आहेत. त्यापैकी बऱ्याच नमुन्यांचें सविस्तर वर्णन करण्यात आलेलें असून थोड्याच अवधींत सर्व वस्तूंचें माहितीपुस्तक तयार करणें शक्य होईल असें वाटतें.

आरोग्यशास्त्र विभागाचें संग्रहालय गेली २५ वर्षे अस्तित्वात असून शक्य असेल तेव्हां तेव्हां त्यात नवीन वस्तूंची भर टाकण्यात येते.

शरीररचनाशास्त्र संग्रहालय सन १९३२ मध्यें अस्तित्वात आलें. वैद्यक महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना वैद्यकीय शास्त्राच्या अभ्यासांत मदत करणें हा या संग्रहालयाचा मुख्य उद्देश आहे.

**व्याप्ति व संग्रह :** रोग्यावर शस्त्रक्रिया करून किंवा त्याच्या मृत्यूनंतर काढलेले त्यांचे रोगग्रस्त अवयव काचेच्या बरण्यात जतन करून ठेवण्यात आलेले आहेत. काचेच्या फळ्या असलेल्या पोलादी रॅकवर सुमारें ५,००० नमुने ठेवण्यात आलेले आहेत.

**आरोग्यशास्त्र संग्रहालय :** येथें आरोग्यविषयक व रोगप्रतिबंधक औषधाचे नमुने ठेवलेले आहेत.

**शरीररचनाशास्त्र संग्रहालय :** हें संग्रहालय मानवी शरीररचनाशास्त्र व तौलनिक गर्भविज्ञानशास्त्र यांच्यापुरतेंच मर्यादित आहे. या संग्रहात सुमारें १,५०० नमुने आहेत.

**शैक्षणिक कार्य.** हीं संग्रहालयें मद्रास वैद्यक महाविद्यालयातील विद्यार्थी व पदव्युत्तर अभ्यास करणारे व इतर वैद्यक व्यावसायी यांच्यासाठी आहेत. इतर महाविद्यालयातील व शाळांतील विद्यार्थीसुद्धा या संग्रहालयास भेट देतात. संबंधित विषयाची माहिती मिळावी म्हणून येथील नमुने निरनिराळ्या सार्वजनिक प्रदर्शनात मांडण्यासाठी तात्पुरते दिले जातात. वस्तूवरील नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजीत आहेत. रोगनिदानशास्त्र विभागातील वस्तूंचें माहितीपुस्तक तयार करण्यात येत आहे. या संग्रहालयातील काहीं नमुन्यांची छायाचित्रें व सूक्ष्मछायाचित्रे देखील काढण्यात येत आहेत. सुमारें ५०० विद्यार्थी या संग्रहालयास वारंवार भेट देत असतात. शिवाय अनेक भारतीय तसेच परदेशी विद्यापीठांचे विद्यार्थी व शिक्षक मद्रास येथें आले म्हणजे या संग्रहालयास वरचेवर भेट देतात. आरोग्यशास्त्रविभाग व शरीररचनाशास्त्र विभाग या दोन्ही विभागाच्या संग्रहालयात दीपचित्रांचा (लॅटर्न स्लाईड्स) संग्रह आहे.

**प्रकाशनें :** काहीं नाहीं.

**कामाचे तास :** आठवड्याच्या सर्व दिवशीं सकाळीं १० ते दुपारीं ४ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय मद्रास वैद्यक महाविद्यालयाचे डीन यांच्या नियंत्रणाखाली आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहालयासाठीं खास सेवकवर्ग नाहीं. रोगनिदानशास्त्राचे प्राध्यापक व आरोग्यशास्त्र व रोगप्रतिबंधक औषधिशास्त्र याचे प्राध्यापक अनुक्रमें रोगनिदानशास्त्र संग्रहालयावर, आरोग्यशास्त्र संग्रहालयावर व शरीररचनाशास्त्र संग्रहालयावर देखरेख ठेवतात. त्या त्या विभागातील सेवकवर्ग त्यांना या कामीं मदत करतो.

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकात निरनिराळ्या विभागांसाठी असलेली तरतूद सोडून संग्रहालयांसाठी कोणतीहि निराळी तरतूद नाही. रोगनिदानशास्त्र संग्रहालयासाठी त्या विभागाच्या अंदाजपत्रकांतील तरतूद पैकी दरवर्षी सुमारे रु ५०० इतकी रकम खर्च करण्यात येते.

**अभिप्राय :** ज्या उद्देशानें ही संग्रहालयें उघडण्यात आलीं तो उद्देश पार पाडण्याच्या दृष्टीनें ही संग्रहालयें योग्य व पुरेशीं असून वस्तु मांडून ठेवण्यासाठी येथें पुरेशी जागा आहे व प्रयोगशाळेचीहि सोय आहे विभागीय प्रयोगशाळांना संग्रहालयांनासुद्धा उपयोग होतो रोग्यांवर केलेल्या शस्त्रक्रियेद्वारे तसेच शवपरीक्षेद्वारे रोगनिदानशास्त्र संग्रहालयासाठी नमुने मिळविण्यात येतात आरोग्यशास्त्र संग्रहालयांतील वस्तु बहुतेक खरेदी करून संपादन करण्यात येतात शरीररचनाशास्त्र संग्रहालयांतील वस्तु मनुष्याच्या प्रेतापासून व प्राणिसंग्रहालयातील प्राण्यांच्या मृतशरीरापासून तेथेंच तयार करण्यात येतात आवश्यक तेवढा निधि जमा झाल्यास सर्व संग्रहालयांची व विशेषत तौलनिक शरीररचनाशास्त्र विभागाची सुधारणा करण्यासंबंधी एक योजना आहे

## ( २ ) स्थापत्य महाविद्यालय संग्रहालय, गिंडी

**स्थापना :** ६ ११ १९२०

**पूर्वइतिहास :** या संग्रहालयात बोहुतेक प्रतिकृती आहेत व तें सन १९२० मध्यें ज्यावेळी स्थापत्यशास्त्र महाविद्यालय चेपॉक येथून गिंडी यथें हलविण्यात आलें त्यावेळी स्थापन करण्यात आलें महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना शिक्षण देण्यासाठी अभ्यासक्रमानुसार निरनिराळ्या प्रतिकृती गरजेप्रमाणें तयार करण्यात आल्या स्थापत्यशास्त्राच्या निरनिराळ्या शाखांचें शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांस जास्तीत जास्त फायदा व्हावा या हेतूनें प्रयोगशाळा व कारखाने ( वर्कशॉप्स ) एवं साधनांनी सुसज्ज ठेवण्यात आलेले आहेत

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयातील प्रमुख संग्रह म्हणजे नागरी व यांत्रिक स्थापत्यशास्त्रविषयक प्रतिकृती असून त्यात पूल, धरणें, तुळ्या, लोहमार्गाखालील नलिका ( कल्व्हर्ट ), भूस्तराचे छेद, इमारतीच्या पायाचें बांधकाम, दरवाजे व खिडक्या यांवरील कमानी, पुढें आलेला भाग, चौकटीची कडा व आतील कोन दाखविणारें छप्पर, छपरालगतचा भिंतीचा त्रिकोणी भाग, निवोप्या, निरनिराळ्या तऱ्हेचे जिने, अनेक मजली इमारती, बंगल्याचे नमुने, चुन्याच्या भट्या, विटा पाडण्याचा ( दगडी ) चौक ( मेज ), रेल्वेला लागणारे इमारती दगड, विलायती दगडाचे नमुने, लाकूडकामातील सांध्याचे नमुने, जमिनीत काँक्रीटचा खांब रोवण्याचे यंत्र, मनोरा असलेल्या इमारतीचा पुढील दरवाजा, मद्रास बंदराची वाढ, उघडझाप करतां येण्याजोगे दरवाजे असलेली चालू स्थितीतील कालव्याची प्रतिकृती, हावरा पूल यांच्या प्रतिकृती असून प्रात्यक्षिक करून दाखविण्यासाठी आवश्यक असलेली उपकरणें दर्शविणाऱ्या इतर प्रतिकृती आहेत

**शैक्षणिक कार्य :** महाविद्यालयास जोडून असलेल्या ग्रंथालयाशिवाय दुसरें ग्रंथालय नाही या ग्रंथालयात, ४,००० पुस्तकें व ९७ नियतकालिकें असून कोणालाहि त्याचा उपयोग करता यईल अशी व्यवस्था अलिकडेच करण्यात आली आहे स्थापत्यशास्त्रावरील पुस्तकें व प्रकाशनें विकत घेण्यासाठी दरवर्षी कांही रकमेची तरतूद केली जाते मद्रास विद्यापीठाच्या निरनिराळ्या स्थापत्यशास्त्रविषयक शाखांच्या पदवीपरीक्षेइतका ज्याचा अभ्यास झालेला आहे अशा महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना आवश्यक त्या शैक्षणिक सोयी संग्रहालयात उपलब्ध आहेत महाविद्यालयास भेट देणाऱ्या इतर शाळांतील व महाविद्यालयातील विद्यार्थ्यांना महाविद्यालयाचा सेवकवर्ग येथील वस्तु दाखवून त्यांविषयी माहिती देतो तेथें दीप चित्रांचा ( लँटर्न स्लाइडस्‌चा ) व शैक्षणिक चित्रपटाचा संग्रह असून या वस्तु मद्रास येथील लोकशिक्षण संचालकाच्या मंजुरीनें इतर संस्थांच्या उपयोगासाठी तात्पुरत्या पाठविल्या जातात सरकारच्या अनुमतीनें खास व ठराविक मुदतीनें प्रदर्शनें भरविलीं जातात व अशीं प्रदर्शनें अनेक खुलीं असून त्यांना येथील संग्रह पाहता येतो. येथील प्रदर्शनवस्तु उसनवारीच्या तत्त्वावर दुसरीकडे पाठविल्या जातात व इतर ठिकाणच्या वस्तु स्वीकारल्या जातात. इतर विद्यापीठें आपापल्या संस्थांसाठी येथील प्रतिकृतींची उसनवारीच्या तत्त्वावर मागणी करतात व लोकशिक्षण संचालकाची आगाऊ मंजुरी घेऊन त्या प्रतिकृती उसनवारीच्या तत्त्वावर देण्यात येतात पाठांच्या वेळीं व प्रात्यक्षिकाचे वर्ग घेतेवेळीं लागतील त्या व लागतील त्याप्रमाणें प्रतिकृती बाहेर काढण्यात येतात व कामाच्या वेळेंत त्या पुन्हा जागच्या जागीं ठेवण्यात येतात येथील वस्तु मुख्यत महाविद्यालयाच्या विद्यार्थ्यांसाठी ठेवलेल्या असल्यामुळें त्यांना चिठ्ठ्या लावलेल्या नाहीत.

**प्रकाशनें :** कांही नाही

**कामाचे तास :** महाविद्यालय चालू असते त्या वेळी सकाळी १० ते दुपारी ४ पर्यंत उघडें असते

**प्रवेश :** विनामूल्य हें संग्रहालय मुख्यत्वेंकरून महाविद्यालयाच विद्यार्थी व शिक्षकवर्ग यांच्या उपयोगासाठींच आहे )

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय महाविद्यालयाच्या प्राचार्यांच्या नियंत्रणाखाली आहे.

**सेवकवर्ग :** नागरी व यांत्रिक स्थापत्यशास्त्राचे प्राध्यापक यांच्या ताब्यांत नागरी व यांत्रिक स्थापत्यशास्त्रविषयक प्रतिकृतींचे संग्रह आहेत त्यासाठी निराळा सेवकवर्ग नाही

**आर्थिक तरतूद** या संग्रहालयासाठी अंदाजपत्रकांत निराळी तरतूद केलेली नाही जरूरीप्रमाणें महाविद्यालयाच्या कारखान्यात ( वर्कशॉपमध्यें ) प्रतिकृती तयार करण्यात येतात

**अभिप्राय :** महाविद्यालयामार्फत प्रदर्शन भरविण्यात येतें त्या वेळे शिवाय इतर वेळीं संग्रहालय प्रेक्षकांना खुलें नसतें संग्रहालयाची इमारत महाविद्यालयाच्या विद्यार्थ्यांचे वर्ग घेण्यास पुरेशी असून निराळा प्रतिकृती विभाग अशी संज्ञा दिली आहे जर हें संग्रहालय सर्व लहानसहान बाबी दर्शविणारें असें एक रीतसर संग्रहालय असतें तर त्याची सर्वांगीण वाढ व्हावी म्हणून इतर संस्थांच्या सोईकरितां आवश्यक ती व्यवस्थाहि करावी लागली असती त्याचप्रमाणें कायमचा सेवकवर्ग, वस्तु मांडून ठेवण्यासाठी पुरेशी जागा इत्यादींसाठींहि व्यवस्था करावी लागली असती सध्यांची वस्तु मांडून ठेवण्यासाठी असलेली जागा पुरेशी नाही, परंतु निराळ्या प्रयोगशाळेची निकड भासत नाहीं कारण हें संग्रहालय स्थापत्यशास्त्र महाविद्यालयास जोडलेलें असून या विद्यालयाची स्वत ची प्रयोगशाळा आहे

## ( ३ ) स्टॅन्ले वैद्यक महाविद्यालय संग्रहालय

( अ ) रोगनिदानशास्त्र संग्रहालय, ( ब ) शरीररचनाशास्त्र संग्रहालय, ( क ) आरोग्यशास्त्र संग्रहालय, ( ड ) औषधि विज्ञान-विभाग संग्रहालय.

**स्थापना :** ( अ ) हा विभाग इ. स. १९२३ मध्यें संग्रहालयात सामील करून घेण्यात आला. ( ब ) हा विभाग इ. स. १९५० मध्यें सामील करून घेण्यात आला, आणि ( क ) हा विभाग नुकताच सामील करून घेण्यात आला.

**पूर्वेतिहास :** मद्रास येथील पूर्वीच्या रॉयापुरम् वैद्यक विद्यालयातील ५०० नमुन्यांच्या छोट्या संग्रहाच्या साह्यानें रोगनिदानशास्त्र संग्रहालय सुरू झालें. हें विद्यालय लेडी विलिंग्डन वैद्यक विद्यालयास १९२३ सालीं जोडण्यांत आलें. संग्रहालयाचे मुख्य शिल्पकार के. डॉ टी. भास्कर मेनन हे असून त्यांनी आपल्या विदेशपर्यटनात निरनिराळे नमुने गोळा केले.

मद्रास वैद्यक महाविद्यालयातील शरीररचनाशास्त्रविषयक मध्यवर्ति वस्तुसंग्रहापासून स्टॅन्ले वैद्यक महाविद्यालयाची शरीररचनाशास्त्र विभाग १९५० साली निराळा केला तेव्हां शरीररचनाशास्त्र संग्रहालय सुरू करण्यात आलें. सध्या त्यात ४०० पेक्षा अधिक नमुने आहेत. त्यात माणसाच्या शरीराचें विच्छेदन करून मिळविलेले भाग, गर्भविकासशास्त्रविषयक नमुने, तौलनिक शरीररचनाशास्त्रविषयक नमुने, इत्यादि वस्तु आहेत. विद्यार्थ्यांस जो कोणताहि भाग पाहण्याची इच्छा होईल तो भाग त्यास शेजारीच त्याच्या आकृतीसह पाहण्यास मिळून त्यास नीट मार्गदर्शन व्हावें या हेतूंन येथील नमुन्यांची संख्या वाढविण्याचें योजिलें आहे. त्याचप्रमाणें तौलनिक शरीररचनाशास्त्रविभाग व वैद्यकशास्त्राचा इतिहास यांच्या नमुन्यासाठीं दोन निरनिराळीं दालनें त्या वस्तुसंग्रहालयात उघडण्याचें ठरविण्यात आलें आहे.

आरोग्यशास्त्रविभागाचें संग्रहालयसुद्धां स्टॅन्ले वैद्यक महाविद्यालयाचा एक भाग आहे

औषधिविज्ञानविभागाचें संग्रहालय अलीकडेच स्थापन करण्यात आलें आहे

**व्याप्ति व संग्रह :** रोगनिदानशास्त्र व इतर संबंधित विषय रोगनिदानशास्त्र संग्रहालयाच्या कक्षेंत येतात सर्व नमुन्यांची मांडणी प्रदेशवार केलेली आहे व कागदपत्रांच्या (रेकॉर्डच्या) दोन दोन प्रती काढण्यात आलेल्या असून एक प्रत रॅकवर ठेवलेली आहे व दुसरी मुख्य रेकॉर्ड फाइलमध्यें आहे. रॅकवरील नोंदणीपुस्तकांतील प्रत्येक पत्रकात ( कार्डात ) वैद्यकशास्त्र विषयक व चिकित्साशास्त्रविषयक माहिती थोडक्यात दिलेली असून त्या कार्डावरून सुचविण्यात येणाऱ्या बाबींच्या सूक्ष्मदर्शक छायाचित्रांची व वैद्यकदृष्ट्या घेतलेल्या छायाचित्रांची थोडक्यात माहिती आहे.

शरीररचनाशास्त्र संग्रहालयात मानवी शरीराचें विच्छेदन करून मिळविलेल्या भागाचेच केवळ नमुने नसून तौलनिक शरीररचनाशास्त्र, गर्भविकासशास्त्र व अस्थि, इत्यादींचेहि नमुने त्यात आहेत

आरोग्यशास्त्र विभागाच्या संग्रहालयांतील वस्तूंचा संग्रह आरोग्यशास्त्र व रोगप्रतिबंधक औषधें यांचा अभ्यास सुकर व्हावा या उद्देशानें केलेला आहे. ह्या आरोग्यशास्त्र संग्रहालयात अनेक प्रतिकृती व उपकरणें असून माहिती देण्यासाठीं, पाणीपुरवठा, जलशुद्धीकरण, पाणी गाळणें, अन्न व पौष्टिक आहार, कृमिसमूह व कृमिविशेष, हिवताप, कुष्ठरोग, जंतुनाशकें, व्यवसाय विशिष्टरोग, पीटिकोत्पादकज्वर, कीटक, प्लेग, देवी, हवा व वायुवीजन, सापळे व स्वच्छता, यांसारख्या निवडक विषयांचे प्रात्यक्षिक करून दाखविण्यासाठीं आवश्यक असलेल्या अनेक वस्तूंच्या नमुन्याशिवाय तक्ते व आकृत्यादि आहेत

औषधिविज्ञान विभाग संग्रहालयात खालील वस्तू आहेत ( अ ) अशुद्ध औषधांचे नमुने. यांना चिठ्या लावलेल्या असून तीं बाटल्यात भरून ठेवलेली आहेत. ( ब ) औषधिनिर्माणशास्त्र व औषधिगुणधर्मशास्त्र या विषयींच्या ग्रंथात आढळून येणाऱ्या निरनिराळ्या औषधांच्या कृती. ( क ) औषधिक्रियाविज्ञानाच्या निरनिराळ्या प्रकारांचें आलेख ( ग्राफ ), ( ड ) औषधिगुणधर्मशास्त्र, औषधिचिकित्सा व विषविज्ञान या संबंधींचे तक्ते, ( ई ) औषधविज्ञानविषयक नमुने, ( फ ) अलीकडेच सुरू केलेली चित्रशाळा व ( ग ) व्यापारी दृष्ट्या तयार केलेल्या अनेक औषधांचा संग्रह.

**शैक्षणिक कार्य :** वैद्यकीय विद्यार्थी व वैद्यक व्यवसायी यांच्यासाठींच हीं संग्रहालयें खुलीं असतात. खात्याच्या उपयोगासाठीं एक ग्रंथालय आहे. विद्यार्थ्यांना तावडतोब पहाता यावें म्हणून प्रत्येक नमुन्याशेजारीं आराखडे ठेवण्याचें ठरविण्यात आलें आहे. कधीं कधीं खास प्रदर्शन भरविण्यात येतात १९५० व १९५२ सालीं अशीं खास प्रदर्शन भरविण्यात आलीं होतीं व तीं पहाण्यास जवळजवळ ३०,००० प्रेक्षक आले होते. इतर शाळा व महाविद्यालयें यांचे विद्यार्थी मधून मधून या संग्रहालयास भेट देत असतात चिठ्या, टीपा इत्यादि सर्व इंग्रजी भाषेत लिहिलेल्या आहेत. क्लिष्टशा वस्तूंचें सम्यक् ज्ञान होण्यासाठीं प्रतिकृती इत्यादींचें साह्य मिळूं शकतें. वैद्यक विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठीं दीपचित्रें व चित्रपट आरोग्यशास्त्रविभागाच्या संग्रहालयांत मिळूं शकतात.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं.

**कामाचे तास :** रोगनिदानशास्त्र संग्रहालय, आरोग्यशास्त्रविभाग संग्रहालय व औषधिविज्ञानविभाग संग्रहालय हीं महाविद्यालयाच्या वेळात उघडीं असतात शरीररचनाशास्त्र संग्रहालय कामाच्या सर्व दिवशीं सकाळीं ८॥ ते रात्रीं ८ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य हीं संग्रहालयें वैद्यकशास्त्राच्या विद्यार्थ्यांसाठीं आहेत

**नियामक मंडळ :** हीं संग्रहालयें स्टॅन्ले वैद्यक महाविद्यालयाचे प्राचार्य ह्यांच्या नियंत्रणाखालीं आहेत.

**सेवकवर्ग :** संबंधित विभागाकडून संग्रहालयाची व्यवस्था पाहिली जात असल्यामुळें संग्रहालयासाठीं निराळा सेवकवर्ग नेमलेला नाहीं.

**आर्थिक तरतूद :** विभागासाठीं केलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीव्यतिरिक्त संग्रहालयासाठीं अशी खास आर्थिक तरतूद केलेली नाहीं

**अभिप्राय :** संग्रहालयें, तीं जे उद्देश डोळ्यासमोर ठेवून स्थापन करण्यात आलीं आहेत ते उद्देश साध्य करण्यास समर्थ आहेत व त्यात संग्रहासाठीं पुरेशी जागा व प्रयोगशाळेची सोय आहे स्टॅन्ले रुग्णालय व आर् एस् आर् एम्. रुग्णालयांत केल्या जाणाऱ्या रोग्यांच्या व मृत रोग्यांच्या देहविच्छेदनामुळें मिळणाऱ्या वस्तूंचा संग्रह करण्यात येत असतो. परदेशातील व देशातील इतर रुग्णालयाकडून देणग्या म्हणून किंवा देवाणघेवाणीच्या तत्त्वावर नमुने मिळाल्यास त्यांचा स्वीकार केला जातो. साधारणतः वैद्यकीय विद्यार्थ्यांशिवाय इतर कोणास संग्रहालयात प्रवेश दिला जात नाहीं परंतु अधिकाऱ्यांच्या आगाऊ परवानगीनें इतरांना संग्रहालयास भेट देता येते.

**मंडपम् कॅंप :** लोकसंख्या माहीत नाही

## मध्यवर्ती सागरी मत्स्योद्योग संशोधन केंद्राचें संदर्भ संग्रहालय

**स्थापना** : १९४९

**पूर्वेतिहास :** माशांच्या निरनिराळ्या जाति, मासेमारीच्या (साधन सामुग्रीचे नमुने) व इतर सागरी सत्पादनाच्या वस्तु यांच्या प्रदर्शनासाठीं हें संग्रहालय १९४९ मध्यें सुरू करण्यांत आलें व तें मुख्यतः सागरी मत्स्योद्योग संशोधन व तत्सम संशोधनकार्य करणाऱ्यासाठीं आहे प्रशिक्षार्थी विद्यार्थी व सामान्य प्रेक्षक यांना सर्वसाधारण मत्स्योद्योगविषयक माहिती या संग्रहालयात मिळूं शकते

**व्याप्ति व संग्रह** : संग्रहालयात संदर्भ म्हणून उपयोग व्हावा याकरितां सागरी माशांचा प्रातिनिधिक स्वरूपाचा व अचूक नामनिर्देश केलेला संग्रह आहे भारताच्या निरनिराळ्या भागांत मासेमारीसाठीं वापरण्यात येणारी साधनसामुग्री, सागरी वनस्पति व त्यापासून बनविलेल्या वस्तु अशा आर्थिक दृष्ट्या महत्त्वाच्या वस्तूंचे नमुनेसुद्धा प्रदर्शनार्थ संग्रहालयात मांडलेले आहेत

**शैक्षणिक कार्य** : काहीं नाहीं

**प्रकाशनें :** काहीं नाहींत

**प्रवेश** : प्रवेश विनामूल्य पण मध्यवर्ती सागरी मत्स्योद्योग संशोधन केंद्र, मंडपम् कॅंपच्या प्रमुख संशोधन अधिकाऱ्याच्या परवानगीनें मिळतो.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय मध्यवर्ती सागरी मत्स्योद्योग संशोधन केंद्राचे प्रमुख संशोधन अधिकारी यांच्या नियंत्रणाखालीं चालविलें जातें

**सेवकवर्ग** : संग्रहालयासाठीं निराळा सेवकवर्ग नेमलेला नाहीं

**आर्थिक तरतूद** : संग्रहालयासाठीं निराळी आर्थिक तरतूद केलेली नाहीं

**अभिप्राय** : मध्यवर्ती सागरी मत्स्योद्योग संशोधन केंद्र, मंडपम् कॅंपच्या मुख्यालयाच्या ठिकाणीं हें संदर्भ संग्रहालय आहे साधारणतः रोज ५० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात मधून मधून भारतातील शाळा, महाविद्यालयें व विद्यापीठ यांतील विद्यार्थ्यांचे गट संग्रहालयास भेट देतात

**ताम्बरम्** : लोकसंख्या १८,५७८

## मद्रास ख्रिश्चन महाविद्यालयाचें प्राणीशास्त्र संग्रहालय

**स्थापना** : १८८५

**पूर्वेतिहास** : वरील महाविद्यालयाचा सृष्टिविज्ञान विभाग सन १८८५ मध्यें सुरू झाला तेव्हां हें संग्रहालय स्थापन करण्यांत आलें प्रारंभीं त्यांतील संग्रह अगदीं लहानसाच होता सन १९११ मध्ये मद्रास येथील सरकारी संग्रहालयाचे अधीक्षक यांनीं महाविद्यालयासाठीं प्रवाळ, शंखयुक्त प्राणी, मासे, सरपटणारे प्राणी, पेंढा भरलेले पक्षी व प्रदर्शनासाठीं उपयोगी पडतील अशा अनेक फळ्या व कपाटें मिळवून त्यास मदत केली नंतर कित्येक नमुने परदेशांत खरेदी करण्यात आले सन १९२८ पासून विद्यार्थी वस्तुसंशोधनासाठीं नियमितपणें फिरू लागले व त्यानंतर वरील दक्षिण भारतातील प्राणी व वनस्पति यांचा संग्रह समृद्ध व प्रातिनिधिक स्वरूपाचा बनला भारताच्या भूगर्भशास्त्रविषयक पहाणी-विभागाकडून कांहीं नमुने देणगीदाखल मिळाल्यावर या संग्रहालयांतील अश्मीभूत प्राणीसंग्रहविभागाची सुरुवात झाली वरील महाविद्यालय सन १९३७ मध्यें मद्रासहून तांबरम् या उपनगरात नेलें गेलें तेव्हां संग्रहालय महाविद्यालयाच्या नवीन इमारतीतील एका स्वतंत्र खोलींत हलविण्यांत आलें सन १९४५ च्या सुमारास संग्रहालयाची जागा अपुरी भासूं लागली आणि शरीरशास्त्रदृष्ट्या महत्त्वाचे असे कित्येक नमुने वर्गातील फळ्या व कपाटांतून ठेवावे लागले भारतातील व सिलोनमधील इतर संग्रहालयांतील नमुन्यांशी या संग्रहालयातील नमुन्यांची अदलाबदल करून येथील संग्रहांत वाढ करण्यात आली आहे सन १९४८ पासून संग्रहालयानें ऑस्ट्रेलिया व अमेरिका येथून पुष्कळ नमुने देवाणघेवाणीच्या मार्गानें मिळविले आहेत

**व्याप्ति आणि संग्रह :** हें संग्रहालय सृष्टिविज्ञान या विषयास वाहिलेलें असल्यामुळें महाविद्यालयांतील प्राणीशास्त्र व वनस्पतिशास्त्र या विषयाच्या अभ्यासास मदत करण्याच्या उद्देशानें संग्रहालयाची व्यवस्था करण्यात आली आहे संग्रहालयात व्यवस्थित जतन करून ठेवलेले प्राणीशास्त्र व वनस्पतिशास्त्र विषयक नमुने, सुटे स्वतंत्र रीत्या मांडून ठेवलेले नमुने, अश्मीभूत प्राणी व वनस्पति, प्रतिकृती व तक्ते आहेत संग्रहालयात लॅंटर्नच्या कांचचित्रांचा व सूक्ष्मदर्शकयंत्रांत पहावयाच्या कांचपट्टयांचा संग्रह आहे या सर्व वस्तूंची एक यादी तयार करण्यात आली आहे व गरज भासल्यास या वस्तूंच्या प्रतिकृती तयार करतां येतील

**शैक्षणिक कार्य :** महाविद्यालयाच्या विद्यार्थ्यांसाठीं संग्रहालयात सर्व सोयी उपलब्ध करून दिल्या जातात लॅंटर्नच्या कांचचित्रांच्या संग्रहाचा व्याख्यान देतांना फार उपयोग होतो. सृष्टिविज्ञानविषयक ग्रंथालय सुव्यवस्थित असून तें संग्रहालयास जोडून आहे ग्रंथालय महाविद्यालयाचे विद्यार्थी व शिक्षकवर्ग यांच्या उपयोगासाठींच केवळ आहे महाविद्यालयाच्या सृष्टिविज्ञानसंस्थेतर्फे दरवर्षी निदान एकदां प्रदर्शन भरविण्यांत येतें वस्तूंच्या नावांच्या सर्व चिठ्ठ्या इंग्रजींत आहेत संग्रहालयांतील वस्तूंचें यथातथ्य वर्णन करणाऱ्या तक्त्यांचा एक लहानसा संग्रह आहे इतर शैक्षणिक संस्था या संग्रहालयाकडून माहिती मिळवितात व सृष्टिविज्ञानाचे विद्यार्थी गटागटानें संग्रहास भेट देतात

**प्रकाशनें :** कांहीं नाहींत

**कामाचे तास :** संग्रहालय व्यावहारिक दिवशीं व ठराविक वेळीं विद्यार्थ्यांसाठीं उघडे ठेवण्यात येतें

**प्रवेश :** प्रवेश विनामूल्य, परंतु तो मुख्यतः महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना दिला जातो.

**नियामक मंडळ** : प्राणीशास्त्र व वनस्पतिशास्त्र विभागामार्फत संग्रहालयाचा कारभार पाहिला जातो

**सेवकवर्ग** : एक पेंढा भरणारा

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं निराळें अंदाजपत्रक बनविण्यात येत नाहीं, परंतु दरवर्षी सरासरी २०० रु. एवढी रक्कम संग्रहालयावर खर्च केली जाते

**अभिप्राय** : संग्रहालयाची इमारत पुरेशी मोठी नसल्यामुळें नमुन्यांची प्रदर्शनासाठीं मांडणी करणें कठीण जातें यामुळें बहुतेक नमुन्यांचा केवळ संग्रह करून ठेवावा लागतो कांहीं वस्तु वर्गातील दोघांशा जागेत मांडलेल्या आहेत दरवर्षी नमुन्यांच्या संग्रहात बरीच वाढ होत असल्यामुळें नवीन नमुने ठेवण्याच्या कामात अडचण येत आहे थोड्याशा संग्रहाचे वगळता बाकीच्या बहुतेक संग्रहाचा देवाणघेवाणीसाठीं उपयोग केला जातो उल्लेखनीय असा खास संग्रह या संग्रहालयात नाहीं संग्रहालयात प्रयोग शाळेचा योग नाहीं केवळ वर्गांत वर्गीज वस्तु इतर संग्रहालयांत उपलब्ध !

पाठविल्या जातात. संग्रहालयांतील बहुतेक वस्तु प्रत्यक्ष बाहेर जाऊन कार्य करणाऱ्या विद्यार्थ्यांनी गोळा केलेल्या आहेत व काही नमुने देवाणघेवाण करून मिळविलेले आहेत.

**तिरुचिरपल्ली** : लोकसंख्या २,१८,९२१

## सेंट जोसेफ महाविद्यालयाचें सृष्टिविज्ञान संग्रहालय

**स्थापना** : सन १८८९ च्या सुमारास.

**पूर्वेतिहास** : संग्रहालयाची सुरुवात लहान प्रमाणावर करण्यात आली, पण हळूहळू त्याचें महत्त्व वाढत जाऊन शेवटीं ३० वर्षांपूर्वी जुन्या महाविद्यालयाच्या आवारांतील मध्यवर्ती इमारतीच्या पहिल्या मजल्यावर तें नेण्यांत आलें.

**व्याप्ति व संग्रह** : या संग्रहांत बहुतेक सृष्टिविज्ञानविषयक म्हणजे कीटक, पक्षी, सस्तन प्राण्यांच्या कवट्या, सर्प व भूगर्भशास्त्रविषयक नमुने यांसारख्या वस्तु आहेत. त्याचप्रमाणें काहीं जुनी शस्त्रास्त्रें व पेंढा भरून ठेवलेले सस्तन प्राण्यांचे थोडेसे नमुने आहेत.

**शैक्षणिक कार्य** : संग्रहालयाला जोडून असलेल्या ग्रंथालयांत सुमारें २५० ग्रंथ असून हा ग्रंथसंग्रह संग्रहालयाध्यक्ष व पेंढा भरणारा यांच्या उपयोगासाठीं आहे. ग्रंथ अतिशय दुर्मिळ असल्यामुळें ते बाहेरील व्यक्तींना दिले जात नाहीत. जरूरी असेल त्याप्रमाणें पेंढा भरणारा प्रेक्षकांना वस्तूंची माहिती समजावून देतो संग्रहालयाध्यक्ष अथवा पेंढा भरणारा संग्रहालयास भेट देणाऱ्या शालेय विद्यार्थ्यांना संग्रहालयांत फिरवून तेथें मांडलेल्या वस्तूंची माहिती देतो. वस्तूंना अर्थवाही नावाच्या चिठ्ठ्या लावलेल्या असून त्या इंग्रजी व तामीळ भाषांतील आहेत. शहरांतील व जिल्ह्यांतील शाळांच्या विद्यार्थिवर्गांत संग्रहाविषयी बरेंच औत्सुक्य आहे व ते नियमितपणें संग्रहालयास भेट देतात.

**प्रकाशनें** : काहीं नाहींत.

**कामाचे तास** : संग्रहालय वर्षांतून २७५ दिवस रोज सकाळीं ९ ते सायंकाळीं ५ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश** : विनामूल्य.

**नियामक मंडळ** : महाविद्यालयांतील सृष्टिविज्ञान विभागप्रमुखाकडून संग्रहालयावर देखरेख ठेवली जाते.

**सेवकवर्ग** : संग्रहालयांत पूर्ण वेळ काम करणारा एक पेंढा भरणारा व मार्गदर्शक असून ते संग्रहालयाध्यक्ष म्हणून काम करणारे वनस्पतिशास्त्राचे प्राध्यापक रेव्हरंड फादर एल. एम्. बाल्म्, एस्. जे., बी. ए. (ऑनर्स) यांच्या हाताखालीं काम करतात.

**आर्थिक तरतूद** : संग्रहालयासाठीं नियमित असें वार्षिक अंदाजपत्रक तयार केलें जात नाहीं. परंतु महाविद्यालयाच्या व्यवस्थापकमंडळाकडून संग्रहालयाच्या आवश्यक त्या खर्चास मंजुरी दिली जाते.

**अभिप्राय** : हें महाविद्यालय शहरांतील मध्यवर्ती व सोईस्कर अशा जागेंत आहे. दर वर्षी सुमारें ७,००० प्रेक्षक भेट देतात. त्यांपैकीं बहुतेक शाळकरी मुलें असतात. संग्रहालयांतील वस्तूंची संख्या वाढल्यामुळें इमारतींत त्यांची फारच गर्दी झालेली आहे व म्हणून जादा जागेची अत्यंत गरज आहे. संग्रहालयावर पहारा ठेवण्याची खास अशी निराळी सोय केलेली नाहीं पूर्वसूचनेनुसार प्रेक्षक आल्याची वर्दी मिळाल्यावरच फक्त पेंढा भरणारा संग्रहालय उघडण्याची व्यवस्था करतो. वस्तूंच्या संग्रहासाठीं असलेली जागा अपुरी आहे. प्रयोगशाळेची व्यवस्था आहे व महाविद्यालयाच्या कर्मशाळेकडून जरूर ती कोणतीहि खास मदत मिळते. प्रदर्शन वस्तूंची इतर संग्रहालयांबरोबर उसनवारीनें देवघेव करण्याचें धोरण या संग्रहालयास पसंत नाहीं.

## म्हैसूर

**बंगलूर** : लोकसंख्या ७,७८,९७७

## मध्यवर्ती महाविद्यालयाचीं संग्रहालयें

(अ) भूगर्भशास्त्रविषयक संग्रहालय, (ब) वनस्पतिशास्त्रविषयक संग्रहालय व (क) प्राणीशास्त्रविषयक संग्रहालय.

**स्थापना** : (अ) भूगर्भशास्त्रविषयक संग्रहालय—सन १८९८, (ब) वनस्पतिशास्त्रविषयक संग्रहालय सन १९२१ व (क) प्राणीशास्त्रविषयक संग्रहालय सन १९२३.

**पूर्वेतिहास** : भूगर्भशास्त्रविषयक संग्रहालय सन १८९८ मध्यें सुरू करण्यांत आलें. त्या वर्षापासून संग्रहालयांत अनेक नमुन्यांची भर पडली आहे.

वनस्पतिशास्त्रविषयक संग्रहालय सन १९२१ मध्यें स्थापन करण्यात आलें व त्यात त्यावेळेपासून वस्तूंची भर पडत गेली आहे.

प्राणीशास्त्रविषयक संग्रहालय सन १९२३ मध्यें सुरू झालें. दर वर्षी विद्यार्थ्यांच्या अभ्यासदौऱ्याच्या वेळीं नवीन नमुने गोळा केले जातात व ते जतन करून प्रदर्शनार्थ कांचेच्या कपाटांतून मांडले जातात. कित्येक दुर्मिळ नमुने व सांगाडे खरेदी करण्यांत आलेले आहेत. प्राणीशास्त्राधिष्ठित निरनिराळ्या प्राण्यांच्या जाति, उपजाति, प्रकार व वर्ग आणि सर्प यासंबंधींच्या नमुन्यांचा आतां एक चांगला संग्रह बनलेला आहे.

**व्याप्ति व संग्रह** : भूगर्भशास्त्रविषयक संग्रहालयात पुढील नमुने आहेत : (अ) खडक, (ब) खनिज पदार्थ, (क) अश्मीभूत वस्तु, (ड) स्फटिक व (इ) रचनात्मक वैशिष्ट्ये दाखविणारे नमुने.

वनस्पतिशास्त्रविषयक संग्रहालयात फक्त वनस्पतींचे नमुने आहेत. प्राणीशास्त्रविषयक संग्रहालयात पाठीचा कणा असलेल्या व पाठीचा कणा नसलेल्या प्राण्यांचे, खास करून सस्तन प्राण्यांचे व प्लॅटिपस्सारख्या दुर्मिळ प्राण्यांचे व पक्ष्यांचे पेंढा भरलेले नमुने आहेत.

**शैक्षणिक कार्य** : महाविद्यालयाच्या विद्यार्थ्यांसाठींच हीं संग्रहालयें आहेत. विद्यार्थ्यांस संग्रहालयांतील वस्तूंची माहिती दिली जाते. ग्रंथालयांतील ग्रंथ व नियतकालिकें विद्यार्थी व शिक्षकवर्ग यांच्या उपयोगासाठींच आहेत महाविद्यालय दिनाच्या वेळीं प्रदर्शन भरविलें जातात तेव्हां लोकांना सुद्धा संग्रहालयें पहाण्याची परवानगी असते. इतर विद्यापीठांचे विद्यार्थीसुद्धा संग्रहालयास भेट देतात.

**प्रकाशनें** : काहीं नाहींत.

**कामाचे तास** : संग्रहालयें महाविद्यालयाच्या कामाच्या वेळीं म्हणजे सकाळीं ११-३० ते सायंकाळीं ६ पर्यंत उघडी असतात.

**प्रवेश** : प्रवेश विनामूल्य, परंतु बाहेरील लोकांना प्रवेश दिला जात नाहीं.

**नियामक मंडळ** : संबंधित विभागाकडून आपापल्या संग्रहालयाचा कारभार पाहिला जातो.

**सेवकवर्ग :** संग्रहालयासाठीं खास वेगळा सेवकवर्ग नेमलेला नाहीं. विभागांचा सेवकवर्ग संग्रहालयांचा कारभार पहातो.

**आर्थिक तरतूद :** या संग्रहालयासाठीं वेगळी अशी अंदाजपत्रकीय तरतूद नाहीं. परंतु विभागाच्या अंदाजपत्रकांत वनस्पतिशास्त्र संग्रहालयासाठीं १००० रुपये मंजूर करण्यात आले आहेत.

**अभिप्राय :** हीं संग्रहालयें लोकांसाठीं खुलीं नसल्याकारणानें व ती महाविद्यालयातील विद्यार्थ्यांसाठींच असल्याकारणानें संग्रहालयांची व्याप्ति फारच मर्यादित आहे. महाविद्यालय दिनाच्या प्रदर्शनाच्या वेळीं संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या लोकांची संख्या मोठी असते. भूगर्भशास्त्रविषयक संग्रहाल्यांतील प्रदर्शन-वस्तु उपलब्ध असलेल्या निधींतून खरेदी करण्यांत येतात किंवा सहलीच्या वेळीं सेवकवर्गाकडून व विद्यार्थ्यांकडून गोळा करण्यांत येतात. नांवांच्या सर्व चिठ्ठ्या इंग्रजींत आहेत. वनस्पतिशास्त्रविषयक संग्रहाल्यांतील नमुने संशोधन व देवाणघेवाण यांद्वारें गोळा करण्यांत येतात. ही देवाणघेवाण बंधनरहित असते. प्राणीशास्त्रविषयक संग्रहालयातील प्रदर्शनवस्तु नैसर्गिक मार्गाद्वारें जमा करण्यांत येतात आणि विद्यार्थी जेव्हां संग्रहालय पहावयास येतात तेव्हां तेव्हां त्या व्यवस्थित मांडून ठेवण्यांत येतात. सांगाड्यांचे कांहीं दुर्मिळ नमुने खरेदी करण्यात येतात. राखीव नमुने व ममकली पेटयांतून ठेवण्यांत येतात. नावांच्या चिठ्ठ्यांवर प्राणीशास्त्रविषयक व नेहमीच्या प्रचारांतली नावें इंग्रजींत लिहिलेली असतात. विद्यार्थ्यांना विषयाचें स्पष्ट आकलन व्हावें म्हणून तक्ते व नमुने यांचा उपयोग करण्यात येतो. संग्रहालयास अधिक जागा, संग्रहालय सहाय्यक, पैदा भरणारा तज्ञ व संग्रहालयाध्यक्ष अशा कायमच्या सेवकवर्गाची तरतूद आणि पुरेसा निधि यांची गरज आहे. या सर्व गोष्टींसाठीं विद्यापीठाला विनंती करण्यांत आली आहे.

## मंगळूर, कॅनरा हायस्कूल महात्मा गांधी संग्रहालय

'पुराणवस्तुशास्त्र व सांस्कृतिक संग्रहालयें' याखालीं पहा.

**म्हैसूर :** लोकसंख्या २,४४,३२३.

## वैद्यकीय महाविद्यालय संग्रहालयें

(अ) शरीररचनाशास्त्र विभाग, (ब) रोगचिकित्साशास्त्र विभाग, (क) औषधिशास्त्र विभाग, आणि (ड) प्रतिबंधक व सामाजिक वैद्यकविभाग.

**स्थापना :** (अ) शरीररचनाशास्त्र विभाग संग्रहालय—१९२४, (ब) रोगचिकित्साशास्त्र विभाग संग्रहालय—१९३९, आणि (क) औषधिशास्त्र विभाग व (ड) प्रतिबंधक व सामाजिक वैद्यकविभाग—माहीत नाहीं.

**पूर्वेतिहास :** वैद्यकीय विद्यार्थ्यांना शिक्षणात मदत म्हणून १९२४ मध्यें शरीररचनाविभाग संग्रहालय स्थापन करण्यात आलें. रोगचिकित्सा विभागाचे डॉ. व्ही. आर्. नायडू यांनीं १९३९ मध्यें या विभागाचा रोगचिकित्साशास्त्राचे प्राध्यापक म्हणून ताबा घेतल्यानंतर अध्यापनाच्या कारणासाठीं या संग्रहालयाची व्यवस्था करण्यात आली. आपल्या पदव्युत्तर अभ्यासासाठीं ते परदेशांत असतांना गोळा केलेले, अमेरिका व इंग्लंड येथील अनेक नमुने त्यांनीं आणले. १९३९ मध्यें एक स्वतंत्र इमारत बांधून तयार झाली आणि या इमारतीचा एक मजला संग्रहालयासाठींच वापरण्यात येत आहे. त्यात एक हजारावर नमुने असून रोगचिकित्साशास्त्राच्या परीक्षेला बसणाऱ्या विद्यार्थ्यांना त्या शास्त्राचें शिक्षण देण्यांत मदत करण्यासाठीं त्या सर्वांना क्रमांक दिले असून संपूर्ण तपशील असलेला पूर्वेतिहास त्यांस जोडला आहे.

**व्याप्ति व संग्रह :** शरीररचनाशास्त्र विभागाचें संग्रहालय : यांत सुमारें १०० नमुने आहेत. तसेंच त्यांत शरीराच्या निरनिराळ्या २६० भागांचीं विच्छेदनें (करण्यात ठेवलेले ओले नमुने), हाडाच्या बनविलेल्या ६५ वस्तु, २० शरीरविकृतिविषयक संग्रह आणि ३० भ्रूणविषयक व इतर नमुने, जनावरांच्या कवट्याचे २० नमुने आणि सचित्र तुलनात्मक शरीररचनाशास्त्र बरेच कापलेले भाग अभ्यासासाठीं राखून ठेवण्यात आले आहेत. त्याशिवाय ५० तक्ते दाखविण्यासाठीं व व्याख्यानाच्या वर्गासाठीं राखून ठेवले आहेत.

**रोगचिकित्साशास्त्र विभागाचें संग्रहालय :** या संग्रहालयांत भरण्यांत ठेवलेले २,२०० नमुने, ७५ प्रतिकृति (कांहीं स्थानिकरीत्या तयार केलेल्या) आणि २०० आराखडे व ७५,००० पेक्षां अधिक हिस्टो-पॅथॉलॉजिकल भाग आहेत.

**औषधिशास्त्र विभागाचें संग्रहालय :** यांत औषधांचे १०० नमुने, १५ व्यापारी संस्थांमधून आणलेले १५ पेटंट औषधांचे नमुने, २५ रोपट्यांचीं रंगचित्रें आणि ४० आराखडे आहेत.

**प्रतिबंधक व सामाजिक वैद्यकविभागाचें संग्रहालय :** यात २०० तक्ते व आकृत्या आणि १०० नमुने आहेत.

**प्रकाशनें :** कांहीं नाहींत.

**कामाचे तास :** संग्रहालयें महाविद्यालयांतील कामाच्या सर्व दिवशीं सकाळीं ८ ते संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत उघडीं असतात.

**प्रवेश :** विनामूल्य, परंतु हीं संग्रहालयें लोकांना खुलीं नाहींत.

**नियामक मंडळ :** हीं संग्रहालयें त्या त्या विभागांच्या प्रमुखांच्या ताब्यांत आहेत.

**सेवकवर्ग :** या संग्रहालयांसाठीं कोणताहि खास सेवकवर्ग नाहीं.

**आर्थिक तरतूद :** महाविद्यालयासाठीं असलेल्या आर्थिक तरतुदीव्यतिरिक्त या संग्रहालयांसाठीं खास अशी कोणतीहि अंदाजपत्रकीय तरतूद नाहीं.

**अभिप्राय :** संग्रहालयें जनतेसाठीं खुलीं नसल्यामुळें व तीं फक्त वैद्यकीय विद्यार्थ्यांसाठींच असल्यामुळें संग्रहालयांची व्याप्ति फारच मर्यादित आहे. विभागाचा एक शिपाई संग्रहालयांवर देखरेख ठेवतो. नांवांच्या सर्व चिठ्ठ्या इंग्रजींत आहेत. फक्त मरणोत्तर व सर्वसामान्य विच्छेदनाच्या वेळीं शरीररचनाशास्त्र संग्रहालयासाठीं संग्रह करण्यांत येतो.

रोगचिकित्साशास्त्र संग्रहालयांत, रोगचिकित्साशास्त्र व जंतुशास्त्राचा अभ्यास करण्यासाठीं अनेक नमुने व चित्रें उपलब्ध आहेत.

प्रत्येक विभागाचें ग्रंथालय त्या त्या विभागाच्या संग्रहालयाचें ग्रंथालय म्हणून उपयोगांत आणलें जातें.

## पंजाब

**अमृतसर :** लोकसंख्या ३,२५,७४७

### पंजाब विद्यापीठाच्या वनस्पतिशास्त्र विभागाचें संग्रहालय

**स्थापना :** १९४७

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय लाहोर येथील पंजाब विद्यापीठाच्या सुस्थापित संग्रहालयाची उणीव भरून काढण्यासाठीं अमृतसर येथें १९४७ मध्यें सुरू करण्यांत आलें. या वर्षांत सध्याचा संग्रह एकत्र आणण्यात आला; परंतु पुरेशा जागेच्या अभावीं, तो योग्य रीतीनें प्रदर्शित करता येत नाहीं शेवटीं चंदीगड येथें जेव्हां हा संग्रह ठेवण्यात येईल तेव्हां तो योग्य रीतीनें प्रदर्शित करण्यास पुरेसा अवसर मिळेल.

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय वनस्पतिशास्त्रविषयक नमुन्यांसाठीं आहे.

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय महाविद्यालयांतील व पदव्युत्तर शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं आहे आणि संग्रहालयात विद्यार्थ्यांना प्रदर्शनवस्तु व जोडविषय यांची माहिती देण्यात येते. विभागांत लॅन्टर्नच्या, कांचचित्रांच्या व फिल्मच्या तुकड्यांचा संग्रह असून विद्यार्थ्यांच्या फायद्यासाठीं त्यांचा उपयोग करण्यात येतो. त्यामध्यें एक विभागीय ग्रंथालय असून त्यात वापरण्यासाठीं सुमारें ५००० पुस्तकें आहेत. कधीं कधीं तज्ज्ञांचीं खास व्याख्यानें ठेवलीं जातात. दरवर्षी चर्चा-बैठक भरविण्यात येते. अशा वेळीं अनेक शैक्षणिक संस्थांतील लोक येऊन संग्रहालयातील प्रदर्शनवस्तूंचा अभ्यास करतात. नमुन्यांना लावलेल्या नांवाच्या चिठ्ठ्या इंग्रजींत आहेत.

**प्रकाशनें :** काहीं नाहींत

**कामाचे तास :** हें संग्रहालय रविवार व राजपत्रित सुट्यांखेरीजकरून सर्व दिवशीं, हिंवाळ्यात सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत आणि उन्हाळ्यात सकाळीं ७-३० ते दुपारीं १-३० पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य हें संग्रहालय फक्त महाविद्यालयातील व पदव्युत्तर शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं असून तें जनतेला खुलें नाहीं.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय चंदीगड येथील पंजाब विद्यापीठाच्या वनस्पतिशास्त्र विभागाचे प्रमुख यांच्या नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष, संग्रहालय सहाय्यक व नोकर.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं निराळी अशी कोणतीहि अंदाजपत्रकीय तरतूद नाहीं आणि सर्व गरजा विभागासाठीं मंजूर केलेल्या रकमेंतून भागविण्यात येतात.

**अभिप्राय :** संग्रहालय सध्यां अमृतसर येथें आहे, परंतु तें लवकरच चंदीगड येथील विद्यापीठातील त्याच्या कायमच्या जागेंत हलविण्यांत येईल. संग्रहालय जेव्हां नवीन इमारतींत जाईल तेव्हां प्रदर्शनासाठीं व राखीव संग्रहासाठीं व समकक्ष ठरण्यासाठीं प्रदर्शनविभाग व सामान ठेवण्याकरितां पुरेशी जागा उपलब्ध होईल. संग्रहालयात प्रयोगशाळेची सोय आहे संग्रहालयासाठीं लागणाऱ्या वस्तु, भारताच्या निरनिराळ्या भागातील वनस्पतिशास्त्र विभागाच्या सदस्यांनी केलेल्या संग्रहातून व जीवशास्त्रीय पुरवठागृहामधून खरेदी करण्यात येतात.

**होशियारपूर :** लोकसंख्या ४५,२११

### पंजाब विद्यापीठाच्या प्राणीशास्त्र विभागाचें संग्रहालय

**स्थापना :** १९४८

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय १९४८ मध्यें सुरू झालें आणि तेव्हांपासून त्यात प्रदर्शनवस्तु मोठ्या प्रमाणात जमा केल्या जात आहेत व त्यांची जलदगतीनें वाढ होत आहे

**व्याप्ति व संग्रह :** हें प्राणीशास्त्रविषयक संग्रहालय असून त्यात प्राणीवर्गाचे सर्व प्रमुख गट आहेत.

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय मुख्यतः विद्यापीठांतील व महाविद्यालयांतील विद्यार्थ्यांसाठीं आहे. पदवीचा किंवा पदव्युत्तर अभ्यास करणारे विद्यार्थीसुद्धा येथील वस्तूंचा अभ्यास करतात. संग्रहालयासाठीं विभागीय ग्रंथालय उपलब्ध आहे. नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजींत आहेत पंजाब विद्यापीठाच्या प्राणीशास्त्रसंस्थेच्या विद्यमानें दरवर्षी प्राण्यासंबंधीं चर्चा-बैठक भरविण्यात येते. या वेळीं शैक्षणिक संस्थांतील पुष्कळ लोक प्रदर्शनवस्तूंचा अभ्यास करण्यासाठीं येथें येतात.

**प्रकाशनें :** काहीं नाहींत.

**कामाचे तास :** संग्रहालय रविवार व राजपत्रित सुट्यांखेरीजकरून सर्व दिवशीं हिंवाळ्यांत सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत आणि उन्हाळ्यात सकाळीं ७-३० तें दुपारीं १-३० पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य. संग्रहालय फक्त महाविद्यालयातील विद्यार्थ्यांसाठींच आहे.

**नियामक मंडळ :** संग्रहालय चंदीगड येथील पंजाब विद्यापीठाच्या प्राणीशास्त्र विभागाच्या नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष, संग्रहालय सहाय्यक व प्रयोगशाळा सहाय्यक.

**आर्थिक तरतूद :** वार्षिक अनुदान रु. २,५०० चें आहे. याशिवाय, वेळोवेळीं खास अनुदानें देण्यात येतात

**अभिप्राय :** संग्रहालय सध्यां तात्पुरतें होशियारपूर येथें आहे आणि वर्षभरात तें चंदीगड येथें हलविण्यात येईल सध्याची इमारत अपुरी पडते, परंतु चंदीगड येथें संग्रहालयासाठीं जागेची विपुल तरतूद करण्यात येईल अशी आशा आहे. येथें प्रयोगशाळेची सोय आहे प्रदर्शनवस्तु विभागाचा सेवकवर्ग व विद्यार्थी यांनीं वारंवार गोळा केलेल्या वस्तु यांद्वारें संपादन करण्यात येतात.

## राजस्थान

**पिलानी, मध्यवर्ती संग्रहालय**

'औद्योगिक व वाणिज्य संग्रहालयाखालीं' पहा

## उत्तर प्रदेश

**आग्रा :** लोकसंख्या ३,७५,६६५

### सेंट जॉन्स महाविद्यालयाचें संग्रहालय

**स्थापना :** माहीत नाहीं.

**पूर्वेतिहास :** महाविद्यालयीन विभागांच्या गरजा भागविण्यासाठीं जीवशास्त्र, प्राणीशास्त्र, वनस्पतिशास्त्र व वाणिज्य या विभागास जोडलेलीं

चार सग्रहालयें येथें असून भारतीय चित्रकलेच्या विविध शैलींचा एक सर्व साधारण प्रातिनिधिक सग्रह महाविद्यालयाच्या ग्रथालयात प्रदर्शित करण्यात आला आहे

**व्याप्ति व सग्रह :** प्राणीशास्त्र व वनस्पतिशास्त्र सग्रहालयें जीवशास्त्र विभागात ठेवण्यात आलीं आहेत आणि दालनात सृष्टिविज्ञानप्रदर्शन विभाग असून तींत जगलें, वनस्पती व दगातील पशुजीवन प्रदर्शित करण्यात आलें आहे प्राणीशास्त्र सग्रहालयात, भूचर व जलचर प्राण्यांच्या प्रातिनिधिक सग्रहाचे राखीव नमुने, अश्मीभूत वस्तु व इतिहासपूर्व काळातील प्राण्यांचे नमुने, मानवाची उत्क्रांति दर्शविणाऱ्या वस्तु वगैरे गोष्टी आहेत येथें उत्तर भारतातील कीटकांचा, विशेषत गॉलकीटकांचा खास सग्रह आहे वनस्पतिशास्त्र सग्रहालयात, अश्मीभूत वनस्पति, वनस्पतिजीवन, फुलें, फळें व बीं यांचीं वैशिष्ट्यं विशद करणारे उद्बोधक नमुने आहेत आणि अर्थोत्पादक वनस्पतींपासून तयार केलेल्या वस्तूंचा सग्रहहि आहे वाणिज्य विभागास जोडलेल्या सग्रहालयात, देशातील वाणिज्य व उद्योगनिर्मित वस्तु आहेत भारतीय चित्रकलेच्या निरनिराळ्या शैलींचा व अभिजात पाश्चात्य रगचित्रांचा एक प्रातिनिधिक सग्रह महाविद्यालयाच्या ग्रथालयात आहे

**शैक्षणिक कार्य .** निरनिराळ्या विभागात अभ्यास करीत असलेल्या विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक गरजा या सग्रहालयामुळें पूर्ण होतात

**प्रकाशनें :** काहीं नाहींत

**कामाचे तास :** सग्रहालयें कामाच्या सर्व दिवशीं महाविद्यालयाच्या वेळांत उघडीं असतात

**प्रवेश :** हीं सग्रहालयें महाविद्यालयातील विद्यार्थ्यांसाठीं आहेत

**नियामक मडळ :** सग्रहालयें महाविद्यालयाच्या प्राचार्यांच्या नियत्रणाखालीं आहेत

**सेवकवर्ग :** सबधित विभागाकडून त्यावर देखरेख ठेवली जाते

**आर्थिक तरतूद** महाविद्यालयाच्या अदाजपत्रकात ह्या तरतुदीचा समावेश करण्यात आला आहे

**अभिप्राय :** काहीं नाहीं

**अलाहाबाद .** लोकसख्या ३,३२,२९५

## अलाहाबाद विद्यापीठ सग्रहालयें

( अ ) प्राणीशास्त्रविषयक सग्रहालय, ( ब ) वनस्पतिशास्त्रविषयक सग्रहालय व ( क ) कौशाबी सग्रहालय ( पुराणवस्तुशास्त्रविषयक )

**स्थापना :** (अ) प्राणीशास्त्रविषयक सग्रहालय–१९१०, (ब) वनस्पतिशास्त्रविषयक सग्रहालय–१९२२ आणि (क) कौशाम्बी सग्रहालय–१९५२

**पूर्वेतिहास .** अलाहाबाद विद्यापीठाचा प्राणीशास्त्रविभाग १९१० मध्यें सुरू करण्यांत आला आणि सग्रहालयाची स्थापना त्या वेळेपासून झाली असें समजण्यास हरकत नाहीं सग्रहालयाची मुख्यत डॉ डब्ल्यू एच् वुडलँड यांच्याकडें वाढ झाली वुडलँड हे १९१२ पासून १९२२ पर्यंत विभागप्रमुख होते त्या वेळेपासून सग्रहालयांत भर पडत गेली आहे

वनस्पतिशास्त्र सग्रहालयाची स्थापना १९२२ मध्यें केव्हातरी झाली या वर्षी वनस्पतिशास्त्रविभाग सुरू करण्यांत आला आधीं अलीकडच्या काळापर्यंत सग्रहालय एका लहानशा प्रदर्शनविभागात समाविष्ट केलें होतें परतु १९५२ मध्ये त्यासाठीं एक दालन मिळालें

त्या वेळच उत्तर प्रदेशाचे राज्यपाल श्री के एम्. मुनशी यांच्या हस्तें कौशाम्बी सग्रहालयाचें औपचारिकरीत्या उद्घाटन झालें विद्यापीठ उत्खनन मोहिम तुकडीने कौशाम्बी येथें १९४९ मध्यें उत्खनन सुरू केलें आणि खणून काढलेल्या प्राचीन वस्तु या सग्रहालयात ठेवण्यात आल्या आहेत बऱ्याचशा शिल्पकृति, मुद्रा व इतर वस्तु कौशाम्बी येथील बुद्धाचें प्रसिद्ध निवासस्थान घोषिताराम येथून खणून काढण्यात आल्या सग्रहालयात काहीं अतिशय मौल्यवान शिलालेख आहेत या शिलालेखामुळ बुद्धानें कौशाम्बी येथील घोषितारामाच्या मठातील निवासस्थानाला दिलेल्या भेटीवर प्रकाश पडतो बुद्धकालीन कलेचीं निरनिराळीं अगें दाखविणाऱ्या शिल्पकृतींचा बराच मोठा सग्रह आहे

**व्याप्ति व सग्रह :** प्राणीशास्त्रविषयक सग्रहालयांतील प्रदर्शनवस्तु, विशेषत विद्यार्थ्यांना प्राणीशास्त्राचा अभ्यास करण्यासाठीं आहेत सग्रहालयात प्राणीसृष्टीतील सर्व वंशातील सर्व जातींचे प्रातिनिधिक नमुने आहेत प्रदर्शनवस्तु एकतर पेंढा भरलेल्या, जतन केलेल्या किंवा सधियुक्त सागाड्याच्या स्वरूपात आहेत

वनस्पतिशास्त्र सग्रहालय हें वनस्पतिशास्त्र व तत्सबधीं विषयास वाहिलेलें आहे

कौशाम्बी सग्रहालय हें पुराणवस्तुविषयक सग्रहालय असून त्यात पुढील प्रकारच्या प्राचीन वस्तु आहेत शिलालेख, मुद्रा, मातीच्या वस्तु, पुतळे व शिल्पकृति, नाणीं, मणी, बागड्या, लोखंडी अवजारें, ठेवण्या आणि विद्यापीठातर्फे केलेल्या उत्खननात खणून काढलेल्या इतर किरकोळ प्राचीन वस्तु

**शैक्षणिक कार्य .** प्राणीशास्त्रविभागास जोडलेलें हें ग्रथालय, प्राणीशास्त्राच्या शिक्षकांच्या व विद्यार्थ्यांच्या उपयोगासाठीं आहे त्यात सुमारें ६००० पुस्तकें व नियतकालिकें आहेत विद्यार्थ्यांना प्राणीशास्त्राच्या अभ्यासात सग्रहालयाचें सहाय्य होतें विद्यार्थ्यांना प्रदर्शनवस्तूंची माहिती देण्याची सोय आहे प्राणीशास्त्रासबधीं फिल्म्स आहेत परतु त्या मर्यादित विषयावरील आहेत व त्या उत्तम्या दिल्या जात नाहींत अर्धवाही नावाच्या चिठ्ठ्या असून त्या इंग्रजींत आहेत विशेष गोष्टींची माहिती देतांना नकाशे, तक्ते, नमुने, प्रतिकृती व चित्रें यांची मदत घेण्यात येते सग्रहालयात प्राणीशास्त्राचा अभ्यास करण्यासाठीं स्थानिक महाविद्यालयाकडून विद्यार्थ्यांच्या तुकड्या वेळोवेळीं पाठविण्यात येतात

विद्यार्थी व शिक्षक यांच्या उपयोगासाठीं वनस्पतिशास्त्रविषयक सग्रहालयाला जोडूनहि एक ग्रथालय आहे त्यात १५२८ पुस्तकें व ३९ नियतकालिकें आहेत सग्रहालय सर्वांसाठीं खुलें आहे परंतु तें विशेषत विद्यापीठांतील विद्यार्थ्यांसाठीं आहे विभागाच्या उपयोगासाठीं सुमारें १०० स्लाइड्स आहेत सर्व नांवांच्या चिठ्ठ्या असून त्या इंग्रजींत आहेत

विद्यापीठातील विद्यार्थ्यांना व प्राचीन भारतीय इतिहास व सस्कृति या विषयाच्या इतर तज्ज्ञांना कौशाम्बी सग्रहालयामुळें अभ्यासासाठीं महत्त्वाचें साधन उपलब्ध झालें आहे सग्रहालय पाहायला येणाऱ्या

लोकांना संग्रहालयांतील सेवकवर्गांकडून प्रदर्शनवस्तूंची माहिती देण्यात येते.

लॅन्टर्नच्या काचचित्रांचा संग्रहसुद्धा तेथें आहे. कधीं कधीं खास प्रदर्शनें भरविलीं जातात. कौशाम्बी येथील उत्खननाच्या इतिहासाची माहिती देण्यासाठीं नकाशे, आराखडे, छायाचित्रें व लॅन्टर्नची काचचित्रें वगैरे वस्तु आहेत.

**प्रकाशनें :** नाहींत.

**कामाचे तास :** कामाच्या सर्व दिवशीं सकाळीं १० ते दुपारीं ४ वाजेपर्यंत संग्रहालय उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** सर्व संग्रहालयें विद्यापीठाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालीं आहेत आणि प्रत्येक संग्रहालयाची व्यवस्था संबंधित खात्यामार्फत पाहिली जाते.

**सेवकवर्ग :** संग्रहालयासाठीं निराळा सेवकवर्ग नाहीं. प्राणिशास्त्रविषयक संग्रहालयाचें प्रयोगशाळा सहाय्यक, विभागाचे प्राध्यापक व इतर शिक्षक यांच्या देखरेखीखालीं काम करतात. वनस्पतिशास्त्रविषयक संग्रहालय वनस्पति विभागाच्या एका प्राध्यापकाच्या ताब्यात आहे आणि हे प्राध्यापक आपल्या फावल्या वेळांत त्यावर देखरेख करतात. एक छायाचित्रकार, मानचित्रकार, सहाय्यक मानचित्रकार व दोन शिपाई एवढ्या कौशाम्बी उत्खनन तुकडीच्या सेवकवर्गाकडून कौशाम्बी संग्रहालयाची देखरेख पाहिली जाते.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं निराळी अशी अंदाजपत्रकीय तरतूद नाहीं. कौशाम्बी संग्रहालयाचा खर्च, उत्खनन निधि व विद्यापीठानें आपल्या सामान्य निधींतून दिलेल्या जादा रकमांतून भागविण्यांत येतो.

**अभिप्राय :** प्राणीसंग्रहालय विद्यापीठांत शोभिवंत अशा जागीं आहे आणि मुख्यतः तें विद्यार्थ्यांसाठीं असून विभागांत व स्थानिक महाविद्यालयांत काम करणाऱ्या सुमारें ४०० विद्यार्थ्यांखेरीज रोज सुमारें ८ ते १० व दरसाल १,००० ते १,६५० प्रेक्षक संग्रहालय पाहाण्यास येतात. येथें प्रयोगशाळेची सोय आहे. मुख्यत संशोधन, खरेदी व देवाणघेवाण याद्वारें संग्रह करण्यांत येतो. प्रदर्शनवस्तूंच्या मांडणींत आणखी सुधारणा करण्याची व संग्रहालयासाठीं अधिक वस्तु गोळा करण्याची योजना आहे. वनस्पतिशास्त्रविषयक संग्रहालय विभागाच्या विद्यार्थ्यांसाठीं आहे. तरीसुद्धां बाहेरचे लोक मधून मधून संग्रहालय पाहाण्यास येतात. संग्रहालयांतील जागा पुरेशी नाहीं. संग्रहालयासाठीं प्रयोगशाळेची वेगळी सोय नाहीं; परंतु विभागांत जरूर त्या सोयी करून केल्या जातात. सामान्यतः येथील संग्रह शिक्षक व विद्यार्थी यांच्याकडून केला जातो. परंतु कधीं कधीं नमुने देणगी म्हणून मिळतात किंवा खरेदी केले जातात. समकृतींची देवाणघेवाण करण्याची व्यवस्था नसली तरी संग्रहालय देवाणघेवाणीच्या तत्वाविरुद्ध नाहीं

कौशाम्बी संग्रहालय विद्यापीठाच्या परिसरांत असल्यामुळें तें पाहाण्यास येणारे बहुतेक विद्यापीठांतील विद्यार्थीच असतात. संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या प्रेक्षकांची रोजची सरासरी ५० आहे. संग्रहालयाला अजून स्वतःची स्वतंत्र इमारत नाहीं, परंतु त्या दृष्टीनें विचार चालू आहे. संग्रहाचें साधन मुख्यतः कौशाम्बी येथील उत्खनन हें आहे आणखी वस्तु देवाणघेवाणीद्वारें संपादन करणें शक्य आहे. गुप्तनिधींत सापडलेल्या वस्तु ठेवण्यास संग्रहालयास मान्यता मिळालेली नाहीं.

## डेहराडून : लोकसंख्या १,४४,२१६

## (१) वनसंशोधन संस्था व महाविद्यालयें यांचें संग्रहालय

**स्थापना :** १९१४

**पूर्वेतिहास :** १८७८ सालीं डेहराडून येथें एक वनविद्यालय काढण्यात आलें परंतु १९०६ पर्यंत जंगल वाढविणें व जंगलांतील उत्पन्न उपयोग करणें यासंबंधींच्या प्रश्नाचा अभ्यास करण्यासाठीं कायमचें असें तें केंद्र बनलें नव्हतें. १९१४ मध्यें डेहराडून येथें पहिली वनसंशोधनसंस्था स्थापन करण्यात आली आणि युद्धकालांतील जंगलाच्या मालाच्या वाढत्या मागणीमुळें वनसंशोधनाला महत्त्व प्राप्त झालें. शास्त्रीय संशोधन विस्तृत प्रमाणावर करण्याची आवश्यकता मान्य करण्यात आली. त्यामुळें १९२१ मध्यें मि. सी. जी. ब्लोमफील्ड, एफ्. आर. आय्. बी. ए. यांनी रचना केलेल्या नवीन इमारतीत जंगल संशोधन संस्थेच्या कार्यांत वाढ झाल्याचें दिसून आलें. २०० एकर जमिनीवर झाडें लावली असून तेथें एक प्रायोगिक उद्यान, रासायनिक प्रयोगशाळा, वोटकालय, लाकूड कापण्याची गिरणी, कागद व कागद वनविद्याची यंत्रसामुग्री आणि कित्येक लाकूडकामाचे कारखाने आहेत. पूर्वीच्या इमारतीत असलेलीं सहा संग्रहालयें पुढीलप्रमाणें आहेत.— इमारती लाकूड, जंगलांतील किरकोळ वस्तु, वनशास्त्र, वनविकासविज्ञानशास्त्र, वनकीटकशास्त्र व वनस्पतिशास्त्रविषयक सुसंरक्षित संग्रहालय. ही संग्रहालयें आता मुख्य इमारतींत आहेत. येथील संग्रहालयाची इमारत भारतीयच नव्हे तर सर्वच आशियात उत्कृष्ट आहे

**व्याप्ति व संग्रह :** ही संग्रहालयें बहुतेक जंगलें व जंगलांचें उत्पन्न यासंबंधी आहेत.

**(१) इमारती लाकडांचें संग्रहालय :** हें संग्रहालय, पॉलिश केलेल्या व पॉलिश न केलेल्या फळ्यांच्या स्वरूपांतील अनेक निरनिराळ्या भारतीय इमारती लाकडाच्या प्रदर्शनाला वाहिलेलें आहे. त्यांत लाकूड रापविण्याच्या, लाकडें जतन करून ठेवण्याच्या, व इमारती लाकूड तपासण्याच्या यंत्राच्या प्रात्यक्षिकाचे नमुने देखील आहेत. घरांतील व कार्यालयांतील फर्निचर, जमीन तयार करणें, भिंतींना लाकडी पट बसविणें, छतें बसविणें, फर्निचर, बंदुकी, दारूगोळ्याच्या पेट्या, तोफांच्या गाड्यांची चाकें, क्रीडासाहित्य, हत्याराच्या मुठी वगैरे करण्यासाठीं भारतीय लाकडाचा कसा उपयोग होतो हें सुद्धा परिणामकारक रीतीनें दाखविलें आहे.

**(२) जंगलांतील किरकोळ वस्तूंचें संग्रहालय :** इमारती लाकडाखेरीज भारतीय जंगलापासून मिळणाऱ्या असंख्य वस्तु, देशाच्या आर्थिक व्यवस्थेंत अतिशय महत्त्वाचें कार्य करीत आहेत व त्या दरसाल १८ कोटि रुपयाच्या किंमतीपर्यंत परदेशांत पाठविल्या जात आहेत. अशा वस्तु निदर्शनास आणण्यासाठीं व त्या काढण्याच्या व त्यांचा उपयोग करण्याच्या पद्धती दर्शविण्यासाठीं हें संग्रहालय आहे. या प्रदर्शनवस्तूंत महत्त्वाचीं औषधें, मसाले, अत्तराची सामग्री, रंग, कातडी कमावण्याचे पदार्थ, तेल, कच्चे रेशीम, डिंक, राळ, लाख वगैरेंचा समावेश करण्यात आला असून त्या काढण्याच्या व त्यांचा उपयोग करण्याच्या पद्धतीही दर्शविल्या आहेत. या संग्रहालयात १,७०० वर वस्तु प्रदर्शित करण्यात आल्या आहेत.

**(३) वनशास्त्र संग्रहालय :** ह्या संग्रहालयात वनशास्त्राबद्दलच्या पद्धती व जमिनीची धूप होण्याचे दुष्परिणाम यांच्या प्रात्यक्षिकाचे अनेक नमुने आहेत त्यांत जंगलकामात वापरण्यात येत असलेल्या हत्यारांचा प्रातिनिधिक संग्रह व जमिनीचा योजनाबद्ध उपयोग या गोष्टींचाहि समावेश करण्यांत आला आहे प्रदर्शनवस्तु पुढीलप्रमाणें आहेत —(१) वनशास्त्रपद्धति व जमिनीची धूप होण्याचे दुष्परिणाम दर्शविणाऱ्या दहा प्रदर्शन पेट्या व नमुने, (२) जंगलात उगवणाऱ्या विशिष्ट वनस्पतींच्या बियांची एक प्रदर्शन पेटी, (३) जंगलातील सामान्य देखाव्यांची ५० घनचित्र-मुद्रणें असलेला एक घन चित्रदर्शक आणि (४) जंगलाची काहीं रंगीत व काहीं साधीं छायाचित्रें प्रदर्शित करणारे सहा लाकडी स्टँड याशिवाय, भारतीय तसेंच काहीं परदेशी जंगली हत्यारें, रोपणीचीं व पेरणीचीं हत्यारें, दगडाचे नमुने, महत्त्वाच्या इमारती लाकडाच्या जातींच्या लाकडाचे घेतलेले छेद, झाडाची उंची, घन वगैरे दर्शविणारे तक्ते, झाडें बारीक कशीं होतात हें दर्शविणाऱ्या आकृत्या, प्रचाराचीं भित्तिपत्रकें, भारतीय संघराज्यातील जंगल प्रदेश दर्शविणारे नकाशे वगैरे गोष्टी प्रदर्शित करणारे फलक आहेत

**(४) कीटकशास्त्र संग्रहालय :** भारतातील झाडांचें व इमारती लाकडाचें कीटकांपासून किती नुकसान होतें हें या संग्रहालयात परिणामकारक रीतीनें दाखविलें आहे हरेक तऱ्हेच्या महत्त्वाच्या भारतीय लाकडाचे नमुने, त्याच नुकसान करणारे निरनिराळ्या प्रकारचे कीटक, ज्या परिस्थितींत नुकसान होतें ती परिस्थिति, आणि नुकसान जें स्वरूप धारण करतें तें स्वरूप दाखविण्यासाठीं स्वतंत्रपणें मांडून ठेवण्यात आले आहेत. त्यावर नियंत्रण ठेवण्याच्या पद्धतीहि दिल्या आहेत संग्रहालयात सुमारें ३,१०० प्रदर्शनवस्तु आहेत.

**शैक्षणिक कार्य :** संस्थेच्या व महाविद्यालयाच्या सेवकवर्गांसाठीं व विद्यार्थ्यांसाठीं एक केन्द्रीय ग्रंथालय असून लोकांना, वनसंशोधन संस्था व महाविद्यालयें यांच्या अध्यक्षाच्या परवानगीनें त्याचा उपयोग करता येतो प्रदर्शित केलेल्या प्रत्येक वस्तूसाठीं इंग्रजींत व हिंदींत नावांच्या चिठ्ठ्या आहेत विद्यार्थ्यांना वस्तूंची माहिती देण्याचें काम सेवकवर्गाकडून केलें जातें संस्थेच्या प्रदर्शनवस्तु व भित्तिपत्रकें, निरनिराळ्या शैक्षणिक संस्थांना मागणी केल्यास विनामूल्य किंवा प्रत्यक्ष खर्चाची रक्कम देऊन पुरविल्या जातात भारतीय वन महाविद्यालयात १६ मिलिमिटरचा एक साऊंड प्रोजेक्टर असून या संस्थेच्या नियंत्रणाखालीं असलेल्या महाविद्यालयास दाखविण्यासाठीं संस्थेकडून १४ फिल्म्सचा एक संच खरेदी करण्यांत आला आहे

त्याशिवाय वन महाविद्यालयात वनअधिकाऱ्यांचीं व्याख्यानें नीट समजावून देण्याकरितां दिव्याच्या सहाय्यानें दाखवावयाचीं काचचित्रेंहि आहेत व तीं इतर शिक्षणसंस्थांना विनंति केल्यास उसनवारीनें मिळूं शकतात संग्रहालयाचे प्रभारी अधिकारी महाविद्यालयातील विद्यार्थ्यांसमोर अनेकदा व्याख्यानें देतात संग्रहालयें वनप्रदर्शनात भाग घेतात विशेष गोष्टीसंबंधीं सोदाहरण माहिती देणें आवश्यक असेल तेव्हां त्यासाठीं नकाशे, तक्ते, प्रतिकृति वगैरेंची मदत घेण्यात येते.

**प्रकाशनें** • वन संशोधन संस्था व महाविद्यालयें यांच्या प्रकाशनांच्या यादींत शक्तों पुस्तिकांचा समावेश होतो संग्रहालय मार्गदर्शिका तयार करण्यांत येत आहे संस्थेसंबंधींची माहितीपुस्तिका विक्रीसाठीं ठेवण्यात आली आहे पुढील तक्ते मागितल्यास विनामूल्य पुरविण्यात येतात—

(अ) जंगलें तुमच्या शेतांचें रक्षण करतात—इंग्रजी व हिंदी भाषांत. (ब) इमारती लाकूड टिकत रापविण्यासाठीं तें रचून ठेवणें—इंग्रजी व हिंदी भाषांत (क) प्रक्रिया केलेलें लाकूड वापरा—इंग्रजी व हिंदी भाषांत आणि (ड) भारतीय लाकडाचा तौलनिक मजबूतपणा—इंग्रजी भाषेंत

**कामाचे तास :** शनिवारीं दुपारीं, रविवार व राज्यशासनानें जाहीर केलेले सुटीचे दिवस खेरीजकरून रोज सकाळीं ९–३० ते ११–३० व दुपारीं १–३० ते ४–३० पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** प्रत्येक संग्रहालय संबंधित शाखा अधिकाऱ्याच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखालीं व भारत सरकारच्या अन्न व कृषि मंत्रालयाच्या वन-संशोधन संस्था आणि महाविद्यालयें यांच्या अध्यक्षाच्या प्रत्यक्ष नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** प्रत्येक संग्रहालयासाठीं पुढील सेवकवर्ग असून तो प्रभारी अधिकाऱ्याच्या हाताखालीं काम करतो —संग्रहालय साहाय्यक, दोन संग्रहालय कलावंत, साहाय्यक तंत्रज्ञ, साहाय्यक, संग्रहालयाध्यक्ष व शिपाई

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठीं वेगळें अंदाजपत्रक नाहीं आणि वन संशोधन संस्था व महाविद्यालयें यांना भारत सरकारकडून मिळणाऱ्या वार्षिक अनुदानाच्या रकमेंतून या संग्रहालयाचा खर्च भागविण्यात येतो

**अभिप्राय :** संग्रहालयाची जागा सोईस्कर ठिकाणीं आहे ती कामाच्या सर्व दिवशीं लोकांना पहाण्यासाठीं खुली असून प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या १०० आहे दसरा व दिवाळी या सुटींत आणि 'झंडा' व शिवरात्री या स्थानिक जत्रांच्या वेळीं प्रेक्षकांची फार मोठी गर्दी होते त्यात खेडेगावांतील लोकहि येतात या वेळीं संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं खास व्यवस्था करण्यात येते संग्रहालयाची इमारत सोईस्कर व पुरेशी असून राखीव संग्रहित वस्तु ठेवण्यासाठीं पुरेशी जागा आहे प्रयोगशाळेची सोयहि आहे मात्र ती केवळ संग्रहालयाच्या कामासाठीं नसून संबंध संस्थेच्या कामासाठीं आहे दिवसा कामाच्या वेळात शिपाई व रात्रीं व सुटीच्या दिवशीं चौकीदार संग्रहालयावर देखरेख ठेवतात निरनिराळ्या प्रकारच्या जंगलाचीं छायाचित्रें विक्रीसाठीं ठेवण्याची व्यवस्था असून तीं पैसे भरले असता संस्थेच्या वनशाखेकडून पुरविण्यात येतात• संस्थेंतील प्रदर्शनवस्तु साधारणपणें उसनवार देण्यात येतात परंतु एकहि वस्तु उसनवार घेतली जात नाहीं कारण येथें संग्रहित केलेल्या जवळजवळ सर्व प्रदर्शनवस्तु संस्थेंत करण्यात आलेल्या संशोधनांतून निर्माण झालेल्या आहेत जंगल उत्पन्नासंबंधींच्या प्रदर्शनवस्तु बहुतेक अशा प्रकारच्या आहेत, परंतु त्यांपैकीं काहीं वस्तु धंद्यातील हितसंबंधी इसमांनीं देणगी म्हणून दिलेल्या आहेत जीवशास्त्र-विषयक प्रदर्शन वस्तु ह्या संस्थेंत प्रतिकृती म्हणून तयार केलेल्या आहेत किंवा त्या सेवकवर्गानं जंगलातून आणून संग्रहित केल्या आहेत त्यांपैकीं काहीं वस्तु राज्य वनविभाग अधिकाऱ्यांकडून देणगी म्हणूनहि मिळालेल्या आहेत अशा प्रकारचें वाङ्मय प्रसिद्ध करणाऱ्या संस्थांबरोबर किंवा वन संशोधन संस्थेच्या प्रकाशनासंबंधी जिज्ञासा बाळगणाऱ्या संस्थांबरोबर अथवा व्यक्तींबरोबर परस्पर सहकार्याच्या तत्त्वानुसार वस्तूंची अदलाबदल केली जाते भारतात किंवा आशिया खंडात अशा प्रकारची ही एकच संस्था असल्याकारणानें प्रदर्शनवस्तूंची किंवा संग्रहालयीची अदलाबदल

करण्याचा प्रश्न आतापर्यंत कधीच उद्भवला नाही. कलकत्ता, मुंबई येथील लोकप्रिय संग्रहालयात आणि इमारती लाकडाच्या वस्तू बनविण्याच्या जिज्ञासु सभाच्या मुख्य कार्यालयात प्रदर्शनवस्तू पाठवून महत्त्वाच्या ठिकाणी औद्योगिक प्रदर्शन-गृहे स्थापन करण्याची संस्थेची इच्छा आहे

**(२) भारतीय निरीक्षण विभागाचें भूमापन शाखा संग्रहालय**

**स्थापना :** १९२७

**पूर्वेतिहास :** ह्या संग्रहालयाचें उद्घाटन १९२७ साली म्हणजे कर्नल कमांडर इ. ए. टँडी, आर्. ई. हे भारताचे सर्व्हेयर जनरल होते व लेफ्टनंट कर्नल एम्. ओ सी. टँडी, डी. एस्. ओ., ओ. बी. ई., आर्. ई. हे भूमापन-शाखेचे संचालक होते त्या वेळी करण्यात आले

ह्या संग्रहालयाचा उद्देश भूमापनाची व निरक्षण करण्याची प्राचीन साधनें आणि त्याच प्रकारच्या आधुनिक साधनांशी त्यांची तुलना करणें हा आहे

**व्याप्ति व संग्रह :** ह्या संग्रहालयात पुढील वस्तु आहेत — "महा त्रिकोणमिति निरीक्षण-केन्द्राच्या संस्थापकांची छायाचित्रें, ग्रेट थिओडोलाइट भूमापनयंत्र, लँटनचो घांसळे, ग्रेट थिओडोलाइटशी तुलना करण्याकरिता आधुनिक भूमापनयंत्रे, विविध पुरातन भूमापनयंत्रें,— त्यांपैकी कलकत्ता येथील सैयद मीर मोहसीन यानी तयार केलेलें मोठें भूमापनयंत्र, कोल्बी बार्स, अक्षांश निरीक्षणाची खगोलशास्त्रविषयक दोन साधनें, नवीन व जुन्या पातळी (लेव्हल) व पातळ्यांच्या स्टॅव्हज्, लंबक, लोहचुंबकीय मापयंत्र (मॅग्नेटोमीटर), भरती मोजण्याची आखलेली काठी (टाईड गेज), छायाचित्रें व पूर्वीचे नकाशे, सतलज व नैनिताल यामधील हिमालयाची प्रतिकृति, ज्यामधून रेखांश टरविण्यात येतो तो स्थानिक वेळ पाहण्याकरिता संक्रमण दूरदर्शक (ट्रँझिट टेलिस्कोप) इत्यादि

**शैक्षणिक कार्य :** प्रत्येक प्रदर्शनवस्तूला वर्णनात्मक चिठ्ठी लावलेली असून संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या लोकांना निरनिराळ्या गोष्टीसंबंधी तपशीलवार माहिती देण्यासाठी एक अधिकारी नेमलेला आहे.

**प्रकाशनें :** काही नाही.

**कामाचे तास :** शनिवारी दुपारी, रविवार व सरकारी सुट्टीचे दिवस खेरीजकरून संग्रहालय रोज सकाळी ९-३० ते संध्याकाळी ४-३० वाजेपर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य. प्रथम वेळ व दिवस ठरवून घ्यावा लागतो

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय भारताच्या निरीक्षणविभागाच्या भूमापन व संशोधनशाखेचे उप-संचालक यांच्या नियंत्रणाखाली आहे

**सेवकवर्ग :** स्वतंत्र सेवकवर्ग नाही

**आर्थिक तरतूद :** वेगळी तरतूद नाही

**अभिप्राय :** काही नाही

**हरद्वार, गुरुकुल कांगरी संग्रहालय**

"पुराणवस्तु व संस्कृतिविषयक संग्रहालयें" या सदराखाली पहा.

**लखनौ :** लोकसंख्या ४,९६,८६१

**(१) प्रांतिक आरोग्य संस्था संग्रहालय**

**स्थापना** १९२८

**पूर्वेतिहास** संग्रहालयाची स्थापना डिसेंबर १९२८ मध्ये करण्यात आलेली असून त्यात निरनिराळे विभाग आहेत ते असे : (१) हवामान शास्त्र, (२) पदार्थविज्ञान, (३) रसायनशास्त्र, (४) शरीररचनाशास्त्र, (५) प्रतिबंध करता येईल असे रोग, (६) पाणीपुरवठा, (७) हवा व वायुवीजन, (८) मलनिस्सारण व जलनिस्सारण, (९) आहारशास्त्र आणि (१०) संकीर्ण. हें संग्रहालय मुख्यत्वेंकरून एम्. बी. बी. एस्. च्या वर्गातील आरोग्यशास्त्राचे व सार्वजनिक आरोग्यविषयक (एल. पी. एच्.) डिप्लोमाचे शिक्षण घेणारे विद्यार्थी आणि आरोग्यरक्षण निरीक्षक व आरोग्य पर्यवेक्षक (हेल्थ व्हिजिटर्स) यांच्या प्रशिक्षणासाठी उपयोगी पडावें असा हेतु होता. प्रांतिक आरोग्य संस्थेच अध्ययनाचें कार्य जसजसें वाढत गेलें तसतसें संग्रहालयातहि अनेक नवीन प्रतिकृती व तक्ते यांची भर पडून त्याचा विस्तार झाला. जवळजवळ २० वर्षांनंतर म्हणजे १९४९ साली संग्रहालयाचा ताबा घेण्यासाठी शेवटी संग्रहालय रक्षकाची नेमणूक करण्यात आली.

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय परिस्थितिविनिष्ठ आरोग्य व सामाजिक वैद्यकशास्त्र यासंबंधीचे आहे. प्रदर्शनवस्तूत परिस्थितिनिष्ठ आरोग्य, आहारशास्त्र, रोग व रोगवाहक जंतु वगैरे संबंधीच्या प्रतिकृती तक्ते व दिव्याच्या सहाय्यानें दाखवावयाची काचचित्रें आहेत. संग्रहालयातील प्रतिकृती व तक्ते पुढीलप्रमाणें आहेत—

१. मानवी शरीररचनेची शारीरक्रियात्मक माहिती दर्शविणारा सांगाडा व प्रतिकृती. २. पाऊस, आर्द्रता, उष्णता, वाऱ्याची गति, उष्णतावहन व उष्णतापरिवहन व बाष्पीभवन यामुळें गेलेली उष्णता या गोष्टींच मापन करण्याकरिता हवामानशास्त्रीय उपकरणें.

३. हवा खेळती राहण्याची निरनिराळी साधनें दर्शविणाऱ्या प्रतिकृती.

४. ग्रामीण व शहरी प्रदेशातील पाणीपुरवठ्याची साधनें आणि पाणी गाळून घेण्याच्या व शुद्ध करण्याच्या क्रिया दर्शविणारे तक्ते व प्रतिकृती.

५. खाजगी व सार्वजनिक संडास आणि साफसफाईच्या आणि खाजगी घरातून व सार्वजनिक ठिकाणातून कचरा काढून नेण्याच्या विविध पद्धति दर्शविणारे तक्ते व प्रतिकृती.

६. खेडेगावातील दुसमाचे आदर्श घर, आदर्श मांस बाजार व अस्वच्छ व स्वच्छ गाव व दुग्धालय यांच्या प्रतिकृती.

७. इमारतींची आरोग्यरक्षणाच्या दृष्टीनें पाहणी करण्यासाठी लागणाऱ्या आरोग्यरक्षणाच्या घरगुती साधनांच्या प्रतिकृती.

८. प्लेग, पटकी, हिंवताप, क्षयरोग, गुप्त रोग वगैरे सारख्या सर्वसाधारण रोगांना आळा घालण्याचे विविध उपाय आणि वैयक्तिक संरक्षण-पद्धति दर्शविणारे तक्ते, आकृत्या, प्रतिकृती व चित्रपट.

९. ह्या देशात सर्वसाधारणपणें उपयोगात आणले जाणारे निरनिराळे अन्नपदार्थ, त्यांचे पौष्टिकतेच्या दृष्टीनें महत्त्व, निरनिराळ्या वर्गातील इसमासाठी आवश्यक असलेलें पौष्टिक आहाराचें प्रमाण, समतोल आहार, वगैरे गोष्टी दर्शविणारे तक्ते, आकृत्या, प्रतिकृती व नमुने

**शैक्षणिक कार्य :** ह्या विषयाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी हें संग्रहालय खुलें आहे आणि त्या दृष्टीनें त्यांच्या फायद्यासाठी तेथील वस्तूंवर इंग्रजी भाषेत चिठ्ठ्या लावण्यात आल्या आहेत. प्रादेशिक आरोग्य-संस्थेचे साहाय्यक संचालक व प्राध्यापक हे आवश्यक असेल तेव्हा प्रदर्शनवस्तूसंबंधी खुलासेवार माहिती देतात व प्रात्यक्षिक करून दाखवितात. तसेंच

परिस्थितिनिष्ठ आरोग्य व आरोग्यरक्षणविषयक स्थापत्यशास्त्र (सॅनिटरी इंजिनिअरिंग) या विषयासंबंधानें भरणाऱ्या प्रदर्शनात प्रात्यक्षिकासाठीं प्रदर्शनवस्तु नेण्यात येतात प्रदर्शनवस्तुसंबंधी परिणामकारक व सोदाहरण माहिती देण्यासाठीं प्रतिकृती व तक्ते यांचा उपयोग केला जातो लखनौ विद्यापीठातील एम्. बी. बी. एस्. चा अभ्यास करणारे वैद्यकीय विद्यार्थी व आरोग्य-संस्थेचे विद्यार्थी ह्या संग्रहालयाचा उपयोग करतात

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** रविवार व राजपत्रात जाहीर केलेले सुट्टीचे दिवस खेरीजकरून रोज सकाळीं १० ते संध्याकाळीं ४ पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य परंतु मुख्यत्वेंकरून आरोग्यशास्त्र या विषयाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांनाच प्रवेश देण्यात येतो.

**नियामक मंडळ :** लखनौ येथील प्रांतिक आरोग्य-संस्थेचे साहाय्यक संचालक या संग्रहालयाचा कारभार पहातात

**सेवकवर्ग :** संग्रहालय रक्षक.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालय आरोग्य-संस्थेचाच एक भाग असल्यानें अंदाजपत्रकात त्याच्यासाठीं स्वतंत्र तरतूद केलेली नाहीं

**अभिप्राय** संग्रहालयाची इमारत सोईस्कर आहे, पण पुरेशी नाहीं वस्तु ठेवण्यासाठीं असलेली जागाहि अपुरी आहे ह्या संग्रहालयासाठीं प्रयोगशाळेची सोय असण्याची आवश्यकता नाहीं प्रांतिक आरोग्य-संस्थेचे चौकीदार संग्रहालयावरहि पहारा ठेवतात छायाचित्रें वगैरेंच्या विक्रीची व्यवस्था नाहीं प्रतिकृति तयार करणाऱ्याकडून प्रतिकृती खरेदी करण्यात येतात आणि तक्ते संस्थेच्या कलात्मकाकडून तयार केले जातात किंवा बाहेरून खरेदी केले जातात

## (२) लखनौ विद्यापीठ संग्रहालय

**स्थापना :** रोगनिदानशास्त्र संग्रहालय १९१३ सालीं सुरू करण्यात आलें

**पूर्वेतिहास :** विद्यापीठाच्या संग्रहालयात पुढील विभाग आहेत — (अ) शरीररचनाशास्त्र विभाग, (ब) रोगनिदानशास्त्र विभाग, (क) औषधीविज्ञान विभाग, (ड) न्यायवैद्यक विभाग, (इ) लोकस्वास्थ्य विभाग, (फ) प्राणिशास्त्र विभाग, (ग) भूस्तरशास्त्र विभाग आणि (ह) मानवशास्त्र विभाग. विभागातील निरनिराळ्या अभ्यासक्रमास मदत व्हावी हा या सर्व संग्रहालयाचा हेतु असून रोगनिदानशास्त्राचें संग्रहालय लखनौ विद्यापीठातील वैद्यकशाखेतील रोगनिदानशास्त्र व रोगजंतुशास्त्र विभागास जोडण्यात आलें आहे तें सन १९१३ मध्यें ११० नमुन्यांच्या सहाय्यानें सुरू करण्यात आलें व त्याची संख्या हळूहळू वाढून ती आतां ६,००० इतकी झाली आहे त्यांत चाचणींत बसविलेले नमुने, दिव्यांच्या सहाय्यानें दाखवावयाचीं चित्रें, कांचा (स्लाइड्स), छायाचित्रें व मेणाच्या व मातीच्या प्रतिकृति आहेत

शरीररचनाशास्त्र विभागाच्या संग्रहालयाशीं संबंधित असलेली मानवशास्त्रविषयक प्रयोगशाळा सन १९४४ मध्यें स्थापन करण्यात आली आणि मानवशास्त्रविषयक संग्रहालय सन १९५० मध्यें स्थापन करण्यात आलें

न्यायवैद्यक संग्रहालयाची इमारत पूर्ण झाली असून रोगनिदानशास्त्र विभागातील नमुने तेथें आणण्यात येतील तेथें स्वतंत्र न्यायवैद्यक संग्रहालय उघडण्यात येईल

**व्याप्ति व संग्रह : (अ) शरीररचनाशास्त्र विभाग** — सामान्य गर्भविकासशास्त्र, विशेष संवेदना, प्रादेशिक शरीररचनाशास्त्र, भागविशिष्ट शरीररचनाशास्त्र, अस्थिरचनाशास्त्र, तौलनिक शरीररचनाशास्त्र, तौलनिक गर्भविकासशास्त्र, क्ष किरणलेखविशिष्ट शरीररचनाशास्त्र यांची सोदाहरण माहिती देण्याकरिता हे नमुने व प्रतिकृती पेट्यामध्यें व्यवस्थित ठेवण्यात आल्या आहेत मानवशास्त्रीय प्रयोगशाळेत, मत्स्यावस्थेपासून मानवावस्थेंत, मानवी चेहऱ्याचा कसकसा विकास होत गेला हें दर्शविणाऱ्या १२ प्रतिकृती ठेवल्या आहेत तसेंच प्रतिकृती व 'आदिमानव' वगैरेंच्या यांच्या सहाय्यानें इतिहासपूर्वकालीन मानवाची सचित्र माहितीहि उपलब्ध करून दिली आहे या विभागात असंख्य मानवमापनशास्त्रविषयक साधनेंही समाविष्ट केलेलीं आहेत

**(ब) रोगनिदानशास्त्र विभाग** . याचे सहा मुख्य विभाग पाडले आहेत (१) सर्वसामान्य रोगनिदानशास्त्रीय प्रक्रिया, (२) रोगाच्या कारणविषयक बाबी, (३) अभिसरणविषयक किंवा इतर रचनेंतील रोगनिदानशास्त्रीय प्रक्रिया, (४) खास विषय व बालरोग वगैरे बाबतींतील रोगनिदान शास्त्रीय प्रक्रिया, (५) दाहक गटातील, अधोगतिकारक गटातील निरनिराळ्या रोगांच्या बाबतींतील रोगनिदानशास्त्रीय प्रक्रिया आणि (६) प्राणी व वनस्पति यांच्या बाबतींतील रोगनिदानशास्त्रीय प्रक्रिया

**(क) औषधिविज्ञान विभाग** संग्रहालय अद्यावत् असून त्यात औषधिविज्ञानाच्या अभ्यासासाठीं अनेक नमुने, तक्ते व चित्रालेख ठेवलेले आहेत

**(ड) न्यायवैद्यक विभाग :** न्यायवैद्यक विभाग हा आतापर्यंत रोगनिदानशास्त्र संग्रहालयाचा भाग होता त्याचा आतां स्वतंत्र विभाग करण्यात आला असून तो त्यासाठीं उपलब्ध असलेल्या इमारतींत नेण्यात आला आहे

**(इ) लोकस्वास्थ्य विभाग** लोकस्वास्थ्य संग्रहालय प्रांतिक आरोग्य संस्थेच्या इमारतींत आहे तें उ. प्र. सरकारचें असून विश्वविद्यालयीन विद्यार्थी त्याचा लाभ घेतात

**(फ) प्राणीशास्त्र विभाग** . प्राणीशास्त्र विभागाच्या संग्रहालयात सर्वांत कनिष्ठ अवस्थेपासून तों सर्वांत श्रेष्ठ अवस्थेपर्यंतचें असें प्राणीजीवन दाखविणारे प्राणिसृष्टींतील नमुने ठेवलेले आहेत येथील संग्रह चांगला असून त्यात कांहीं दुर्मिळ व उद्बोधक नमुने ठेवलेले आहेत येथील संग्रहात मासे, भूचलचर, सरपटणारे प्राणी, पक्षी, सस्तन प्राणी आणि पृष्ठरज्जुविहीन प्राणी समाविष्ट केलेले आहेत

**(ग) मानवशास्त्र विभाग** . मानवशास्त्रविषयक संग्रहालय पांच वर्षांपूर्वी स्थापन करण्यांत आलें असून त्यात भारतांतील व भारताबाहेरील अशी इतिहासपूर्वकालीन व इतिहासआरंभकालीन साधनसामग्री तसेंच मातीचीं भांडीकुंडीं व इतर पुरातन वस्तु संग्रहित केलेल्या आहेत समकालीन आदिसमाजाच्या भौतिक संस्कृतीचे नमुनेहि ठेवण्यांत आले असून त्यात होड्या, पाळणा, दागदागिने, मासेमारीचीं साधनें, टोपल्या, वाद्यें, हत्यारें वगैरेही समाविष्ट केलीं आहेत फोटो, तक्ते, नकाशे व आराखडे दगील

ठेवलेले आहेत. इतिहासपूर्वकालीन मानव दाखविणारे अर्धपुतळेहि तेथें ठेवलेले आहेत.

**शैक्षणिक कार्य :** ही संग्रहालयें विशिष्ट प्रकारच्या विद्यार्थ्यांच्या खास गरजा भागविण्यासाठीं उघडलेल्या खास संस्था असून त्यांच्यामार्फत हें कार्य उत्तमपणें साध्य होतें.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं.

**कामाचे तास :** सुटीचे दिवस सोडून रोज महाविद्यालयाच्या कामाच्या वेळांत उघडी असतात.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** लखनौ विद्यापीठाचे निरनिराळे विभाग

**सेवकवर्ग :** निरनिराळ्या संग्रहालयांची व्यवस्था संबंधित विभागाकडून पाहिली जाते.

**आर्थिक तरतूद :** अर्थसंकल्पीय तरतूद निरनिराळ्या विभागांनी केलेली आहे.

**अभिप्राय :** वैद्यकीय संग्रहालयाच्या बाबतींत वस्तूंचे नमुने बहुतेक शवपरीक्षा व इस्पितळांचे इतरांचे यांच्याद्वारा मिळविण्यात येतात. कांहीं नमुने परदेशांतूनही मिळविलेले आहेत.

## (३) मोतीलाल नेहरू बालसंग्रहालय

**स्थापना :** सन १९५७

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय मोतीलाल नेहरू स्मारक-संस्थेच्या वतीनें स्थापन करण्यांत आलें असून त्याला श्री. चंद्रभानु गुप्त व इतर कांहीं जण यांनी अतिशय उत्साहानें साह्य केलें आहे. हें संग्रहालय दि. २७ ऑक्टोबर, १९५७ रोजीं प्रधान मन्त्री, श्री. जवाहरलाल नेहरू यांच्या हस्तें उघडण्यात आलें आणि त्यांच्या वडिलांच्या स्मृतिप्रीत्यर्थ त्याला उपरिनिर्दिष्ट नांव देण्यात आलें.

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयांत खालील तीन विभाग आहेत :– (१) आरोग्य विभाग, (२) सामान्य व खेळणी विभाग, व (३) सृष्टिविज्ञान विभाग.

आरोग्यविभागांत, निरनिराळ्या प्रकारच्या रोगांचीं कारणें व परिणाम, तसेंच त्यांचे प्रतिबंधक व निवारक उपाय यासंबंधी माहिती रंगीत तक्ते व नमुने यांच्या साह्यानें स्पष्टपणें दर्शविण्यात आली आहे.

सामान्य व खेळणी विभागांत निरनिराळ्या देशांतील यांत्रिक खेळणीं, नमुने, बाहुल्या इत्यादि व इतर शैक्षणिक क्रीडासाहित्य ठेवलेलें आहे. मुलांच्या शारीरिक, मानसिक व सामाजिक जीवनाची वाढ व विकास होण्यास मदत होईल अशा प्रकारच संग्रहित साहित्याची रचना केलेली आहे.

सृष्टिविज्ञान विभागाच्याद्वारें मुलाला त्याच्या सभोंवतालची वनस्पति सृष्टि व प्राणीसृष्टि यांची ओळख करून दिलेली असून त्यामुळें मुलाचें वनस्पति व प्राणी यांच जीवन व सवयी यांविषयीच ज्ञान वाढण्यास मदत होते

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाच एक छोटेसें पुस्तकालय असून त्यात ३,००० हून अधिक पुस्तकं आहेत त्याशिवाय मुलांच्यासाठीं रंगीत तक्ते, सचित्र व बालवाङ्मय ठेवलेलें असून त्यांची आकर्षक रीतीनं मांडणी केलेली आहे प्रदर्शनालयांतून वस्तूंना हिंदी, इंग्रजी व बंगाली अशा तीन भाषांतून नांवाच्या चिठ्ठ्या लावलेल्या आहेत. शैक्षणिक चल-चित्रपट देखील दाखविण्यात येतात. या ठिकाणीं मुलांना मोकळेपणानं वावरण्याचें स्वातंत्र्य दिलं जातं. सभासद स्वत:चें मंडळ चालवितात आणि त्यांच्या आवडीप्रमाणें कांहीं कार्यक्रम पडवून आणले जातात व रविवारीं चित्रपट दाखविले जातात. मुलांना संग्रहालयासाठीं खेळणीं तयार करण्याचे कामीं प्रोत्साहन देण्यात येतें आणि त्या वस्तु लोकांना दाखविण्यासाठीं ठेवण्यात येतात. चित्राच्या स्पर्धा देखील ठेवून त्यासाठीं बक्षिसें देण्यात येतात.

**प्रकाशनें :** 'मोतीलाल नेहरू बालसंग्रहालय' नांवाची पुस्तिका.

**कामाचे तास :** रविवार सोडून रोज सकाळीं १० ते सायंकाळीं ७ पर्यंत आणि शनिवारीं सकाळीं १० ते सायंकाळीं ५ पर्यंत संग्रहालय उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाची व्यवस्था १५ सदस्यांची एक व्यवस्थापक समिति पाहते. समितीच्या अध्यक्षस्थानीं श्रीमती शीला कौल या आहेत.

**सेवकवर्गं :** संग्रहालयाध्यक्षा कुमारी हिना रॉय. सेवकवर्गांत इतरही १३ इसम आहेत.

**आर्थिक तरतूद :** आवर्तक रु. १४,६१२·३९
अनावर्तक रु. ३०,६७३·४७

**अभिप्राय :** या संग्रहालयाच्या भाजूबाजूचें वातावरण अत्यंत आल्हाददायक असून संग्रहालयांत सहज जाता येतें. संग्रहालयाच्या सदस्यासाठीं खास सोयी केलेल्या आहेत. दररोज सुमारें १२५ व दरवर्षी ३७,५०० प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात. सार्वजनिक सुटीच्या दिवशीं यापेक्षा जास्त प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात. मुलांमध्यें आवड निर्माण करण्यासाठीं विज्ञानविषयक साधे साधे प्रयोग करण्याकरिता एक प्रयोगशाळा लवकरच उघडण्यात येणार आहे मुलांसाठीं एक छंद केंद्रदेखील तयार करण्यात येत असून तेथें सध्या मातीच्या मूर्ती बनविणें, नक्षी-काम, अश्वारोहण वगैरे कला शिकविण्यात येतात. खरेदी व देणगी या साधनांनीं संग्रहालयासाठीं वस्तु गोळा केल्या जातात.

## वाराणसी, हिंदु विद्यापीठ, भारत कला भवन संग्रहालय

"पुराणवस्तुशास्त्र व सांस्कृतिक संग्रहालयें" विभाग पहा.

### पश्चिम बंगाल

**कलकत्ता :** लोकसंख्या २५,४८,६७७

## (१) वैद्यकीय महाविद्यालय संग्रहालयें

(अ) शरीररचनाशास्त्र विभाग व (ब) रोगनिदानशास्त्र विभाग

**स्थापना :** माहीत नाहीं

**पूर्वेतिहास :** कलकत्ता वैद्यकीय महाविद्यालय सन १८३५ सालीं सुरू झालं; परंतु शरीररचनाशास्त्र संग्रहालय केव्हा स्थापन झालें याबद्दल कागदोपत्रीं काहीहि माहिती उपलब्ध नाहीं तथापि, १९०७ सालीं मेजर डी एम् मॉइर हे शरीररचनाशास्त्र, शस्त्रवैद्यकीय शरीररचनाशास्त्र व चिकित्साविषयक शस्त्रवैद्यक या विषयाचे प्राध्यापक होते. त्या वेळीं शरीररचनाशास्त्र संग्रहालय मोडण्यात आलें आणि नवीन संग्रहालय उभारण्याचें

करें हातीं घेण्यात आलें त्यांत शरीररचनाशास्त्र व जीवशास्त्र विभागांतील नमुने दाखल करण्यात आले होते.

वैद्यकीय महाविद्यालय रोगनिदानशास्त्र संग्रहालयात या प्रांतातील त्या विषयाचा असा मुख्य संग्रह आहे. या संग्रहात वस्तूंचे नमुने संग्रहित असून त्यांपैकी सर्वांत जुने असे नमुने कलकत्ता वैद्यकीय महाविद्यालय व सन १८२१ साली स्थापन झालेल्या कलकत्ता पदार्थविज्ञान-संस्था यांनी जतन करून ठेवले होते. हा संग्रह सन १८३९ च्या सुमारास कलकत्ता वैद्यकीय महाविद्यालयाच्या स्वाधीन करण्यात आला. डॉ. ॲलन वेब हे या संग्रहालयाचे पहिले संग्रहालयाध्यक्ष होते. सन १८४३ साली कलकत्ता वैद्यकीय मंडळाने रोगनिदानशास्त्रविषयक नमुने मिळविण्यासाठी भारतातील सर्व वैद्यकीय अधिकाऱ्यांना आवाहन केले होतें. तें फलद्रूप होऊन संग्रहात मौलिक नमुन्यांची भर पडली आहे सन १८६५ साली जोसेफ एवर्ट यांनी रोगनिदानशास्त्रविषयक नमुन्यांचें व प्रतिमांचें एक संपूर्ण माहितीपुस्तक तयार केलें. माहितीपुस्तकात एकूण १३२२ नमुने व १०० प्रतिकृती समाविष्ट होत्या. सन १८८८ साली एक नवीन माहितीपुस्तक बनविण्यात आलें हें माहितीपुस्तक सेंट जॉर्ज हॉस्पिटल संग्रहालयाच्या माहितीपुस्तकावरहुकूम तयार करण्यात आलें. माहितीपुस्तकात २८६० नमुने, ३५९ प्रतिकृती व रोगनिदानशास्त्रीय आकृत्या देण्यात आल्या होत्या. सन १९०० साली के. (आतां सर) लिओनार्ड रॉजर्स हे संग्रहालयाचे संग्रहालयाध्यक्ष व रोगनिदान शास्त्राचे प्राध्यापक झाले सन १९०५ साली सध्याची रोगनिदानशास्त्रीय प्रयोगशाळा उघडण्यात आली नवीन नमुने दाखल करण्यात आल्यानंतर त्यांची एकूण संख्या–९,६१२ विकृत नमुने, ३०० प्रतिकृती व ४०० आकृत्या इतकी झाली. विद्यमान माहितीपुस्तक हें जी. एन. मिन, एस. सी. दास व पी. एल. दास यांनी प्रसिद्ध केलें. रोगनिदानशास्त्रविषयक संग्रहालयात ८५,००० हून अधिक विकृत नमुने, १०० हून अधिक प्रतिमा, ६०० हून अधिक आकृत्या व आलेख, २५० हून अधिक छायाचित्रें व ३०० हून अधिक स्लाइड्सच्या साहाय्यानें दाखविण्याची कांचचित्रें आहेत. संग्रहालयाच्या जागेचें क्षेत्रफळ १०,००० चौ. फूट असून त्यांत ५५ दुहेरी अलमाऱ्या, आठ चित्रांचे फिरते घोडे व प्रदर्शन पेट्या आहेत.

**व्याप्ति व संग्रह :** शरीररचनाशास्त्र संग्रहालयांत मानवी शरीराच्या अवयवाचे विच्छेदित नमुने व प्रतिकृती ठेवलेल्या आहेत. तेथें काही जीवशास्त्रीय संग्रह देखील आहे. रोगनिदानशास्त्र संग्रहालयात रोगनिदानशास्त्रविषयाचें ज्ञान करून देणारे विकृत नमुने, प्रतिकृती, आकृत्या, आलेख व छायाचित्रें ठेवलेली आहेत.

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय मुख्यतः वैद्यकीय महाविद्यालयाचे विद्यार्थी व डॉक्टर वर्ग यांच्या उपयोगासाठी आहे आणि प्राचार्य अगर विभागाचे प्रमुख यांच्या अनुमतीनें या विषयाची आवड असणाऱ्या इसमांना देखील संग्रहालयाला भेट देण्याची परवानगी देण्यात येते. शहरांतील सर्व वैद्यकीय संस्थांचे विद्यार्थी अध्ययनासाठी संग्रहालयात येतात. महाविद्यालय संमेलन, वगैरेसारख्या प्रसंगी खास प्रदर्शनें भरविण्यात येतात. अशा प्रसंगी संग्रहालयात मोठ्या संख्येनें प्रेक्षक येतात. संग्रहित वस्तूंना इंग्रजी भाषेत नावांच्या चिठ्ठ्या लावण्याची तरतूद केलेली असून नकाशे, तक्ते व प्रतिकृती यांचें साह्य शक्य तेवढ्या अधिक प्रमाणात देण्यात येतें.

**प्रकाशनें :** काही नाही.

**कामाचे तास :** संग्रहालय सरकारी सुटीचे दिवस सोडून आठवड्यातील सर्व दिवशी सकाळी १० ते सायंकाळी ४ वाजेपर्यंत आणि शनिवारी सकाळी १० ते दुपारी २ वाजेपर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य. मुख्यतः वैद्यकशास्त्राच्या विद्यार्थ्यांसाठीच तरतूद केली आहे.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाची व्यवस्था त्या त्या विभागाच्या प्रमुखाकडून पाहण्यात येते.

**सेवकवर्ग :** शरीररचनाशास्त्राचा डेमॉन्स्ट्रेटर हाच आपली नेहमीची कामें सांभाळून शरीररचनाशास्त्र संग्रहालयाची व्यवस्था पाहातो. त्या कामी संग्रहालयातील शिपाई त्याला साह्य करतो. रोगनिदानशास्त्र संग्रहालयातील सेवकवर्गात एक संग्रहालयाध्यक्ष, दोन तंत्रज्ञ, कारकून, पेंढा भरण्याचें काम करणारा, कलातज्ज्ञ व दोन शिपाई यांचा समावेश होतो.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयासाठी अंदाजपत्रकात स्वतंत्र तरतूद केलेली नाही. संबंधित खात्याच्या अंदाजपत्रकात संग्रहालयाच्या खर्चाची तरतूद केलेली आहे.

**अभिप्राय :** संग्रहालयाच्या कामासाठी शरीररचनाशास्त्र संग्रहालय इमारत व आतील जागा पुरेशी आहे. मात्र तेथें प्रयोगशाळाविषयक सोयी पुरेशा प्रमाणात उपलब्ध नाहीत.

या संग्रहालयातील विभागाच्या सेवकवर्गानें केलेल्या विच्छेदनाद्वारें व बाहेरून खरेदी करून मिळविलेल्या आहेत. संग्रहालयावर विभागाच्या दरवानाची गस्त व पहारा असतो.

रोगनिदान संग्रहालयाची इमारत ज्या कारणासाठी तिचा उपयोग करण्यात येत आहे त्या कारणासाठी सुयोग्य व पुरेशी आहे आणि तींत प्रयोगशाळेची सोयही आहे रोगनिदान विभागाचे दरवान संग्रहालयावर गस्त घालण्याचें व पहारा करण्याचें काम करतात या संग्रहालयातील वस्तु विविध वॉर्ड व शवपरीक्षेच्या खोल्या यातून मिळविलेल्या आहेत

## (२) कुष्ठरोगनिर्बंध वैद्यक महाविद्यालय संग्रहालय

**स्थापना :** इ. स. १९२१

**पूर्वेतिहास :** उष्णकटिबंध वैद्यक महाविद्यालय सन १९२१ साली स्थापन झालें व तेव्हापासूनच या संग्रहालयातील वस्तु जमविण्यास सुरुवात झाली आणि या संस्थेच्या गरजानुसार या संग्रहालयाचा क्रमाक्रमानं विस्तार करण्यात आला हें संग्रहालय मुख्यतः वैद्यकीय संशोधनासाठी व वैद्यकीच्या पदव्युत्तर अध्यापनासाठी आहे.

**व्याप्ति व संग्रह :** प्रदर्शन-वस्तूंचा संग्रह, विद्यार्थी व अभ्यासू संशोधक यांना पाठ्यविषय समजावून घेण्यासाठी उपयोगी पडावा म्हणून जमविलेला असून त्याची पुढीलप्रमाणे वर्गवारी करता येईल :

( अ ) निरनिराळ्या वर्गांचे जतन करून ठेवलेले जीवशास्त्रीय नमुने :–

( १ ) विषमज्वर, पटकी, महारोग, क्षयरोग वगैरे निर्माण करणारे जंतु

( २ ) अमीबियासिस, हिवताप, कृमि आजार, सांसर्गिक रोग वगैरे निर्माण करणारे आदिजंतु

( ३ ) हत्तीरोग निर्माण करणारे कृमि.

( ४ ) पिवळा ताप, सधिगतज्वर, विषमज्वर, प्लेग, ताप उलटणें, हिंवताप, काळा आजार वगैरेंचा संसर्ग करणारा संधिपाद प्राणीवर्ग.

( ५ ) सर्प ( विषारी व बिन विषारी ), विषारी सर्पदंश व त्यामुळें मृत्यु येणें किंवा अंगात विष भिनणें.

( ६ ) प्लेग, वेल्सचा रोग, उंदीर चावल्यामुळें येणारा ताप वगैरे निर्माण करणारे उंदीर.

( च ) संसर्गदूषित प्राण्याचे कापलेले भाग आणि मानवी शरीराची मरणोत्तर व मृत्युपूर्व परीक्षा.

( क ) उष्णकटिबंधांतील रोगाचें स्वरूप दर्शविणारे प्लास्टरचे नमुने.

( ङ ) विविधरोग, महारोग, देवी वगैरेंमुळें झालेली शरीराची हानि दर्शविणारे, मानवी शरीराच्या भागाचे मेणाचे बनविलेले नमुने.

( इ ) उष्णकटिबंधातील रोग ज्या प्रदेशांत उद्भवतात ते प्रदेश दर्शविणारे व उष्णकटिबंधातील रोगासंबंधींचें सामान्यविज्ञान व लक्षणें आणि त्यांचा प्रतिबंध करण्याच्या पद्धति तसेंच रोग होण्यास कारणीभूत होणाऱ्या निरनिराळ्या प्राण्यांचे जीवन यांची रूपरेषा देणारे आराखडे, चित्रें व छायाचित्रें.

( फ ) औषधी वनस्पति, औषधें वगैरेंचे वर्णवारी केलेले नमुने.

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय, पदव्युत्तर विद्यार्थ्यांना व अभ्यासू संशोधकांना त्यांच्या अभ्यासात साहाय्य करण्यासाठीं निर्माण केलेलें आहे. वस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठया सध्यां इंग्रजींत आहेत, परंतु बंगाली व हिंदी भाषांतील नांवाच्या चिठ्ठया लवकरच लावण्यांत येतील. सामान्य विज्ञानाचें पदव्युत्तर शिक्षण घेणारे विद्यार्थी व वैद्यकीचा अभ्यास करणारे वरच्या वर्गांतील विद्यार्थी या संशोधन संग्रहालयाचा फायदा घेतात. निरनिराळ्या मुद्द्यांचें स्पष्टीकरण करण्यासाठीं नकाशे, आराखडे, नमुने व सांच्यात तयार केलेल्या वस्तु यांचा भरपूर उपयोग करण्यात येतो.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** रविवार व सुट्याचे दिवस खेरीजकरून इतर सर्व दिवशीं सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य. परंतु हें संग्रहालय केवळ पदव्युत्तर वैद्यकीय विद्यार्थी व वैद्यकीय संशोधनाचें कार्य करणारे इसम यांच्यासाठींच आहे.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय, संचालक, उष्णकटिबंध वैद्यक महाविद्यालय, यांच्या नियंत्रणाखालीं आहे व त्यास त्यांचा सेवकवर्ग साहाय्य करतो.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष व एक शिपाई

**आर्थिक तरतूद :** हें संग्रहालय उष्णकटिबंध वैद्यक महाविद्यालयाचाच एक भाग असल्यानें त्याच्यासाठीं स्वतंत्र असें वार्षिक अंदाजपत्रक नाहीं.

**अभिप्राय :** संग्रहालय शहराच्या मध्यभागीं आहे, परंतु तें सार्वजनिक संग्रहालय नसल्यामुळे व तें केवळ वैद्यकीय विद्यार्थी व संशोधन कार्य करणारे इसम यांच्यासाठींच असल्यामुळें संग्रहालय पाहण्यासाठीं येणाऱ्या लोकांची संख्या मर्यादित असते. तथापि, परिसंवादाच्या वेळीं मात्र बरेच लोक येतात. विस्तार करण्यासाठीं संग्रहालयाला योग्य व पुरेशा जागेची आवश्यकता आहे संग्रहालय हें संस्थेचा एक भाग असल्यामुळें संग्रहालयासाठीं स्वतंत्र पहारेकरी नाहीं. संग्रहालयाला कलकत्ता येथील उष्णकटिबंध वैद्यक महाविद्यालयाच्या निरनिराळ्या विभागाकडून प्रदर्शनवस्तूंचा पुरवठा होतो.

## ( ३ ) आर जी. कार वैद्यकीय महाविद्यालय रोगविज्ञान संग्रहालय

**स्थापना :** माहीत नाहीं.

**पूर्वेतिहास :** या संग्रहालयाचा पूर्वेतिहास आर्. जी. कार वैद्यकीय महाविद्यालयाच्या रोगनिदान विभागाच्या इतिहासाहून निराळा नाहीं.

**व्याप्ति व संग्रह :** हें महाविद्यालयीन संग्रहालय वैद्यकीय शास्त्राच्या निरनिराळ्या शाखांसाठीं आहे व तें वैद्यकीय महाविद्यालयाच्या रोगनिदान विभागास जोडलेल्या इमारतींत आहे. त्यांत, असंख्य उपयुक्त आराखडे, नकाशे, छायाचित्रें आणि वर्णनात्मक टीपा यांच्या साह्यानें ' प्राचीन रोगनिदानशास्त्र' आणि 'वैद्यकशास्त्राचा इतिहास – प्राचीन व अर्वाचीन' यांची माहिती देण्यासाठीं वेगवेगळे प्रदर्शनविभाग आहेत

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय वैद्यकीय विद्यार्थ्यांसाठीं असून त्याद्वारें प्रस्तुत उद्देश पुरेशा प्रमाणात सफळ होतो. येथें भरलेल्या वैद्यकीय व इतर विज्ञान परिषदांचे प्रतिनिधी हें संग्रहालय अवश्य पहातात वैद्यकीय विद्यार्थ्यांच्या सोयीसाठीं प्रदर्शनवस्तूंवरील नांवाच्या चिठ्ठया इंग्रजींत लिहिलेल्या आहेत. कलकत्त्यातील व शेजारच्या राज्यातील इतर विद्यापीठांतील विद्यार्थ्यांना हें संग्रहालय पाहण्याच्या बाबतींत बरीच उत्सुकता वाटते.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं.

**कामाचे तास :** हें संग्रहालय रविवार व इतर सुट्याचे दिवस खेरीज-करून दररोज दुपारीं १२ ते ४ पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य. हें संग्रहालय पदवीपूर्व वर्गांतील व पदव्युत्तर विद्यार्थ्यांसाठीं, तसेंच वैद्यकीय शास्त्राविषयीं जिज्ञासा असलेल्या इतर लोकांसाठींच निर्माण केलेलें आहे

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय रोगनिदानशास्त्र विभागाच्या प्राध्यापकाच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग :** रोगनिदानशास्त्राचे प्राध्यापक हे संग्रहालयाध्यक्ष आहेत व एक शिक्षक सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष आहेत. त्याशिवाय, एक अभिरक्षक, एक प्रयोगशाळा सहाय्यक, एक कलाकार–छायाचित्रकार व एक झाडूवाला आहे

**आर्थिक तरतूद :** हें संग्रहालय महाविद्यालयाचा एक भाग असल्यानें संग्रहालयासाठीं अशी निराळी आर्थिक तरतूद केलेली नाहीं.

**अभिप्राय :** हें संग्रहालय वैद्यकीय विद्यार्थ्यांसाठीं वैद्यकीय महाविद्यालयातच आहे व तें पाहण्यास सर्वसाधारण लोक येत नाहींत. जागा सध्या योग्य व पुरेशी आहे; तथापि, संग्रहालयाची सुधारणा करण्यासंबंधींच्या योजनांचा विचार चालू आहे महाविद्यालयाच्या संबंध इमारतीसाठीं दिवसा व रात्रीं पहारा करण्याची तरतूद केलेली आहे संग्रहालयातील वस्तूंपैकीं काहीं वस्तु शवपरीक्षेच्या द्वारें व काहीं ऑपरेशन केसीसूच्या द्वारें मिळविलेल्या असून त्यांत विकृत शरीरविषयक आणि शरीररचनाविषयक नमुने भरपूर आहेत. प्रसूतीच्या वेळीं पुरातन काळापासून वापरण्यात येत असलेल्या चिमट्यांचा स्वर्गवासी सर केदारनाथ दास यांनीं जमविलेला संग्रह खरेदी करून मिळविलेला आहे

## कलकत्ता विद्यापीठाचें भारतीय-कलाविषयक असुतोष संग्रहालय

'पुराणवस्तु व सांस्कृतिक संग्रहालयें' याखालीं पहा.

**दार्जिलिंग :** लोकसंख्या ३३,६०५

## सृष्टिविज्ञान संग्रहालय

**स्थापना :** इ. स. १९०३

**पूर्वेतिहास :** दार्जिलिंग येथें सृष्टिविज्ञान संग्रहालय स्थापण्याची कल्पना प्रथम १९०३ मध्यें सुचली व त्यासाठीं "लॉइड बोटॅनिक गार्डन" मध्यें बांधलेल्या एका लहानशा इमारतींत छोटासा संग्रह ठेवण्यात आला होता. संग्रहालयाची सध्याची इमारत १९१५ मध्यें बांधून पुरी झाली होती. पुढें १९२२ मध्यें पैशाची टंचाई व इतर कारणें यामुळे संग्रहालयाची स्थिति इतकी वाईट झाली कीं, समितीच्या त्या वेळच्या अध्यक्षांनीं मदतीसाठीं गव्हर्नरास विनंति केली. ही विनंति, सृष्टिविज्ञान-संस्था स्थापन करण्याच्या व एक सुयोग्य संग्रहालयाध्यक्ष नेमण्याच्या शर्तीवर मान्य करण्यात आली. १९२३ मध्यें दार्जिलिंग सृष्टिविज्ञानसंस्था स्थापन करण्यांत आली व त्या संस्थेनें संग्रहालय आपल्या ताब्यात घेतलें. १९२६ मध्यें १५ पानांचें एक तिमाही पत्रक सुरू करण्यात आलें. दार्जिलिंग सृष्टिविज्ञान संस्थेस १९४० सालीं बंगाल सृष्टिविज्ञान संस्था असें नाव देण्यात आलें व त्या संस्थेच्या मार्फत हें संग्रहालय सध्या चालविण्यात येत आहे. कांहीं काळ या संग्रहालयाची प्रगति कांहीं अपरिहार्य कारणामुळें खुंटली होती. परंतु डॉ. एस. थॉमस सत्यमूर्ति यांची १९५२ मध्यें संग्रहालयाध्यक्ष म्हणून नेमणूक झाल्यानंतर संग्रहालयाच्या कार्यास जोराची चालना मिळाली व संग्रहालयाचें नियत-कालिक नियमितपणें सुरू झालें.

**व्याप्ति व संग्रह :** या संग्रहालयांत, सस्तन प्राणी, पक्षी, सरपटणारे प्राणी, मासे, पक्ष्यांचीं अंडीं, कीटक व इतर पृष्ठरज्जुविहीन प्राणी इत्यादि सृष्टिविज्ञानविषयक नमुने आहेत. संस्थेच्या उद्देशाप्रमाणें सृष्टिविज्ञानविषयक अभ्यासास प्रोत्साहन देणें व दार्जिलिंग, जलपैगुरी या जिल्ह्यांतून व सिक्किम राज्यांतून नमुने एकत्र करणें हा संग्रहालयाचा उद्देश आहे.

**शैक्षणिक कार्य :** येथें एक ग्रंथालय असून त्यांत सृष्टिविज्ञान या विषया-वरील सुमारें ५०० पुस्तकें व नियतकालिकें आहेत. पुस्तकें सभासदांच्या उपयोगासाठीं आहेत. संग्रहालयाध्यक्ष शाळेंतील मुलांच्या पथकांना संग्रहालय दाखवितात व त्यांतील वस्तूंची माहिती देतात. युनायटेड स्टेट्स् इन्फर्मेशन सर्व्हिस या संस्थेच्या सहकार्यानें शाळेंतील मुलांच्या पथकांना दीपचित्रांच्या (लँटर्न स्लाइडच्या) साहाय्यानें निवडक विषयांवर व्याख्यानें देण्यात येतात. अभ्यासाच्या कारणासाठीं कधींकधीं इतर संग्रहालयांना नमुने उसने देण्यात येतात. संग्रहालय, 'बंगाल सृष्टिविज्ञानसंस्थेची पत्रिका' या नांवानें आपलें प्रकाशन देशांतील व परदेशांतील संग्रहालयांना व इतर विज्ञान संस्थांना पाठवितें व त्याच्या मोबदल्यांत अशा संग्रहालयांचीं व संस्थांचीं प्रकाशनें मिळवितें. वस्तुवर्णनें नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजींत असून त्या संपूर्ण वर्णनात्मक व अर्थपूर्ण आहेत. स्थानिक महाविद्यालयांना व शाळांना संग्रहालयाबद्दल बरीच जिज्ञासा आहे.

**प्रकाशनें :** संग्रहालय 'बंगाल सृष्टिविज्ञानसंस्थेची पत्रिका' या नावाचें नियतकालिक प्रकाशित करतें. हें नियतकालिक इ. सन १९२६ मध्यें सुरू करण्यात आलें. तें दर तीन महिन्यांनीं प्रसिद्ध होत होतें; परंतु, छपाईच्या वाढत्या खर्चामुळें इ. स. १९५१ पासून दरवर्षी फक्त दोन अंक काढण्यात येतात. पक्ष्यांच्या रंगीत चित्रांनीं युक्त अशा रंगीत प्लेट्स् व भेटपत्रिका संग्रहालयानें प्रसिद्ध केल्या असून त्या विकत मिळूं शकतात.

**कामाचे तास :** हें संग्रहालय रविवार सबंध दिवस व शनिवारची दुपारनंतरची वेळ वगळून इतर सर्व दिवशीं सकाळीं ९ ते दुपारीं १ व दुपारीं २ ते संध्याकाळीं ५ वाजेपर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय बंगाल सृष्टिविज्ञान संस्थेकडून चालविण्यांत येतें.

**सेवकवर्ग :** संग्रहालयाध्यक्ष – श्री. जे. सी. डॅनियल, एम्. एस्सी., पेंढा भरणारा एक इसम, दोन चौकीदार व एक अंशकालिक कारकून.

**आर्थिक तरतूद :** अंदाजपत्रकांतील वार्षिक तरतूद १२,००० रुपये आहे.

**अभिप्राय :** संग्रहालय अगदीं मध्यवर्ती व सोयिस्कर अशा जागीं असून तें भारतातील थंड हवेच्या ठिकाणीं असलेलें एकमेव संग्रहालय आहे. हें संग्रहालय पाहाण्यासाठीं येणाऱ्या लोकांची रोजची सरासरी संख्या ५० असते. परंतु उन्हाळ्यात व पूजा उत्सवात संग्रहालय पाहाण्यास येणाऱ्या लोकांची विशेष गर्दी असते. संग्रहालयाची इमारत सोयिस्कर आहे. परंतु आणखी वाढ करण्यासाठीं तींत वाव नाहीं. दिवसा पहाऱ्यासाठीं दोन पहारेकरी असतात; परंतु रात्रीसाठीं पहारेकरी नाहींत. संग्रहालयाध्यक्षासाठीं संग्रहालयालयातच राहण्याची सोय केलेली आहे. सध्याच्या संग्रहासाठीं संग्रहालयांत पुरेशी जागा आहे. परंतु, पेंढा भरण्याचें कामासाठीं स्वतंत्र खोली नाहीं. नमुने मुख्यतः संग्रहालयाध्यक्ष यांनीं स्थानिकरीत्या केलेला संग्रह व देणगीदाखल दिलेल्या वस्तु यांद्वारें मिळविलेले आहेत. विशेषतः सरपटणारे प्राणी, कीटक वगैरे ठेवलेल्या प्रदर्शनविभागांत तक्ते व मोतीव नमुने यांचा उपयोग करण्यात आला आहे. वस्तुसंग्रहशास्त्राविषयीं जिज्ञासा असलेल्या इसमांना शिक्षण देण्याची व्यवस्था संग्रहालयातर्फे करण्यात आली आहे.

## सेरामपूर, सेरामपूर महाविद्यालय संग्रहालय

"पुराणवस्तु व सांस्कृतिक संग्रहालयें" याखालीं पहा.

## तामलुक, हॅमिल्टन हायस्कूल संग्रहालय

"पुराणवस्तु व सांस्कृतिक संग्रहालयें" याखालीं पहा.

# ३

# औद्योगिक व वाणिज्य संग्रहालयें

## आसाम

**गौहत्ती :** लोकसंख्या ४३,६९५

### (१) वाणिज्य संग्रहालय, गौहत्ती विद्यापीठ, जालुकबारी

**स्थापना :** सन १९५७

**पूर्वेतिहास :** हें संग्रहालय १९५७ साली द्वितीय पंचवार्षिक योजने-नुसार केंद्रीय सरकारकडून मिळणाऱ्या अनुदानाच्या साहाय्यानें सुरू करण्यात आलें. अवघ्या एका वर्षाच्या मुदतींत वाणिज्यदृष्ट्या महत्त्वाच्या अशा ६०० प्रदर्शनवस्तु संग्रहालयासाठीं संग्रहित करण्यांत येऊन त्या निरनिराळ्या विभागांत प्रदर्शित करण्यांत आल्या.

**व्याप्ति व संग्रह :** भारताचा आर्थिक विकास दर्शविण्यासाठीं तक्ते, नकाशे व प्रतिकृती प्रदर्शित करण्यात आल्या आहेत. वाणिज्यदृष्ट्या महत्त्वाच्या अशा ६०० प्रदर्शनवस्तु आहेत. ह्या प्रदर्शन-वस्तु म्हणजे वाणिज्य पदार्थ, खनिज पदार्थ व खडक, जंगल उत्पन्न, हस्तव्यवसायाचे नमुने, औद्योगिक व रासायनिक पदार्थ, शेतीची अवजारें, कार्यालयासाठीं लागणाऱ्या वस्तु व मेहनत वांचविणारी साधनें, वाणिज्य-विषयक पुस्तकें व कागदपत्र, आकडेवार माहितीचे तक्ते, नकाशे, चित्रें व प्रतिकृती, नाणीं व सांस्कृतिक दृष्ट्या महत्त्वाच्या प्रदर्शनवस्तु होत.

**शैक्षणिक कार्य :** विद्यार्थ्यांना कच्चा माल, तयार माल, वाणिज्य-विषयक कागदपत्र, कार्यालयासाठीं लागणाऱ्या वस्तु वगैरेसारख्या वाणिज्य दृष्ट्या महत्त्वाच्या प्रदर्शनवस्तूंचा परिचय करून घेण्याच्या कामीं या संग्रहालयाची मदत होते. संग्रहालयाध्यक्ष व मानचित्रकार हें संग्रहालय पाहण्यास येणाऱ्या व्यक्तींनीं विनंति केल्यास त्यांना मदत करतात. नकाशे, तक्ते वगैरेंचा भरपूर उपयोग केला जातो वस्तूंना लावलेल्या चिठ्ठ्या इंग्रजींत आहेत.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं.

**कामाचे तास :** कामाच्या सर्व दिवशीं दुपारीं १२-३० ते संध्याकाळीं ६-३० पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाची व्यवस्था विद्यापीठाकडून आपल्या विभागांपैकीं एक विभाग म्हणून पाहिली जाते. प्रभारी-प्राध्यापक हे संग्रहालयाचे अवैतनिक प्रभारी अधिकारी असून त्यांच्या अधिकाराखालीं हें संग्रहालय आहे.

**सेवकवर्ग :** प्रभारी प्राध्यापक – श्री. के. एन्. सैकीया, एम्. ए., (कॉन.) एलएल. बी., संग्रहालयाध्यक्ष – श्री. एन्. सी. दत्त, एम्. कॉम्., नकाशे काढणारा व कार्यालय साहाय्यक.

**आर्थिक तरतूद :** आवर्तक रु. २०,०००
अनावर्तक रु. १०,०००

**अभिप्राय :** संग्रहालय पाहण्यास रोज सरासरी २० व वर्षांत ६,००० लोक येतात. प्रदर्शनवस्तु खरेदी करून व देणगीच्या द्वारें संपादन करण्यांत आल्या आहेत.

### (२) कुटीरोद्योग संग्रहालय

**स्थापना :** १९५५

**पूर्वेतिहास :** कुटीरोद्योग संग्रहालय गौहत्ती येथें राज्यातील प्राचीन कला व व्यवसाय जतन करून ठेवण्याकरितां सन १९५५ च्या सुरुवातीस स्थापन करण्यात आलें. साहित्य योग्य रीतीनें प्रदर्शित करण्याकरितां इमारत बांधण्यांत आली आहे व तिचा तळमजला वापरण्यासाठीं तयार झालेला असून त्यासाठीं रु. १,४१,००० इतका खर्च आला आहे.

**व्याप्ति व संग्रह :** राज्यातील निरनिराळ्या वर्गांतील व जमातींतील लोकांच्या कलाकृतींचे व व्यवसायनिर्मित वस्तूंचे वैशिष्टपूर्ण नमुने संग्रहित व खरेदी करण्यांत आले आहेत. व्यवसायवार व जमातीवार अधिक नमुने संग्रहित करण्याचें योजिलें आहे. तशाच प्रकारच्या वस्तु कुशल कारागिरां-मार्फत तयार करवून घेऊन त्या विक्रीला ठेवणें हा त्यामागील हेतु आहे

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय औद्योगिक विकास घडवून आणण्या-करितां स्थापन करण्यांत आलें आहे. आसपासच्या शिक्षणसंस्थातील विद्यार्थी व विशेषत गौहत्ती विद्यापीठाच्या मानवशास्त्रविभागाचे विद्यार्थी संग्रहालय पाहण्यास येतात व संग्रहालयातील वस्तुविषयीं त्यांना विशेष आस्था वाटते. तेथील वस्तुमुळें राज्याच्या कुटीरोद्योग विभागाच्या संशोधन व चित्ररेखन शाखेस आपल्या परंपरागत चित्ररेखन कलेसंबंधीं संशोधन करण्याची संधि मिळाली आहे. प्रदर्शनवस्तूंना लावलेल्या चिठ्ठ्या सध्या इंग्रजी भाषेत आहेत. परंतु यापुढें लवकरच त्या इंग्रजी व आसामी या दोन भाषांमध्यें लावण्याची सोय करण्यात येईल.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं

**कामाचे तास :** शनिवारीं दुपारीं, रविवार व इतर सरकारी सुटीचे दिवस खेरीजकरून रोज सकाळीं १० ते संध्याकाळीं ४ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय आसाम सरकारच्या कुटीरोद्योग विभागाच्या नियंत्रणाखालीं आहे.

**सेवकवर्ग :** प्रभारी अधिकारी–श्री. एन्. सी. दोवेरा, एम्. कॉम्., संग्रहालय साहाय्यक, कार्यालय साहाय्यक, शिपाई व दिवसपाळीचा चौकीदार.

**आर्थिक तरतूद :** रु. ३२,०००

अभिप्राय : हें संग्रहालय नवीनच बांधलेल्या स्वतःच्या इमारतींत असून तेथें सहज जातां येतें. प्रेक्षकांची रोजची सरासरी संख्या ४० इतकी असून वार्षिक संख्या सुमारें १५,००० इतकी आहे. बोहाग बिहु (आसामी नववर्ष-दिनोत्सव), दुर्गापूजा यांसारख्या सणाच्या विशेष प्रसंगीं व माघ महिन्यांत प्रेक्षकांची संख्या बरीच मोठी असते. खरेदी करून व भेट स्वीकारून प्रदर्शन-वस्तु संपादन करण्यांत येतात.

## मुंबई

**अहमदाबाद :** लोकसंख्या ७,८८,३३३

### कॅलिको वस्त्र संग्रहालय

**स्थापना :** १९४९

**पूर्वेतिहास :** कॅलिको वस्त्रसंग्रहालय श्री. गौतम साराभाई यांनीं सन १९४९ मध्यें स्थापन केलें. हें एका सुंदर इमारतींत असून त्यांतील साहित्याची सुरेख मांडणी करण्यांत आली आहे. भारतीय वस्त्रकलेंतील आधुनिक चित्ररेखनावर (डिझाइन्स) भर देण्यांत आला आहे.

**व्याप्ति व संग्रह :** यांतील संग्रह, वस्त्रें व भारतीय पोशाख यांपुरताच मर्यादित आहे. ह्या संग्रहालयांत भारतातील आर्थिक व तंत्रशास्त्रीय परिस्थितीचें व यांत्रिक मागाच्या हस्तव्यवसायाच्या संभाव्यतेचें स्पष्ट चित्र दिसतें. कापूस, लिनन, लोकर, रेशीम, नायलॉन यांसारखा कच्चा माल, तसेंच त्यावर प्रक्रिया करणें, त्यांचें सूत कातणें व तें विणणें या सर्व गोष्टी यांत असून कातण्याची व विणण्याची आदिमानवानें अवलंबिलेली पद्धत व आधुनिक पद्धत, तसेंच यंत्रमाग यांची उत्क्रान्ति निरनिराळ्या अवस्थांमधून कशी होत गेली हें फारच परिणामकारक रीतीनें प्रदर्शित करण्यांत आलें आहे.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयांत एक उपयुक्त असें ग्रंथालय असून तें सर्व लोकांसाठी खुलें असतें. संग्रहालयांतील साहित्यविषयींची माहिती शाळेंतील विद्यार्थ्यांना व इतर प्रेक्षकांना देण्यांत येते. दिव्याच्या साहाय्यानें दाखवावयाच्या कांचचित्रांचा संग्रह आहे. पूर्वीच्या ऐतिहासिक काळापासून तों आजतागायत वस्त्रनिर्मितीच्या ज्या कलेंत भारत अतिशय श्रेष्ठ आहे त्या कलेच्या उत्पादनाच्या सर्व अवस्था, पारंपरिक व तसेंच आधुनिक यंत्रसाहाय्य उत्पादनपद्धति सुंदर व परिणामकारक रीतीनें प्रदर्शित करण्यांत आलेल्या असल्यामुळें जनतेला शिक्षण देणारें संग्रहालय कसें असावें त्याचा हा आदर्श आहे. वस्तूंना लावलेल्या चिठ्ठ्या हिंदी व इंग्रजी अशा दोन भाषांत आहेत. नकाशे, तक्ते, प्रतिकृती वगैरे साधनांचा उपयोग केला जातो व त्यापासून बराच फायदा होतो. अगदी जवळच्या शिक्षणसंस्था या संग्रहाविषयीं अतिशय जिज्ञासा दाखवितात.

**प्रकाशनें :** (१) जर्नल ऑफ टेक्स्टाईल हिस्टरी.
(२) परिचय पुस्तिका.

**कामाचे तास :** सोमवारखेरीज रोज संध्याकाळीं ५ ते ६ वाजेपर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** कॅलिको मिल्सचे संचालक.

**सेवकवर्ग :** संग्रहालयासाठीं स्वतंत्र अधिकारी नाहीं असें दिसतें.

**आर्थिक तरतूद :** माहित नाहीं. संग्रहालयासाठीं वस्तु खरेदी करण्यासाठीं मंजूर होणारी रक्कम प्रत्येक वर्षी बदलते.

**अभिप्राय :** हें संग्रहालय अहमदाबाद येथें योग्य ठिकाणीं ठेवण्यांत आलें असून त्याच्या इमारतीची आखणी श्री. गौतम साराभाई यांनीं इतर देशांतील अत्यंत प्रगतिशील अशा संग्रहालयांच्या धर्तीवर केलेली आहे. वातानुकूलनाची यंत्रसामग्री असलेलें तसेंच सूर्यप्रकाशापासून अलिप्त अशी संपूर्ण कृत्रिम प्रकाशयोजना असलेलें भारतांतील हें पहिलेंच संग्रहालय आहे. कारण सूर्यप्रकाश ऋतुमानाप्रमाणें बदलतो, एवढेंच नव्हे, तर त्यामुळें कापडाचा रंगहि जातो. संग्रहालयाच्या अभ्यासाठीं प्रयोगशाळेची सोय उपलब्ध आहे. संग्रहालयाला भेट देणाऱ्या प्रेक्षकांसाठीं बसण्याची जागा, दिवे, पंखे वगैरे सोयी केलेल्या आहेत. हें संग्रहालय इतर संग्रहालयांबरोबर संग्रहित साहित्याची अदलाबदल करण्यास आणि त्यांच्याकडून उसनवारीच्या तत्त्वावर साहित्य आणण्यास उत्तेजन देतें. येथील संग्रह मुख्यत: वस्तु खरेदी करून, भेटीदाखल स्वीकारून किंवा अदलाबदलीच्या तत्त्वावर वस्तु आणवून करण्यांत आलेला आहे. हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघ या संस्थेचें सदस्य आहे.

**पुणें :** लोकसंख्या ४,८०,९८२

### लॉर्ड रे महाराष्ट्र औद्योगिक संग्रहालय

**स्थापना :** १८८८

**पूर्वेतिहास :** सन १८८८ मध्यें पुण्यास भारतीय कला व भारतांत उत्पादन केलेल्या वस्तु यांचें प्रदर्शन भरलें होतें. त्यांतूनच या संग्रहालयाची स्थापना करण्यांत आली. या संग्रहालयाचा पायाभरणी समारंभ मुंबईचे गव्हर्नर हिज एक्सलन्सी लॉर्ड रे यांच्या हस्तें १८९० सालीं झाला. १९२९ सालीं पुणें शहर नगरपालिकेनें या संग्रहालयाचें पुनरुज्जीवन व पुनर्रचना केली. नंतर हें संग्रहालय भारत सरकारच्या पेटंट्‌सचें केंद्र बनलें. सन १९३३, १९३५, १९३७ व १९३९ मध्यें या संग्रहालयांत चार भव्य प्रदर्शनें भरली होतीं. सन १९३९-४० मध्यें या संग्रहालयाला सरकारी साहाय्यक अनुदानासाठीं मान्यता मिळाली. मुंबई सरकारनें सन १९४७ चा अधिनियम ३२ हा कायदा केल्यापासून हें संग्रहालय संस्थापित मंडळ झालें. कारण या अधिनियमांत सरकारमार्फत या संस्थेची व्यवस्था व विकास करण्यासंबंधीं तरतूद केलेली आहे. या संग्रहालयाच्या कृषि व वनसंवर्धन विभागांत पेटंट्‌स् व शोध लावलेल्या गोष्टी दाखविण्यासाठीं ठेवलेल्या आहेत.

**व्याप्ति व संग्रह :** हें संग्रहालय मुख्यतः औद्योगिक संग्रहालय असून त्याच्याद्वारें कृषि, वनसंवर्धन, शिक्षण, विज्ञान व उद्योगधंद्याच्या निरनिराळ्या बाबी या विषयांच्या आर्थिक व औद्योगिक महत्त्वाचें व्यापक प्रमाणांत ज्ञान करून देण्यांत येतें. ही संस्था सर्वस्वीं शैक्षणिक संस्था असून शालेय विद्यार्थ्यांच्या शिक्षणावर तिनें आपले सर्व प्रयत्न केंद्रित केले आहेत. संग्रहालयातर्फे आंतरप्रांतीय व खास प्रदर्शनें भरविण्यांत येतात. संग्रहालयानें विक्रयालय स्थापन केलें असून तें भारतांतील सुप्रसिद्ध कला, व्यवसाय व कुटीरोद्योग यांना वाहिलेलें आहे. संग्रहालयानें वनसंवर्धन संग्रहालय व कृषि संग्रहालय स्थापन केलें असून एक तांत्रिक व औद्योगिक ग्रंथालय स्थापन केलें आहे.

**शैक्षणिक कार्य :** या संग्रहालयाला एक तांत्रिक व औद्योगिक ग्रंथालय जोडलेलें असून तें जनतेसाठीं खुलें आहे. तेथें एक फिरता विभाग आहे. त्याचा नकाशे, तक्ते व प्रदर्शनीय छायाचित्रसाहित्य वगैरेंचा संग्रह

साठे विपुल असून संग्रहातील वस्तु उसनवारीच्या तत्त्वावर शाळांना व इतर संस्थांना पाठविण्यात येतात ग्रंथालयात ७,२८५ पुस्तकें व २५५ नियतकालिकें असून जगातील सर्व देशांना विनंति करून पुस्तकें मिळविण्यात येतात. संग्रहालयात एक खास उपविभाग असून तो भारतीय पेटंट्स् व ट्रेड मार्क्स यांना वाहिलेला आहे संग्रहालयाचें शैक्षणिक कार्य विस्तृत असून त्याच्या सेवकवर्गात सहा सदस्य आहेत त्यांचें मुख्य काम म्हणजे शाळांना संग्रहालयाचें साहाय्य देणें हें होय शिशु संग्रहालय म्हणून या संग्रहालयाची गणना करता येईल या संग्रहालयाचा संदेश दरवर्षी या ना त्या स्वरूपात ३०,००० हून अधिक विद्यार्थ्यांना पोहोंचविण्यात येतो संग्रहालयाचा एक शैक्षणिक संघ असून शाळा या संघाच्या सदस्य झालेल्या आहेत संग्रहालय त्यांना साह्य करतें संग्रहालयात 'संग्रहालयाची शाळेस भेट' या नांवाचा एक कार्यक्रम सुरू केला असून प्रदर्शनीय साहित्य व दर्शनीय वस्तु व प्रदर्शन पेट्या नियमित पणें शाळांकडे पाठविण्यात येतात दाखविण्यात येणाऱ्या साहित्यात वेळोवेळीं बदल करण्यात येतो संग्रहालयातर्फे मुलांसाठीं शैक्षणिक कार्यक्रम ठेवण्यात येतात

शैक्षणिक सहली देखील काढल्या जातात संग्रहालयात एक सुसज्ज सभागृह असून चित्रपट दाखविण्यासाठीं एक प्रक्षेपकयंत्र सुद्धा आहे काचचित्रें, चित्रें व छोटे चित्रपट दाखविण्याची संपूर्ण सामग्री असून आठवड्यातून एकदा किंवा दोनदा वर्गांना प्रयोग करून दाखविण्यात येतात या व्याख्यानां बरोबरच प्रत्यक्ष निरीक्षणासाठीं प्रदर्शनेंहि असतात संग्रहालयानें भरविलेल्या काहीं खास प्रदर्शनांत पुढील प्रदर्शनें उल्लेखनीय वाटतात (१) कृत्रिम फुलें, (२) पेटंट आणि शोध, (३) शालेय विद्यार्थी आणि त्यांचीं उपकरणें, (४) आंतरराष्ट्रीय ग्रंथप्रदर्शन, (५) वन्यपशु, (६) रबर, (७) खनिज द्रव्यें आणि (८) सिसाल नांवाच्या धाग्याचीं ५० वर्षें

**प्रकाशनें :** संग्रहालयानें खालील विषयांवर मराठींतून पुस्तिका प्रसिद्ध केल्या आहेत – (१) रेशीम, (२) सिसाल धागा आणि (३) रबर

**कामाचे तास :** दर बुधवारीं आणि प्रजासत्ताक दिन, स्वातंत्र्यदिन, अनंत चतुर्दशी आणि धूलीवंदन या दिवसांखेरीज इतर सर्व दिवशीं संग्रहालय सकाळीं ९ ते ६ पर्यंत उघडें असतें

**प्रवेश :** विनामूल्य

**नियामक मंडळ :** संस्थेच्या देखरेखीसाठीं व विकासासाठीं मुंबई सरकारनें केलेल्या १९४७ च्या ३२ व्या अधिनियमानुसार संग्रहालयाची व्यवस्था एका विश्वस्त मंडळाकडे आहे

**सेवकवर्ग :** प्रशासकीय विभाग–संग्रहालयाध्यक्ष–श्री जी बी सरदेसाई, बी एससी (ऑनर्स), बी एससी (टेक केम), सहाय्यक संग्रहालयाध्यक्ष–श्री पी जी कासीकर, डी कॉम्, (आय एम, सी), चिटणीस, देखरेख करणारा, कारकून, तीन शिपाई, माळी

**संग्रहालय शिक्षणविभाग** – व्याख्याता, कारकून आणि शिपाई

**ग्रंथालय** – ग्रंथालयाध्यक्ष तथा व्याख्याता आणि शिपाई

**कृषि आणि वनशास्त्रविभाग** – व्याख्याता, शिपाई आणि माळी

**कलात्मक आणि हस्तकलेच्या वस्तूंचें भांडार** – सहाय्यक व्यवस्थापक, दोन विक्रेते आणि दोन शिपाई

**आर्थिक तरतूद :** अर्थसंकल्प ४६,५१० रुपयांचा आहे संग्रहालयाला मुंबई सरकार, पुणें महानगरपालिका, मराठा चेंबर ऑफ कॉमर्स ॲण्ड इन्डस्ट्रीज आणि डेक्कन ॲग्रिकल्चरल असोसिएशन यांचेकडून सहाय्यक अनुदान व वर्गण्या मिळतात

**अभिप्राय :** हें संग्रहालय पुणें येथें अत्यंत सोयीस्कर ठिकाणीं असून सार्वजनिक जनता तसेंच शैक्षणिक संस्था त्यापासून शक्य तेवढा फायदा करून घेतात दररोज सरासरी १६५ व गटागटानें येणारे विद्यार्थी धरून वर्षांतून ६१,००० पेक्षा अधिक प्रेक्षक संग्रहालय पहावयास येतात नित्याचें काम म्हणून एक मार्गदर्शक प्रेक्षकांना गटश संग्रहालयाची माहिती देतो शालेय विद्यार्थी गटागटानं वाढत्या प्रमाणांत संग्रहालय पहावयास येतात संग्रहालयाच्या आवारात किंवा वेगवेगळ्या शाळांमध्यें संग्रहालयातर्फे चित्रपट दाखविले जातात व प्रदर्शनें भरविलीं जातात तसेंच शिक्षक वर्गाला संग्रहालयाबाबतचें प्राथमिक शिक्षण देण्याकरितां संग्रहालयातर्फे एक वर्गहि चालविला जातो सध्याची इमारत फारच अपुरी असल्यामुळें संग्रहालयाची बरीच गैरसोय होते पुणें महानगरपालिकेनें संग्रहालयाच्या नियोजित इमारतीसाठीं १½ एकर क्षेत्रफळाची जागा दिलेली असून इमारतीसंबंधीचे नकाशे तयार केले जात आहेत संग्रहालयात कोणत्याहि मौल्यवान् वस्तु नसल्या तरी देखरेख व पहाऱ्याची तरतूद केलेली आहे तांत्रिक आणि औद्योगिक ग्रंथालय हें या संग्रहालयाचें एक अत्यंत महत्त्वाचें अंग असून तें सर्वसाधारण जनतेसाठीं खुलें असतें या संग्रहालयाचा एक फिरता विभाग देखील आहे संग्रहालयाचे नकाशे, तक्ते आणि छाया चित्रणाची सामग्री शाळा व इतर शैक्षणिक संस्थांना उसनवारीनें दिली जाते ग्रंथालयाच्या एका विभागात भारतीय पेटंट आणि व्यापार चिन्हें ठेवलेलीं आहेत संग्रहालयातील वस्तूंच्या नांवाच्या चिठ्ठ्या मराठींत छापल्या आहेत नकाशे, नमुने, छायाचित्रें, तक्ते इत्यादींचा सढळ उपयोग केला जातो हें संग्रहालय भारतीय संग्रहालय संघाचें सदस्य आहे संग्रहालयाच्या भावी योजनेच्या उद्दिष्टप्रमाणें एक औद्योगिक विभाग, तांत्रिक आणि औद्योगिक ग्रंथालय, विक्रयालय, व्यापारी नमुन्याकरितां एक संग्रहालय, कला व हस्तकलेच्या वस्तूंसाठीं विभाग, वनशास्त्रविषयक तसेंच कृषिविषयक संग्रहालय, प्रयोगशाळा, आधुनिक उद्योगधंद्याचा एक विभाग, प्रायोगिक कारखाना (वर्कशॉप), उद्योगधंद्यातील निर्मितीच्या प्रक्रिया दाखविणारा एक विभाग, आणि संग्रहालयाद्वारें शिक्षण देणारा एक विभाग निर्माण करण्याचें ठरविलें आहे

## दिल्ली

**नवी दिल्ली** लोकसंख्या २,७६,३१५

### हस्तकला संग्रहालय

**स्थापना :** १९५२

**पूर्वेतिहास :** भारतीय हस्तकलांना प्रोत्साहन मिळावें, पुरातन हस्त शिल्पांचें जतन करावें व त्यायोगें भारतीय संस्कृतीच्या या अंगाचा विकास घडवून आणावा या उद्देशानें १९५२ मध्यें या संग्रहालयाची स्थापना करण्यांत आली असून त्याचा कारभार, वाणिज्य व उद्योग मंत्रालयाच्या मार्गदर्शनाखालीं अखिल भारतीय हस्तकला मंडळाकडून पाहिला जातो लवकरच एखादी जागा मिळवून तेथें संग्रहालयाची इमारत बांधण्याचा विचार आहे सध्या संग्रहालय थापर हाऊसमध्यें तात्पुरतें ठेवलें असून सर्वसामान्य जनतेला तेथें अजून प्रवेश दिला जात नाहीं

**व्याप्ति आणि संग्रह :** जुनी पत्रें, धातूंची भांडी, टोपल्या वगैरे, लाकूड, हस्तिदंत व दगडावरील काम, जवाहीर, चामड्याच्या वस्तु आणि खेळणी इत्यादि भारतीय हस्तकलेच्या वस्तु.

**शैक्षणिक कार्य :** हें संग्रहालय अजून बाल्यावस्थेंतच आहे.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं.

**कामाचे तास :** कामाच्या सर्व दिवशीं संग्रहालय सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** अजूनपर्यंत जनतेला संग्रहालयांत प्रवेश दिला जात नाहीं.

**नियामक मंडळ :** हें संग्रहालय अखिल भारतीय हस्तकला मंडळाच्या अधिकाराखालीं आहे.

**सेवकवर्ग :** संचालक ( हे अजून कायमचे नेमले गेले नाहींत ), स्टोअर सुपरवायझर, वस्तु-रक्षण विभागाकरितां चार सहाय्यक, दोन चौकीदार.

**आर्थिक तरतूद :** रु. १,२०,०००.

**अभिप्राय :** खरेदी, देणग्या आणि देवाणघेवाण या मार्गांनीं जमविलेल्या प्रदर्शनवस्तु सध्यां तशाच ठेवल्या आहेत. नवी इमारत बांधून होतांच त्यांची योग्य मांडणी करतां येईल.

## केरळ

**त्रिवेंद्रम् :** लोकसंख्या १,८६,९११

### श्री मूलम् षष्ठ्यब्दिपूर्ति स्मारक संस्था संग्रहालय ( कुटीरोद्योगाच्या वस्तूंचें वाणिज्यिक व औद्योगिक संग्रहालय )

**स्थापना :** १९२७

**पूर्वेतिहास :** त्रावणकोरचे महाराज कै. मूलम् तिरुनाल यांची षष्ठ्यब्दिपूर्ति साजरी करण्याच्या उद्देशानें त्रिवेंद्रम्च्या नागरिकांनीं हें संग्रहालय स्थापन केलें. या संग्रहालयाचा कोनशिला समारंभ १९२१ मध्यें झाला आणि १९२७ मध्यें संग्रहालयाचें प्रत्यक्ष उद्घाटन झालें. संग्रहालयाचा उपयोग उद्योग आणि वाणिज्य संग्रहालय व ब्यूरो म्हणून केला जातो. येथें स्थानिकरीत्या बनविलेल्या वस्तु प्रदर्शनार्थ ठेवल्या असून त्या विकल्याहि जातात व त्यांची निर्मिति, किंमत आणि इतर उपयुक्त तपशिलासंबंधी माहिती पुरविली जाते. वर्गणीची रक्कम जवळजवळ एक लक्ष रुपयांची असून त्यापैकीं अर्धी रक्कम इमारत व लांकडी सामान यांत गुंतली आहे. उरलेल्या अर्ध्या रकमेपासून होणाऱ्या प्राप्तीतून संग्रहालयाच्या देखरेखीचा खर्च केला जातो.

**व्याप्ति आणि संग्रह :** संग्रहालयातील प्रदर्शनवस्तु कुटीरोद्योगाच्या वस्तु असून त्यांत मुख्यतः हस्तिदंत, लाकूड, केवडा, वेत यांपासून केलेल्या वस्तु, चाकू, कात्र्या वगैरे माल, कासें, कुफ्त गाडी, ताडपत्रें, नारळाची करवंटी, ताग यांपासून केलेल्या वस्तु, कलाबतूचें काम, हातानें बनविलेला कागद, मध वगैरे इत्यादि प्रकार आहेत.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयांत एक सुसज्ज ग्रंथालय असून जनतेला त्याचा वापर करतां येतो. संस्थेतर्फे विशेषेंकरून व्यापार आणि उद्योगविषयक नियतकालिकें व मासिकें मागविलीं जातात. ग्रंथालयांत एकूण ४१० पुस्तकें आहेत. प्रेक्षकांना वस्तूंची माहिती देण्याचें काम सेवकवर्गाकडे असतें. वस्तूंवरील नांवाच्या चिठ्या इंग्रजींत आहेत.

**प्रकाशनें :** कांहीं नाहीं.

**कामाचे तास :** रविवार आणि सुटीचे दिवस यांखेरीज संग्रहालय दररोज सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** सरकारनें नियुक्त केलेल्या एका व्यवस्थापकसमितीकडे संग्रहालयाचा कारभार सोंपविला आहे. या समितींत चार सरकारी व तीन बिनसरकारी सदस्य आहेत.

**सेवकवर्ग :** व्यवस्थापक, विक्रेता, कारकून, दोन शिपाई, रात्रपाळीचा पहारेकरी, दोन माळी आणि एक झाडूवाली.

**आर्थिक तरतूद :** संग्रहालयाचा वार्षिक अर्थसंकल्प १०,०९१ रु. चा आहे. यापैकीं कांहीं रक्कम, धर्मादाय रकमेच्या खजीनदाराकडे सोंपविलेल्या व भारत सरकारच्या कर्जांत गुंतविलेल्या रकमेच्या व्याजाच्या रूपानें आणि बऱ्याच मोठ्या प्रमाणांत संस्थेनें बनविलेल्या औद्योगिक मालाच्या जास्तींत जास्त विक्रीपासून मिळते.

**अभिप्राय :** संग्रहालय सचिवालयाच्या इमारतीच्या अगदीं जवळ असून संस्थेला भेट देणाऱ्या प्रेक्षकांची संख्या बरीच मोठी आहे. संग्रहाल्यांतील वस्तु वस्तुनिर्मात्यांकडून केलेल्या खरेदी व प्रदर्शकांकडून मिळालेल्या देणग्या या मार्गांनीं जमविल्या जातात.

## मद्रास

**मद्रास :** लोकसंख्या १४,१६,०५६

### मध्यवर्ती औद्योगिक संग्रहालय

**स्थापना :** १९४०

**पूर्वेतिहास :** भारतीय उद्योगधंद्यांची वाढ व्हावी या हेतूनें मद्रास उद्योग संचालनें एका मध्यवर्ती औद्योगिक संग्रहालयाची स्थापना केली आणि त्याच दृष्टीनें त्याची व्यवस्था ठेवली जात आहे. औद्योगिक कलात्मक वस्तूंचे उत्पादक आणि ग्राहक यांच्या दृष्टीनें हें संग्रहालय फार उपयुक्त व लोकप्रिय ठरलें आहे. या संग्रहालयास औद्योगिक आणि व्यापारविषयक संस्थांच्या सहकार्याचा लाभ मिळतो. तसेंच त्याला केंद्रीय आणि राज्य सरकारांचाहि आश्रय लाभलेला आहे.

**व्याप्ति आणि संग्रह :** या संग्रहालयांत लहान प्रमाणावरील कुटीरोद्योग व सहकारी उद्योगाच्या वस्तूंचा प्रातिनिधिक संग्रह प्रदर्शनार्थ ठेवला आहे. मद्रास राज्यांतील खनिज संपत्ति आणि शेतकी उत्पादन यासंबंधीची संपूर्ण माहिती, तसेंच राज्याच्या औद्योगिक प्रगतीसंबंधींचें स्पष्ट चित्र येथील संग्रहालयावरून प्रत्ययास येतें.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयांत एक व्यापारविषयक ग्रंथालय असून त्याला जोडूनच वाचनालयें काढलेलीं आहेत. हीं वाचनालयें वाचकांकरितां खुलीं असतात. संग्रहालय व ग्रंथालय हीं शैक्षणिक दृष्ट्या महत्त्वाचीं असल्यामुळें तेथें येणाऱ्या प्रेक्षकांची संख्या बरीच मोठी असते. लहान प्रमाणावरील

उद्योगधंद्यात राष्ट्रीय संपत्ति किती असते हें जनतेला समजावून देण्यासाठीं गृहोद्योगांना प्रोत्साहन व चालना देण्याबाबत संग्रहालयानें महत्त्वाची कामगिरी बजावली आहे.

**प्रकाशनें :** नाहींत.

**कामाचे तास :** रविवार व सरकारी सुट्या यांखेरीज संग्रहालय दररोज सकाळीं १० ते संध्याकाळीं ५ पर्यंत उघडें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** संग्रहालयावर व्यवस्थापक मंडळाचें नियंत्रण असून त्यात संचालक, उद्योग व वाणिज्य विभाग, इंजिनियर सहकारी संस्था, मद्रासचे महापौर आणि इतर यांचा समावेश होतो.

**सेवकवर्ग :** अवैतनिक चिटणीस–श्री. एन्. वेणुगोपाल नायगर, बी. ए., बी. एड्., कारकून, शिपाई वगैरे.

**आर्थिक तरतूद :** याबद्दलची माहिती नाहीं.

**अभिप्राय :** मर्यादित साधनांच्या मदतीनें बनविण्यांत आलेल्या वस्तु संग्रहालयात ठेवल्या जातात. या गृहोद्योगनिर्मित वस्तु लोकप्रिय करून संग्रहालयानें कित्येक लोकांना आपलें निर्मितिकौशल्य दाखविण्याची संधि मिळवून दिली व त्यांना कामधंदा मिळवून दिला. संग्रहालय बघावयास सर्व भारतातून तसेंच परदेशांतूनहि प्रवासी लोक येतात. संग्रहालय मध्यवर्ती ठिकाणीं असल्यामुळें तेथें जनतेला सहज जातां येतें.

## ( २ ) व्हिक्टोरिया तांत्रिक संस्था

**स्थापना :** १८९०

**पूर्वेतिहास :** १८८७ मध्यें राणी व्हिक्टोरियाची ज्युबिली साजरी करण्याकरिता गोळा केलेल्या सार्वजनिक देणग्या तसेंच स्थानिक सरकारनें दिलेली अनुदानें यांच्या साहाय्यानें हें संग्रहालय १८९० मध्यें स्थापन करण्यांत आलें.

**व्याप्ति व संग्रह :** येथें ठेवण्यांत आलेल्या मुख्य वस्तूंमध्यें लाकडावरील कोरीव काम, हस्तिदंताच्या आकृति, वेतकाम, चंदनी लाकडाच्या कोरीव वस्तु, पेट्या आणि इतर आकृति, धातूंच्या वस्तु, लाल व नरम लाकडावरील कोरीव काम, हस्तिदंतावरील जाळीकाम, कापडावरील काम व भरतकाम, तसेंच कोठ व भरतकाम, तंजावर व त्रिचनापल्ली येथील पितळ, चांदी आणि तांब्याचें काम, गवताच्या चटया, खेळणी, चिनीमातीची भांडी वगैरे यांचा समावेश होतो. हें व्यापारविषयक संग्रहालय असल्यामुळें येथें प्रदर्शित वस्तूंच्या किंमतीची यादी ठेवलेली आहे.

**शैक्षणिक कार्य :** धनकोटी मुदलियार यांचें ग्रंथालय या संस्थेच्या ताब्यांत असून त्यांतील बहुसंख्य पुस्तकें कला, हस्तकला व ललितकला यासंबंधींची आहेत. हा ग्रंथसंग्रह विश्वविद्यालय, तसेंच कॉनेमारा सार्वजनिक वाचनालयामध्यें ठेवलेला असून तेथें सर्वसामान्य जनतेला त्याचा लाभ घेतां येतो.

सर टी. माधवराव यांच्या नांवानें एक व विल्यम बोल्ट यांच्या नांवानें एक अशा दोन निधींचा कारभार या संस्थेकडून पाहिला जातो. मद्रास येथील कला व हस्तकला विद्यालयांतील भिन्नभिन्न कला व हस्तकलाविद्यांत विशेष प्राविण्य मिळविणाऱ्या विद्यार्थ्यांना ही संस्था बहुधा प्रत्येकी १५ रुपये प्रमाणें अनेक शिष्यवृत्त्या देते. संस्थेच्या सदस्यांना देशांतल्या कला व हस्तकला केंद्रांना भेटी देऊन, कलात्मक वस्तुनिर्मितीचा दर्जा व प्रमाण कसें वाढवितां येईल यासंबंधीच्या स्वतःच्या अनुभवांचा फायदा इतर लोकांना मिळवून देतां यावा म्हणून एक प्रवास-खर्चनिधि ठेवला आहे. व्हिक्टोरिया टेक्निकल इन्स्टिट्यूट ही संस्था संग्रहित केलेल्या वस्तूंची वनरोड मद्रास म्हणजे यासारख्या स्थानिक प्रदर्शनातून भाग घेते.

**प्रकाशनें :** वस्तूंच्या किंमतींची यादी विक्रीकरितां ठेवलेली आहे.

**कामाचे तास :** संग्रहालय, शनिवारखेरीज इतर दिवशीं सकाळीं ९ ते १ व दुपारीं २ ते ५–३० आणि शनिवारीं सकाळीं ९ ते १ खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** सरकारद्वारें निवडलेल्या व नामनिर्दिष्ट केलेल्या मंडळाकडे संस्थेचा कारभार सोंपविलेला आहे. मद्रास सरकारचे मुख्य सचिव हे मंडळाचे अध्यक्ष आहेत.

**सेवकवर्ग :** अवकालिक चिटणीस–श्री. के. ए. सिद्दिक, अवैतनिक महिला चिटणीस, अधीक्षक, विशेष श्रेणीचे तीन हिशेबनीस, सहाय्यक अधीक्षक, व्यवस्थापिका, पहिल्या श्रेणीतील सहा कारकून, दुसऱ्या श्रेणीतील आठ कारकून आणि विक्रेता, दोन सुतार, दहा शिपाई आणि एक रात्रपाळीचा पहारेकरी.

**आर्थिक तरतूद :** वार्षिक तरतूद सुमारें ६०,००० रुपयांची आहे.

**अभिप्राय :** व्हिक्टोरिया टेक्निकल इन्स्टिट्यूट या संस्थेची प्रशस्त आणि सुंदर इमारत सध्या मद्रास संग्रहालयाला जोडून असलेल्या राष्ट्रीय कला-प्रदर्शन-विभागाला देण्यात आल्यामुळें ही संस्था एका भाड्याच्या इमारतीत ठेवण्यात आली आहे. ही इमारत अगदी अपुरी आहे. स्वतःची इमारत असावी या विचारानें व्हिक्टोरिया टेक्निकल इन्स्टिट्यूटनें माउंट रोडवर मेसर्स स्पेन्सर आणि कंपनी, लिमिटेडच्या शेजारी १४ गुंठे प्लॉटसु विकत घेतले असून लवकरच इमारतीचें काम सुरू होईल. ही संस्था शहरातल्या एका प्रमुख बाजारपेठेत असल्यामुळें मद्रासला येणारे परदेशी देशी प्रवासी संस्थेच्या इमारतीस भेट देतात. दररोज सुमारें १०० प्रेक्षक संस्थेला भेट देतात. संस्थेसाठीं रात्रपाळीचे चार पहारेकरी असून चोरी किंवा आगीचा धोका टाळण्याकरितां प्रदर्शित-वस्तूंचा विमा उतरविलेला आहे. कला आणि हस्तकलेच्या अनेक वस्तूंखेरीज भिन्नभिन्न चित्रकारांची रंगचित्रें, तसेंच शहरांतील व दक्षिण भारतांतील कित्येक प्रसिद्ध स्थळांचीं छायाचित्रें संस्थेत विक्रीस ठेवण्यांत आलीं आहेत.

## राजस्थान

**पिलानी :** लोकसंख्या ११,११४

### मध्यवर्ती संग्रहालय

**स्थापना :** १९५६

**पूर्वेतिहास :** या संग्रहालयाच्या स्थापनेचें सारें श्रेय श्री. घनश्यामदास बिर्ला यांच्या औदार्यालाच द्यावें लागेल. त्यांनी पिलानीतील आपल्या शैक्षणिक कार्याचाच एक महत्त्वाचा भाग म्हणून या संग्रहालयाची स्थापना केली. संग्रहालय स्थापन होऊन आतां चार वर्षे झालीं असून तेवढ्या काळात एक उपयुक्त शैक्षणिक संस्था म्हणून संग्रहालयास प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे.

सर्वसाधारण जनतेला वैज्ञानिक दृष्टिकोन प्राप्त करून देण्याकरितां यांत्रिक व वैज्ञानिक संग्रहालयें स्थापन करण्याच्या योजनेंत ह्या संग्रहालयानें एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान मिळविलें आहे. तरुण व सुशिक्षित स्त्रीपुरुषांना औद्योगिक क्षेत्रांतील चमत्कृतींना आभासचित्रांच्या सहाय्यानें नीट परिचय घडवून देऊन त्यांना वेगवेगळ्या उद्योगधंद्यांची कार्यपद्धति समजण्यास मदत व्हावी असा संग्रहालयाचा प्रयत्न आहे.

**व्याप्ति आणि संग्रह :** संग्रहालयासाठी एका नव्या इमारतीचें बांधकाम सुरू असून त्यांत चार मोठे दिवाणखाने, एक मधला माळा, तळें व बगीचा यांसहित एक मध्यवर्ती सभागृह, मोठ्या प्रमाणावर खोळंबा सांठवून ठेवण्याकरितां एक तळमजला, तसेंच कारभारासाठीं व कारखान्यासाठीं एक विभाग राहील. ह्या ठिकाणीं शेतकीव्यवसायापासून सुरुवात करून नंतर सुती कापड, रासायनिक उद्योग व खनिज उद्योग यांसारखे भारतांतील प्रमुख उद्योगधंदे समाविष्ट करून व शेवटीं यंत्रविषयक उद्योगधंदे आणि वाहतूक विभाग सुरू करण्यांत येतील. त्याचप्रमाणें ज्या विविध प्रदर्शन-वस्तु लघुकृतींच्या किंवा नमुन्यांच्या स्वरूपांत प्रदर्शित करण्यांत येतील, त्यांत विजेवर चालणाऱ्या रेल्वेची संपूर्ण रचना, पाण्यापासून वीजनिर्मिति दाखविणारें जल-विद्युत् यंत्र, एक अणुयंत्र आणि भिन्न भिन्न उद्योगधंदे व यांत काम करणारे स्त्रीपुरुष यांचीं जिवंत वाटणारीं आभासचित्रें राहतील.

प्रत्येक प्रदर्शनवस्तु स्वतंत्रपणें घडविण्यांत आली असून तिचें अत्यंत चमत्कृतिपूर्ण प्रदर्शन करण्यांत आलें आहे. त्यांच्या प्रदर्शनाच्या पद्धतींत फेरफार केला जातो. प्रत्येक प्रदर्शनवस्तु साध्या, सुबोध व सुसंगत रीतीनें आपली जीवनकथा निवेदन करूं शकेल अशा रीतीनें तिची मांडणी केली आहे. प्रेक्षकांचें कुतूहल वाढावें म्हणून सजीव वाटणारीं प्रात्यक्षिकें, कळ दाबतांच होणाऱ्या हालचाली व अशाच प्रकारच्या इतर नाविन्यपूर्ण गोष्टी येथें ठेवलेल्या आहेत.

**शैक्षणिक कार्य :** तंत्रकलेची प्रगति किती प्रचंड प्रमाणावर झाली आहे याची नवी आणि सखोल जाणीव तरुण पिढीला करून यावी असा ह्या संग्रहालयाचा उद्देश आहे. हें एक विश्वविद्यालयाच्या स्वरूपाचेंच संग्रहालय असून बिर्ला शैक्षणिक ट्रस्टखालील वेगवेगळ्या शैक्षणिक संस्थांना त्याचा उपयोग होतो.

येथें एकूण ३० नमुने, आभासचित्रें व इतर प्रदर्शनवस्तु असून त्यांच्याच जोडीला शैक्षणिक चित्रपट वगैरेंचा उपयोग केला जात असल्यामुळें वस्तूंबद्दलची माहिती मनोरंजक पद्धतीनें मिळवितां येते. संग्रहालयाच्या शेजारीच मध्यवर्ती ग्रंथालय नांवाचा एक विभाग असून त्याचाहि जनतेस लाभ घेतां येतो. सर्व वस्तूंना इंग्रजींतून नांवाच्या चिठ्ठ्या लावल्या आहेत.

**प्रकाशनें :** नाहींत.

**कामाचे तास :** संग्रहालय सोमवारखेरीज आठवड्याच्या सर्व दिवशीं सकाळीं ८ ते १२-३० व दुपारीं ३ ते ५ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** बिर्ला शिक्षण ट्रस्ट, पिलानी, या संस्थेच्या नियंत्रणाखालीं हें संग्रहालय आहे.

**सेवकवर्ग :** पूर्णकालिक कायम सेवकवर्ग : संग्रहालयाध्यक्ष—श्री. व्ही. पी. बेरी, कार्यालय सहाय्यक, देखरेख करणारा मदतनीस आणि शिपाई.

तात्पुरता सेवकवर्ग : इंजिनियर, दोन चित्रकार, सहाय्यक चित्रकार मेकॅनिक, सहाय्यक मेकॅनिक, १० सुतार आणि भांडाररक्षक.

**आर्थिक तरतूद :** आवर्तक रु. १०,०००
अनावर्तक रु. १,५०,०००

**अभिप्राय :** संग्रहालय शहराच्या मध्यवर्ती ठिकाणीं वसलेलें असल्यामुळें बहुसंख्य जनता त्याचा फायदा घेऊं शकते. दररोज सरासरी १०० व वर्षांतून सुमारें १०,००० प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात. उत्सवांच्या दिवसांत तर घटाघटानी येणाऱ्या प्रेक्षकांची बरीच गर्दी असते. संग्रहालयाची मांडणी अजून पूर्ण झाली नाहीं. इमारतीचें बांधकाम सुरू असून प्रदर्शनवस्तूंपैकीं सुमारें ९० टक्के वस्तु संग्रहालयाच्या कारखान्यांतच बनविल्या असल्यामुळें स्थानिक कलाकार व हस्तव्यवसाय करणाऱ्यांना त्यामुळें चांगलें प्रोत्साहन मिळतें. कांहीं थोड्या वस्तु खरेदी केल्या जातात. दिवसा व रात्रीं संग्रहालयावर पहाऱ्याची व्यवस्था असते.

## पश्चिम बंगाल

**कलकत्ता :** लोकसंख्या, २५,४८,६७७

### बिर्ला औद्योगिक आणि तंत्रशास्त्रविषयक संग्रहालय

**स्थापना :** १९५९

**पूर्वेतिहास :** कलकत्याला साजेसें असें औद्योगिक व तंत्रज्ञानविषयक संग्रहालय बिर्ला हाऊसमध्यें स्थापन करण्याकरितां बिर्ला हाऊसकडून मिळालेल्या उदार देणगीमुळेंच हें संग्रहालय अस्तित्वांत येऊं शकलें. तंत्रशास्त्रानें केलेली प्रगति, मानवाच्या कल्याणांतील तंत्रज्ञानाचा वांटा आणि भारतीय उद्योगधंद्यांना लागू केलेल्या तंत्रशास्त्राच्या आधुनिक पद्धति या तिन्ही गोष्टींचें सम्यक् दर्शन जनतेस घडविणें हा या संग्रहालयाचा उद्देश आहे. कांहीं वर्षेपर्यंत योजनेच्या अवस्थेंत असलेल्या या संग्रहालयाचें उद्घाटन २ मे १९५९ रोजीं वैज्ञानिक संशोधन आणि सांस्कृतिककार्य विभागाचे मंत्री प्रो. हुमायून कबीर यांच्या हस्तें झालें.

**व्याप्ति व संग्रह :** नुकत्याच उघडण्यांत आलेल्या येथील प्रदर्शन-विभागांत पुढील विषयांवरील वस्तुसंग्रह आहे : धातुशास्त्र, पेट्रोलियम, वीज, अणुविज्ञान, इलेक्ट्रॉनिक्स, दूरचित्रवाणी, दृष्टिशास्त्र आणि संकीर्ण विषय.

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालय नुकतेंच उघडलें असून प्रदर्शन विभागांची मांडणी चालू आहे. अजूनपर्यंत ग्रंथालयसुद्धां तयार झालेलें नाहीं. सध्यां असलेलीं थोडीशीं पुस्तकें व नियतकालिकें विभागाच्या उपयोगाकरितां असतात. प्रदर्शन विभागांतील नावाच्या चिठ्ठ्या इंग्रजींत असून त्या अर्थपूर्ण आहेत. तंत्रशास्त्र व भारतीय उद्योगधंदे यांत अलीकडे झालेल्या प्रगतीची माहिती मिळविण्याबाबत जनतेंत एक प्रकारचें औत्सुक्य निर्माण होईल अशी अपेक्षा आहे.

**प्रकाशनें :** नाहींत.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार एका योजना अधिकाऱ्याकडून पाहिला जातो व त्यावर वैज्ञानिक व औद्योगिक संशोधन मंडळाचें नियंत्रण असतें.

**सेवकवर्ग** . योजना अधिकारी–श्री ए घोस, विभाग अधिकारी, प्रदर्शन विभागातील सात प्रात्यक्षिककर्ते, सात प्रदर्शनविभाग सहाय्यक आणि पहारेकरी

**आर्थिक तरतूद** . अंदाजपत्रकातील वार्षिक तरतूद रु १७,००,००० इतकी असून कारखाना उभारणे आणि इमारतीची सुधारणा करणें ह्या गोष्टी त्यात अंतर्भूत आहेत

**अभिप्राय** : हें संग्रहालय ह्या महान् औद्योगिक शहरात सोयीस्कर ठिकाणीं वसलेलें असून सध्या त्याची इमारत अपुरीच आहे संग्रहालयातील वस्तु खरेदी, देणग्या व संग्रहालयाच्या कारखान्यांतील निर्मिति या मार्गांनी जमविल्या जातात

## ( २ ) हस्तकला संग्रहालय

**स्थापना** . १९५०

**पूर्वेतिहास** : संस्थेच्या वार्षिक पाहणीकरिता व प्रदर्शनाकरिता भारताच्या वेगवेगळ्या भागातून मागविण्यात आलेल्या हस्तकौशल्याच्या वस्तु जतन करून ठेवण्याची सोय व्हावी म्हणून १९५० मध्यें हस्तकला संग्रहालय अस्तित्वांत आलें पाचच वर्षांच्या कालावधीत या संग्रहालयांतील वस्तुसंग्रह बराच सुसंपन्न झाला तथापि, ह्या संग्रहालयातील वस्तूंचें यथायोग्य प्रदर्शन करणें केवळ १९५७ मध्येंच शक्य झालें आणि त्यादृष्टीनें हें संग्रहालय त्याच दिवसापासून खरेखुरें अस्तित्वांत आलें, असें म्हणावें लागेल

**व्याप्ति आणि संग्रह** . शिल्पकलागृहाच्या पहिल्या मजल्यावर संग्रहालय असून भारतीय कला आणि हस्तकलेच्या प्रातिनिधिक विविध वस्तूंचे प्रदर्शन विभाग येथें आहेत पश्चिमेकडील दालनात बाहुल्या आणि खेळणीं, रंगचित्रें आणि सुती कापड वगैरे असून पूर्वेकडील दालनात हस्तिदंती वस्तु, लाकडी आणि धातूच्या वस्तु, लाल मातीच्या वस्तु आणि जडजवाहीर आहे मुख्य दिवाणखान्यात राजस्थानच्या पारंपरिक शैलींतील व बंगाल व ओरिसा येथील ग्रामीण शैलींतील रंगचित्रें आहेत उदाहरणार्थ, बाकुरा येथील जदूपथ आणि कालीघाटची पटवा पद्धतीचीं रंगचित्र खास वस्त्रप्रावरणाकरिता असलेल्या दिवाणखान्यात भारतीय वस्त्रप्रावरणांची संपन्नता नानाविध प्रकारानी प्रदर्शित केली आहे एक मोठा भरतकाम केलेला चंबा रुमाल विशेष उल्लेखनीय आहे बालुचार साड्या, मच्छलीपट्टमच्या चादरी, बनारसी शालू, गुजराती पाटोळा, तंजावरी रेशीम, पंजाबी फुलकारी, काश्मीरी शाली आणि बंगाली कांथा इत्यादि सर्व प्रकार वस्त्रविभागात आहेत याशिवाय या विभागात आकर्षक 'कलमकारी' छपाईचे ठसे आहेत आदिजमातीच्या वस्त्रांचाहि बराच मोठा संग्रह येथें आहे लगतच्याच खोलींत जयपूर, राजस्थान, बंगाल व केरळ येथील संगमरवर, दगड, हस्तिदंत वगैरेंपासून पारंपरिक पद्धतीनें केलेल्या आकर्षक वस्तु आहेत पुढील दिवाणखान्यात भारतातील निवडक व उत्कृष्ट अशा धातूच्या कलात्मक वस्तु आहेत गुजरात आणि तंजावर येथील लाकडावरील कोरीव काम पाहून ही कला अजूनहि जिवंत असल्याची खात्री पटते त्यापुढील दिवाणखान्यात लाल मातीच्या वस्तु, नक्षीकाम केलेलीं चिनीमातीचीं भांडीं, जडजवाहीर आणि कागद कापून तयार केलेल्या नक्षीकामाचे नमुने आहेत मुखवट्यांचा एक संग्रह व दरातील कला आणि हस्तकलेचें स्वरूप दर्शविणाऱ्या नमुन्यांचा व छायाचित्रांचा एक मोठा संग्रह यामुळें येथील संग्रहात फार महत्त्वाची भर पडली आहे

**शैक्षणिक कार्य** . भारतीय कलेचीं व हस्तकलेचीं डिझाइन्स आणि वैशिष्ट्यें लोकप्रिय करणें हें संग्रहालयाचें ध्येय आहे संग्रहालयाच्या डिझाइन्स पुरविण्याच्या पद्धतीचा उद्देश भारतातील कापडधंद्यात डिझाइन्सचें महत्त्व वाढविण्याचा आहे संस्थेंत १०,००० पुस्तकें व ३०० नियतकालिकें असलेलें एक ग्रंथालय आहे संग्रहालयातील प्रदर्शनवस्तूंची माहिती करून देण्याकरिता इंग्रजीतून नावाच्या चिठ्ठया लावल्या आहेत. वस्तूंची मांडणी आणि हस्तकलेचें काम यासंबंधीचें प्रत्यक्ष शिक्षण देण्याकरिता ह्या संग्रहालयात कलकत्ता विश्वविद्यालयातर्फे संग्रहालयशास्त्राचे वर्ग चालविले जातात.

**प्रकाशनें** : ( १ ) भारतीय उद्योगकला संस्थेचें प्रकाशन, ( २ ) डिझाइन्स इन इन्डियन टेक्स्टाइल्स, ( ३ ) ५००० भारतीय डिझाइन्स व मोटिफ्स, ( ४ ) आर्ट फॉर एव्हरीवन व ( ५ ) क्रॅफ्टस् म्युझियम

**कामाचे तास** . शनिवार व रविवारखेरीज रोज सकाळीं १० ते दुपारीं ४ पर्यंत खुलें असतें

**प्रवेश** : विनामूल्य

**नियामक मंडळ** : हें संग्रहालय भारतीय उद्योगकला संस्था, कलकत्ता, ह्या संस्थेच्या नियंत्रणाखालीं आहे

**सेवकवर्ग** . संचालक–श्री अजीत मुकर्जी, तीन परिचारक व एक रात्रपाळीचा पहारेकरी

**आर्थिक तरतूद** . रु. २५,०००

**अभिप्राय** : संग्रहालय मध्यवर्ती ठिकाणीं असल्यामुळें प्रेक्षक बऱ्याच मोठ्या संख्येनें संग्रहालयास भेट देण्यास येतात हिंवाळ्यात होणाऱ्या, संस्थेच्या वार्षिक प्रदर्शनाच्या वेळीं सुमारें ३५,००० प्रेक्षक संग्रहालयास भेट देतात संग्रहालयातील प्रदर्शनवस्तु खरेदी, संशोधन व देणग्या या मार्गांनी मिळविल्या जातात

## ( ३ ) सरकारी औद्योगिक व वाणिज्य संग्रहालय

**स्थापना** . १९३९

**पूर्वेतिहास** : संग्रहालय १९३९ मध्यें स्थापन झालें डिसेंबर १९४४ मध्यें बंगाल सरकारच्या हुकुमानुसार हें संग्रहालय जनतेसाठीं तात्पुरतें बंद ठेवण्यात आलें होतें तथापि संग्रहालयाचें ग्रंथालय जनतेसाठीं खुलें ठेवलें होतें डिसेंबर १९४७ मध्यें संग्रहालय पुन्हा उघडलें आणि तेव्हांपासून तें व्यवस्थित सुरू आहे

**व्याप्ति आणि संग्रह** : संग्रहालयात अनेक प्रदर्शनवस्तु असून त्यापैकीं कांही खरेदी केलेल्या आहेत बऱ्याच वस्तु कारखानदारांकडून देणगीदाखल मिळाल्या आहेत दर्शकांना एका दृष्टिक्षेपातच एखाद्या उद्योगधंद्याची माहिती व्हावी म्हणून संग्रहालयाच्या भिंतींवर निरनिराळे तक्ते, नकाशे आणि भित्तिपत्रिका टांगलेल्या आहेत तसेंच दामोदर धरण योजना, भाताची गिरणी, चहाचा मळा, जंगल, कोळशाच्या डबराचें शुद्धिकरण-यंत्र, गंधकाम्ल यंत्र आणि मीठ कारखाना यांचे अनेक नमुने येथें मांडण्यात आले असून पश्चिम बंगालच्या उठावदार नकाशातून उद्योगधंद्यांचीं ठिकाणें आणि विजेचा विस्तार ह्या गोष्टी दाखविल्या आहेत

**शैक्षणिक कार्य :** संग्रहालयाच्या ग्रंथालयांत ६०० पुस्तकें व नियतकालिकें आहेत. संग्रहालयात एक मोफत वाचनालय असून ग्रंथालयांतील पुस्तकें तेथें घेऊन वाचण्याची लोकांना परवानगी आहे. संग्रहालयाला अंगतः जोडलेलें एक फिरतें प्रदर्शन असून तें खेड्यापाड्यांतून हिंडून चित्रपटांच्या सहाय्यानें खेड्यातील जनतेला माहिती पुरवितें. संग्रहालयांतील वस्तूंना बंगाली व इंग्रजींतून नांवांच्या चिठ्ठया लावलेल्या आहेत. व्यापार व उद्योगविषयक पुस्तकें वाचण्याकरितां आणि कच्च्या मालापासून तयार वस्तु बनविण्याच्या प्रक्रियेची माहिती मिळविण्याकरितां विश्वविद्यालयाचे तसेंच इतर शैक्षणिक संस्थांतील विद्यार्थी संग्रहालयांत येतात.

**प्रकाशनें :** नाहींत.

**कामाचे तास :** शनिवारीं दुपारीं, रविवारीं व सरकारी सुट्यांच्या दिवशीं संग्रहालय बंद असतें. त्याखेरीज रोज सकाळीं ११ तें संध्याकाळीं ६ पर्यंत खुलें असतें.

**प्रवेश :** विनामूल्य.

**नियामक मंडळ :** संग्रहालयाचा कारभार पश्चिम बंगाल सरकारच्या उद्योग संचालकांकडून पाहिला जातो.

**सेवकवर्ग :** मुख्य अधिकारी—श्री. पी. आ. मुखर्जी, ... संग्रहालयाध्यक्ष, सहाय्यक वार्ता अधिकारी, तीन कुमारी, ग्रंथालयाध्यक्ष, चित्रकार भांडाररक्षक, मदतनीस ३, यंत्रचालक, टंकलेखक, मेकॅनिक, प्रेषक आणि १४ शिपाई.

**आर्थिक तरतूद :** वार्षिक १,३८,००० रुपये.

**अभिप्राय :** संग्रहालय शोधोस्कर ठिकाणी असल्यामुळें तें पाहावयास जाणें सहज शक्य होतें. दररोज सरासरी ७६३ व दरवर्षी सुमारें १,१५,६२१ प्रेक्षक संग्रहालयाला भेट देतात. अधूनमधून भरविलीं जाणारी प्रदर्शनें आणि चित्रपटांचे कार्यक्रम यासारख्या विशेष प्रसंगीं प्रेक्षकांची संख्या बरीच जास्त असते. संग्रहालयाची इमारत सोयीची आणि प्रशस्त असली तरी राखीव वस्तूंसाठीं पुरेशी जागा नाहीं. निदान दिवसा तरी संग्रहालय पाहाण्याची व्यवस्था आहे. छायाचित्रें, ओतीव कृती आणि प्रतिकृती इत्यादींच्या विक्रीची कांहींहि सोय केलेली नाहीं. संग्रहालयांतील प्रदर्शित वस्तू मुख्यतः सरकारी व कारखानदारांनी दिलेल्या देणग्या या मार्गानें मिळविल्या जातात. नमुने, तक्ते आणि ओतीव कृतींचा भरपूर उपयोग केला जातो. संग्रहालयाच्या दिवाणखान्यात औद्योगिक आणि व्यापारविषयक वस्तूंचा प्रदर्शन विभाग उघडण्यात येणार असून ग्रंथालयांत नव्या पुस्तकांची बरीच मोठी भर पडणार आहे.

---